कै. दत्तोपंत आपटे-स्मारक ग्रंथ

# इतिहास : शास्त्र व तत्त्वज्ञान

[ नऊ नामवंत विद्वानांनीं कै. दत्तोपंत आपटे यांचे स्मृतीस वाहिलेली इतिहासचिकित्साविषयक निबंधाञ्जली ]



चित्रशाळा प्रेस, प्रकाशन विभाग, पुणें २.

किंमत सहा रुपये

एकमेव विक्रेते
चित्रशाळा प्रेस, प्रकाशन विभाग
पुणें २.

मुद्रक
एस्. व्ही. पोरे
चैतन्य प्रेस, ६९१ बुधवार
पुणे २

☆

☆ सदर ग्रंथ भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणें याचेकडेहि मिळेल.

☆ भा. इ. सं. मंडळाचे सभासद व कै. दत्तोपंत आपटे स्मारक मंडळाचे देणगीदार यास हे पुस्तक ५ रु. ८ आ. या किंमतीस मिळेल.

प्रकाशक
के. एस्. गुप्ते
६९१ बुधवार
पुणे २

☆

शक १८६९
इ. स. १९४७



*

इतिहास-संशोधक

# कै. दत्तात्रय विष्णु आपटे. बी. ए.



जन्म-मि. फाल्गुन शु. १३ शक १८०२, मृत्यु-मि. आश्विन व. १३ शक १८६५,
ता. १३ मार्च १८८१ ता. २७ ऑक्टोबर १९४३

# प्रस्तावना

कै. दत्तोपंत आपटे यांच्या चौथ्या स्मृतिदिनीं **दत्तोपंत आपटे स्मारक ग्रंथ** प्रसिद्ध करण्याचा योग येत आहे. खुद्द दत्तोपंतांच्या हयातींत त्यांना ६० वर्षे पुरीं झाल्याची संधि साधून अशा प्रकारचा ग्रंथ **दत्तोपंत आपटे गौरव ग्रंथ** म्हणून प्रसिद्ध करावा असा संकल्प होता. पण कै. दत्तोपंतांनीं तो हट्टानें सिद्धीस जाऊं दिला नाहीं. आपला सन्मान होऊं नये म्हणून ते धरणे धरून बसले व स्वतःच्या अंगावर दुखणे ओढून घेतले ! म्हणून जे तेव्हां शक्य झालें नाहीं ते आतां साध्य करीत आहोत. असे करण्यांत कै. दत्तोपंत व त्यांच्याबद्दल आदर बाळगणारे अशा उभयतांनींहि एकमेकांवर प्रेमानें विजय मिळविला व त्यांत इतिहासाची सेवा झाली.

या स्मारक ग्रंथाचें स्वरूप सामान्यतः स्मृतिग्रंथ प्रसिद्ध होतात त्याहून अमळ वेगळें आहे. असे ग्रंथ प्रायः संकीर्ण फुटकळ निबंधसंग्रह अशा स्वरूपाचे असतात. हा ग्रंथ तयार करतांना लेखकांचे सर्व निबंध इतिहासविषयक शास्त्रीय व तात्त्विक चिकित्सा किंवा समालोचन करणारे असावेत असा निर्बंध घालण्यांत आला. तो या निबंधलेखकांनी पतकरला हा त्यांचा थोरपणा आहे. कै. आपटे यांच्या स्मारकाच्या योजनेसाठीं जेव्हां जाहीर सभा भा. इ. सं. मंडळांत भरली तेव्हां अनेक कल्पनांबरोबर प्रा. माटे यांनीं ही एक सुचविली. मराठींत इतिहासावर शास्त्रीय दृष्टि ठेवून लिहिलेले चिकित्सक वाङ्मय कमीच आहे. कै. राजवाडे यांनीं आपल्या सहाव्या खंडास लिहिलेली प्रदीर्घ प्रस्तावना आणि ज्ञानकोशांतील विवेचन सोडलें तर विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा जवळ जवळ ७० वर्षांपूर्वीं प्रसिद्ध झालेला इतिहासावरील निबंध व कै. तात्यासाहेब केळकर यांचा 'इतिहासविहार' या नावानें प्रसिद्ध झालेला फुटकळ निबंधसंग्रह याखेरीज अशी विचिकित्सा करणारें ग्रंथरूप वाङ्मय प्रायः नाहीं. ( श्री. दातेकृत ग्रंथसूचि पृ. ८३९ पाहा ) महाराष्ट्रीयांनीं चालविलेल्या इतिहासाच्या अभ्यासांत हें एक अंग उणें राहून गेलें आहे. ऐतिहासिक घडामोडींची चिकित्सा व्हावी, इतिहासशास्त्र विषयक विचारप्रवाहाचा अभ्यास व्हावा, इतर देशांच्या इतिहासाचें तौलनिक ज्ञान व्हावें हें अवश्य आहे. आपणांत अजून अफगाणिस्तान, रशिया, चीन, तुर्कस्तान, जपान, जावा वगैरे जवळपासच्या देशांच्या इतिहासाचें स्थूल ज्ञान असणारेहि दुर्मिळच आहेत, ही स्थिति या पुढें चालणार नाहीं वगैरे अनेक विचार या प्रसंगीं सुचतात. कै. दत्तोपंत हे मराठ्यांच्या इतिहासाचें संशोधन करीत, तसेंच इतिहासविषयाची तात्त्विक चर्चाहि मोठ्या उत्साहानें

करीत, हे लक्षात घेऊन प्रस्तुतच्या स्मारकग्रंथास विशिष्ट वळणाचे स्वरूप दिलें आहे. स्मारकग्रथ योजनाबद्ध करावयाचा हा यत्न अभ्यासकास कितपत रुचतो हे त्यानी ठरवावयाचे आहे.

प्रस्तुतच्या निबधसग्रहात खुद्द कै. दत्तोपत आपटे याचे तीन छोटे निबंध आले आहेत. ते पूर्वी कधी प्रसिद्ध झालेले नाहींत. निबंधाच्या हस्तलिखितावर नावें नव्हती, ती सपादकानी दिली आहेत. हे निबध त्रोटक टाचणरूपच आहेत. कै. दत्तोपताचे अव्वल दर्जाचे लेखन ' दत्तोपत आपटे लेखसंग्रह ' या ग्रथात किंवा त्याच्या शिवभारताच्या व मुधोळ संस्थानच्या इतिहासास जोडलेल्या प्रस्तावनात सापडेल. त्यावरून दत्तोपताचें मोठेपण कळण्यासारखें आहे. प्रस्तुतचा स्मारक-ग्रथ वाचून झाल्यावर कै. दत्तोपंत हे इतिहासकाराच्या कोणत्या वर्गात बसतात हा विचार मनात येतो. इतिहाससंशोधनास बराच काळपर्यंत देशाभिमानाची बैठक होती. आपलें जुने असेल तें पहावें, प्रकाशावे, पूर्वजाचें पराक्रम प्रकाशांत आणावे, ज्या राष्ट्राला भूतकाल नाहीं त्यास उज्ज्वल भविष्य-काळ येण्याची आशा नको इत्यादि प्रकारच्या विचारानी काहीं एका पिढीतले विद्वान् पुढे सरसावले. कै. दत्तोपत या पिढींतले नव्हत. खूप वाचन करावे, अनेक साधने पहावींत, मराठीच काय, पण सस्कृत, इग्रजी, फ्रेंच, पार्शियन, डच, इ. देशी परदेशी साधने जीं असतील तीं उपलब्ध करून घ्यावीं, साधनाची जंत्री करावी, साराश ' गगनाएवढा उद्योग ' करावा, तो मनात घोळावा, व ' तिळाएवढे ' लेखन करावे असा कै. दत्तोपताचा स्वभाव असे. दत्तोपत हे वास्तववादी इतिहासलेखक होते. काढलेले अनुमान काटेकोर बिनचुक असावे, त्याचे आधार कोणते ते स्पष्ट सागावे, आपले दोष व इतिहासविषयक व्यक्तींच्या चुका प्राजलपणे सांगाव्या. नवी प्रमाणे सांपडल्यावर त्याच मुद्याची फिरून चर्चा करावी असा त्याना छद असे. ते स्वतः काम करीत व इतरास काम करावयास लावीत. तरुणास मोठेपणा देऊन त्याच्यांत आत्मविश्वास उत्पन्न करीत. या ग्रथांत एक निबध लिहिणारे प्रा. दि. वि. काळे, कै. दत्तो-पंताच्या अशा शिकवणुकीचा लाभ झालेले गृहस्थ आहेत. इतिहासाचा अभ्यास ही एकट्या दुकट्याने करण्याची बाब नाहीं, त्यासाठीं सस्था पाहिजे व अनेकाचें सहकार्य पाहिजे असे कै. दत्तोपताना वाटे व हे जाणून ते स्वतः अभ्यास करीत असता इतरास आपल्याबरोबर बोलावीत; पण त्याची वाट न पाहाता व ते न आल्यास त्याबद्दल राग न मानता आपलें काम चालू ठेवीत ! त्यांचें इतिहाससंशोधन हा सहकार्याच्या पायावर आधारलेला सामुदायिक वस्तुनिष्ठ सत्यसशोधनाचा सतत उद्योग होता.

कै. दत्तोपत आपटे हे वास्तववादी इतिहासकार आहेत असे वर म्हटलें आहे ते अधिक स्पष्ट करणे जरूर आहे. घटनेची विचिकित्सा व यथातथ्य

वर्णन हें करीत असतां घटनेंतून निघणारें पण घटनानिरपेक्ष असे प्रतिभाशाली सामान्य सिद्धान्त कै. दत्तोपंताच्या लेखनांतून सहजगत्या व संयमपूर्ण भाषेत आलेले आहेत. कै. दत्तोपंताच्या अंगीं कै. राजवाडे यांची उच्च कल्पनाशक्ति नव्हती व त्यामुळे त्यांनीं मांडलेल्या सिद्धांतात अपूर्वत्वाने येणारा आकर्षकपणा कमी आहे. न्या. मू. रानडे यांच्या 'मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष' या ग्रंथात दिसून येणारी प्रतिभासपन्न मीमांसा कै. आपटे यांच्या लेखनांत नाहीं. पण उपलब्ध घटनेवर आधारलेले व त्यावरून स्फुरलेले असे सिद्धान्त तत्त्वज्ञानाच्या वृत्तीने नम्रपणे पण असंदिग्ध रीतीने मांडण्यांत कै. दत्तोपंतांनीं मोठेंच यश मिळविलें आहे. सारांश, साधने जमवावीं, संस्था चालवावी, सत्कार्य करावे, सत्याची उपासना करावी, तत्त्वाचा शोध घ्यावा, तुलनेने बरेवाईट जाणून घ्यावें, परदेशस्थ इतिहासज्ञांचे तात्त्विक विचार समजून घेऊन आपल्या विचारांतील एकदेशीपणा घालवावा, अशी इतिहास–अभ्यासाची परंपरा कै. दत्तोपंत आपटे व त्यांच्याच जोडीला प्रा. दत्तोपंत पोतदार, या दत्तोपंत-द्वयांनीं घालून दिली. त्याबरहुकूम म्हणण्यासारखें मोठें काम महाराष्ट्रांत चालू आहे असे परमार्थानें म्हणवत नाहीं. तरुण अभ्यासक मराठ्यांच्या इतिहासाचा अभ्यास करण्यास पुढे येत नाहींत. विश्वविद्यालयाच्या अभ्यासांतून मराठ्यांच्या इतिहासास योग्य स्थान नाहीं. आतां महाराष्ट्र विद्यापीठ स्थापनेचा समय नजीक आला आहे तेव्हां या विचारास जोम येईल अशी आशा वाटते.

या निबंधसंग्रहांत कै. दत्तोपंतांच्या अनेक ऋणानुबंधी अभ्यासकांचे निबंध प्रसिद्ध होऊं शकले नाहींत. ते ते निबंध त्यांच्या नावावर जाहीरहि झाले. पण कोठें तरी कालमर्यादा घातली पाहिजे, त्या कालमर्यादेंत ते आले नाहींत. या कामीं चित्रशाळेच्या चालकांनीं मोठें सौजन्य दाखवून आम्हांस सभाळून घेतलें. निबंध हातीं येतील या आशेनें काम चालूं करावें, तों काम अर्धे ठेवावें लागे. त्यांत दिवसगत जात. त्यांनीं म्हणूनच ही कळ सोसली. कै. दत्तोपंतांचा त्यांचा थोर ऋणानुबंध, यामुळें हे सर्व घडलें. चित्र-शाळेचे आभार मानण्यास शब्द कमी पडतील. या निबंधसंग्रहाचें संपादकत्व प्रा. रा. पु. पटवर्धन यांनीं प्रारंभीं स्वीकारलें होते व त्याप्रमाणें त्यांनीं पहिलीं पहिलीं पृष्ठें कसोशीने पाहून दिलींहि, पण पुढे त्यांना पुण्याबाहेर जावें लागलें व त्यांनीं उरलेलें काम आमच्या स्वाधीन केलं, तें आम्हीं यथामति पुरें केलें.

या संग्रहांत प्रसिद्ध होणाऱ्या निबंधांच्या स्वरूपाबद्दल आम्ही कांहीं गुण विवेचन करण्यापेक्षां ते आहेत त्या स्वरूपांत वाचकांपुढे ठेवणें एवढेच आमचें काम समजून ते आम्ही करीत आहोत, प्रा. पुणतांबेकरांचा 'पाश्चिमात्य इतिहास-कारांच्या इतिहासविषयक कल्पना' हा निबंध हा एक त्या विषयावरील छोटासा ग्रंथच होय. या एकट्या निबंधाने प्रस्तुत ग्रंथाचा एक तृतीयांश भाग व्यापला

आहे. याच धर्तीवर फारशी इतिहासकाराच्या व संस्कृत, कानडी, मराठी वगैरे वाङ्मयातील इतिहासविषयक कल्पना यावर एक एक निबंध मिळविण्याचा यत्न केला. तो यशस्वी होता तर तसा इतिहासरूप खंड स्वतंत्रच प्रसिद्ध केला असता.

प्रा. पुणतांबेकराच्या निबंधात आलेले सिंहावलोकन मराठीत प्रथमच प्रसिद्ध होत आहे. प्रा. मावळंकर याच्या मूळ इंग्रजीत लिहिलेल्या निबंधाचा मराठीत तर्जुमा करताना भाषांतरकारांनी पुष्कळच परिश्रम घेतले, परंतु विषय अवघड, परिभाषा नवी, आधारभूत ग्रंथ व ग्रंथकार अपरिचित अशा स्थितीतहि भाषांतर बह्वंशी मूलार्थप्रतिपादक करण्याची त्यांनी खबरदारी घेतली व असे करताना भाषा काहींशी खडबडीत झाली तरी ती होऊं दिली. शास्त्रीय विवेचन करणारास मनोरंजक सोप्या व प्रवाही भाषेत लेखन करणे नेहमीच जमते असे नाहीं. या बाबतींत डायलेक्टिक्स या ग्रंथाचा लेख टी. इ. जॅक्सन याने तर शास्त्रीय विषय सोपा करूं पहाणारावर उघड उघड ताशेरा झाडलेला आहे (जॅक्सनकृत डायलेक्टिक्स, इंडियन एडिशन पृ. १० पाहा). सारांश अवघड विषय मांडत असताना निबंधकारांनी सोपेपणा डावलला असे क्वचित् दिसून आले तर वाचकांनी ते अपरिहार्य समजले पाहिजे, एवढेच आम्ही नम्रपणे सुचवूं इच्छितों.

शेवटीं, आभार मानण्याचे काम आनंदानें पुरे करतो. मुख्य आभार निबंध लेखकाचे. ज्यांनी अभ्यास व परिश्रमपूर्वक निबंध लिहून दिले त्याचे आभार किती मानले तरी ते थोडेच होणार. कै. दत्तोपंतासारख्या निरलस, उद्योगी, साध्या व सालस अभ्यासकाच्या गौरवास पूजार्ह अशीं हीं पुष्पे आहेत. तीं एकत्र बांधून त्याचा गुच्छ इतिहासाभ्यासकाच्या हातीं देण्याची जबाबदारी चित्रशाळेच्या विश्वस्तांनीं अंगावर घेतली. कै. दत्तोपंताचा चित्रशाळेशीं जुना ऋणानुबंध लक्षात घेऊन विद्यमान् विश्वस्तांनीं, आम्ही शब्द टाकताच हे काम अंगावर घेतले व वर सांगितल्याप्रमाणे गैरसोय सोसत असताहि आम्हास तिची जाणीव होऊ दिली नाहीं, यामुळे त्यांनीं जुना ऋणानुबंध नव्याने पुढे चालूं ठेवला असे झाले. या कामीं चित्रशाळेचे विश्वस्त, व व्यवस्थापक श्री. दामुअण्णा जोशी व श्री. वसंतराव देवकुळे याचे आम्ही मनःपूर्वक आभारी आहोत. चित्रशाळेतील श्री. यशवंतराव रानडे, जुळणीस श्री. पाटील, चित्रकार श्री. नाडगौडा ही मंडळीहि सहकार्यतत्पर आहेत. या ग्रंथाचीं मुद्रिते पहाण्यास श्री. ल. वि. गाडगीळ व सूचि तयार करण्यास प्रा. स. न. आठवले व श्री. भावे याचे बहुमोल साह्य झाले. ग्रंथात अशुद्धे राहिलीं, त्याचे शुद्धिपत्र शेवटीं जोडले आहे.

अशा रीतीने तयार झालेला हा ग्रंथ कै. दत्तोपंत आपटे याच्या पवित्र स्मृतीस अर्पण असो !

भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे ९–११–४७ } शं. ना. जोशी
रा. वि. ओतुरकर

# अनुक्रमणिका

## भाग १ ला

### इतिहासकारांच्या इतिहासविषयक कल्पना



## भाग २ रा

### संकीर्ण ऐतिहासिक निबंध

# दत्तोपंत आपटे स्मारकमंडळ

अध्यक्ष

महामहोपाध्याय प्रा. द. वा. पोतदार

उपाध्यक्ष

श्री. पां. के. शिराळकर

सभासद

श्री. सरदार ग. ना. मुजुमदार, श्री. ज. स. करंदीकर श्री. ना. गो. चापेकर, श्री. सि. वि. चित्रावशास्त्री, श्री. ब. द. आपटे

खजिनदार

श्री. धों. के. साठे

कार्यवाह

श्री. शं. ना. जोशी व प्रा. रा. वि. ओतुरकर

मंडळाचें कार्य

स्थिरनिधि रु. ५ सहस्र

ग्रंथप्रकाशन

१ दत्तोपंत आपटे लेखसंग्रह पृ. ३०० किं. ५ रु.

२ ,, ,, व्यक्तिदर्शन प्रा. शेजवलकरकृत किं. १२ आ.

३ स्प्रिंगेलकृत जर्मन भाषेंत लिहिलेल्या मराठ्यांच्या इतिहासाचें भाषांतर, इंग्रजी टंकलिखित प्रत भाषांतरकार—प्रा. र. ना. चापेकर एम्.ए.

४ आंग्रेकालीन अष्टागर श्री. शा. वि. अवळसकर

पृ. २०० किं. रु. ५

५ चिंचवड श्री. देवसंस्थानचा इतिहास

स्थूलनिरीक्षण—श्री. कृ. वा. पुरंदरे, मुद्रणार्थ सिद्ध

६ दत्तोपंत आपटे स्मारक ग्रंथ—इतिहास : शास्त्र व तत्त्वज्ञान

पृ. सं. ३०० किं. रु. ६

# पाश्चिमात्य इतिहासकारांच्या

# इतिहासविषयक कल्पना.

**"न हि मानुषात् श्रेष्ठतरं हि किंचित्"** महाभारत.

## प्रास्ताविक.

इतिहासाचें लेखन, आणि त्याचें संशोधन, संकलन व समीक्षण जितके पाश्चिमात्य ग्रंथकारांनीं उत्तम प्रकारें केलें आहे तितकें इतरत्र केलेलें सांपडत नाहीं. ग्रीक ग्रंथकार हेरोडोटस ( Herodotus ) याच्या वेळेपासून तें आतापर्यंत अनेक ग्रंथकारांनीं आपल्या इतिहासविषयक कल्पना विविध रूपानें व साकल्यानें मांडल्या आहेत. व त्या आपणास त्यांच्या इतिहासग्रंथांत,—त्यांत अंतर्भूत झालेले विषय, त्यांत योजलेली दृष्टि, त्यांत पत्करलेली रचना, क्रम इ.—अथवा त्यांनी केलेल्या इतिहासशास्त्राच्या—त्यांच्या संशोधन, संकलन व समीक्षणपद्धतीच्या—खास उहापोहांत सांपडतात. त्यांच्या इतिहासरचनेंतच त्यांची ऐतिहासिक पद्धति व त्यांचे ऐतिहासिक तत्त्वज्ञान, यांची माहिती प्रत्यक्षरूपानें मिळते. कांहीं मोठे इतिहासकार आपल्या कल्पना स्वतंत्र रूपानें मांडीत नाहीत. इतरांनीं इतिहास न लिहितां त्या तशा मांडल्या आहेत.

पाश्चिमात्य इतिहासकारांच्या कल्पनांमध्यें मानवाच्या वाढत्या संपर्कामुळें व कालानुसार मिळालेल्या अनुभवानुरूप बदल व वाढ झाली आहे. त्याचे टप्पे पुढीलप्रमाणें आहेतः—

१. प्राचीन ग्रीक व रोमन इतिहासकारांच्या कल्पना

२. पूर्वमध्यकालीन खिस्ती ग्रंथकारांच्या व इतिहासकारांच्या कल्पना

३. उत्तरमध्यकालीन शकावलीकार व बखरकार यांच्या कल्पना

४. प्राचीनविद्याकलांच्या पुनरुज्जीवन ( Renaissance ) कालांतील इतिहासकारांच्या कल्पना

५. धर्मसुधारणा व धर्मसंघर्ष ( Reformation व Counter-reformation ) काळांतील इतिहासकारांच्या कल्पना

६. नव्या प्रदेशांच्या शोधकालांतील ( Age of Geographical Discovery ) इतिहासकारांच्या कल्पना

७. बुद्धिवादी ( Rationalist ) इतिहासकारांच्या कल्पना

८. भावनावादी ( Romanticist ) इतिहासकाराच्या कल्पना

९. ध्येयवादी इतिहासकाराच्या ( Idealist ) कल्पना

१०. राष्ट्रवादी ( Nationalist ) इतिहासकाराच्या कल्पना.

११. उदारमतवादी ( Liberal ) इतिहासकाराच्या कल्पना

१२. विवेचक शास्त्रीय इतिहासकाराच्या कल्पना ( Critical Scientific School )

१३. नव्या इतिहासकाराच्या कल्पना. त्यातील अनेक मते ( New History School )

१४ समाजवादी इतिहासकाराच्या कल्पना. ( Materialist School )

ह्या सर्व इतिहासकारामध्ये एकाच पद्धतीचा आश्रय केलेला सापडणार नाही. त्याच्यामध्ये इतर कल्पनाचे थोडेबहुत मिश्रण झालेले सापडेल.



## १. वास्तविक पण राजनैतिक विचारसरणीचे

# (अ) ग्रीक इतिहासकार

खरे नावाजलेले इतिहासकार प्रथम ग्रीक लोकांमध्ये उत्पन्न झाले. आशियातील यवन प्रांतात ( Ionia ) व युरोपच्या ग्रीक देशात (Hellas) दोन मोठे इतिहासकार हेरोडोटस व थुसिडिडेस, यांचा जन्म झाला. इतिहास-लेखनाला अनुकूल परिस्थिति तेथे होती. बाह्य जगाबद्दल चौकस वृत्ति, गत-वृत्तांताची आवड, कथालेखनाची गोडी, प्रवासाचा शोक, माहिती गोळा करण्याची उत्सुकता व इतर लोकांच्या जीवनाबद्दल कुतूहल, इत्यादि गुण ग्रीक लोकांमध्ये प्रामुख्याने होते. त्यांची दृष्टि ऐहिक होती. त्यांना ऐहिक जीवन प्रिय होतें. ते पारलौकिक कल्पनांमध्ये फारसे गुंतलेले व फसलेले नव्हते. ते जिज्ञासु, चिकित्सक व व्यावहारिक वृत्तीचे होते. त्यांच्यामध्ये राजकीय जीवन, आर्थिक आकांक्षा, स्वातंत्र्यप्रेम, स्वराज्यरक्षा, नागरिक अधिकार, यांबद्दल प्रबळ आसक्ति होती. परकी सत्तेचा परमद्वेष व स्वतःच्या अधिकारांची व स्वाधीनतेची अनिवार्य हौस होती. त्यांना भोंवतालीं चाललेल्या सृष्टीच्या घडामोडींची व लोकांच्या हालचालींची जाणीव होती, आणि त्याबद्दलची माहिती योग्य अवलोकनाने व अभ्यासाने करून घेण्याची त्यांची प्रबळ इच्छा होती. या वृत्तीमुळे ते तत्कालीन सभोंवतालच्या जगाचा भूगोल व इतिहास आणि त्या-वेळचे देश व लोक, यांचे वास्तविक आचार व जीवन यांची विस्तृत माहिती मिळवीत असत, आणि सृष्टीच्या दृश्य घडामोडींचे व व्यापारांचे सूक्ष्म अवलोकन व परीक्षण करून, त्यासंबंधीं नियम शोधित असत. ग्रीक लोकांचा संपर्क व संघर्ष इतर सुधारलेल्या व सभ्य पौर्वात्य लोकांशी झाल्याने व त्यांच्याशीं झालेल्या दळणवळणाने, त्यांच्या बऱ्याच विद्या व कला घेऊन व अनेक प्रकारची माहिती मिळवून आपल्या विद्या, शास्त्रे व कला यांची वाढ केली. अशा प्रकारे गणित, वैद्यक, ज्योतिष, सृष्टितत्त्वज्ञान, इतिहास, भूगोल इत्यादिबद्दल बरेच नवे व व्यवस्थित ज्ञान मिळविलें, व अधिक उत्पन्न केले; आणि नवीं शास्त्रे रचलीं, व त्यांना उत्कृष्ट परंपरा घालून दिली. शिवाय त्यांच्यामध्ये गद्य लेखनकला उत्पन्न झाली, वास्तविक दृष्टि येऊन प्राचीन गूढगाथा व दंतकथा यांच्याबद्दल अविश्वास उत्पन्न झाला, आणि मानवी जीवनाच्या अनेक सामाजिक संस्था, समजुती, आचार व विचार यांच्या उत्पत्तीबद्दल व प्रकाराबद्दल जिज्ञासु वृत्ति दृढ झाली.

ग्रीकांचे जीवन एकंदर फार हालचालींचे व संपर्कांचे होतें. त्यांच्या वसाहती, व्यापार, व प्रवास या निमित्त होणाऱ्या हालचालींमुळे त्यांची शोध-वृत्ति, व वृत्तान्तवर्णनवृत्ति व तत्त्वान्वेषणवृत्ति ह्या वाढल्या. त्यांच्या बहुविध संपर्कांमुळे त्यांची दृष्टी व्यापक व वास्तविक झाली. विशेषतः इजिप्त लिडिया, असीरिया, पार्शिया इत्यादि देशांच्या संपर्कांमुळे त्यांचे मन सुसंस्कृत झाले, व त्यांचे व्यवहार व्यापक झाले.

### इतिहास-लेखनाचा उदय

ग्रीक इतिहासाचें प्राथमिक वाङ्मय ग्रीक कथाकाराच्या (logographer) लिखाणांत सांपडतें. त्यांचे स्वरूप मुख्यतः देवांच्या वंशावळ्यांचे, राजांच्या वंशावळ्यांचे व प्रसिद्ध कुलांच्या वंशावळ्यांचे होते. पुढे ते चरितावल्यांचे झाले. त्याबरोबर लेखकांचे लक्ष भूगोलवर्णन व लोकवर्णन यांकडे जात असे. ग्रीक लोकांमध्ये विश्वसनीय इतिहास लेखनाचा उदय इ. स. पू. ६ शतकाच्या अखेरीला झाला व पुढे त्याचे स्वतंत्र रूप व व्यापक क्षेत्र ठरले गेले. त्यांच्या Istoria शब्दाचा अर्थ नुसता प्रसंगवर्णन अथवा वृत्तांत असा नसून, त्यांत अंतर्भूत असलेले संबंध व ज्ञान शोधणे व समजणे असा होता. त्यांचे इतिहासकार नुसते कथा सांगणारे वर्णनकार नसून, त्यांतील अनुभव उलगडणारे रहस्यकार होते. त्यांनीं इतिहासाला साधनचिकित्सा, कालमापन, स्थलनिर्देश भाषासौष्ठव, लोकजीवनाचें महत्त्व, वीरांच्या कर्तृत्वाचें सूत्र, कार्यकारणमीमांसा युग-क्रमसरणी हीं दिलीं. वाचनानें, प्रवासानें, संभाषणानें, व अवलोकनानें माहिती मिळवून व ती संशोधनानें तपासून त्यांनीं आपले इतिहास साधनांचा उहापोह करून लिहिले. याप्रमाणे त्यांनीं इतिहासविद्येचा खंबीर पाया घातला. जिज्ञासू व शोधक वृत्तींवाचून व साधनांच्या उहापोहावाचून इतिहासाच्या संकलनाचा व समीक्षणाचा आरंभ होत नाहीं. ग्रीक इतिहासकारानीं प्राकृतिक परिस्थिति, सामाजिक संबंध, व लोकांच्या आकांक्षा, गुण व हालचाली यांच्या अनुरोधानें व आधारानें इतिहासविषयाची उभारणी केली. त्यांनीं आपला इतिहास लोकांच्या दृष्टीनें लिहिला. तो देवांच्या, राजांच्या, कुलांच्या अथवा व्यक्तींच्या गौरवार्थ लिहिला नाहीं. पण त्याबरोबर इतर लोकांबद्दल व देशांबद्दल—ज्यांच्याशीं त्यांचा संबंध आला आणि ज्यांची माहिती मिळविता आली त्यांची—त्यांनीं बरीच जुनी व समकालीन ऐतिहासिक, भौगोलिक, सामाजिक, राजकीय व धार्मिक माहिती मिळवून दिली. त्यांची दृष्टि व्यापक होती. त्यांनीं पौराणिक अद्भुत कथा, व दैवी गाथा व चमत्कार, यांना गौण ठरवून जे व जसे घडले ते सांगावयाचा प्रयत्न वास्तविक रीतीनें केला. त्यांनीं इतिहासाला उच्च वाङ्मयाचें रूप दिलें, त्यांच्या वर्णनामध्ये उत्तम व सरळ भाषाशैली वापरली. त्यांनीं साधनें तपासलीं व तोलून घेतलीं. त्यांच्या इतिहासाचें मुख्य क्षेत्र राज्यकारभार व

राज्यधोरण, राजकारण व राज्ययुद्धें हे होते, तरी त्याच्या अनुषंगानें त्यांत गुतलेल्या व सबध आलेल्या लोकाची, देशाची, व व्यक्तींची नानाप्रकारची ऐतिहासिक, भौगोलिक, सामाजिक व राजकीय माहिती सागितली.

होमर, हेसिअड, हेकाटेअस, व हेलानिकस, याच्या काव्यग्रथाचा, दंतकथाचा, देव–वीर चरितावल्याचा, कुलजाति वशावल्याचा, काल, क्रमावल्याचा व स्थलवर्णनाचा उपयोग जरी इतिहासरचनेला झाला, तरी त्याची दृष्टि पौराणिक गाथाकथात्मक स्वरूपाची होती. त्यामध्ये देव, दानव व मानव यांची अद्भुत कृत्ये, कलह व व्यवहार याबद्दलच्या काहीं काल्पनिक व परपरागत गाथा आहेत, व काहीं सर्गप्रतिसर्गाच्या कथा आहेत. त्याबरोबर काहीं ऐतिहासिक घटनाचे वृत्तातहि आहेत.

हेकाटेअस व हेलानिकस ( इ. स. पू. ६ वे शतक ) यानीं काहींसा इतिहास व स्थलवृत्ते रचण्याचा प्रथम उपक्रम केला. ते मोठे प्रवासी होते, व लेखकहि होते. त्याच्या इतिहासाचे स्वरूप लोकवृत्ते, कुलकथा, व वशावल्या, या प्रकारचे होते. पण त्यामध्यें प्रवासाने मिळालेल्या नव्या माहितीनुसार जुन्या वृत्ताताची आलोचनात्मक टीका होती. हेकाटेअस म्हणतो "I write what I deem true, for the stories of Greece are manisfold and ridiculous. हा आयोनिआमधील मिलेटस शहरी राहणारा होता. तेथेच ग्रीक शास्त्रे व गद्य उदयाला आलीं. त्याची सत्यान्वेषक व तुलनात्मक दृष्टि इतिहास रचण्याला उपयोगी पडली. त्यानी गद्यात ग्रथरचना केली. त्यामुळे इतिहास लिहिण्याला सुलभता आली.

ग्रीकाचे उत्तम इतिहासकार व श्रेष्ठ इतिहास हे महान् सकटकालाच्या अथवा मोठ्या युद्धाच्या प्रेरणेने सामान्यतः लिहिले गेले आहेत. तीं युद्धे गृहयुद्धे असोत अथवा परकी युद्धे असोत. हेरोडोटसच्या इतिहासामागे पर्शियाच्या आक्रमणाची प्रेरणा होती. त्याच्यापुढे लहान ग्रीसचा जय व महान् पर्शियाचा पराजय का झाला, हा प्रश्न होता. त्या यावनी इराणी युद्धाचे स्वरूप, त्याचा इतिहास, त्याने समाज व सस्कृति याची माहिती देऊन माडला, व त्याचीं कारणे, घटनाक्रम व परिणाम सागितले. थुसिडिडेसच्यापुढे गृहयुद्धाचा प्रश्न होता. त्याने ते का व कसे घडले हे सागितले. त्यामध्ये स्पार्टाचा जय व अथेन्सचा पराजय कसा झाला हे वर्णिले आहे.

तसेच वाल्मिकीचे 'रामायण' व होमरचे 'इलिअड' हीं परकीयाशीं केलेल्या युद्धाचीं वर्णने आहेत. व्यासाचे 'भारत' ही स्वकीयामध्ये झालेल्या गृहयुद्धाची स्मृति आहे. हे ग्रथ त्या काळच्या समाजाच्या सस्कृतींची, समजुतीचीं व संस्थाचीं चित्रे आहेत. त्यामध्ये जयापजयाची घटनाना अनुसरून कारण-

मीमांसा व परिणाममीमासा आहे. ‘ पोलिबिअस ’ चा ग्रंथ हा रोम व कार्थेज याच्यामधील परकीय युद्धाची कथा आहे. संत ऑगुस्तीनचा इतिहासाचा ग्रथ हा मध्यकालीन ‘ बर्बर ’ ( जर्मन ) टोळ्याचा आक्रमणाच्या इतिहासाचा धार्मिक निष्कर्ष आहे, पण तो खिस्ती धर्माच्या अतिम जयाच्या धार्मिक तत्त्वज्ञानाचे मडण आहे. इब्न खाल्दूनचे ऐतिहासिक ग्रथ व त्याना जोडलेली इतिहासाबद्दलची प्रास्ताविक तात्विक चर्चा, ही अरबाच्या स्वाऱ्याचे व साम्राज्याचे वर्णन व तत्त्वमीमासा आहे. मॅकिआव्हेचा ग्रथ तसाच इटलीमधील गृहयुद्धासबधी आहे. हेगेलचा ऐतिहासिक तत्त्वज्ञानाचा ग्रथ हा प्रशिआच्या उदयाने व फ्रेंच राज्यक्रान्तीच्या घडामोडींने प्रेरित आहे. मार्क्सची ऐतिहासिक मीमासा व दृष्टि व त्याचे ग्रथ हीं सर्व देशी व परदेशी चालू असलेल्या वर्गकलहाच्या व वर्गयुद्धाच्या प्रेरणेने प्रभावित आहेत. स्पेङ्गलरचा ग्रथ पहिल्या महायुद्धाच्या वेळच्या भूमिकेवरून लिहिला गेला आहे. टॉयनबीचा ग्रथ मोठमोठ्या सस्कृतीच्या उत्थानपतनाची, सपर्कसघर्षाची मीमासा आहे.

## हेरोडोटस

हेरोडोटसच्या वेळीं ( ४८४–४२५· इ. स. पू. ) पर्शिआचे महान् साम्राज्य होते. त्या सत्तेने ग्रीकाचा आयोनिया प्रान्त पादाक्रान्त केला होता व ग्रीस देशावर दोन स्वाऱ्या केल्या होत्या व त्या निष्फळ झाल्या होत्या. पर्शियाबद्दल ग्रीकाना भीति व कुतूहल ही दोन्ही होतीं, त्याच्या आक्रमणाची भीति व त्यांच्या वैभवाचे कुतूहल. त्यामुळे ग्रीक लोक इराणी साम्राज्यांत प्रवास करून तेथील देशाची, लोकाची, राजघराण्याची व इतिहासाची माहिती गोळा करीत व ती वृत्तातरूपाने लिहून ठेवीत. हेकाटेअसने व हेलेनिकसनें अशींच वृत्तें पर्शियाबद्दल व इतर सभोवतालच्या देशाबद्दल अशतः लिहिलीं होतीं.

हेकाटेअसच्या नंतर व हेरोडोटसच्या अगोदर ग्रीस–पर्शियाचीं दोन युद्धे झालीं. त्यामध्यें मिळालेल्या जयामुळे ग्रीक लोक राजकारणात व सस्कृतींत पुढे सरसावले. त्याच्यामध्ये नवे चैतन्य व नवा आत्मविश्वास उत्पन्न झाला. त्याना व्यापक दृष्टि आली. त्यामुळे त्याच्या इतिहासलेखनाला अधिक प्रेरणा मिळाली. त्याना पार्शियाबद्दल अधिक माहिती मिळविण्याची इच्छा झाली. त्याच वेळेस अथेन्समध्ये नवी धोरणे, नव्या घटना, नव्या आकाक्षा व सुधारणा आखल्या गेल्या. ह्या सर्वांचा परिणाम हेरोडोटसच्या मनावर झाला, व पुढे प्रवास करून, अवलोकनाने व सभाप्रणाने, व लिखित साधनाचा अभ्यास करून त्याने आपला ग्रीक-पर्शिया याच्या सबधाचा व युद्धाचा (५००-४७९ इ. स.पू.) प्रसिद्ध व प्रामाणिक इतिहास लिहिला. त्याला ग्रीकाचा ‘जय’ इतिहास म्हणता येईल. त्या मध्ये पार्शियाच्या साम्राज्यातील लोकाच्या इतिहासाची, संस्कृतीची

व स्वभावाची माहिती आहे. त्याचबरोबर ग्रीक नगरराष्ट्रांची व सभोवतालच्या सुसस्कृत व असस्कृत भ्रमणशील लोकाची व देशाची माहिती आहे.

हेरोडोटस हा राज्यकारभार व राज्यव्यवहार, राजधोरण व राजकारण, राजकीय भूगोल व राजकीय युद्धे, याबद्दल वास्तविक व स्वतत्र रीतीने लिहिणारा पहिला इतिहासकार झाला. त्याला ' इतिहासाचा पिता ' म्हणजे खरा आद्य ग्रथकार म्हणतात. त्याने जिज्ञासू, अन्वेषक व तुलनात्मक बुद्धीचा उपयोग करून ऐतिहासिक साधनाचे सशोधन केले, तीं गोळा करून त्याचे सकलन केले, व आपला आलोचनात्मक इतिहास लिहिला. त्याने जुनीं साधने आहेत तशींच वापरलीं नाहीत. प्रवासाने, अवलोकनाने, सभाषणाने नवी माहिती गोळा करून व पारखून तीं वापरलीं. सभोवतालच्या अज्ञात लोकाची व देशाची, त्याच्या चालीरीतींची, रहाणीची व इतिहासाची नवी सामग्री जमविली व आपल्या मुख्य वर्ण्यविषयाला धरून तिला उपयोगात आणून इतिहासाचे क्षेत्र व्यापक केले.

त्याचा मुख्य विषय जरी ग्रीक पर्शियाचीं युद्धे हा होता, तरी इतिहासाचे क्षेत्र त्याने नुसती समरभूमि अथवा नुसता राज्यकारभार, राज्यव्यवहार अथवा राज्यकारस्थान न कल्पून, भिन्न सस्कृतींचा सपर्क व सघर्ष असाहि समजून त्या दृष्टीने भिन्न प्रदेशाचे व लोकाचे अवलोकन व अभ्यास केला, आणि आपल्या इतिहासात त्यासबधीची व्यापक माहिती योग्य पद्धतीने गोवली.

त्याचा मोठेपणा त्याच्या व्यापक ऐतिहासिक दृष्टीमध्ये आहे. सभोवतालच्या बाह्य ग्रीकेतर जगाची परिस्थिति व इतिहास जाणण्याची, व त्याच्याशीं संबध आल्यामुळे ग्रीकाच्या इतिहासावर त्याचे झालेले परिणाम ओळखण्याची जिज्ञासा, हीच ग्रीक कथाकार ( logographer ) आणि ग्रीक इतिहासकार ( historiographer ) याच्या मध्ये होती. पर्शिया, बॅबिलोनिया, असीरिया, लिडिया, ईजिप्त, सिथिया, मॅग्नाग्रेसिया, इत्यादींची राज्ये व सस्कृति यानींच ग्रीक लोकाना प्रवासाची प्रेरणा व इतिहासाची जिज्ञासा उत्पन्न केली. त्यानीं आपल्या व त्या बाह्य सस्कृतींची व आचारविचाराची तुलना व परीक्षण केलें. त्याची जिज्ञासा व तुलनात्मक परीक्षण हींच त्याच्या नव्या विवेचनात्मक व तात्त्विक दृष्टीचे वैशिष्ट्य होय. ही दृष्टि दुसऱ्या लोकात सापडत नाहीं. हेरोडोटसच्या इतिहासाच्या कल्पना व गुण पुढीलप्रमाणें माडता येतील. इतिहास म्हणजे अनेक सस्कृतीचा सपर्क व सघर्ष याचे वर्णन व उलगडा, काल स्थल व समाज याना अनुसरून दाखविणे, त्यामध्ये प्राकृतिक परिस्थितीबरोबर लोकांच्या स्वभावाला व व्यक्तीच्या कर्तृत्वाला जागा देणे, तो निरपेक्ष वृत्तीने पूर्व मह

सोडून लिहिणे, त्याच्या रचनेंत जरी अनेक प्रकारचे प्रसंग व नानाविध विषय येतात तरी त्याच्या मुख्य विषयाला अथवा प्रश्नाला धरून इतिहासलेखनामध्ये एकसूत्रता ठेवणे. हेरोडोटसने अनेक उपकथा व उपाख्याने याच्या रूपाने बरीच भौगोलिक, सामाजिक व ऐतिहासिक माहिती दिली आहे, पण त्यामुळे त्याच्या इतिहासाचा मुख्य विषय व धागादोरा याना विकृति आलेली नाहीं. त्याच्या प्रत्येक भागामध्ये व्यापकता असून प्रमाणबद्धता, भव्यता व जिवतपणा आहे.

त्याची इतिहास लेखनशैली चित्ताकर्षक व मनावर छाप बसविणारी आहे. तिच्यामध्ये रचनासामर्थ्य मोठे आहे. त्याची भाषा सरळ, सुंदर व ओघवती आहे. त्याची वर्णने वास्तविक व सभाषणे उठावदार व प्रसगानुरूप आहेत.

त्याच्या ऐतिहासिक पद्धतीप्रमाणें वास्तविक घटना व अनुभव यांना सोडून असलेले दैविक व अद्भुत चमत्कार यावर विश्वास ठेवावयाचा नाहीं, जेथे पुरावा विरोधी प्रकारचा असेल तेथे ठाम मत द्यावयाचें नाहीं, मुख्य विषयाच्या व्यतिरिक्त पण सामाजिक, धार्मिक व भौगोलिक माहिती देण्याकरता त्याबद्दलच्या उपकथा सागावयाच्या. तो आपल्या पद्धतीबद्दल म्हणतो

"My duty is to report all that is said; but I am not obliged to believe it all alike, a remark which may be understood to apply to my whole story."

तो साधने गोळा करण्यात मोठा परिश्रमी व चौकस बुद्धीचा होता. त्याचा उपयोग त्याने प्रामाणिकपणाने केला. त्याने स्वमताचा पूर्वग्रह व राजकीय पक्षपात दाखविला नाहीं. जाणून बुजून खोट्या अथवा विपरीत रूपाने घटना सागितल्या नाहींत.

त्याला घटनाचे कार्यकारणात्मक क्रम व सबध व अंतिम रहस्य चागले सागता आले नाहीं. इतिहासाच्या चालू घडामोडीला व हालचालीला काय मूळ अथवा प्रधान, सामान्य अथवा विशिष्ट कारणे असतात, याची त्याला चागली जाणीव नव्हती. त्याने (nemesis) देवतेला दुष्कर्माबद्दल पारिपत्य करणाऱ्या न्याय-अथवा दड-देवतेला-त्याचे कर्तृत्व दिले आहे. तीच जयापजयाची कर्त्री त्याने धरली आहे. राज्याच्या व साम्राज्याच्या उदयास्ताच्या मागे वाईट कृत्याचा सूड घेणारी तीच अखेरची शक्ति आहे. इतिहासाचा मुख्य प्रवाह नीति-अनीतिरूपी कृत्याचा समुच्चय आहे. त्याचे नियमन करणारी ही न्यायदेवता आहे. हेरोडोटस मानवी जीवनाच्या नानाविध अंगाचे व घटनाचे, प्राकृतिक परिस्थितीचे, त्याच्या अन्योन्य संबधाचें व प्रति-

क्रियेचें परीक्षण करून आपली कारणमीमांसा व रहस्य यांची फोड करीत नाहीं. तो घटनाच्या मागे असलेल्या नुसत्या मानसिक भावना व हेतु यांचें दिग्दर्शन करतो. त्याच्या इतिहासात चमत्कार, शकुन, स्वप्ने, कौल, दैवीवाणी इत्यादीसबधीं भाविकपणा व श्रद्धा दिसून येतात. काहीं ठिकाणीं घटनाचे वर्णन परिणामकारी दाखविण्याचे उद्देशाने त्याने त्याना फुगवून सागितल्या आहेत. काही ठिकाणीं त्याचे घटनाच्या परिणामाचे अजमास मार्मिक नाहींत. त्याची कालगणना एक प्रमाणभूत शकगणना नसल्यामुळे चोख नाहीं. पण एकदर दृष्टीने त्याचा इतिहास एक सुसगत व सुरचित असा इतिहासग्रथ आहे. त्याने अनेक लोकाच्या इतिहासाच, समाजाचे व धर्माचे चित्र उत्तम माडले आहे. त्यामध्ये विद्वत्ता, बहुश्रुतता व दीर्घाभ्यास आहे. त्याच्यामध्ये मुख्य विषयाची एकता व अनेक कथोपकथाचीं अनुरूपता आहे. तेथे विस्काळितपणा नाहीं. त्याच्यामध्यें इतिहासाला आवश्यक असणारे घटनाच्या अपूर्वत्वाचे व विविधत्वाचें प्रसंगोचित वर्णन आहे. त्याच्यात प्रसग व परिस्थिति, लोक व व्यक्तिस्वभाव, याच्या चित्रणाची कुशलता आहे.* त्या काळातील प्रदेशाच्या सर्व ऐतिहासिक जीवनाचें दृश्य व रहस्य तो आपल्यापुढे ठळकपणे व प्रतिभेनें माडतो. त्याचे प्रतिपादन व विवरण परिणामकारी व कौशल्याचे आहे. त्यामध्ये वर्णनाचा व भावनाचा ओघ आहे, कृत्रिमपणा नाहीं. तो केवळ राजकारणाचा इतिहासकार नसून त्या काळच्या सस्कृतींचा इतिहासकार आहे.

## थुसिडीडेस.

थुसिडीडेस ( ४५६–३९६ इ. स. पू. ) हा दुसरा ग्रीसचा नामांकित इतिहासकार आहे. त्याने ग्रीकाच्या गृहयुद्धाचा ( ४३०–४०५ इ. स. पू. ) २५ वर्षांचा इतिहास लिहिला आहे. इतिहासलेखनाच्या दृष्टीने हा श्रेष्ठ इतिहासकार समजला जातो. त्याचा ग्रथ तर्कशुद्ध पद्धतीने घटनाचीं साधने पारखून प्रमाणबद्ध रीतीने लिहिला आहे. घटनाचीं योग्य पारख करून त्याचीं यथोचित माहिती देणे, त्याचे वास्तविक वर्णन करणें, आणि त्यातलि अर्थ व रोख पुन्हा प्राप्त करून देणे, हे तिन्ही गुण त्यामध्ये उत्कृष्ट होते.

त्याच्या इतिहासाचें क्षेत्र मात्र मर्यादित आहे. त्यामध्ये लढणाऱ्या ग्रीक राज्याचा केवळ राजकीय व सामाजिक इतिहास आहे; त्यात आर्थिक, सामाजिक व धार्मिक जीवनाचा समावेश नाही. तो हेरोडोटसच्या इतिहासासारखा व्यापक नाहीं. तो सस्कृतीचा इतिहासकार नाहीं. केवळ राजकीय

* चौथ्या पुस्तकातील सिथियन तरुण व ॲमेझॉन स्त्रिया याच्यातील प्रथम झालेला युद्धप्रसग व नतर घडून आलेले विवाहसबध, त्याचीं संभाषणे हीं बहारीचीं असून मुळातून वाचण्यासारखीं आहेत.

उलाढालींचा व घडामोडींचा वर्णनकार आहे. पण इतिहासलेखनाच्या व विवेचनाच्या दृष्टीने तो पूर्णतेला पोचला आहे. तो विसाव्या शतकाच्या शास्त्रीय पद्धतीने लिहिलेल्या इतिहासाच्या तोडीचा आहे. त्यामध्ये दैविक व भाविक कल्पनाना जागा नाहीं. अद्‌भुत, शकुन, चमत्कार, भाकित, याना थारा नाहीं. त्याची विचारसरणी व लेखनपद्धति आजही मान्य व्हावी अशी आहे. जे व जसें घडलें ते निःपक्षपाताने सागावयाचे, त्याला आधार मात्र पूर्ण व असंदिग्ध असला पाहिजे. साधनाची अतिशय काळजीपूर्वक तपासणी, आणि घटनाची व प्रसगाची खास चौकशी करून तावून सुलाखून त्या पत्करावयाच्या, नाहीं तर त्याज्य ठरवावयाच्या.

इतिहास हे खऱ्या घटनाचे व लोकस्वभावाचे वास्तविक व यथार्थ चित्र असले पाहिजे. थुसिडीडिसचा इतिहास बिनचूक व पक्षपातरहित आहे. तो आजहि मान्य व आधारभूत आहे. राज्याचा इतिहास सागताना त्याचा उद्देश राजाचे, राजमंत्र्याचे, राजपुरुषाचे व राजसभाचे कारभार व व्यवहार, कृत्ये व धोरणें सागणे, व त्याच्या मागील हेतु, आकाक्षा, ईर्ष्या, भय, व हितसबध याचे स्पष्टीकरण करणे हा होता. त्याच्या मते राज्ये हीं मुख्यतः लोकरक्षणाच्या शक्तिसस्था आहेत. त्यामध्ये उच्च नीतीची प्रेरणा व प्रभाव सामान्यतः दिसून येत नाहीत. राज्याची घडामोड मुख्यतः कलहामुळे व युद्धामुळे होते. तेव्हा त्याचाच विचार इतिहासाला प्रमुखपणे करावा लागतो, आणि राजकारणी व राजधोरणी पुरुषाच्या स्वभावाचे त्यामध्ये चित्रण करावे लागते. त्याने आपल्या इतिहासाचे क्षेत्र ग्रीक राज्याचा राजकीय इतिहास हेच घेतलें, व त्यातील युद्ध, वीर, मुत्सद्दी, धोरणे व सधि, याबद्दल माहिती सागितली. त्याची पद्धति म्हणजे आपण अलिप्त राहून जें व जसे घडले ते सागणे, त्यामध्ये भाग घेणाऱ्या व्यक्तींच्या कृत्यावरून घटना वर्णणे, आणि त्याच्या तोंडून परिस्थिति व धोरण वदविणे. तो घटनाचा उलगडा करण्याच्या भानगडीत पडत नाहीं, अथवा त्यातील प्रसगाची व धोरणाची गुणदोषचर्चा करीत नाहीं. तो म्हणतो, "I made the speakers say what the occasion demanded." त्याच्या लेखनपद्धतींतील भाषणाची योजना नाट्यशैलीची आहे. घटना, प्रसग व व्यक्ति याच्या कृतीवरून व भाषणावरून तो आपल्यास इतिहासाचा बनाव दाखवितो. तो घटनाच्या मागून जातो, घटना त्याच्या मागून जात नाहींत. मात्र त्याच्या मते घटना ह्या स्वतःच अर्थद्योतक होत नाहीत. नुसते मनुष्याचे हेतु व हितसबध समजले कीं, तेवढ्यानेहि त्या समजत नाहीत. मानवी जीवनाच्या गर्तीत काहीं अनपेक्षित योगायोग असतात, काहीं आकस्मिक प्रसग घडतात, काहीं अकल्पित विभूति उत्पन्न होतात. त्यायोगाने घटनाना नवे वळण मिळते. पण तो याबद्दल विवेचन करीत नाहीं. तो नुसते

बाह्य राजकारण व राजनीति घेऊन इतिहास लिहितो. तो आपलीं मते प्रगटपणे दर्शवीत नाहीं. इतिहासातील पात्राच्या ( actors ) संभाषणाच्या योगाने तो प्रथम घटनांचा अर्थ सांगतो, परिस्थितीचा व धोरणांचा उलगडा करतो, आणि व्यक्तींच्या अंतर्हेतूंचे व स्वभावाचे स्पष्टीकरण करतो. त्यामध्ये स्वतःच्या मताचा भाव अथवा कल कदाचित असू शकेल. पण तो घटना व व्यक्ती यांच्या द्वारे इतिहासाला बोलावयाला लावतो. उदाहरणार्थ अथेन्सच्या उदार लोकशाही समाजजीवनाचे व्यापक स्वरूप तो तत्कालीन पेरिक्लीसच्या तोंडून वदवीत आहे. राज्यांच्या उत्थानपतनामध्यें तो नीति व न्याय या कल्पनांना स्थान देत नाहीं. त्याचें व्यक्तींच्या कर्तृत्वाकडे व नेतृत्वाकडे ( The role of great men ) अधिक लक्ष आहे. त्यांच्याच कृतीने सर्व घडते. योगायोग कांहीं हा कोणी बाह्य दैवी शक्ति घडवीत नाही. तो म्हणजे भिन्न घटनांचे अवचित संबंध व संयोग होणे व त्यांचा परिणाम अकल्पित होणें. समकालीन इतिहासाचा वृत्तांत लिहिण्यात व मनुष्यस्वभाव रेखाटण्यात त्याचें कौशल्य अप्रतिम व बिनतोडीचें आहे. त्याला साधनांची पुरी माहिती होती व त्यावर प्रभुत्व होते. त्याची पद्धति बिनचूक अपक्षपाती व प्रसंगोचित होती. घटनांची रचना हीच त्याबद्दलची सूचकता, मत अथवा अनुमान समजावयाचें.तो म्हणतो "Men do not discriminate and are too ready to receive ancient traditions about their own as well as about their countries." तारतम्यविलोकन, सारासारभेद व योग्यायोग्य विचार याबद्दलची सूक्ष्म दृष्टि हाच ऐतिहासिक घटनापरीक्षणाचा मुख्य गुण आहे. तो त्याच्याजवळ चांगल्या प्रकारे होता.

त्यानें आर्थिक स्थिति व हित, सामाजिक हेतु आणि बाह्य परिस्थिती व तिचे संपर्क, यांच्या परिणामाचा विचार केला नाहीं. युद्धाशिवाय व त्यासंबंधींच्या धोरणाशिवाय ग्रीकांच्या राजकीय जीवनाच्या इतर अंगाचे त्याने चित्र काढले नाहीं. पण इतिहासकार या नात्याने गूढगाथा व दंतकथा यांना वगळून टाकलें, आणि इतिहासाचा संबंध क्रम व रचना वास्तविक व व्यावहारिक घटनांच्या अनुरोधानें केली. त्याची मुख्य कामगिरी म्हणजे ऐतिहासिक साधनांची सचोटी व वृत्तांताचा बिनचूकपणा यावर भर देणे, तो वृत्तांत विषयाला धरून असणें, आणि समग्र कथेच्या प्रवाहाला त्यातील सर्व तपशील अनुरूप असणे, ही होय. त्याच्या ग्रंथात इतिहाससाधनाच्या संशोधनाबद्दल खोल चर्चा आढळून येत नाहीं. त्याला शास्त्रीय व शोधक इतिहासाचा प्रस्थापक मानतात. शिवाय त्यानेच इतिहास हा उपदेशपर अथवा बोधपर असतो असे स्पष्टपणे सांगितले. तो म्हणतो:—" Accurate knowledge of what has happened will be useful, because according to human probability, similar things will happen again."

त्याची भाषा सरळ व प्रवाही आहे. पण दीर्घकाळाच्या इतिहासाच्या दृष्टीनें त्याला घटनाच्या यथार्थ स्वरूपाची व ओघाची जाणीव नव्हती. त्याने भौगोलिक परिस्थितीच्या परिणामाचा विचार केला नाहीं. ग्रीक सस्कृतीचे त्याने चित्र काढले नाहीं. त्यानें राजकीय व सामाजिक गोष्टीशिवाय इतर अगाचा विचार केला नाहीं. त्यानें केवळ मोठ्या व्यक्तीच्या कर्तृत्वास अनुसरून घटनाचा मुख्यतः अर्थ लावला. प्रोफेसर ब्यूरीच्या ( J. B. Bury ) मते " The work of Thucydides marks the largest and most decisive step that has ever been taken by a single man towards making history what it is today "

## पोलिबिअस

पोलिबिअस ( १९८–११७ इ. स. पू. ) हा तिसरा प्रसिद्ध ग्रीक इतिहासकार आहे. त्याने रोमन राज्याच्या जयाचा इतिहास लिहिला. त्यामध्ये कार्थेज व ग्रीस या राज्यसत्ताच्या पराजयाचा इतिहास आहे. त्याच्या इतिहासाच्या कल्पना उच्च व शुद्ध आहेत. तो शास्त्रीय वृत्तीचा इतिहासकार आहे. तो म्हणतो. " Directly a man assumes the moral attitude of a historian, he ought to forget all considerations such as love of one's friends, hatred of one's enemies He must sometimes praise enemies and blame friends. " थुसिडिडेसपेक्षा त्याचे ग्रथ प्रमाणानें अधिक आहेत. त्याच्यामध्ये अधिक खोलपणा आहे, आणि त्याच्यासारखाच ऐतिहासिक वृत्तात सागण्यात तो चोख व निःपक्षपाती आहे. घटनाचें वर्णन करण्यात, व्यक्तींचे स्वभावचित्रण करण्यात व राजकीय धोरणाचे विवरण करण्यात त्याची परीक्षणबुद्धि प्रगल्भ आहे. त्याने भौगोलिक ज्ञानावर व स्थलवर्णनावर भर दिला आहे. पण त्याची वर्णनशैली हेरोडोटससारखी सरळ व मनोरंजक नाहीं. त्याची व्यापकता मात्र त्याच्यासारखी आहे. त्याने त्या वेळच्या भूमध्यसमुद्राच्या सभोवतालच्या ज्ञात जगाचे व मुख्यतः ग्रीक–रोमन जगताचें वर्णन केले आहे. त्याबरोबर रोमचा जय आणि कार्थेजचा व ग्रीसचा पराजय हे कसें व का घडलें, याची मीमासा केली आहे. त्याच्या दृष्टीनें त्या काळात रोमचा उदय, जय व वर्चस्व ही जगाच्या इतिहासात एक महत्त्वाची व अपूर्व घटना असून, त्याचा विवेचनात्मक अभ्यास करणे व इतिहास लिहिणें हें इतिहासकाराचे आद्य कर्तव्य आहे. ह्या दृष्टीने त्याने रोमन लोकाच्या स्वभावाचे गुण, त्याच्या राजनीतीचें स्वरूप, त्याच्या सस्थाची रचना व त्याची एकता, या सर्वांचें चित्र उत्तम रेखाटले आहे. त्याच्या दृष्टीने रोमची वाढ व ऐश्वर्य हीं वाजवी होतीं. त्याच्यामध्यें शासन करण्याची योग्यता

होती. पण त्यानें हें रोमला मिळालेल्या जयावरून, त्याच्या राजसंस्थावरून व घडलेल्या राजकारणावरून ठरविले. त्याने झालेल्या परिणामावरून ही कारण-मीमांसा रचली, व आपली मते व अनुमानें सांगितली.

त्याच्या मते इतिहासाची कारणता प्रायः जरी (प्राकृतिक) व मानसिक असली तरी त्याशिवाय एक बाह्य अतिमानुष शक्ति आहे. ती घटनाचें नियमन करते, व त्याना आकस्मिकपणें नवें वळण लावते. रोमच्या जयाचीं कारणें नुसता त्याचा राजकीय स्वभाव व राजकीय संस्था नसून भवितव्यतेचाही दैवयोग त्याला अनुकूल होता. मात्र जेव्हा घटनाचा उलगडा साध्या ऐहिक कारणानीं होतो, तेव्हा भवितव्यतेकडे जाण्याची आवश्यकता नाहीं. त्याच्या दृष्टीने मानवीय जीवन केवळ एकाच नियमाने अथवा दैवगतीने चाललेलें नाहीं. त्यामध्ये मनुष्याच्या स्वभावाला, त्याच्या इच्छाशक्तीला, त्याच्या कर्तृत्वाला प्रधानरूपानें जागा आहे. इतिहासाची उन्नति व ऱ्हास याच्या कारणमीमांसेत त्याने सामाजिक व आर्थिक कारणापेक्षा नैतिक शक्तीला अधिक महत्त्व दिले आहे. इतिहासाचा क्रम व कल याबद्दल मात्र त्यानें कांहीं विचार प्रगट केले नाहींत. त्याचीं इतिहासाबद्दलचीं मते हीं 'एक मान्य निबंध' स्वरूपाचीं आहेत. प्रसिद्ध इतिहासकार रान्केच्या पूर्वी इतिहासकारांची इतिहासाबद्दल शास्त्रीय मते काय होतीं हें त्यावरून समजतें. पोलीबिअस म्हणतो:—" The science of history is threefold, first, the dealing with the written document and arrangement of the material thus obtained; second, topography, the appearance of cities and localities, the description of rivers and harbours, and, speaking gradually, the peculiar feature of the seas and countries and their relative distances, thirdly, political affairs. The special province of history is first to ascertain what the actual words used were, and secondly, to learn why it was that a particular policy or arrangement failed or succeeded. For a bare statement of an occurrence is interesting indeed, but not instructive, but when this is supplemented by a statement of cause, the study of history becomes fruitful. For it is by applying analogies to our own circumstances that we get the means and basis for calculating the future, and for learning from the past when to act with caution, and when with greater boldness, in the present. "

त्याची ऐतिहासिक पद्धति आजच्या पद्धतीशीं पूर्णपणे अनुरूप आहे. इतिहासाचे कार्य उपदेशाचे आहे. तो आपल्याला मानवी जीवनाचे कथारूपाने तात्पर्य सांगू शकतो. मात्र वृत्तांत खरा, योग्य व बिनचूक पाहिजे. तो म्हणतो:-
" If we write what is false, for our country's sake, or to please our friends or to win favour, and measure truth by utility, we shall discredit the authority of our works and be no better than politicians ".

ज्याना शास्त्रीय इतिहास म्हणजे काय हे समजून घ्यावयाचे असेल त्यांना पोलीबिअसची इतिहासाबद्दलची मते प्रेरणात्मक व मार्गदर्शक होतील.

* * * * *

## (आ) रोमन इतिहासकार

रोमन इतिहासकार ग्रीक इतिहासकाराच्या उच्चतेला पोहोंचले नाहींत. रोमचा इतिहास ग्रीकानींच प्रथम लिहिला व त्याची माडणी त्यानींच केली. रोमचें एवढे साम्राज्य, त्याची एवढी राजकीय कीर्ति आणि त्याच्या एवढ्या हालचाली असून सुद्धा, रोमन इतिहासकार ग्रीकाच्या तोडीचे व तोलाचे झाले नाहींत. त्याचे नावाजलेले दोनच इतिहासकार झाले. एक लिव्ही (Livy) व दुसरा तासितस (Tacitus). त्यानीं इतिहासलेखनाच्या कल्पना ग्रीकापासून घेतल्या. पण ते त्याच्या कोटीला पोंचले नाहींत. ग्रीकाची व्यापक दृष्टि, खोल बुद्धि व विवेचनशक्ति त्याच्यामध्ये नव्हती. त्याच्यामध्ये इतिहाससाधनाचे योग्य संशोधन, घटनाचे यथावृत्त वर्णन, व कारणाचे योग्य विवेचन सापडत नाहीं. त्यानीं इतिहासाबद्दल एकही नवी कल्पना अथवा पद्धत काढली नाहीं. लिव्हीने (Titus Livius इ. पू. ५९–इ. स. १७) रोमचा एक मोठा इतिहास लिहिला तो नुसता कथात्मक आहे. लिव्ही हा या दृष्टीने अतिशय नामांकित कथाकार आहे. त्याचे लक्ष केवळ रोमचा गौरव रगविण्याकडे होते. तो त्याने देशभक्तीने प्रेरित होऊन लिहिला. पण त्याची ऐतिहासिक किंमत कमी आहे. त्याने मूळ साधने फारशीं तपासलीं नाहींत, व भूगोलाकडे ध्यान दिले नाहीं. त्याच्यामध्ये घटना वर्णनाचे याथातथ्य, काटेकोरपणा व समतोलपणा नाहीं. तो भाषणानीं भरलेला आहे. त्याने साधनाच्या सचोटीकडे फारसे लक्ष दिले नाहीं. त्यामध्ये भाषासौंदर्य व भाषाचा प्रवाह याकडे फार लक्ष आहे. त्याची भाषाशैली चित्रमयी, चित्ताकर्षक व बलवान् आहे. तो वर्तमानातून गताकडे पाहत होता. त्याचा

उद्देश रोमन लोकाच्या प्राचीन वीरवृत्तींच्या व वीरकृत्यांच्या उदाहरणांनी रोमन तरुणाना देशभक्तीची प्रेरणा व प्रोत्साहन मिळावे असा होता. त्याला घटना घडून आणणारी भोवतालची बाह्य प्राकृतिक परिस्थिति, आतरिक मानसिक कारणता व हेतुना आणि सामाजिक अन्योन्यसंबंध याची योग्य जाणीव नव्हती. त्यानें इतिहासाच्या मागे काही सूत्र, शक्ति अथवा योजना असते याचा विचार केला नाहीं. त्याने बरेच चमत्कार, अद्भुत् गोष्टी व शकुन आपल्या इतिहासात वर्णिले आहेत. त्याच्यात अतिशयोक्ति आहे, प्रमाणबद्धता व शास्त्रशुद्धता नाहीं. इतिहासदृष्टीनें त्याचे मूल्य फार नाहीं.

रोमचा दुसरा इतिहासकार हा कॉर्नेलिअस **तासितस** (इ. स. ५५–१२०) होय. तो बुद्धीनें तीक्ष्ण होता. लेखक या दृष्टीने तो उच्च प्रतीचा होता. स्वभावचित्रे रेखाटणे व नीतिनिर्देश करणे ह्यामध्ये तो हातखंडा होता. पण इतिहासकार ह्या दृष्टीने तो उच्च कोटीला पोंचला नाही. त्यानें घटनाची निवड निरपेक्ष वृत्तीने केली नव्हती. त्याने साधनाचा जरी चागला अभ्यास केला होता, त्याला माणसाची जरी योग्य पारख होती, त्याची नीतितत्त्वाची समज जरी खोल होती, तरी त्याचा इतिहास स्वमताग्रहाने दूषित आहे. भाषा-शैलीकरता, व भाषासौंदर्याकरता त्याने यथावृत्ताकडे व यथार्थतेकडे दुर्लक्ष केले. त्यानें इतिहासाला वाङ्मयाचे स्वरूप दिलें. त्यानें व्यक्तींना, नीतीला आपल्या इतिहासपरीक्षणात मोठे स्थान दिले व परिस्थितीला गौण लेखले. त्यानें इतिहासाचे असे सूत्र अथवा तत्त्वज्ञान म्हणून काहीं बाधले नाहीं. त्याने दैवयोग अथवा भवितव्यता याचे स्थान काय याबद्दल निश्चित मत दिले नाही. मानवी कृत्याच्या व घटनाच्या मागील कारणे व हेतू मात्र सागितले. स्वभावाच्या चित्रणात व विश्लेषणात त्याचा हात धरणारा झाला नाहीं. साधने तपासण्याचा उद्योग त्याने फारसा केला नाहीं. त्याच्या मते इतिहासकाराने थोर मानवी कृतींची प्रशसा केली पाहिजे व नीच कृत्याची निदा केली पाहिजे. त्याने इतिहासाचे उच्च कार्य नीतिन्यायालयाचे आहे असे ठरविले. आपल्या नैतिक दृष्टीने त्याने रोमन घटनाचे व व्यक्तींचे परीक्षण केले. त्यामध्ये मानवी स्वतत्रतेचा त्याने पुरस्कार केला. पण तो रोमच्या खऱ्या कर्तृत्वाचा खोल अर्थ व त्या एकदर युगाचा आढावा काढू शकला नाहीं. त्याने नुसते माणसाचे स्वभाव, हेतु व कृत्ये तपासलीं व दाखविलीं. पण त्या काळच्या इतिहासाचे साधारण वळण व विशेष लक्षण सागू शकला नाहीं. त्याला इतिहासाच्या सामान्य ओघाची व घटनाच्या समन्वयाची कल्पना नव्हती. त्यामुळे घटनाची निवड व रचना करणे, त्याचे अर्थ व महत्त्व सागणें हीं त्याच्या हस्ते योग्य झालीं नाहीत. त्याने घटनातील गुतागुतीच्या संबधाची कार्यकारणमीमासा करण्याचा प्रयत्न केला नाहीं. मानवी नीतीच्या क्षेत्रामध्ये त्याने एक प्रकारची

इतिहासाची चक्रनेमिक्रमाची कल्पना आणली. तो म्हणतो:—" Perhaps there is in all things, a kind of cycle and there may be moral revolutions just as there are changes of seasons. Nor was everything better in the past. Our age too has produced many specimens of excellence and culture for posterity to imitate. "

* * * * *

## २. दैविक पण धर्मपंथीय विचारसरणीचे
## ख्रिस्ती इतिहासकार

ख्रिस्ती धर्माच्या प्रसारानें व प्राबल्याने युरोपमध्यें नवी धार्मिक क्रान्ति झाली. त्यामुळें ग्रीक रोमन संस्कृतीच्या विचारावर पाणी फिरले. त्याच्या आग्रही मतामुळे इतिहासाबद्दलची दृष्टि व कल्पना बदलल्या. त्याचे क्षेत्र व स्वरूप निराळे झाले. ख्रिस्त्याची दृष्टि केवळ पारलौकिक व आधिदैविक होती. त्यामुळे इतिहासाचे क्षेत्र समग्र ऐहिक घटनाचें वर्णन न राहून तें ख्रिस्ती धर्माच्या कल्पनाचा व कथाचा उदय, वाढ, हेतू व प्रसार होऊन बसले. त्यामध्ये धर्मसंघ व मठ, संत व महंत, धार्मिक गाथा आणि सृष्टिसर्गाच्या व प्रतिसर्गाच्या कथा, व तदनुरूप घटनाना प्रमुख स्थान मिळाले. जग हे केवळ गौण मानून ख्रिस्ती धर्माशीं व कथांशीं अनुकूल नसलेल्या अथवा बाह्य असलेल्या घटना त्याने त्याज्य ठरविल्या. इतिहास हा ख्रिस्ती धर्मप्रसाराचे साधन मानले गेले. त्याला अनुसरून त्याचे रहस्य ठरविले गेलें. त्यामध्ये मानवी स्वभावाचे व हेतूचे मापन नाहीं, सांस्कृतिक आचारविचाराचे दर्शन नाहीं आणि प्राकृतिक व सामाजिक परिस्थितीची जाणीव नाहीं. इतिहास हा ईश्वरी सूत्र व नेमानेम याचा कालस्थलामध्ये होणारा आविष्कार असा कल्पिला गेला. त्यामुळे इतिहासाचे इतिहासत्व गेलें. घटनाचे विवरण व त्याचा कार्यकारणसंबंध, व क्रमानुबंध त्या कल्पनेनुसार ठरविला गेला. केवळ ख्रिस्ती धर्ममताचा, दंतकथाचा, आख्यायिकाचा परिपोष करणें व त्याची श्रेष्ठता दाखविणे, हेच त्याचे कार्य होऊन बसले. त्यामध्ये ऐतिहासिक साधने तपासून खऱ्या घटना शोधून काढणें, त्याचे हुबेहुब चित्र तयार करणे, आणि नंतर त्याचा अर्थ लावणे हे बाजूला राहिले. शोधक व अन्वेषक दृष्टि नाहींशी झाली. केवळ ' बायबल'-मध्यें ग्रथित केलेल्या यहुदी लोकाच्या दंतकथा हाच जगाचा मुख्य इतिहास ठरला. हा ग्रंथ पवित्र व प्रेरित असल्यामुळे त्यातील साधने, वर्णने व मते विचाराच्या कसोटीला लावणे हे गर्ह्य समजलें गेले. ख्रिस्ती धर्माच्या मते जगा-

मध्यें जुने यहुदी लोक ही एकच पवित्र व ईश्वराची लाडकी जात आहे, आणि ख्रिस्ती मत हा एकच पवित्र व ईश्वराचा खरा धर्म आहे. तेव्हा त्यांचीं वर्णने व त्यानीं कल्पिलेल्या कथा हाच खरा इतिहास आहे. ख्रिस्ती धर्माच्या उदयात व प्रसारांत इतिहासाच्या ओघाची परिसमाप्ति आहे.त्यामुळे बायबलमध्ये दिलेलीं जगाच्या व मानवाच्या उत्पत्तीचीं वर्णने, त्यात सागितलेले कालक्रम, यहुदी लोकाच्या, राज्याच्या, राजांच्या व संतमहंताच्या आख्यायिका व चमत्कार, त्याचप्रमाणे येशू खिस्ताचे आगमन व चरित्र, त्याच्या घरचीं माणसे, त्याचे अनुयायी, त्याचे चरित्र व उपदेश, आणखी खिस्ती सताचीं चरित्रे व संप्रदायाची स्थापना व वाढ, या सर्वांचा इतिहास म्हणजे इतिहासाचे खरे क्षेत्र, ही इतिहासाची खास धार्मिक दृष्टि सत ऑगुस्तीन ( ५ वे शतक ) पासून ते ते बोसुए ( १७ वे शतक ) पर्यंत ख्रिस्ती धर्मपथीयामध्ये दिसून येते. इतर पंथ व मते ही सैतानाची करणी समजली गेली. ग्रीक रोमन सस्कृति ही असद्धर्मी मानली गेली व ते लोक मूर्तिपूजक म्हणून अपवित्र समजले गेले. त्याचे विचार व त्याचा इतिहास हीं त्याज्य ठरलीं गेलीं. मानवी विवेकाच्या जागीं दैवी श्रद्धा प्रमाणित मानली गेली. मानवी प्रयत्नाच्या ऐवजीं ईश्वरी प्रसादाला अधिष्ठान मिळाले. वास्तविक, वस्तुगत, घटनागत दृष्टि जाऊन, कल्पनागत व धर्मनिष्ठ श्रद्धेची दृष्टि आली. त्यायोगे जगाच्या उत्पत्ति, स्थिति व लयाबद्दल एक ठराविक ईश्वरी योजना मान्य होऊन त्याला धर्माचे स्वरूप आले. आाणि मानवी इतिहासाच्या कालस्थलक्रमाला त्या योजनेमध्ये बसविले गेले आणि त्याचे एक ऐतिहासिक तत्त्वज्ञान सुरवातीच्या ख्रिस्ती धर्माचार्यांनीं ( Fathers ) निर्माण केले. इतिहास हा ईश्वरी सर्गप्रतिसर्गाचा ख्रिस्ती मतानुसारे पौराणिक स्वरूपाचा गाथा झाला. सत आगुस्तीन ( इ. स. ३५४–४३० ) हा त्याच्या मधील मोठा धर्माचार्य झाला. त्यानें आपल्या "देवाची नगरी" ( City of God ) ह्या ग्रथामध्ये त्यानें ख्रिस्ती धर्मीयाच्या जगाच्या इतिहासाबद्दल कल्पना माडल्या. त्याने इतिहास असा मुळींच लिहिला नाहीं. बायबलाचा धर्मेतिहास व ख्रिस्ताचे धर्मतत्त्वज्ञान घेऊन त्यानें आपल्या ग्रथाची व इतिहाससरणीबद्दलच्या कल्पनांची मांडणी केली. त्यांना अनुसरून एक जगाच्या इतिहासाच्या मुख्य घटनाची व कालक्रमाची योजना ठरवून, त्याने इतिहासाच्या घटना मोडून तोडून त्यामध्यें बसाविल्या. यहुदी पवित्र ग्रंथांना अनुसरून त्यानें मानवी इतिहासाचीं सहा युगें ठराविलीं. त्यामध्ये सुरवातीला उत्तम सुवर्ण युग होते. नतर मनुष्याचे पतन ( Fall of Man ) झाले. पुढे येशु ख्रिस्ताचे आगमन झालें. ख्रिस्ती धर्माचा प्रसार झाला. अखेरीला ( Judgment Day ). पुन्हा असे सुवर्णयुग येईल व सर्व लोक सुखी व पुण्यशील होतील, असा भविष्यत्कालीन सर्व सुखाचा काल्पनिक काल त्याने कल्पिला, त्यावेळेस ख्रिस्ती धर्माचा विजय होईल. पण

यामध्ये जो इतिहासाचा क्रम व प्रवाह आहे तो दैवासुर संग्रामाचा राहील. येशु-खिस्ताची दैवी शक्ति व त्याचे अनुयायी व पंथ हा एक देववर्ग ( The City of God ) आणि इतर पंथ व त्याचे अनुयायी ( The City of Devil ) हा दुसरा असुर वर्ग; या दोन वर्गांच्या कलहाचा अथवा संघर्षाचा वृत्तांत व त्यामुळें घडणारीं सुखदुःखें हाच मानवी विकासाचा इतिहास, व त्यामधील अखेरचा खिस्ती धर्माचा जय हेच इतिहासाचे खरे सूत्र व रहस्य अथवा अंतिम हेतु व तत्त्वज्ञान. राष्ट्रांचे उदयास्त ईश्वराच्या हातीं आहेत, इतिहास हें त्याच्या ज्ञानाचें, सामर्थ्याचे व अंतिम जयाचे आविष्करण आहे. तोच मानवाचें अस्तित्व, जीवन व भवितव्यता यांचा कर्ता आहे. तो अद्भुत चमत्काराने, अलौकिक घटनाने व आकस्मिक योगायोगाने अथवा सामान्य नियमाने जागतिक जीवन चालवितो. या इतिहासाच्या कल्पनेमुळे इतिहासाचे क्षेत्र व्यापक झाले. त्यामध्यें भूत, वर्तमान व भविष्य एका सूत्रात बांधले गेले, व इतिहासाचा रोख काहीं उच्च मानवी व दैवी ध्येयाकडे नेणारा आहे असे कल्पिले गेलें. त्यामध्ये युगाची व प्रगतीची कल्पना घुसली. मानवसमाजामध्ये मूलतः व फलतः ऐक्य अथवा एकोपा आहे असे मत प्रस्थापित झाले.

या कल्पनांना व समजुतींना अनुसरून त्याकाळचे इतिहास लिहिले गेले. त्यामध्ये संघ व संत, मठ व महंत, धर्मपंथ व सण, इत्यादींचीं चरित्रे, कथा, शकावल्या, चरितावल्या, बखरी, आख्यायिका, तिथीवार टिपणे, जन्ममरण दिवसाच्या नोंदी वगैरे सांपडतात. त्याला खरा इतिहास म्हणता येत नाहीं. त्या काळचा इतिहास त्यावेळच्या लोकांच्या सामाजिक विचारांचा व धार्मिक श्रद्धेचा दिग्दर्शक आहे. तो विशिष्ट समजुतींनीं भरलेला व लिहिलेला आहे. त्यामध्यें वास्तविक घटनांचा कार्यकारणभाव व संबंधानुक्रम सापडत नाहीं. त्यातील वृत्तांत हे केवळ स्थानिक कृत्यांचे अथवा घटनांचे आहेत.

ह्या इतिहासकारांना ऐतिहासिक पद्धत नव्हती. त्यांनीं साधने शोधलीं नाहींत. तीं जमा केलीं नाहींत. त्यांचे वर्णन व विवेचन पक्षपाती व पूर्वग्रह-दूषित होते. त्यांची दृष्टीच वस्तुगत नव्हती, आत्मगत होती. पुष्कळ वेळा त्यांची माहिती चुकीची असे, आणि त्यांचे कालनिर्देश मनास वाटेल तसे केलेले असत. राजशक्ति व अर्थशक्ति, मनुष्य व परिस्थिति यांच्या प्रभावाचा व संबंधाचा तेथे विचार केलेला नाहीं. त्यांनीं आपल्या पवित्र ग्रंथातील वृत्तांत व प्रेषित माणसांच्या कथा, ह्या प्रेरित समजून त्यांच्या योगाने मानवी जीवनाचा अर्थ व ओघ दाखविण्याचें काम केलें. त्यांची पद्धत म्हणजे त्यातील सांगितलेल्या घटनांचा रूपक, दृष्टान्त व संकेत असा अर्थ घेऊन, त्यांचे अंतर्गत रहस्य अथवा नीति सांगावयाची. या रूपकपद्धतीचा उपयोग धर्माचार्यांनी केला. त्यांनीं इतिहासाचे दोन विभाग केले. एक धार्मिक व पवित्र; दुसरा प्रापंचिक व अपवित्र. धार्मिक

विभाग हा महत्त्वाचा. त्यातील गूढ व अद्भुत चमत्कार याचे वर्णन करणे व त्यातील खोल रहस्य सागणे, हाच महत्त्वाचा इतिहास. इतर प्रापंचिक घटना ह्या केवळ अनुषंगिक म्हणून अप्रस्तुत धरल्या गेल्या. प्रपच हा मनुष्याचें पतन समजला गेला. मानवाची उत्पत्ति सुमारें इ. स. पूर्वी ४००० वर्षांची (४००४ इ. स. पू. ) धरली गेली, व त्याच्या ऐहिक जीवनाची समाप्ति इ. स. नंतर १००० वर्षांची ठरविली गेली. **ओरोशिअसनें** ( Orosius इ.स.३८०–४२०) या प्रकारचा इतिहास लिहिला. तो सत ऑगुस्तिनचा शिष्य होता. त्याची धार्मिक इतिहासाची कल्पना व योजना घेऊन त्यानें मानवजातीच्या उत्पत्तीचा व ऐहिक जीवनाचा इतिहास ख्रिस्ती दृष्टीने व बायबलाच्या साहाय्यानें लिहिला. अशा प्रकारचे त्या काळातील सर्व इतिहास ख्रिस्तिधर्म, कथा व चमत्कार यांचें मडन करणारे आहेत. त्याच्या मते सर्व इतिहास येशु ख्रिस्ताच्या देवत्वाचा, पूर्णत्वाचा प्रेषित कार्याचा साक्षी आहे. त्याना आपल्या धर्माच्या मागील खोल व व्यापक अंगाचा विचार करता आला नाहीं. ते ईश्वरी कृपा व योजना यावर विसबून राहिले.

* * * * *

## ३. उत्तर मध्यकालीन लेखक.

उत्तरमध्यकालीन युगामध्यें सुद्धा इतिहास व ख्रिस्ती धर्मशास्त्र यामधील गुतागुत कायम राहिली. धर्मशास्त्राच्या अनुरोधाने सर्व ज्ञानाचें परीक्षण व माडणी केली गेली. त्यामुळे ज्ञानाच्या व विद्याच्या अंगोपागामध्यें एक प्रकारची पण एकागी एकता आली. धार्मिक अद्भुत चमत्कार, ईश्वर सैतान द्वंद्व, ख्रिस्ती व ख्रिस्तेतर कलह, ख्रिस्ती धर्माचा अखेरचा जय इत्यादि गोष्टींचा विश्वास कायम असून, त्याचा परिणाम इतिहासलेखकावर होत राहिला. ख्रिस्ती धर्माव्यतिरिक्त होणाऱ्या राजकीय, सामाजिक, आर्थिक व वैचारिक घटना व लोकाचे नवे नवे सबंध व सपर्क याकडे त्यांचे फारसे लक्ष गेलें नाहीं. ऐतिहासिक दृष्टि, पद्धति, परीक्षण, अन्वेषण त्यांच्यामध्ये नव्हते. ते धार्मिक प्रामाण्यबुद्धीने सर्व घटनाचा व जीवनाचा विचार करीत. त्याच्यामध्यें कारणमीमासा, साधनचिकित्सा, संभवनीय मत, आकस्मिक योगायोग व मानवी प्रयत्न याच्याकडे मुळींच लक्ष नव्हते. त्यामुळे इतिहासाचे स्वरूप विकृत झाले. उत्तरमध्यकालातील इतिहासाचे नवे लेखनप्रकार मुख्यतः शकावल्याच्या, बखरीच्या अथवा टिपणाच्या स्वरूपाचे होते. त्याची दृष्टि मात्र थोडी व्यापक झाली होती. ते धार्मिक घटना व गोष्टी याबरोबर त्याकाळच्या राजकीय, सामाजिक व इतर घटनांचें वर्णन अंशतः करूं लागले. काहींनीं त्यांच्या नोदीकडे अधिक लक्ष दिलें. त्यांचें सर्व लेखन सालवार नोंदीच्या स्वरूपाचें होतें. त्यानीं कांहीं अंशीं

मिळालेल्या साधनाचा उपयोग केला. अपक्षपात बुद्धि दाखविली. व्यक्तींच्या कृतींचे थोडेंबहुत चित्रण केले. त्यापैकीं मॅथू (पॅरिसचा इ. स. १२००–१२५९) व जॉ फ्रुआसार ( Jeau Froissart इ. स. १३३७–१४४० ) हे त्याकाळचे प्रसिद्ध इतिहासकार म्हणता येतील. त्यानीं धार्मिक समजुतींना व अद्भुत कल्पनाना बाजूस सारून, केवळ राजकीय गोष्टींचा इतिहास सागण्याचा प्रयत्न केला. फिलिप–द–कोर्मीनेस ( इ. स. १४४५–१५०९ ) हा त्या काळचा अखेरचा मोठा इतिहासकार झाला. त्याची बखर ( memoirs ) इतिहासाचे खरे स्वरूप पुष्कळ अर्शी दाखविते. त्याच्यामध्ये घटनाचा वास्तविक अर्थ समजण्याची आकलनशक्ति आहे. त्याला हेतूचे व भावनाचे खोल विश्लेषण करण्याची बुद्धि आहे. तो ऐतिहासिक गोष्टींची कार्यकारणमीमासा करूं शकतो. त्याला सास्कृतिक परिस्थितीचे वर्णन करता येते. त्याला तुलना करून सर्वसाधारण अनुमाने चोख रीतीने काढण्याची योग्यता आहे. त्याने इतिहासाचे राजकीय दृष्टया उपदेश अथवा तात्पर्यरूपी महत्त्व प्रतिपादिले आहे. मनुष्याचे स्वभाव व त्याच्या कृत्याचा परिणाम, याचा विचार त्याने केला आहे. त्याला पहिला आधुनिकवृत्तीचा इतिहासकार म्हणता येईल. मध्यकालीन इतिहासकारार्चीं सामान्यतः मुख्य लक्षणे म्हटली तर

( १ ) त्यानीं व्यवस्थित रीतीने इतिहासाचीं साधने जमा केलीं नाहींत.

( २ ) त्यानीं साधनसशोधनाचे ऐतिहासिक तत्र अथवा पद्धत निर्माण केली नाहीं.

( ३ ) त्याची दृष्टि धर्मसमजुतीची व अंधश्रद्धेची होती.

( ४ ) त्यानीं घटना केवळ कथोपकथाच्या रूपाने वर्णन केल्या होत्या. त्याच्या मागे असलेले सामाजिक, आर्थिक, राजकीय व वैचारिक सबंध व कारणें याचे त्याना आकलन नव्हते.

( ५ ) कांहीं बखरकारानीं मात्र तत्कालीन राजांचे, राजघराण्याचे, आक्रमक लोकसमूहाचे व त्याच्या हालचालींचे वृत्तात दिले आहेत.

## कांहीं जागतिक इतिहासकार

जागतिक इतिहासाची कल्पना खिस्ती धर्माच्या काळांत उदयाला आली. त्या धर्मामध्ये वाशिक कल्पना व राष्ट्रीय कल्पना मूलतः नव्हती. त्याची मानवसमाजाची आद्यन्ती कल्पना एकत्वाची होती. इतिहास एकत्वांत सुरूं झाला व तो पुन्हा अनेकत्वातून एकत्वाकडे नेत आहे, असे त्याच्या आचार्यांनीं पुकारले. त्याच्या अगोदर जागतिक इतिहासाच्या कल्पनेला पोषक अशा घटना म्हणजे अलेक्झँडरची साम्राज्यनीति, रोमन साम्राज्याची नागरिकनीति, स्टोआ पंथीयांची ( Stoics ) विश्वकल्पना व मानवी तत्त्वज्ञान, विश्वनागरिकत्व बंधुत्वाच्या,

व समतेच्या नीतिकल्पना, प्रांताप्रांतांमध्ये, देशादेशामध्ये व लोकालोकांमध्ये, वाढलेले संस्कृतीचे संपर्क व देवघेव, आणि व्यापाराचें दळणवळण व विनिमय. रोमन साम्राज्याच्या काळात जगाचा बखररूपी इतिहास लिहिण्याची प्रथा सुरू झाली.

दिओदोरस सिकुलुस (Diodorus Siculus इ. स. पू. ८०—२९ ) ह्या ग्रीक इतिहासकाराने जगाच्या इतिहासावर एक सामान्य रूपाचे ४० भागाचे पुस्तक लिहिले. हा प्रथमचा जगाचा इतिहासकार मानता येईल. त्याने प्राचीन इजिप्त व पौर्वात्य देश, ग्रीस, रोम व इतर अनेक देश, यांचा इतिहास सुरवातीपासून आपल्या काळापावेतो लिहिला. तो त्यावेळच्या सर्व ज्ञात जगाचा इतिहास ऑगस्टस सीझरपर्यंतचा आहे. मात्र तो बखरीच्या स्वरूपाचा आहे. त्यामध्यें घटनांचा कार्यकारणसंबंध दाखविलेला नाहीं. त्यामध्ये कोणतीहि केंद्रित कल्पना नाहीं, व घटनाक्रमाचा विचार नाहीं. त्यामध्ये रहस्योद्घाटनरूपी स्वतंत्र विचार नाहींत. भिन्न देशाचे इतिहास अलग लिहून एकत्रित केले आहेत. त्यामध्ये जुन्या लेखकांचीं अवतरणे दिलीं आहेत.

अशाच प्रकारचा दमास्कसच्या निकोलासचा (Nicholas-first century A. D.)विश्व इतिहास अनेक भागाचा आहे. त्यामध्ये असीरिया, लिडिया, ग्रीस, पर्शिया, यहुदी लोक, इत्यादींचा व समकालीन इतिहास आहे. पांपेइअस ट्रागूस (Pampeius Tragus) याने पौर्वात्य व ग्रीक जगाचा इतिहास रचला आहे. त्याच्यामध्ये जगाचे एकत्व व सततचा संबंध दाखविला. याखेरीज सेक्स्टस ज्युलिअस आफ्रिकानसने (Sextus Julius Africanus, 220 A. D. ) एक जगाचा इतिहास लिहिला आहे.

* * * * *

## ४. मानुषिक पण राजनैतिक विचारसरणीचे इतिहासकार

युरोपच्या पुनरुज्जीवनाच्या काळात ( Renaissance ) ग्रीक व रोमन संस्कृतीच्या पुनरपि प्राप्त झालेल्या साहित्याच्या प्रभावामुळे त्याज्य धरलेल्या व लुप्त असलेल्या विद्या व दृष्टी ह्या पुढे आल्या, आणि त्यामुळे इतिहासाची कल्पना व मांडणी पुन्हा वास्तविक व घटनाबद्ध होऊं लागली. येथून आधुनिक इतिहासलेखन प्रकाराला सुरुवात झाली. नवे इतिहासकार धार्मिक कल्पनेच्या व समजुतीच्या आधाराने इतिहास न लिहिता, सर्व प्रकारच्या ऐहिक व वास्तविक घटना घेऊन त्यांच्या परीक्षणाने व जुळणीने तो मांडू लागले. ऐतिहासिक घटनामध्येच इतिहासाचे संबंध व कार्यकारण शोधणे, व त्यांच्या उलगड्याकरता त्यांच्या बाहेर न जाता त्या घडून आणणाऱ्या व्यक्ती व परि-

स्थिति याच्या संपर्कानें उत्पन्न होणारे प्रसग व वृत्त याचे आकलन करणे, त्याकरता समकालीन लेखें, वृत्तान्त व माहिती याचेच अवलोकन करून त्यातील बिनचूक प्रसंग व यथार्थ घटना विचारांत घेणे, अशी त्याची पद्धत होती.

या नव्या दृष्टीला ऐहिक जीवनाची मानवी दृष्टि ( humanistic outlook ) म्हणतात. मानवी जविनाचे ऐहिक व्यवहार व हित, या गोष्टीकडे नव्या वृत्तीच्या लेखकाचे लक्ष जाऊ लागले. खिस्ती धर्माच्या विरक्त व कडक व्रताचा वीट येऊन ते लेखक मानवाच्या विचारात्मक, भावनात्मक व कामनात्मक गोष्टीकडे लक्ष देऊं लागले. त्यानीं काहीं नवे धार्मिक अथवा सामाजिक विचार माडले नाहींत. त्यानीं मानवी जीवनात अतर्भूत व खेळत असलेल्या सर्व भावनाकडे मात्र लक्ष दिले, व मनुष्याचे सपूर्ण मनुष्यत्व विचारात घेतले. या नव्या दृष्टीचा परिणाम इतिहासलेखनावर बराच झाला. इतिहासलेखक जुने लिखाण शोधून व तपासून जुळवू लागले, आणि अद्भुत चमत्कार इत्यादि वगळू लागले. ते ग्रीक रोमन इतिहास पुढे आणू लागले व त्याची इतिहासलेखनाची दृष्टि, तत्त्वे, शैली अनुकरू लागले. त्यानीं इतिहासाचे राजकीय क्षेत्र वाढविले आणि सास्कृतिक गोष्टीकडे लक्ष दिले. धर्मसमजुतींच्या पकडींतून इतिहासाला सोडविले, व त्याला ऐहिक जीवनाच्या वृत्ताताकडे वळविले. त्याचे दोष म्हणजे ते आपल्या त्या काळच्या हितसबधातून व अधिकारीवर्गाच्या कक्षेतून आपणास पूर्णपणे सोडवू शकले नाहींत. त्यामुळे त्याचे घटनाचे व परिस्थितीचे विवरण थोडेसे विकृत झालेले आहे. ते थोर राजे व राज्याधिकारी याच्या प्रभावातून व अवास्तव प्रशसेतून सुटले नाहींत. पुनरुज्जीवन काळाचे इतिहासकार मुख्यतः राजकीय विचार व नैतिक कल्पना यामध्ये गुतले होते. खास इतिहासलेखन हे त्याना गौण होते.

### मॅकियाव्हेली

मॅकियाव्हेली ( Machiavelli ) व गिकीआर्डिनी ( Guicciardini ) यानीं या नव्या दृष्टीप्रमाणे आपले इतिहास लिहिले व आधुनिक राजकीय व राष्ट्रीय इतिहासाची प्रथा निर्माण केली. निकोली मॅकियाव्हेली ( इ. स. १४६९–१५२७ ) हा मुख्यतः राजनीतिज्ञ होता. इतिहासाचा उपयोग त्याने आपली राजनीति व राजधोरण याकरता केला. त्याने इतिहासाच्या कारणमीमांसेत राजशक्तीला प्रमुख स्थान दिले. आणि इतिहासलेखनात राजकीय हालचाली व व्यवहार याचेच वर्णन केले. त्याने राजकीय जीवनाची ऐतिहासिक भूमिका उत्तम प्रकारें माडली. त्याला देशांतील व परदेशातील राजकारण, युद्धाच्या हालचाली व राजकीय घडामोडी याचे अन्योन्य संबंध व त्याबद्दलचे मर्म पूर्णपणें समजत होतें. त्याने आपल्या इतिहासाचे क्षेत्र व केन्द्र आपले राष्ट्र धरलें. त्याचा इतिहास राजकीय व्यवहाराचा व राष्ट्रीय दृष्टीचा होता. त्याने राजकीय घटनाचे

विश्लेषण उत्तम केले. त्याची कारणमीमांसा मनुष्याच्या मानसिक भावना व हेतु आणि परिस्थितीची पकड व परिणाम याला अनुसरून होती. त्यानें दूरच्या अथवा मूल कारणांचा उहापोह केला नाहीं. त्याने सालवार इतिहास ( annals ) लेखनाची पद्धत सोडून, विषयानुसार इतिहास लिहिण्यास सुरवात केली, व तो भाषासौंदर्याच्या दृष्टीने न लिहितां सरळ व वास्तविक रूपाने लिहिला.

फ्रान्सेस्को गिक्कीआर्डिनी ( इ. स. १४८३-१५४० ) ह्याचे लेखन अधिक ऐतिहासिक पद्धतीचें होते. त्याने आवश्यक घटना योग्य प्रकारे निवडून त्याचे वर्णन केले. इतर अननुषंगिक वृत्तान्त व गोष्टी त्याने घेतल्या नाहींत. त्याचे लेखन सरळ आहे. त्यामध्ये भाषासौंदर्याचे स्तोम नाहीं. त्याचा इतिहास राजकीय व्यवहाराचा आहे. त्याचे घटनावर्णन जोरदार व अपक्षपाती आहे. त्याचें घटनाविश्लेषण राजकीय रूपाचे आहे. त्याने व्यक्ती व त्यांचीं धोरणे याची चागली मीमासा केली आहे. त्यामध्ये त्याने रचलेलीं कारस्थाने व धोरणे याना विशेष महत्त्व दिले आहे.

* * * * *

## ५. धार्मिक पंथांचे पण जातीय विचारसरणीचे इतिहासकार

धर्मसुधारणा पथाच्या काळात ( Reformation ) इतिहासलेखन-पद्धति पुन्हा धार्मिक वळणावर गेली. मात्र त्यांच्या धार्मिक वादविवादामुळे इतिहास लेखनाला बरेच महत्त्व प्राप्त झाले आहे. खरा इतिहास जरी मागे पडला तरी, प्रत्येक धार्मिक पंथ आपले मत खरे व इतिहासाला धरून आहे आणि आपल्या विरोधक पथाचीं मते चुकीचीं व इतिहासास सोडून आहेत, असे दाखविण्याकरता जुन्या इतिहाससाधनाचे संशोधन करूं लागला. त्यामुळे त्याचे ऐतिहासिक साधनाचे ज्ञान व परीक्षण वाढले, व त्याचे लेखन-तंत्र सुधारले, आणि ग्रीक रोमन लोकाच्या, यहुदी व खिस्ती धर्माच्या, व जर्मन लोकाच्या गत इतिहासाची व वाङ्मयाची, त्याच्या ऐतिहासिक अवशेषाची व वस्तूंची चौकशी करणे व माहिती मिळविणे, हे मुख्य काम होऊन बसले. प्रत्येक धर्म व पथ, प्रत्येक देश व राष्ट्र, आपापल्या गत वैभवाची व गोष्टीची माहिती जुळवूं लागला. या पथापंथाच्या उत्कट वादविवादामध्यें व विरोधामध्ये इतिहास-संशोधनाची शास्त्रीय पद्धत उत्पन्न होऊ लागली. प्रत्येकजण दुसऱ्याकडून त्याच्या ऐतिहासिक विधानाबद्दल जुनीं प्रमाणे मागू लागला व आपल्या मताबद्दल जुनीं, प्रमाणें शोधून देऊं लागला, आणि दोघेंहि एकमेकांच्या प्रमाणाची छाननी करूं लागले. त्याकरता त्यानीं विपुल ऐतिहासिक साधने जमा केलीं, व त्याचे संशोधन केलें. १६ व्या व १७ व्या शतकात हे काम मोठ्या प्रमाणात झालें.

त्यांच्या इतिहासामध्ये मात्र धार्मिक कल्पनाचे व समजुतींचें प्राबल्य व प्रभाव राहिले.

मार्टिन लूथरच्या ( इ. स. १४८३–१५४६ ) मते इतिहास हा केवळ ईश्वराने दिलेला धडा आहे. त्याच्यामध्ये देवासुर सग्राम चालू आहे व अखेर देवाचा जय होणार आहे. या दृष्टीमुळें इतिहासाची वास्तविकता गेली, आणि तो एका धार्मीक समजुतीची कथा होऊन बसला. स्वधर्माचे कट्टे अभिमानी दुसऱ्यांचीं मतें इतिहासाच्या द्वारे खोटी दाखवू लागले व त्याकरता इतिहासाचा दुरुपयोगहि करू लागले. त्याचप्रमाणे जॉन नॉक्सचा (John Knox इ.स.१५०५-१५७२) इतिहास आहे. या धर्मसुधारकाच्या काळात १७ व्या शतकात जॅक बेनिन बोसुए ( Jacque Benigne Bossuet इ. स. १६२७–१७०४ ) नावाचा रोमन कॅथोलिक धर्मपथाचा अभिमानी इतिहासकार झाला. त्याने आपले मानवी इतिहासाचे विचार आपल्या 'जागतिक इतिहासाचे कथन' (Discourse on Universal History) या ग्रंथामध्ये ( १६८१ ) माडले. त्याच्या कल्पना सत ऑगुस्तीन व ओरोझिअससारख्या होत्या. पण त्या नव्याने व उत्तम प्रकारे त्याने माडिल्या. इतिहाससरणीच्या मागे ईश्वरी सूत्र आहे व ते खिस्ती योजनेप्रमाणे आहे, असे त्याने सागितले. त्याप्रमाणे ऐतिहासिक घटनाचा क्रम व योगायोग हे बाधलेले आहेत. त्याला अनुसरून प्रत्येक युगांतील अथवा कालखडातील रहस्य त्यातील सकेतावरून व चमत्कारावरून उलगडून दाखविले पाहिजे. नुसत्या वास्तविक घटना अथवा राजकीय क्रात्या बाह्यतः समजून उपयोग नाहीं. त्यातील लोकाचे कल, स्वभाव, व त्याच्या चालीरीती समजल्या पाहिजेत, व ज्या मोठ्या व्यक्तींनीं त्या घडवून आणल्या त्यांचीं चरित्रे समजलीं पाहिजेत, आणि या सर्व गोष्टींच्या व घटनाच्या मागें एक ईश्वरी योजना आहे, हे ओळखले पाहिजे, असे बोसुए प्रतिपादितो. त्याचा ग्रथ हा वास्तविक ऐतिहासिक वृत्तान्त नसून देवाच्या "कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम्" शक्तीचे एक दर्शन व उदाहरण आहे. तो खिस्तीधर्माचा उपदेश आहे.

बोसुए हा राजसत्तेचा पुरा अभिमानी होता. राजा हा दैवी अधिकारी आहे व प्रजेच्या दृष्टीने तो अनियत्रित आहे. तेव्हा इतिहासामध्ये धर्मसत्ता व राजसत्ता याचे प्राबल्य व प्रभाव त्यानें मानला आहे. त्याने आपला इतिहास जरी उदात्त धर्मभावनेनें लिहिला आहे तरी त्यामध्ये शास्त्रीय व तात्त्विक दृष्टि नाहीं आणि व्यापकता, गहनता, व वास्तविकता नाहीं. त्याच्या दृष्टीनें सगळ्या मानवी सामाजिक जीवनाच्या घडामोडी, साम्राज्याचे उदयास्त, राजकीय उलाढाली, आर्थिक हालचाली देवाच्या इच्छेप्रमाणे होत आहेत. तो आपली धार्मिक दृष्टीच ऐतिहासिक दृष्टि म्हणून वापरतो. तो केवळ खऱ्या धर्माच्या (खिस्ती धर्माच्या) विस्ताराचा काल-

क्रम दाखवितो. त्याचा मुख्य उद्देश आपल्या पंथाच्या धार्मिक व राजनैतिक समजुती इतिहासाच्या द्वारे खऱ्या म्हणून दाखविण्याचा प्रयत्न करणें हा होता. मानवी जीवन व मानव जात खिस्ती धर्माकडे एकसारखी ओढली जात आहे, असे सागण्याचा त्याचा हेतु होता.

ड्युक संत सिमाँ ( Duc de St. Simon इ. स. १६७५–१७५५ ) यानें बूर्बन राजाच्या वेळच्या फ्रान्सबद्दल लिहिले आहे. तो उत्तम इतिहासकार होता. त्यामध्यें खोलपणा व तात्त्विक विचारसरणी होती. जरी त्याची बारीक-सारीक माहिती बरोबर नसे तरी त्याचे दरबारी वृत्ताताचे व व्यक्तीचे चित्रण बिनतोड आहे. त्याचा ग्रंथ La Cour de Louis XIV. हा फार प्रसिद्ध आहे.

जुआन द मारिआना (Juan de Mariana इ. स. १५३५–१६२५) हा जेसुइट पंथी नामांकित राजतत्त्वज्ञानी व इतिहासकार झाला. त्याने स्पेनचा इतिहास लिहिला. त्यामध्ये राजकारण व इतर हालचालींबद्दल नैतिक विवेचन आहे. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात व अठराव्या शतकाच्या पूर्वार्धात फ्रान्स देशामध्ये इतिहासाची साधनें गोळा करण्याचे काम मुख्यतः पॅरिसमधील सत बेने-डिक्टच्या मठातील विद्वान् महतांनीं चालू ठेवले. तो मठ इ. स. १६१८ व १६३० मध्ये स्थापला होता. या इतिहाससशोधनातील परिश्रमी पुढारी जाँ माबियाँ (Jean Mabillon इ. स. १६३२–१७०७ ) हा होता. त्याने ऐतिहासिक लेखाचे प्रामाण्य ठरविण्याचे व त्याचे योग्य अध्ययन करण्याचे शास्त्र व पद्धत ( diplomatics ) निर्माण केली आणि पुष्कळ साधने व खऱ्या घटनाची माहिती गोळा केली. त्याच्या नतरची याबद्दलची प्रगति पुढे १९ व्या शतकात रान्के आदींनीं केली.

* * * * *

## ६. भौगोलिक शोधाच्या काळांतलि राजनैतिक इतिहासकार

केवळ राजकीय दृष्टीचा व राजकीय उलाढालीचा इतिहास हा ग्रीक रोमन ग्रंथकारापासून उत्पन्न झाला. त्यानींच भिन्न जातींच्या हालचाली, त्याची आक्रमणे, त्याच्या वसाहती, त्याची राज्ये आणि त्याच्या चालीरीती याचें वर्णन करण्याचा उपक्रम केला. त्याचबरोबर त्याचे वीर पुरुष व योद्धे आणि त्याची स्वतत्र राज्ये अथवा सामन्तरूपी सस्थानें याचाहि वृत्तान्त गोवला. अशी वर्णने आपल्याला रोमन व मध्यकालीन इतिहासकारामध्ये थोडीबहुत सांपड-तात. कोणत्याच इतिहासकाराला राजकीय उलाढाली व त्याचा प्रभाव वगळून चालणे शक्य नाहीं. त्या धार्मिक अर्थाने जरी उलगडल्या तरी त्यांचें वर्णन करणें व त्यांचा प्रभाव समजणें आवश्यक आहे.

१५ व्या शतकापासून साहसी लोकांच्या भौगोलिक शोधांमुळे उत्पन्न झालेल्या व्यापारिक व वसाहतिक संपर्काने जी नवी दृष्टि व माहिती मिळाली त्यायोगाने इतिहासाचे क्षेत्र अधिक व्यापक झाले. नुसत्या आपल्या धर्मांचा व आपल्या राज्यकृत्यांचा, युद्धाचा व व्यवहारांचा इतिहास लक्षांत न घेतां, इतर भिन्न लोकाचा व समाजाचा व त्याच्या सस्थाचा, चालीरीतींचा व राजकीय घडामोडीचा इतिहास नवे इतिहासकार लक्षात घेऊ लागले. त्यामुळे प्रवासानें, अवलोकनानें व संपर्काने मिळालेली नवी भौगोलिक, सामाजिक व राजकीय माहिती गोळा होऊं लागली. त्याचे लेखन साधारणपणे बखरकाराच्या वळणाचे राहिले, पण त्याची दृष्टि बदलली. आणि जेव्हा युरोपातील भिन्न राज्याची परिणाति राष्ट्रकल्पनेत होऊं लागली, तेव्हा या राजकीय व सामाजिक दृष्टीला जोर आला, व धार्मिक दृष्टि मागे पडली.

याच काळामध्ये ( १५ वे ते १७ वे शतक ) बेकन ( Bacon ) देकार्त, (Descartes) व लॉक ( Locke ) याच्यासारखे तत्वज्ञ आणि कोपेर्निकस ( Copernicus ) केपलर, ( Keplar ) गॅलीलियो, ( Galeleo ) याच्यासारखे शास्त्रज्ञ उत्पन्न झाले. त्यानीं आपली प्रत्यक्षरूपी अनुमानपद्धति व भौतिक विज्ञानपद्धति प्रस्थापित केली. त्याच्या मते सृष्टीचा क्रम व कार्य हे दैवी योजनेनुसार चालत नसून, सृष्टीनियमानुसार चालते, आणि ते नियम प्रत्यक्ष प्राकृतिक घटनावरून शोधणे व अनुमानणे, हे काम तत्त्वज्ञ व शास्त्रज्ञ याचे आहे. ही नवी विचारसरणी व अवलोकनदृष्टि जसजशी अधिक मान्य होऊं लागली तसतशी धार्मिक दृष्टि मागे पडू लागली. मानवी जीवनाच्या घटनावरून व अनुभवावरून मानवी इतिहासाच्या रहस्याची, क्रमाची, कार्यकारणपरपरेची अनुमाने काढावयाचीं, तेव्हा नवे भौगोलिक शोध व तेथील लोकाची माहिती, आणि नवी नैसर्गिक अथवा प्राकृतिक विचारसरणी, याच्या साधनाने इतिहासकार हे मानवी जिवनाच्या घटना, सामाजिक सस्था व समजुती, राजकीय घडामोडी व इतिहास प्रात्यक्षिक व बौद्धिक अनुमानपद्धतीने आकलन करूं लागले. ते पवित्र ग्रथाच्या प्रामाणिकपणाबद्दल व पवित्रतेबद्दल सशय प्रदर्शित करूं लागले, व त्यानीं सृष्टिचमत्काराचे तत्त्व अमान्य केले. त्याच्या मते सृष्टीचे व्यवहार व समाजाचे जिवन सृष्टिनियमानुसार व्यवस्थित चालतात. त्यामध्ये गति व वाढ आहे. ह्या कल्पना व्हीको ( Vico ), व्होल्टेर ( Voltaire ) व तुर्गो (Turgot) यानीं ग्रहण केल्या होत्या. नव्या भौगोलिक शोधामुळे व नव्या प्राकृतिक व सामाजिक विचारसरणीमुळें इतिहासाचे क्षेत्र नुसते धर्म व राजकारण न राहतां ते अधिक व्यापक झालें. त्यामध्यें सामाजिक, नैतिक व आर्थिक गोष्टींचा प्रवेश व समावेश झाला, आणि इतिहासाच्या विचारसरणींत बुद्धिवाद व प्रगतिवाद शिरला.

या प्रवृत्तीचा पहिला इतिहासकार जिओव्हानी बातिस्ताव्हीको ( Giovani Baltistavico इ.स.१६६८–१७४४) हा झाला. त्याने आपला "नवे शास्त्र" (Scienza Nuova) हा ग्रंथ १७२५ मध्ये लिहिला. तो या नव्या विचारसरणीनुसार इतिहासाचे शास्त्र बनवू पहात होता. त्याला इतिहासाच्या तत्त्वज्ञानाचा आद्य ग्रंथकार समजतात. त्याच्यामते इतिहासाच्या क्रमात तीन प्रमुख अवस्था आहेत. पाहिली दैवी, दुसरी वीरात्मक, व तिसरी मानवी. दैवी युगात मनुष्याच्या विचारात अद्भुत कल्पनेचें व ईश्वरसत्तेचे प्राबल्य असते. वीरयुगात काव्यकल्पनेचे व वीर सत्तेचे व कृत्याचे प्राबल्य असते, आणि मानवी युगांत प्रत्यक्ष ज्ञानाचे व मानवी प्रयत्नाचे अथवा राजकीय स्वातंत्र्याचे प्राबल्य असते. या तीन अवस्था चक्रनेमिक्रमाप्रमाणे वारवार येतात. पण पुनरावर्तनाच्या प्रत्येक वेळेला त्याचे स्वरूप त्याच प्रकारचे व थराचे नसते. ते प्रत्येक वेळीं नागमोडीप्रमाणे प्रगत होत जाते. या दृष्टीनें प्रत्येक युगाला महत्त्व आहे. मागचे युग पुढच्याची तयारी करते व त्याला प्रगतीची प्रेरणा देते. त्याने प्रगतीची कल्पना प्रथम इतिहासरूपानें माडली, ती सरळ रेषेप्रमाणे नसून, नागमोडीने होते. प्रत्येक मोडीच्या वेळेस ती पुढे जाते. इतिहासाच्या गतीचे सार युगायुगाप्रमाणे बदलणाऱ्या मानवाच्या सामाजिक मनात व कृत्यामध्ये आहे. व्हीकोने इतिहासाच्या घटनावरून एक तत्त्वज्ञान रचले. त्याने घटनाचा इतिहास असा लिहिला नाहीं.

* * * * *

## ७. बौद्धिक पण मानुषिक विचारसरणीचे इतिहासकार.

अठराव्या शतकात या बुद्धिवादी ऐहिक दृष्टीचे व नव्या ज्ञानयुगाचे प्रवर्तक मॉन्तेस्क्यू (Montesquieu ) व व्होल्तेर ( Voltaire ) झाले. त्यानीं इतिहासाबद्दलच्या खिस्ती धर्माच्या कल्पना टाकून दिल्या, नव्या शास्त्रीय इतिहासरचनेचे दार उघडले, व त्याचा मार्ग दाखविला. त्यानीं इतिहासाचा आधार व रहस्य इतिहासाच्या वास्तविक घटनाच्या व अनुभवाच्या बाहेर नसून त्याच्यामध्येच अतर्भूत आहेत, असे दाखविले. त्यानीं इतिहासाचे क्षेत्र व अगे वाढविलीं. त्यामध्ये आशिया व अमेरिका घेतली आणि मानवी जीवनाचीं सर्व अगे अतर्भूत केलीं. त्याची ऐतिहासिक दृष्टि केवळ बुद्धिनिष्ठ नसून मानवीय होती. नुसते धर्मपथ आणि राज्य याचेच व्यवहार व कारस्थान न घेता त्यानीं समाज, सस्कृति, सस्था, उद्योग, व्यापार, इत्यादींचे व्यापक वर्णन व वाढ हीं आपल्या इतिहासामध्ये सागितलीं आणि त्यासबधींचीं काहीं तत्त्वें रचलीं. त्यानीं ईश्वरी योजेनेचे मत पत्करले नाहीं. त्यानीं इतिहास समजण्यात प्रगतीची कल्पना व बुद्धिप्रामाण्य गृहीत धरले, व स्वाभाविक व नैसर्गीक कारणाना व नियमाना प्राधान्य दिले. त्याप्रमाणे घटना घडतात व प्रत्येक मानवी घटनेला निश्चित कार्यकारणसबंध आहे. इतिहा-

साच्या घटनेत व परिवर्तनात त्यानीं बौद्धिक शक्तीला महत्त्वाचे स्थान दिले. मनुष्याचा स्वभाव चोहीकडे मूलतः सारखा आहे. पण त्याच्या सामाजिक चालीरीतींमध्ये व व्यवहारामध्ये जे फरक दिसतात ते त्याच्या भिन्न भौगोलिक परिस्थितीमुळे होणारी भिन्न सामाजिक परिस्थिति ही निर्माण करते. मॉन्तेस्क्यूनें भौगोलिक परिस्थितीला महत्त्व दिले. व्होल्तेअरने हवा, राज्य व धर्म यांना मनुष्याचा स्वभाव बदलणाऱ्या तीन मुख्य शक्ति धरल्या. त्यानीं इतिहासाचें क्षेत्र जरी वाढविलें, तरी त्याच्या साधनाचे परीक्षण करण्यांत मॅबियाच्या पुढें पाऊल त्यानीं टाकले नाहीं. त्यानीं नुसती छापलेलीं साधने उपयोगात आणलीं. घटनाचे महत्त्व मात्र त्यानीं सामाजिक, तात्त्विक व मानवी दृष्टीने व्यापक रूपानें सागितलें. इतिहासाला त्यानीं उपदेशपर अनुभवाचे तत्त्वज्ञान मानले. त्याचें ज्ञान जरी वास्तविक स्वरूपाचे होते, तरी काहीं निश्चित नीतिमूल्ये गृहीत धरलीं होतीं. त्यानीं इतिहास सुदर व आकर्षक भाषेत रचले.

चार्लस् लुई मॉन्तेस्क्यूने ( Charles Louis Montesquieu इ. स. १६८९-१७५५) स्वतत्र असा इतिहास लिहिला नाहीं. पण त्याची दृष्टि व पद्धत फार महत्त्वाची होती. त्याने प्राकृतिक शक्तींचा, विशेषतः हवेचा, मनुष्याच्या बुद्धीवर होणारा परिणाम प्रमुख मानला आहे. शिवाय, त्याने भिन्न सामाजिक, आर्थिक व राजकीय अगाचा समुच्चयाने इतिहासाच्या वाढीवर कसा परिणाम होतो हे दाखविले आहे.

### व्होल्तेर

फ्रान्सुआ व्होल्तेर (Francois Voltaire इ. स. १६९४–१७७८ ) हा बुद्धिवादी मताचा पण मानवीय वृत्तीचा असा मोठा विद्वान् पुढारी होता. त्याची श्रद्धा बुद्धि व विज्ञान यावर होती. तो इग्रजी सास्कृतिक व राजकीय सस्थाचा चहाता होता. तो बुद्धिनिष्ठ टीकाकार म्हणून फार प्रसिद्ध होता. त्यानें आपले इतिहासग्रथ विषयवार रचिले, केवळ क्रमवार रचिले नाहींत. त्यानें इतिहासाच्या अनेक अगाचा उहापोह केला. राष्ट्राच्या समग्र जीवनाच्या वाढींतील मुख्य प्रवाह त्याने वर्णिला. त्याचे इतिहास ' चौदाव्या लुईचे युग ' व राष्ट्राच्या चालीरीती व वृत्ती याबद्दल निबध ( १७५६ ), हे ग्रथ व्यापक स्वरूपाचे, सर्वांगीण सस्कृतीचे आहेत. त्याने मानवी जीवनाच्या सर्वसाधारण वाढीमध्ये राजकीय इतिहासाचा आर्थिक व सामाजिक अंगाशीं योग्य संबंध दाखवून दिला. तो सर्वसाधारण व सर्वांगीण इतिहास लेखनाच्या दृष्टीने पहिला ग्रथकार धरला जातो. त्याने धार्मिक दृष्टीच्या इतिहासाचे पुरे खंडन केलें. त्यानें केवळ प्रान्तिक अथवा युरोपीय दृष्टि सोडून दिली. प्राचीन इतिहास व नवे सापडलेले प्राथमिक लोक यांची माहिती सांगितली. त्यानें प्राचीन ग्रीक रोमन काळांतील संस्कृतीचें व मध्यकालीन संस्थाचे, धर्मांचें व इतिहासकल्पनेचें स्तोम

माजविले नाहीं. धर्मसुधारणापथीयाच्या ईश्वरवादाचा व धर्मवेडाचा आपल्या प्रखर टीकेने त्याने धुवा उडविला. मनुष्ये कशीं रहातात, वागतात व विचार करतात, हे इतिहासाचे मुख्य काम आहे, असे त्याने सांगितले. त्याच्या दृष्टीने मानवी जीवनाचा इतिहासप्रवाह हा भिन्न संस्कृतींचा व युगकल्पनाचा संघर्ष व आविष्कार आहे. उदाहरणार्थ, यावनी संस्कृति विरुद्ध ख्रिस्ती संस्कृति, ख्रिस्ती-धर्माविरुद्ध इस्लामी धर्म, श्रद्धेविरुद्ध बुद्धिवाद, सत्तेविरुद्ध स्वातंत्र्यवाद. तो जहाल सुधारणावादी व प्रखर टीकाकार होता. त्याने दैववादाला बाजूला सारून घटना उलगडणे हे मनुष्याच्या विचारावरून व भावनावरून ठरवावे असे प्रतिपादिले. त्याकरता आपणास इतिहासाच्या बाहेर जाण्याची आवश्यकता नाहीं. मानवी संस्कृतीचा उदय, आविष्कार व क्रम दाखविणे, आणि मनुष्य मूढ स्थितींतून ज्ञानाच्या अवस्थेपर्यंत कसा गेला हे सांगणे, असा त्याने आपल्या सर्वसाधारण इतिहासाचा उद्देश धरला. आणि तो लिहिताना त्याने कोणत्याहि तात्त्विक कल्पनेचा, अथवा बाह्य व अंतर्गत, स्वाभाविक अथवा दैविक, नियमाचा आधार घेतला नाहीं. मानवी जीवनाच्या व्यवहारात कोणताहि सूत्रवत् नियम नाहीं. जर असलाच तर " इतिहास हा ' महाराज आकस्मितता ' याचे अधिकारक्षेत्र आहे. History is the domain of " La Majeste Hasard " असे सांगितले. प्रगति ही केवळ सतत घडणारी आकस्मिक घटना आहे. त्याच्या मते इतिहास विचारशील तत्त्वज्ञाने लिहावा Il faut e' crire l'histoire en philosophe. पण Daus l'histoire le detail c'est tout ( इतिहासामध्ये तपशील हाच सर्वस्व आहे ). त्याने इ. स. १७६५ मध्यें आपला ' इतिहासाचे तत्त्वज्ञान ' हा ग्रंथ लिहिला. त्यामध्ये मानवी जीवनाच्या वाढीचे नियम व क्रम असे मानलेले नाहींत. केवळ बुद्धीच्या साहाय्याने इतिहासाचे विवरण आहे. त्यामध्ये एखादी आग्रही विचारसरणी गृहीत किंवा निर्देशित नाहीं. त्याचा उद्देश भाविकपणा, भ्रामक समजुती आणि गूढ चमत्कार व कथा याना टाकून देणे असा आहे. इतिहासाच्या मागे एखादी बृहत् योजना आहे, असे तो मानीत नाहीं. प्रत्येक घटना खरी मानण्यास नुसते कोणा एकाचे वचन पुरे होत नाहीं, तर त्याला योग्य पुरावा पाहिजे. आणि मग घटनांची योग्य प्रकारे निवड केली पाहिजे.

इतिहासकाराचा उद्देश समाजाची प्रगति दाखविणे हा आहे. पण त्याचा शोध शास्त्रशुद्ध पद्धतीनें साधनाच्या साहाय्याने झाला पाहिजे. भौगोलिक परिस्थिति, धार्मिक कल्पना व राजकीय आकांक्षा याच्या योगाने इतिहास घडतो. मनुष्याच्या कर्तृत्त्वाने परिस्थितीवर झालेले परिणाम याचा अभ्यास केला पाहिजे. तो केवळ युरोपच्या दृष्टीने इतिहास लिहीत नाहीं, पण प्रगतीच्या नियमाच्या दृष्टीने सर्व मानवी इतिहासाचा क्रम तो मापू पहातो.

त्याची कार्यकारणमीमासा दैवगतीस अनुसरून नाहीं. तो जरी ईश्वरनिष्ठ असला तरी, धर्म अथवा इतिहास हा ईश्वरप्रणीत नाहीं, असें मानणारा तो होता. जग हें यंत्रासारखे आहे व त्याचे निश्चित नियम आहेत. ईश्वर हा यत्राच्या बाहेर आहे. तो केवळ यत्र तयार करतो व ते नियमानुसार चालू करतो. पण तो हे नियम अबाधित असणारे धरीत नाहीं. घटनाच्या घडण्यामध्ये स्वतंत्रता, आकस्मितता व दैवयोग आहेत, असें तो मानतो. इतिहास हा उपदेशपर आहे असे तो सागतो. त्याने आपल्या कारणमीमासेंत धार्मिक घटनाचा आणि त्यांच्या सामाजिक, नैतिक आणि राजकीय महत्त्वाचा विचार केला नाहीं. तो म्हणतो " My principal object is to know, so far as I can, the manners of peoples and to study the human mind. I shall regard the order of succession of Kings and Chronology as my friends, but not as the object of my work." इतिहासाची प्रेरक व नियामक शक्ति ही त्या वेळच्या व्यक्तींच्या वर्गाच्या व सस्थाच्या कल्पना ह्या होत. इतिहास हा मनुष्यांच्या विचाराचा, आकाक्षाचा, हेतूंचा, कल्पनाचा सघर्ष व हालचाल आहे. तो माणसाच्या प्रयत्नाने बनलेला आहे. त्यामध्ये स्वार्थवृत्ति व न्याय्यवृत्ति याचा कलह सापडतो. युगायुगामध्यें मोठमोठीं माणसें निपजतात व हा कलह मोडून समाजामध्ये नव्या न्याय्य व्यवस्थेची व नीतींची प्रस्थापना करतात. याप्रमाणें सस्कृति टिकते व वाढते. ऐतिहासिक घटनाच्या मागे राज्य व धर्म याचा प्रमुख प्रभाव असतो. त्याच्यामुळे मानवी कृतींना विशिष्ट वळण लागते.

व्होल्तेरच्या मते इतिहासकाराचे लक्ष मुख्यतः व्यक्तीच्या प्रयत्नानें व परिस्थितीच्या सयोगानें जे परिणाम व कार्य घडले आहे त्याचकडे गेले पाहिजे, आणी त्याना अनुसरून त्याने आपले इतिहासाचे वर्णन व विवरण केले पाहिजे. घटना निवडताना त्याने आपल्या विषयाचें व्यापक अवलोकन केले पाहिजे, आणि त्यातील महत्त्वाचे प्रसग व मोठ्या व्यक्ती याच्याकडे लक्ष दिले पाहिजे. गोष्टींना जरूरीपुरतें गौण स्थान दिले पाहिजे. तो म्हणतो. "The aim of the historian was to fix men's minds on the striking revolutions of history which have changed the manners and laws of great states. पण त्यानें मनुष्याचा स्वभाव सर्वकाळीं व सर्व ठिकाणीं सारखा धरल्यामुळें, त्याच्या इतिहासात भिन्न काळाच्या व ठिकाणांच्या घडामोडींसबंधीं फारशी भिन्नता दिसत नाहीं. मनुष्याच्या गुणात, स्वभावांत, कल्पनात, आकाक्षात व हेतूंत परिवर्तन होते, असे त्यानें मानलें नाहीं. त्यामुळें गतयुगाच्या इतिहासाचे त्याला योग्य चित्रण करता आलें नाहीं.

त्यानें सर्व इतिहास आपल्या १८ व्या शतकाच्या कल्पनाप्रमाणे व दृष्टीप्रमाणें परीक्षिला. घटना ग्राह्य ठरविण्याची त्याची कसोटी अशी दिसतेः—

(१) त्या स्वाभाविक आहेत काय ?
(२) त्या संभवनीय आहेत काय ?
(३) त्या युक्तीला व सारासार विचाराला पटतील अशा आहेत काय ?
(४) आणि त्या ग्राह्य धरण्यास पुरेसा खात्रीलायक पुरावा आहे काय ? पुरावा मात्र पारखून घेतला पाहिजे.

त्याचे इतिहास उत्तम प्रकारे लिहिले गेले आहेत. त्यामध्ये सुंदर वर्णन, प्रमाणबद्ध रचना, सगति व संबद्धता आहे. ते विश्वसनीय आहेत. तो लिहितो " My object is to depict to posterity not the actions of one man, but the mind of men in the most enlightened centuries. "
त्याने इतिहास हा बोधपर, नीतिपर व उपदेशपर आहे असें धरले व त्याप्रमाणे त्याचा उपयोग केला. त्याने काही तात्विक कल्पना ग्राह्य धरून इतिहासक्षेत्रात प्रवेश केला.

व्होलतेर व तत्सम लेखक याच्या मते पूर्वी जसे घडले तसे प्रामाणिकपणें वर्णन करणें एवढेच नव्हें, पण त्याचे आपल्या काळाच्या दृष्टीने परीक्षण करणे, त्याचे मूल्य ठरविणें व त्यातील सास्कृतिक दृष्टीनें स्मरणीय भाग कोणता ते दाखविणें. त्यांनी आपल्या प्रमाण धरलेल्या मूल्यानीं व मतानीं सर्व युगाचे, लोकाचे व घटनाचें मापन करून आपले इतिहास लिहिले. त्यानीं आपण रचलेल्या वर्तमानाच्या न्यायासनासमोर गताचे विवरण केले, व आपला निर्णय दैविक अथवा केवळ राजकीय दृष्टीने न देता तो ठाम धरलेल्या नैतिक व मानवहिताच्या दृष्टीनें दिला. इतिहासकाराचें कर्तव्य त्यानीं गत घटनाचा उलगडा करून त्याचें वर्तमानाच्या दृष्टीनें मूल्यमापन करणे असे मानले. इतिहासातून काहीं मानवी जीवनाचें तथ्य तात्पर्य निघाले पाहिजे व त्यानें काहीं मर्म सागितले पाहिजे असे त्यानीं प्रतिपादले.

### डेव्हिड ह्यूम

डेव्हिड ह्यूम ( David Hume इ.स. १७११-१७७६) हा ब्रिटनमध्ये अठराव्या शतकांतील नामाकित इतिहासकार झाला. तो बुद्धिवादी मताचा होता. त्याचा इतिहास व्यवस्थित वर्णनाच्या व साधनपाडित्याच्या दृष्टीने पाहिलें तर दोषयुक्त आहे. त्यानें इतिहास हा मुख्यतः मानवी जीवनाच्या वैचारिक व नैतिक कल्पनाचा वृत्तात आहे असें धरले आहे, आणि त्या कल्पना राजकारणाला कसे वळण

लावतात हे दाखविले आहे. तो मोठा तत्त्वज्ञ होता. त्यानें इतिहासाला तत्त्वज्ञानाचे स्वरूप दिले. त्यामध्ये त्याची विचारसरणी व नास्तिक दृष्टि महत्त्वाची आहे. तो रूढ ख्रिस्तीधर्माचा व भ्रामक समजुतींचा विरोधी होता. त्याने ईश्वरवादाला व अध्यात्मवादाला, कल्पनावादाला व भौतिकवादाला इतिहासाचे रहस्य उलगडण्याच्या दृष्टीने स्थान दिले नाहीं. मनुष्यांना मिळणारा अनुभव हाच नीतीचे व राजकारणाचे प्रश्न सोडवितो, व त्याच्याच योगें इतिहासाचा अर्थ लावला पाहिजे. इतिहास हा उपदेशपर व नीतिपर आहे. त्यातील अनुभव हा वास्तविक व प्रत्ययात्मक आहे. तो मतापेक्षा घटनांना अधिक महत्त्व देतो. पण त्याने प्राप्त होणाऱ्या सर्व घटनांचा विचार करण्याचा प्रयत्न केला नाहीं. महत्त्वाच्या घटना कशा निवडावयाच्या व त्या कोणत्या हे दाखविण्याचा मार्ग त्याने दाखविला नाहीं. नुसत्या बारीकसारीक गोष्टी सोडाव्या असे तो सागे, पण सतत संशोधन व मूल्यमापन केल्यावांचून महत्त्वाच्या घटना समजणे शक्य नव्हते.

अनेक कारणाचा साकल्याने विचार केल्यावाचून इतिहास समजणे शक्य नाहीं. आर्थिक परिस्थितीचाहि विचार केला पाहिजे. ह्यूमने तसे केले नाहीं. त्याच्यामते मनुष्याचा स्वभाव सर्वत्र मूलतः सारखा आहे. त्याच्या भिन्नत्वामागे कारणे काय आहेत याचा त्याने खोल विचार केला नाहीं. त्याने घटनाची निवड व उपयोग आपल्या मताला अनुकूल होईल अशा दृष्टीने केला. बारीकसारीक घटना घेऊन त्यांचे सशास्त्र तर्कवार व क्रमवार वर्णन व विवरण त्याने केलें नाहीं. त्याची ऐतिहासिक पद्धत आधुनिक नाहीं. तो काहीं गृहीत तत्त्वे अथवा कल्पना घेऊन चालतो, व त्याना अनुसरून त्याची कार्यकारणमीमासा आहे. त्याच्यामध्ये आकस्मित योगायोगाला जागा नाहीं. घटनेचे आपणाला कारण कळलें नाहीं कीं त्याला आपण आकस्मितता म्हणतो. त्याच्यामते खरे पाहिले असता सृष्टीमध्ये व मानवी· जीवनामध्ये घटनाचे पुनरावर्तन ( cyclical progress ) आहे व त्यामध्ये सारखेपणा व नियमितपणा आहे. तीच कारणे तेच परिणाम घडवून आणतात. ह्यूम म्हणतो The chief use of history is "only to discover the constant and universal principles by showing men in all variety of cirumstances and situations." त्याच्या दृष्टीने इतिहासातील मानव हा ठराविक स्वभावाचा आहे. ह्यामुळें त्याचे इतिहासाचे आकलन दोषयुक्त झालें आहे. सामान्य कारणपरंपरा तोडणारी कोणतीहि अपूर्व, अथवा आकस्मिक अथवा अयुक्तिक घटना तो मानीत नाहीं. प्रत्येक व्यक्तीला तो एक जातिवाचक ( typical ) स्वभाव आहे असे कल्पितो. स्थानिक व विशेष स्वरूपाच्या घटना अथवा स्वभाव सोडून, तो त्याचे सामान्य व साधारण प्रकार घेतो. त्यामुळें इतिहासाचे यथोचित दर्शन होत नाहीं. त्याचे चित्र कृत्रिम व अवास्तविक होते. त्याने केवळ

राजकीय घटनाकडे लक्ष दिले. इतर अंगाचा विचार व वर्णन केले नाहीं. त्याची भाषा प्रौढ आहे.

त्याची cyclical progress ची कल्पना अशी आहे: ' There is a point of depression as well as exaltation from which human affairs naturally return in a contrary direction and beyond which they seldom pass, either in their advancement or decline. " त्याला मोठा इतिहासकार म्हणता येणार नाहीं. त्याच्या महत्त्वाच्या घटना नेहमींच खऱ्या घटना नसत. त्याने दुय्यम प्रतीच्या साधनाचा उपयोग केला आहे.

त्याच्या मते ' Mankind is so much the same in all times and places that history informs us nothing new or strange in this particular. ' ' The same motives always produce the same actions, the same events follow from the same causes.' यावरून इतिहासामध्ये एकता व सारखेपणा आहे, व त्यामध्ये पुनरावृत्ति आहे, असे त्याचे मत व्यक्त होते.

### रॉबर्टसन

विल्यम रॉबर्टसन ( William Robertson इ. स.१७२१-१७९३) हा बुद्धिवादी तात्त्विक मताचा होता. त्याची हकीकत खरी व बिनचूक असे. तो साधने चोखपणे तपासून वापरी. त्याची विद्वत्ता मोठी होती. तो निःपक्षपाताने लिही. त्याची वास्तविकता वाखाणण्यासारखी होती. त्याचे वर्णन सरळ, स्पष्ट व जोमदार असे. त्यामध्ये अतिशयोक्ति नसे. त्याचे अवलोकन व आकलन व्यापक असे. तो विषयाशीं सबद्ध असणारी हकीकत घेऊन ती कुशलतेने मांडीत असे. त्याचीं अनुमाने पद्धतशीर असत. त्याचे अर्थ विवरण तात्त्विक पद्धतीचे होते. मात्र तो साधनाचा स्वतत्र शोध व सशोधन करणारा नव्हता. पण त्याचे साधनाचे ज्ञान व परीक्षण उत्तम होते. त्याला खऱ्या घटना समजून घेण्याची आवड होती. तो १८ व्या शतकातला श्रेष्ठ प्रतीचा इतिहासकार आहे. त्याच्या मतें " to relate real occurrences and to explain their real causes and effects is the historians peculiar and only province. " तो इतिहासाला बोधपर व नीतिपर मानतो. तो म्हणतो "It is not only by attending to any one single cause or principle how powerful and extensive so ever its influence may appear, that we explain the actions or account for the character of men. " तो प्राकृतिक व आर्थिक परिस्थितीपेक्षा सामाजिक व तात्त्विक विचाराना अधिक महत्त्व देतो.

### एडवर्ड गिबन

एडवर्ड गिबन ( Edward Gibbon इ. स. १७३७–१७९४ ) हा त्यावेळचा सर्वात प्रसिद्ध इतिहासकार झाला. Decline and Fall of the Roman Empire हा त्याचा प्रसिद्ध ग्रंथ होय. त्यासाठीं प्राप्त असलेलीं सर्व साधने त्याने तपासलीं व आपला वृत्तांत बिनचूक मांडला. तो मोठा विद्वान् होता. त्यानें प्रत्येक जरूरीचा विषय व घटना योग्य रीतीने तपासली. सर्व प्रकारचे संबंधित विषय व प्रासंगिक गोष्टी त्याने सविस्तरपणे गोळा केल्या. त्याचें अवलोकन काळजीयुक्त व बिनचूक असे. तो तात्त्विक मताचा होता. त्यामुळे केवळ वृत्तातालाच तो प्राधान्य देत नसे. तो घटनामधील कार्यकारणाचा दुवा ओळखणारा होता. त्याच्या मते इतिहास हा केवळ दैवाचा खेळ नसून त्यामध्ये कार्यकारणभाव, अनुक्रम व अनुसधान आहे. सर्व घटना प्रसगवशात् व सभवनीयतेच्या दृष्टीने महत्त्वाच्या असतात. प्रसगाला व वर्ण्यविषयाला सुसगत असणाऱ्या प्रमुख घटना इतिहासकारास शोधावयास पाहिजेत. इतिहास हा केवळ घडलेल्या वृत्तान्ताचें वर्णन नसून, घटनाचा कार्यकारणरूपाने रचलेला अनुक्रम आहे. त्यामध्ये अनुसंधान आहे. तो वास्तविक ऐतिहासिक घटनाना आपल्या तात्त्विक समजुतीपुढे बळी देत नाहीं. तो नुसत्या तात्त्विक कल्पना बाधण्यात अथवा तत्त्वान्वेषण करण्याच्या भानगडींत पडत नाहीं. तो तात्त्विक टीका मात्र करतो. त्याचा मुख्य उद्देश गत घडामोडी व हालचाली पूर्णपणें व चोखपणे वर्णन करणें हा आहे; इतिहासाच्या प्रवाहामध्यें काहीं अतिम सूत्र अथवा परम सत्य शोधणे असा नाहीं. तो गतघटनाची जुळणी व्यवस्थितपणे व समग्र रूपानें करतो.

त्यानें घटनाच्या मागे त्याना घडवून आणणाऱ्या काहीं गूढ भावना, नियम अथवा शक्ति आहेत हे शोधण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्याच्या मते इतिहासाचे काम अतिम सामान्य कारणे शोधण्याचे नाहीं; ते जवळचीं विशेष कारणें शोधण्याचे आहे. त्याची भाषाशैली व त्याचे घटनाविश्लेषण उत्तम आहे. त्याचें स्वभावचित्रण व मापन अप्रतीम आहे. सर्वोविषयीं तो पूर्णपणे निःपक्षपाती आहे. त्याच्यामध्ये गुणदोष–परीक्षणाची शक्ति आहे. तो केवळ संकलनकार नाहीं, ग्रंथकार आहे. त्याने प्रामुख्यानें राजकीय गोष्टींचे व राज्य-व्यवहाराचे वर्णन केले असलें, तरी धार्मिक, सामाजिक गोष्टीहि अंशतः सागितल्या आहेत. त्याने धार्मिक भावनांना योग्य स्थान मात्र दिलें नाहीं. त्याच्या इतिहासामध्ये रोमन साम्राज्याच्या ऱ्हासाचा व पतनाचा मुख्य धागा दोरा आहे.

त्याने अप्रकाशित हस्तलिखित साधनाचा शोध केला नाहीं. त्याचे

साधन परीक्षण सर्वांग परिपूर्ण नव्हतें. त्या काळात त्याला साहाय्यक शास्त्रांची माहिती नव्हती. त्याला इतिहासांत मात्र एक प्रकारचा कार्यकारणसंबध, क्रम, व रचना दिसली. तो केवळ आकस्मिक घटनाचें जाळे असे त्यानें मानलें नाहीं. त्याचा हेतु प्रभावी घटना शोधून काढून त्याचे परिणाम ओळखणें व दाखविणें आणि 'to render to posterity a just and perfect delineation of all that may be praised, of all that may be excused, and of all that may be censured.' त्यानें प्रकाशित साधनाचाच उपयोग केला, अप्रकाशिताचा नाहीं. त्याने निरनिराळ्या काळचे पुरावे एकत्र करून त्याचे सार्वत्रिक चित्र तयार केल्यामुळे त्याच्या इतिहासात दोष राहिले आहेत. त्याच्या नतर नवीं साधने पुष्कळ गोळा झालीं आहेत. त्याचें बहिरग व अतरग परीक्षण होऊन त्याची यथार्थता अथवा सत्यता ठरविली गेली आहे. त्यामधील पुष्कळ त्याज्य ठरलीं आहेत. तसेंच साहाय्यक शास्त्राच्या साहाय्यानें त्याचे सशोधन व समीक्षण उत्तम तऱ्हेने झाले आहे. या दृष्टीने गिबनचा इतिहास काहींसा मागे पडला आहे.

त्याने घटनाच्या ओघाची व क्रमाची कारणमीमासा फारशी केलेली नाहीं. जे घडले ते तसे का घडले याचा खोल विचार केला नाहीं. त्याच्या मागे खास कारणपरपरा आहे का आकस्मितता आहे याचे योग्य विवेचन त्याने केले नाहीं.

* * * * *

## ८. भावनावादी पण सांस्कृतिक विचारसरणीचे इतिहासकार

बुद्धिवादी इतिहासकाराची दृष्टि, पद्धत व माडणी याच्या उलट प्रतिक्रिया भावनात्मक इतिहासकाराची होती. ते रसप्रधान होते. त्याना घटना रसात्मक व अपूर्व दिसत. त्यातील रस, भाव, व अपूर्वता ओळखणे व मांडणें, आणि केवळ बुद्धिगम्य सामान्य घटनांना प्राधान्य न देणे, हें ते करीत. त्याच्यामध्यें काहीं ध्येयवादाची काहीं भाविकपणाची, व काहीं विशिष्ट सास्कृतिक प्रेमाची दृष्टि होती. ती केवळ वास्तविक व व्यावहारिक स्वरूपाची नव्हती. अशा वृत्तीचे इतिहासकार व ग्रंथकार फ्रान्स, इंग्लंड, जर्मनी वगैरे देशात झाले. गत इतिहासात सुवर्णयुग, धर्मयुग, अथवा सत्ययुग, सुखाचा व सस्कृतीचा उत्तम काळ, सुरवातीला अथवा त्यानंतर होता. अगदीं पूर्वीचा प्राथमिक काळ वाईट व त्यानंतरचा प्रत्येक काळ हळूहळू सुधारणारा व सरळ प्रगतीने पुढे जाणारा असें बौद्धिक इतिहासकाराचे नवें आग्रही मत त्याना मान्य नव्हते. प्रत्येक राष्ट्राची न कळत उन्नति होत असते. प्रत्येक राष्ट्रीय सस्कृतीमध्ये एक प्रकारची सूत्रता व

अपूर्वता असते. त्यामध्ये काहीं मानसिक भावना व शक्ति अज्ञातपणाने वावरत असतात. त्याचा प्रभाव केवळ बुद्धीच्या द्वारे उकलत नाहीं.

त्याना तुम्ही कालमहिमा, अथवा राष्ट्रमहिमा म्हणा, कालधर्म अथवा राष्ट्रधर्म म्हणा, त्याच्या मते प्रत्येक राष्ट्राला व युगाला आपली विशेष संस्कृति व स्वभाव असतो. त्याचे योग्य वर्णन व आकलन झाले पाहिजे. इतिहासातील कार्य-कारणभाव, स्वभाव व परंपरा केवळ बुद्धीच्या साहाय्याने ओळखू पहाणे निरर्थक आहे. ऐतिहासिक प्रवाह व आंदोलन हीं राष्ट्राच्या व मानवतेच्या सामुदायिक मनामध्ये होणारें बदल व रूपान्तरे याच्या प्रक्रिया आहेत. तेव्हा लोकगीतें, वीरगाथा, पवाडे, अद्‌भुतकथा, हीं सर्व लक्षात घेणे आवश्यक आहे. या प्रवृत्तीचा फ्रान्समध्ये पहिला इतिहासकार फ्रान्सुआ रेने शातोब्रिआँ ( Francois Rene Chataubriand इ.स. १७९८–१८४८ ) हा झाला. तो फ्रान्सच्या राज्य-क्रांतीचें तत्त्वज्ञान व बुद्धिवाद याच्याविरुद्ध होता. तो खिस्तीधर्माचा सुरवातीचा काळ व युरोपचा मध्यकाळ यामध्ये संस्कृतीचे सुवर्ण युग होते, असे मानणारा होता. त्याने आपल्या ग्रंथात राष्ट्रीय भावना प्रखरपणे दाखविली आहे.

### ज्यूल मिचले

दुसरा प्रसिद्ध इतिहासकार ज्युल मिचले (Jules Michelet इ.स.१७९८–१८७४ हा होय.त्याची इतिहासाकडे बघण्याची दृष्टि भावनात्मक व नाट्यरसात्मक होती. मिचलेचे गत इतिहासाबद्दलचे प्रेम व त्यातील घटनाना कल्पनेने डोळ्या-पुढे उभे करण्याची शक्ति अप्रतिम होती. तो नैतिक आवेशाने व भावनात्मक उत्साहाने प्रेरित होता. तो उत्तम वर्णनकार होता. त्याच्या लेखनात काव्यरस व उपदेश भाव होता. तो आपल्या वर्ण्य विषयामध्ये फार खोल शिरत नसे. पण त्याच्या पुस्तकामध्ये रस, रंग, भावना, वाक्पाटव, ओघ इत्यादि प्रेरणेचे गुण आहे. ते कलागुण आहेत, शास्त्रगुण नव्हेत. त्याला आपल्या देशाबद्दल अतिशय निष्ठा होती. त्याची कल्पनाशक्ति दांडगी होती. त्याने फ्रान्सचा इतिहास लिहिला. त्याच्या मते 'History is the drama of human liberty.' त्याचे दिग्दर्शन त्याने आपल्या इतिहासात केले. त्याच्या साध-नाची छाननी व तुलना मात्र त्याने केली नाहीं. त्याचा फ्रान्सचा इतिहास म्हणजे एक सुरळित व सुसघटित वृत्तात नाहीं. तो एकामागून एक घडणाऱ्या मोठमोठ्या प्रसंगाचे व घटनाचे नाट्यात्मक वर्णन आहे. त्याचा फ्रेंच राज्यक्रा-तीचा इतिहास हा अनियंत्रित धर्मसत्ता व राजसत्ता यापासून फ्रेंच लोकाच्या सुटकेचे उत्तम वर्णन आहे.

### सर वॉल्टर स्कॉट

इंग्लंडमध्यें सर वॉल्टर स्कॉट ( Sir Walter Scott इ. स. १७७१–

१८३२ ) याच प्रवृत्तीचा लेखक होता. त्याने मध्यकालीन लोकजीवनाचे सुदर वर्णन केलें आहे. त्याने पुष्कळ ऐतिहासिक कादबऱ्या लिहिल्या. इतिहास असा थोडा लिहिला, पण तो याच स्वरूपाचा होता. त्याने जुन्या काळचे लोकांचे जीवनरहस्य व अपूर्वता उत्तम प्रकारें चित्रित केली. त्याच्या दृष्टीनें ईश्वरी योजना हीच इतिहासाच्या घटनाच्या मागे आहे. त्याच्या ग्रंथाचा परिणाम वंशवादी, राष्ट्रवादी व धर्मवादी इतिहासकारच्या आग्रही मतास अनुकूल झाला. जर्मनीमध्ये कार्ल फ्रिडरिक आयखॉर्न ( Karl Friedrich Eichhorn इ. स. १७८१–१८५४ ) याच प्रवृत्तीचा जर्मन इतिहासकार झाला. त्यानें जर्मन सस्था व जर्मन कायदा याचा इतिहास लिहिला. त्याच्या मते ते सर्व जर्मन राष्ट्रीय स्वभावाचे द्योतक आहेत, व ते त्याला अनुसरून हळूहळू विकास पावतात. त्याला आपल्या देशाच्या गत सस्थाचे व समजुतींचे प्रेम होते.

फिडरिक कार्ल फॉन साव्हिनी ( Friedrich Karl Von Savigny इ.स.१७७९–१८६१) हा त्याच वृत्तीचा दुसरा जर्मन इतिहासकार होय. त्याने मध्यकालीन रोमन कायद्याचा इतिहास लिहिला. त्याच्या मते कायदा हा राष्ट्र-स्वभावाचा परिणाम आहे.

याकोब ग्रिम (Jacob Grimm इ.स.१७८५–१८५३) हा मोठा भाषा शास्त्रज्ञ होता. त्याने जर्मन लोकाच्या जुन्या कायद्याचा व चालीरीतींचा इतिहास लिहिला. त्याने जर्मन पौराणिक कथा, लोकगाथा इत्यादि गोळा केल्या. त्याच्या मते त्या सर्व लोकस्वभावाला अनुसरून प्रस्थापित झाल्या होत्या. याप्रमाणे ऐतिहासिक घटनाचा, सस्थाचा अथवा समजुतींचा उलगडा व अर्थ लोकस्वभावाला मूळ धरून हे इतिहासकार लावीत होते.

धर्म, लोक व वश या खोल भावनानीं प्रेरित असलेल्या या इतिहासकारानीं राष्ट्रीय इतिहास व सस्कृतिलेखनाला बरेच प्रोत्साहन दिले. त्यांचे १९ व्या शतकात बरेच वर्चस्व चालू होते. त्याच्याचमुळे इतिहासाच्या तत्त्वज्ञान प्रथाना स्फूर्ति मिळाली. त्यानीं राष्ट्रसस्कृतीची एकसूत्रता व त्या सस्कृतीची व संस्थाची वाढ या दोन अगावर विशेष भर दिला. त्या काळच्या (१७ वे व १८ वे शतक) प्रगतीच्या कल्पनेत इतिहासाच्या तत्त्वज्ञानाची कल्पना अनुस्यूत होती. बर्नार्ड द फॉन्टेनेल ( Bernard de Fontenelle इ. स. १६५७–१७५७) व्हीको, ( Vico ), तुर्गो ( Turgot ), व कॉनडॉर्से ( Condorcet ) यानीं सतत प्रगति कल्पनेचे इतिहासाच्या साहाय्याने तात्त्विक विवेचन केले आहे.

* * * * *

## ९. तात्त्विक ध्येयवादी इतिहासकार

जोहान गॉटफ्रीड फॉन हर्डर ( Johann Gottfried Von Herder इ. स. १७४४–१८०३) हा इतिहासतत्त्वज्ञानाचा आद्य ग्रंथकार झाला. त्याने 'मानव इतिहासाच्या तत्त्वज्ञानाच्या कल्पना' हा चार भागाचा ग्रंथ लिहिला. त्याने रूसोची समाजाच्या नैसर्गिक स्थितीची व स्वातंत्र्याची कल्पना, व्होल्तेरची राष्ट्रस्वभावाची वास्तविक व स्थायी कल्पना, मॉन्तेस्क्यूची भौगोलिक परिस्थिति व राष्ट्रस्वभाव याच्या संबंधाची कल्पना, आणि हेगेलची मानवस्वतंत्रतेच्या क्रमाक्रमाने वाढीची गूढ कल्पना, या सर्वांचा समन्वय केला. तो बुद्धिवादी व भावनावादी इतिहासकाराच्यामध्ये सीमेवर उभा आहे. त्याच्या मते इतिहासाची क्रिया बाह्य परिस्थिति, आंतरिक प्रवृत्ति व दैवी प्रेरणा याच्या संयोगाने घडते.

आन्ने रोबेर जॅक तुर्गो ( Anne Robert Jacque Turgot इ. स. १७२९–१७८१ ) याने इतिहासाच्या तत्त्वज्ञानाबद्दल बरेच लिहिले. त्यानें इतिहासातील प्रगतीची कल्पना अधिक वास्तविकपणे मांडली. त्याने इतिहासाच्या अखंडित व अविरत प्रवाहावर आणि प्रगतीच्या जमत जमत वाढणाऱ्या कल्पनेवर अधिक जोर दिला. त्याच्या मते प्राथमिक काळात प्रगति फार हळू होती व आधुनिक काळात ती जोराने होऊ लागली आहे. त्याने ' मानवी मनाच्या ऐतिहासिक प्रगतीवर निबंध ' लिहिला. त्यामध्ये त्याने मानवी बौद्धिक प्रगतीच्या तीन अवस्था कल्पिल्या:—एक दैवी कल्पनेची, दुसरी तात्त्विक कल्पनेची व तिसरी शास्त्रीय कल्पनेची. याच प्रकारे कॉन्डॉर्सेने (Condorcet इ. स. १७४३–१७९४ ) प्रगतीची कल्पना खरी मानून मानवी संस्कृतीच्या इतिहासाचे दहा कालखंड केले, व प्रत्येक खंड हा मानवी संस्कृतीच्या इतिहासात पुढचे निश्चित पाऊल आहे, असे दाखविले आहे. नऊ पावलानंतर फ्रेंच राजक्रान्ति व आधुनिक शास्त्रे हीं मानवाला सुखासमाधानाच्या दहाव्या पावलाकडे नेत आहेत. हेन्री द संत सीमॉने ( Henri de St. Simon इ.स१७६०-१८२५ ) मानवी इतिहासाच्या दोन अवस्था कल्पिल्या. पहिली धार्मिक कल्पनेची व दुसरी प्रत्यक्ष व वास्तविक ज्ञानाची; आणि धार्मिक ती संघटित स्वरूपाची, व वास्तविक ती शोधक पण विस्कळित स्वरूपाची. पहिल्या अवस्थेत समाज हा एकरूपाच्या समजुती व संस्था असल्यामुळे संघटित असतो. दुसऱ्या अवस्थेत त्याच्यामध्ये शोधक बुद्धीमुळे नाना मते व मतांतरे उत्पन्न होऊन जुन्या समजुती व संस्था विस्कळित होतात.

### कान्ट

याच विचाराचा प्रसिद्ध फ्रेन्च ग्रंथकार व समाजशास्त्रज्ञ ओगुस्त कान्त ( Auguste Comte इ.स.१७९८-१८५७) झाला.त्याने इतिहासाचें तत्त्वज्ञान

व समाजशास्त्र याबद्दल लिहिले. त्याने मनुष्याच्या बौद्धिक प्रगतीची एक सर्वांगीण नियमरूपी योजना कल्पिली. त्याने समाजदृष्टया इतिहासाचे एक शास्त्र कल्पिले, व इतिहासांतर्गत सामाजिक दृष्टीची व सामाजिक तत्त्वज्ञानाच्या विस्ताराची विचारसरणी समन्वयरूपाने मांडली. त्याच्या मते इतिहाससरणी ही ठराविक नियमाप्रमाणे होते. त्याने इतिहासाचे अनेक कालखंड व उपखंड पाडले, आणि त्या प्रत्येकाचे सांस्कृतिक स्वरूप व प्रगति दाखविली. त्यानें मनुष्याच्या बौद्धिक वाढीच्या तीन अवस्था कल्पिल्या: पहिली दैवी कल्पनेची, दुसरी तात्त्विक कल्पनेची आणि तिसरी प्रत्यक्ष अनुभवाची व शास्त्रीय ज्ञानाची. पहिली अवस्था पौर्वात्य देशामध्ये प्रबल होती. तिचे मुख्य लक्षण मानसिक दृष्टीमध्यें दैवी श्रद्धा आणि राजकीय व सामाजिक आचारामध्ये क्षत्रियवृत्ति. दुसरी अवस्था तात्त्विक व कायदेशीरपणाची होती. ती प्राचीन यवन व रोमनकाळात आणि मध्यकालीन युरोपीय काळात प्रबळ होती. त्यामध्ये तत्त्वज्ञान, धर्म व न्यायानियम याची प्रगति होती. शिवाय क्षत्रियवृत्ति होतीच. तिसरी अवस्था औद्योगिक क्रांति व आधुनिक शास्त्रें याच्या प्रस्थापनेनंतर उदयास आली. त्यामुळे प्राचीन समजुती व श्रद्धा, मध्ययुगीन कल्पना व तत्त्वे, हीं सर्व ऱ्हास पावू लागलीं. समाजाची दृष्टि, रचना व वाढ नव्या शास्त्रीय विचारानुसार व आर्थिक संबंधानुसार होऊं लागली. कॉन्त सर्व उदारमतवादी तत्त्वाच्या विरुद्ध होता.

फ्रान्सुआ लोरे ( Francois Laurient इ. स. १८१०–१८८७ ) ने ' मानव इतिहासासंबंधीं अभ्यास '' नावाचा एक बारीकसारीक गोष्टीकडे सुद्धा लक्ष पुरवून ग्रंथ लिहिला. इतिहासाचे तत्त्वज्ञान त्याच्या मते असे आहे: " History declares the glory of God. " तो दैववादी होता. जर्मनीमध्ये सुद्धा अनेक तत्त्वज्ञानी लेखकांनीं इतिहासाबद्दल आपल्या कल्पना मांडल्या आहेत. हे तात्त्विक लेखक जगामध्ये वावरत असलेले एकादे अंतिम सूत्र अथवा मूलतत्त्व घेऊन त्याच्या प्रेरणेने व त्याला अनुसरून जगाची उत्पत्ति, स्थिति व लय अथवा आविष्कार व विकास होत असतो असे मानतात, आणि त्या दृष्टीने इतिहासाच्या घटना होत असतात असे दाखवितात.

इमॅन्युअल कान्ट ( Immanuel Kant इ.स.१७२४-१८०४) याच्या मतें इतिहासाच्या वळणाचे सूत्र व्यक्ति व समाज, स्वार्थ व परार्थ, व्यक्तिस्वातंत्र्य व समाजसत्ता, याच्या कलहात व संघर्षात गोवलेले आहे. व्यक्तित्व हे प्रगतीला कारणीभूत होते. समाजत्व हे व्यवस्था व परंपरा प्रस्थापित करते. तीं दोन्ही मिळून संस्कृतीची स्थापना करतात.

* * * * *

# १०. राष्ट्रवादी विचारसरणी

जोहान गॉटलीब फिश्टेच्या ( Johaun Gottlieb Fichte इ. स. १७६२–१८१४) मते इतिहासाची योजना ईश्वरनिर्मित असून त्यामध्ये सुरुवातीपासून अखेरपर्यंत पांच युगे आहेत.

( १ ) निष्कलंक कृतयुग. यामध्ये मनुष्य साहजिक प्रवृत्तीने व उपजतबुद्धीने वागतो.

( २ ) सत्तेचे युग. यामध्ये प्रस्थापित सत्तेचे शासन व आज्ञा मनुष्य मुकाट्यानें पाळतो, व तो स्वतःच्या मताचा आग्रह व प्रतिपादन करीत नसतो.

( ३ ) उदासीनवृत्तीचे युग. यामध्ये सत्याकडे दुर्लक्ष असते, व विवेकाचा पूर्ण अभाव असतो.

( ४ ) शास्त्राचे अथवा विद्याचे युग. यामध्ये सत्य शोधण्याची पूर्ण इच्छा असते. त्यामुळे विवेकबुद्धीला प्रधान स्थान मिळते.

( ५ ) कलाचे युग. यामध्ये विवेकबुद्धि पूर्ण अधिकारी होते, व त्यामुळें मानवता स्वाधीन व स्वतत्र होते.

याबरोबर फिश्टेच्या विचारसरणीत वंशशुद्धि, राष्ट्रभावना व देशसत्ता याचा प्रभाव होता.

" The individual life has no real existence, since it has no value in itself, but must and should sink into nothing, while on the contrary the race alone exists, since it alone ought to be looked upon as really living. "

फ्रीडारिक विल्हेल्म जोझेफ फॉन शेलिंगच्या ( Fredrich Wilhelm Joseph Schelling इ. स. १७७५–१८५४ ) मते इतिहास हा मुख्यतः परमतत्त्वाचे स्वयंप्रेरित आविष्करण आहे. त्याच्या विश्वयोजनेमध्ये तीन अवस्था आहेत.

( १ ) प्राचीन साम्राज्याच्या काळची अवस्था. तेव्हा मानवी व्यवहारात व विचारात दैवगतीचे अथवा भवितव्यतेचे प्राबल्य होते.

( २ ) यवन व रोमनकाळची अवस्था. तेव्हा सृष्टीच्या नियमांना अधिक महत्त्व होते.

( ३ ) भावी युग. तेव्हा ईश्वरी नेमानेमाचें प्राबल्य पूर्ण दिसून येणार आहे. त्याच्या मते हा क्रम अनिवार्य आहे. त्याची तर्कपद्धति being (स्थिति)ची नसून becoming ( गति ) ची आहे.

कार्ल विल्हेल्म फ्रीडरिक फॉन श्लेगेल (Karl Wilhelm Fredrich Von Schlegel ( इ. स. १७७२–१८२९ ) याने इतिहासाचें तत्त्वज्ञान

हा ग्रथ लिहिला. त्याच्या मते इतिहासलेखनाची मुख्य कल्पना म्हणजे इतिहासाच्या क्रमवार येणाऱ्या अवस्थामध्ये मानवजातीला पुन्हा प्राप्त होणारें परमेश्वराचे नष्ट झालेले ज्ञान व सत्यस्वरूप याचा मार्ग दाखविणे व थाग लावणें. ही कल्पना ख्रिस्तिधर्माच्या कल्पनाना व भाकिताना अनुसरून आहे.

### हेगेल

गेऑर्ग विल्हेल्म फ्रीडरिक हेगेल Georg Wilhelm Fredrich Hegel इ. स. १७७०–१८३१ ) हा मोठा जर्मन तत्त्वज्ञानी होता. त्याने इतिहासाचे तत्त्वज्ञान हा ग्रथ लिहिला. तो इतिहासकार नव्हता. त्याच्यामते इतिहास हा एका परम चैतन्यशक्तीच्या अथवा विश्वतत्त्वाच्या स्वतत्र आविष्काराचा व स्वयविकासाचा वृत्तात आहे. " History is a gradual self-revelation of the Absolute or Universal Spirit. " या विकासाच्या तीन अवस्था आहेत: ( १ ) पौर्वात्य अवस्था. तिच्यामध्ये मानवी चैतन्यशक्ति सुप्त असते. तिला आपल्या स्वतत्रतेची जाणीव नसते. व ती अनियत्रित धर्मसत्ता व राजसत्ता याच्या अधिकाराखाली निमूटपणे वागते. तेथे सत्ता स्वतत्र असते. व्यक्तींना स्वतत्र अधिकार नसतात. ( २ ) दुसऱ्या अवस्थेमध्ये चैतन्यशक्ति जागृत होते. तिला काही बाबतीत स्वतत्रतेची जाणिव असते व इतरामध्ये मात्र नसते. तिला आपल्या स्वतत्र स्वभावाची जाणिवच मुळी अपूर्ण असते. तिच्यामध्ये सर्व व्यक्ती स्वतत्र नसतात. पण काही मात्र असतात. ( ३ ) तिसऱ्या अवस्थेमध्ये ती चैतन्यशक्ति पूर्ण जागृत असते. तिला आपल्या स्वतत्र स्वभावाची पूर्ण जाणीव होते. सर्व व्यक्तींना विवेकपूर्ण स्वतत्रतेचे सर्व स्वाभाविक अधिकार आहेत असे ती ओळखते.

हेगेलच्या मते प्रगति ही सघर्ष व समन्वय याच्या योगे होते, आणि ती अनिवार्य आहे. ती विरोधविकासाने होते. तिच्यामध्ये दोन विरोधी तत्त्वाचा अथवा वृत्तींचा विरोध चालू असतो. व त्याच्या समन्वयाने नवे तत्त्व अथवा वृत्ति तयार होते. ही तर्कपद्धति अथवा कारणमीमासा रूढ प्रकारची नाही.

त्याच्या मते एखादी कल्पना अथवा तत्त्व प्रचलित असते. नतर त्याला विरोधी दुसरे तत्त्व पुढे येते. त्या दोघाच्या सघर्षाने एक नवे समन्वयरूपी तत्त्व सुरू होतें. ते प्रचलित झाल्यावर दुसरे नवें विरोधाचे तत्त्व पुढे येते. त्याचा सघर्ष होऊन एक आणखी नवा समन्वय होतो. या प्रकाराने प्रगतिरूपाने सत्याचा अथवा तत्त्वाचा विकास अधिकाधिक होतो. ही प्रक्रिया इतिहासाच्या घटनामध्ये सापडते व ती सदैव चालू असते.

हेगेलने चैतन्यशक्तीचा तिसरा आविष्कार प्राशियामध्ये पूर्णपणे झाला आहे असे सागितले, आणि ईश्वराने मानवाना स्वतत्रतेचे अधिकार आणून देण्याचें

कार्य प्राशियाच्या हातीं सोपविले आहे. या हेगेलच्या कल्पनेमुळे एखाद्या खास धर्माप्रमाणे एखाद्या विशिष्ट राष्ट्राला वंशाला अथवा वर्गाला सुद्धा ईश्वराने दिलेलें प्रेषित कार्य असते हा विचार प्रामुख्यानें पुढे आला, आणि त्यामुळें राष्ट्रवादाला, वंशवादाला व समाजवादाला अधिक जोर आला. त्याच्या विरोधविकासपद्धतीचा उपयोग मार्क्सने आपल्या जडवादाच्या तर्कप्रणालीला करून घेतला. हेगेलचे इतिहासाचे तत्त्वज्ञान हे अनैतिहासिक आहे. ते इतिहासाच्या अनुभवावर अधिष्ठित नाहीं. त्याची ऐतिहासिक प्रगतीची तर्कप्रणाली निव्वळ तार्किक आहे. त्याचे ऐतिहासिक तत्त्वज्ञान संत ऑगुस्तीनच्या एका दैविक योजनेसारखे एका चैतन्यतत्त्वाच्या आविष्काराचे आहे. संत ऑगुस्तीनच्या इतिहासप्रणालीमध्ये जसें ईश्वर व सैतान याच्या संग्रामाचे द्वन्द्व दाखविले आहे, तसेंच हेगेलच्या इतिहासप्रणालीमध्ये नीचोच्च स्वतत्रतत्त्वाचे द्वन्द्व दाखविले आहे. जसा ईश्वराचा पूर्ण जय शेवटीं होतो, तसा चैतन्यरूपी उच्चतत्त्वाचा पूर्ण आविष्कार शेवटीं होतो. हे दोन्ही प्रकारचे संग्राम अथवा संघर्ष, अवस्था अथवा युगरूपाने आपल्या अंतिम स्थितीप्रत पोचतात. पण ही सर्व तात्त्विक विचारसरणी इतिहासाच्या वास्तविक घटनाक्रमाला अनुसरून नाहीं. केवळ काल्पनिक व गूढ प्रकारची आहे. ती इतिहासाची विकृति आहे. हेगेलच्या विरोध–व–समन्वय विकासपद्धतीच्या ऐतिहासिक तर्कप्रणालीला a logic, not of being, but of becoming असें म्हणतात. तो म्हणतो हा विकास अनिवार्य आहे व आपणाला आपल्या भावना व कामना, विवेक व विचार त्या विकासाच्या अनुरोधाने योजिल्या पाहिजेत. या तत्त्वज्ञान्यांना असें वाटत होते कीं त्रिकालज्ञ व भविष्यज्ञ प्रासादिक पुरुषापेक्षा आपल्याला परम ईश्वराच्या योजनेचा अथवा परमचैतन्य तत्त्वाच्या विकासाचा ठराविक मार्ग व अदृष्ट हेतू हीं अधिक समजतात. हेगेलच्या मतातील मुख्य दोष म्हणजे तो इतिहासाचा उलगडा इतिहास न जाणता करू पहातो. ज्याप्रमाणे संत ऑगुस्तीन व बोसुए यानीं आपले इतिहासक्रमाचे धार्मिक तत्त्वज्ञान खरा इतिहास न जाणता रचले, तसें हेगेलप्रभृतींनीं व मार्क्स प्रभृतींनीं केले.

* * * * *

## ११. उदार मतवादी विचारसरणी

कार्ल फ्रीडरिक क्राउस ( Karl Fredrich Krause, इ.स. १७८१-१८३२ ) याने ‘ इतिहासाचे सामान्य तत्त्वज्ञान ’ हा ग्रंथ लिहिला. त्याच्या मतें मानवसमाज अनेक अवस्थेतून जातो. त्याची तुलना व्यक्तीच्या जीवनाशीं करणे उपयुक्त आहे. सुरवातीला प्राथमिक समाज असतो. तो काळ मनुष्याच्या बाल्यपणाचा, सात्त्विक एकीचा व सरळ असतो. नंतर तारुण्याचा विविधतेचा

व वाढीचा काळ येतो. त्यामध्ये तीन अवस्था दिसतात. एक, अनेक देवता मताची प्राचीन, पौर्वात्य व पाश्चात्य देशातील अवस्था; दुसरी एकेश्वरी मताचे मध्यकालीन पौर्वात्य व पाश्चात्य देशातील आग्रही व आक्रमक सांप्रदाय, व तिसरी शेवटची संगतीची व स्वतंत्रतेची. तिच्यामध्ये मनावरील बाह्य शक्तींचा व धर्मांचा ताबा टाकून दिलेला असतो. त्यामध्ये मानव हा बाह्य प्रकृतीचा व समाजाचा अधिकारी बनतो आणि सगळ्या राष्ट्राची एकी जगाच्या एका मोठ्या व यशस्वी राष्ट्रामध्यें घडवून आणतो. याप्रमाणे क्राऊसने भविष्याची एक पत्रिकाच केली आहे.

या सर्व तात्त्विक इतिहासकाराच्या मते चैतन्यतत्त्वे हीं मानवी इतिहासाच्या व समाजाच्या विकासामध्ये प्रमुख अथवा मूळ कारणे आहेत." History is from beginning to end the development and display of liberty, the continuous protestation of the mind of the human race against the world, which oppresses and enchains it, the process through which the soul gradually secures and enlarges freedom. "

* * * * *

## १२ वास्तविक व शास्त्रीय विचारसरणीचे इतिहासकार.

एकोणिसाव्या शतकामध्ये शास्त्रशुद्ध इतिहासाच्या दृष्टीने रान्केच्या इतिहासाच्या कल्पना उच्च आहेत. त्याच्या आधीं होऊन गेलेल्या लेखकाच्या कल्पनामध्ये अनेक दोष होते. बुद्धिवाद्याची आकस्मिकतेची कारणमीमांसा व मध्यकालीन इतिहासाबद्दल तुच्छता, अस्सल साधनाचा व व्यवस्थित साधनसंग्रहाचा अभाव, साधनपरीक्षणाच्या ज्ञानाची व पद्धतीची वाण, आणि इतिहासाची अभ्यासपद्धत व्यवस्थितपणाने व योग्य माणसाकडून शिकविण्याच्या शाळाची उणीव, असे ते होते.

भावनावाद्यानीं जरी मध्यकालीन इतिहासाकडे पूर्ण लक्ष दिले व इतिहासाच्या ओघात सातत्य व संबंध आहे, असे दाखविले, तरी त्यानीं व राष्ट्रवृत्तीच्या इतिहासकारानीं आपल्या वांशिक अथवा जातीय दुरभिमानाने इतिहासाला पक्षपाती स्वरूप दिले. राष्ट्रवाद्यानीं मात्र विपुल अस्सल साधने संशोधून तीं उत्तम रीतीने संपादन केलीं.

तेव्हा साधनाचे निःपक्षपाताने संशोधन करणे व त्यातील घटना योग्यपणे जुळवून त्या घडल्या तशा निर्विकार पद्धतीने मांडणे हे काम आवश्यक होते. या प्रकारची शास्त्रीय ऐतिहासिक पद्धत पूर्णत्वाला येण्याला दोन गोष्टींची जरूरी होती; एक बहिरंग परीक्षणाची; साधनाचा अस्सलपणा तपासण्यास लाग-

णारीं साहाय्यक शास्त्रें—साधनाध्ययनशास्त्र, कालगणनशास्त्र, शिलालेखशास्त्र, प्राचीन लिपिशास्त्र, कोशशास्त्र, भाषाशास्त्र, इ. आणि दुसरी अतरगपरीक्षणार्ची अर्थविवरणात्मकशास्त्रे—समाजशास्त्र, मानसशास्त्र, राजशास्त्र व अर्थशास्त्र याच्या योगाने साधनाचा अस्सलपणा, ग्रथकाराची आकलनशक्ति, व घटनाचे अर्थपरीक्षण करण्यास मदत होते. हीं सर्व शास्त्रे १९ व्या शतकात परिणतीस आलीं व त्याचा उपयोग अस्सल साधने व यथार्थ घटना समजण्याला झाला. या सर्वांचा उपयोग करून त्याने ' गतवृत्तातावरूनच वर्तमान घटना समजतात. ' हा सिद्धात बाधला.

बार्थोल्ड गेऑर्ग निबुहर ( Barthold Georg Niebuhr इ. स. १७७६–१८३१ ) हा आधुनिक इतिहासलेखन पद्धतीचा पहिला ग्रथकार समजला जातो. तरी पण या नव्या समग्र सशास्त्र पद्धतीचे श्रेय कोणा एका लेखकाला अथवा लेखकसमूहाला देता येत नाहीं. निबुहरने आपल्या पूर्वीच्या सशास्त्रपद्धति एकात्रित करून त्याचा समन्वयाने उपयोग करण्याचा प्रयत्न केला. त्यास अनुसरून त्याने रोमच्या सस्थाचा इतिहास लिहिला. या त्याच्या पद्धतीने रान्के व मॉमसन याना प्रेरित केलें. याच्या पूर्वी जर्मनीमध्यें जोहान मार्टिन क्लाडनी ( Johann Martin Chladni ) या विद्वान् गृहस्थाने १७५२ मध्ये एक ' इतिहासाचे सामान्यशास्त्र ' हा ग्रथ लिहिला. त्यामध्ये त्याने उत्तम बौद्धिक व चिकित्सक पद्धतीने ( १ ) ऐतिहासिक पुराव्याची सामान्य लक्षणे, ( २ ) ऐतिहासिक साधनाचा अस्सलपणा, ( ३ ) व्यक्तींचा पराक्रम अथवा कार्य, ( ४ ) ऐतिहासिक सभाव्यता व कारणता आणि ( ५ ) ऐतिहासिक अर्थविवरणाचे प्रश्न, याचा सूक्ष्म विचार केला आहे. त्याचप्रमाणे याकोब डानिअल वेगेलिन ( Jacob Daniel Wegelin इ. स. १७२१-१७९१ ) याने आपल्या " जगाच्या इतिहासाची विवेकपूर्ण योजना " या ग्रथात इतिहासकाराचे विशेष प्रश्न, साधनांचे परीक्षण, त्याची छाननी व माडणी, जगाच्या इतिहाससबधी सर्वसाधारण विधाने आणि सामाजिक व सास्कृतिक वाढीचीं लक्षणे, याचा विचार केला आहे. त्याने युरोपचा सर्वांगीण इतिहास लिहिला आहे.

## रान्के

लेओपोल्ड फॉन रान्के ( Leopold Von Ranke इ.स.१७९५-१८८६) हा सर्वांत मोठा इतिहासकार जर्मनीमध्यें झाला. त्याच्या"आधुनिक इतिहासलेखकाची समीक्षा" या ग्रंथामध्ये त्यानें लेखकाच्या साधनाच्या मूळाचे व त्याच्या अंतरंगाचें परीक्षण व विश्लेषण केलें. केवळ समकालीन साधने उपयोगांत आणणे व त्यांचें मूळ शोधणें एवढेंच महत्त्वाचें नसून, त्याबरोबर ज्या लेखकानीं तीं लिहिलीं त्याच्या

स्वभावाचा, विचाराचा, कृत्याचा आणि सर्वांचा पूर्ण अभ्यास केला पाहिजे. रान्केने इतिहासपद्धतीच्या शास्त्रीयत्वात ही अतरगपरीक्षणाची भर घातली. त्यावरून साधनलेखकाच्या मुळे लिखित साधनामध्ये वास्तविक घटनाचे किती रूपातर अथवा विकृति होते ते समजते, व ते वजा करता येते. त्याचबरोबर रान्केने असे प्रामुख्याने प्रतिपादिले की गत घटना जशा व ज्या अपूर्व प्रकारे घडल्या तशा सागणे. त्यामध्ये वर्तमानकाळाचे विचार व आग्रह उपयोगात आणता कामा नये. तो म्हणतो 'I shall say how it happened exactly and peculiarly.' त्याच्या इतिहासलेखनाचे प्रादेशिक क्षेत्र मोठे होते. त्याने सर्व युरोपच्या इतिहासासबधी उत्तम प्रकारे चिरस्थायी रूपाचे वाङ्मय लिहिले आहे. त्याने जे ग्रथ लिहिले तेवढ्याना उपयोगी पडणारी सर्व साधने त्याला अभ्यासिता आली नाहीत. आर्थिक, सामाजिक व सस्थात्मक जीवनाच्या घटनाकडे प्रायः दुर्लक्ष करून त्याने मुख्यतः राजकीय घटना व कर्ती माणसे याकडे अधिक लक्ष दिले. त्याने लोकाच्या उत्थानपतनाचा विचार केला नाही. त्याच्या ऐतिहासिक दृष्टीमध्ये ईश्वरी नेमानेमाच्या विचाराचा भाव अथवा कल होता. त्याने लूथर, प्रशिया व होहेनझोलर्न राजवश याबद्दल अधिक उत्साह दाखविला. त्याने जीवनाच्या मागे असलेल्या कल्पना व भावना याचा खोल विचार केला नाही.

त्याने १८३३ मध्ये इतिहासाची शाळा ( Historical Seminar ) काढली. त्याच्या शिक्षणाने इतिहासपद्धतीचे शिक्षण बऱ्याच होतकरू विद्यार्थ्यांना मिळाले. रान्केच्या या इतिहासविषयक कामगिरीने इतिहासाच्या शास्त्रीय पद्धतीचा पाया पूर्णपणे रोवला गेला. गेआर्ग वेटझ हा रान्केचा उत्तम शिष्य होता. त्याने आपले जर्मन इतिहासाचे काम फारच कसोशीने व पूर्णतेने केले.

रान्केच्या मते प्रत्येक देशाचे व युगाचे रहस्य अथवा महिमा समजण्यास त्याच्यामध्ये वावरत असलेली विशेष विचार व भावना धारा—त्यातील कालात्मा ( Zeitgeist )—समजून घेतला पाहिजे. त्याने प्रभावित होऊन त्या कालातील घटना घडतात. परतु हा कालात्मा त्यावेळच्या घटनेच्या भोवतालची केवळ परिस्थिति नव्हे. ती मानसरूपी प्रेरक व जनकशक्ति आहे. इतिहासामागील सूत्र अथवा तत्त्वज्ञान शोधण्यात रान्के या कालात्म्याच्या कल्पनेपलीकडे गेला नाही. कालात्म्याचे विश्लेषण न करता व उपपत्ति न लावता त्याचे केवळ निरूपण करणे एवढेच इतिहासकाराने करावे असे रान्केने प्रतिपादिले.

गत इतिहासाचा पुरावा गोळा करणे आणि त्याच्यातील जीवन यथार्थरूपाने माडणे हेच इतिहासकाराचे आद्य कर्तव्य आहे. ते घडले तसे व त्याकाळच्या लोकाना दिसले तसे माडले पाहिजे. म्हणजेच ते समजणे शक्य आहे.

याकरता त्याकाळच्या कर्तृत्ववान् व्यक्तींचे विचार व कृत्ये पूर्णपणे अभ्यासली पाहिजेत. स्वतःची दृष्टि व विचार त्यामध्ये योजले तर इतिहासाला खोटेपणा येईल. गत घटनांचें चित्र त्याच्याच साहाय्याने उलगडले पाहिजे. जेवढे सांपडेल तेवढेच खरें धरले पाहिजे. तें ठीक सामजण्यास त्या वेळचा अपूर्व कालात्मा ( Zeitgeist ) समजला पाहिजे. दुसऱ्या दृष्टीचा, कल्पनेचा अथवा उपायाचा उपयोग नाहीं. हा कालात्मा समजून घेऊन त्या काळच्या सर्व प्राप्त साधना-वरून त्या वेळचें पूर्ण चित्र उभारणे एवढेच खऱ्या इतिहासकाराचें कर्तव्य आहे.

### मॉमुसेन

थिआडोर मॉमुसेनची (Theodor Mommsen इ.स.१८१७-१९०३) इतिहासनिर्मिति फार विपुल आहे. त्याच्या लिखाणात उच्च भावनेचा व अचाट बुद्धिसामर्थ्यांचा जोर आहे. त्याने रोमच्या इतिहासाच्या अभ्यासात व लेखनात महदतर घडवून आणले. प्राचीन रोमन लोकाच्या सस्थामध्ये अतर्भूत असलेलें जीवन त्याने प्रगट केले. त्याचप्रमाणे महत्त्वाच्या घटनाचे अर्थ व मोठ्या व्यक्तींचे कार्य त्याने उलगडून दाखविले. नमुन्यादाखल वाचकानीं त्याच्या हिस्ट्री ऑफ रोम या ग्रथातील ज्यूलियस सीझरचे वर्णन पहावे ( खड ४ भाग ११ ). त्याची भाषाशैली उच्च दर्जाची होती. त्यामध्ये शब्दसामर्थ्य व अर्थ-सामर्थ्य होते. त्याच्यामध्ये अपूर्व मौलिक बुद्धि व कल्पकशक्ति होती. तो रान्केच्या तोडीचा किंवा वरचढच इतिहासकार होता. त्याच्या ग्रथात अपरिपक्क-पणा नाहीं. त्याच्यामध्यें कल्पकशक्ति व विवेचकशक्ति याचा योग्य मेळ होता. त्याची दृष्टि व्यापक असून त्याला बारीकसारीक गोष्टीचे आकलन करण्याची अचाट शक्ति होती. त्याने रोमन सस्कृतीचे जीवन व रहस्य पूर्णपणे जाणून तें योग्य भाषेत उत्तम तऱ्हेने माडून दाखविले. त्यामध्यें जिवतपणा आहे. त्याच्या मतें ' The end of historic process is Kulture. '

तसाच एदुआर्द मेयेर ( Edward Meyer इ. स. १८५५-१९२० ) हा इतिहासकार होता. तो माम्सेनच्याहिपेक्षां वरच्या दर्जाचा होता. त्याच्या इति-हासात सर्व प्रकारचे अवश्य गुण दिसून येतात. त्याचा प्राचीन जगाचा इतिहास हा अप्रतिम आहे. त्याच्या इतका विद्वान् इतिहासकार अजून झाला नाहीं असें म्हणतात. १९ व्या शतकाच्या साधनचिकित्सक व घटनाविवेचक शास्त्रीय पद्ध-तीच्या इतिहासकाराच्या प्रयत्नानीं प्रचंड साधन-ग्रंथ गोळा झाले, साधनालयें निर्माण झालीं व साधन-संशोधन मंडळें उत्पन्न झालीं. त्यांनीं त्यासंबधीं सदर्भग्रंथ व त्याच्या याद्या, सूच्या व कोश तयार केले. महत्त्वाचीं साधने निवडून, अभ्यासून व टिपणें व प्रस्तावना देऊन प्रकाशित केलीं. त्यायोगें इतिहाससंशोधनाचें व

लेखनाचे काम बरेच सोपे झालें आहे. सरकारनियुक्त मडळे व खासगी मडळे यांनीं हें सशोधनाचें, प्रकाशनाचें, लेखनाचें आणि साधने रक्षण करण्याचें काम मोठ्या प्रमाणावर केलें आहे. त्यासबधीं अनेक ग्रथ, ग्रंथमाला व नियतकालिका त्यांनीं प्रसिद्ध केल्या आहेत.

* * * * *

## १३. आधुनिक इतिहासकार व त्यांचीं मतें.

१९ व्या शतकात राष्ट्रमतवादी, उदारमतवादी व समाजमतवादी याचा उदय व प्राबल्य झाले. भावनावाद्यानीं राष्ट्रीयत्वाला प्रोत्साहन दिले. त्यास अनुसरून इतिहासकारानीं सर्व प्रकारचीं जुनीं साधने शोधणे, तीं प्रकाशित करणे, त्याचें सकलन करणे व त्याचा राष्ट्राच्या गौरवाच्या दृष्टीने अर्थ लावणे, हीं कामे सुरू केलीं. त्यामुळे पुष्कळ इतिहासाचीं महत्त्वाचीं साधने गोळा झालीं. १६ व्या शतकापासून हे काम धर्मसुधारकाच्या प्रयत्नामुळे थोड्याबहुत प्रमाणात चालू होते. माबियाचे ( Mabillon ) काम या दृष्टीने प्रसिद्ध आहे. पण फ्रेन्च क्रान्तीच्या नतर बदललेल्या दृष्टीमुळे व नेपोलिअनच्या जयामुळें उत्पन्न झालेल्या आशा-आकाक्षामुळे जर्मनी व इतर देशामध्ये नवी जागृति झाली, स्वातत्र्यज्योत पेटली व राष्ट्रीय वृत्ति आली. त्याचबरोबर भावनावाद्यानीं लोकाचा अविनाशी व नैसर्गिक मूलस्वभाव, व राष्ट्रीय सस्कृति यावर जोर दिला. उदारमतवाद्याचीही परपरा व प्रेरणा सुरू होती. जुन्या व नव्या क्रान्त्याच्या योगाने ( १६८८, १७७६, १७८९, १८०७, १८३०, १८४८ ) ती बळावली होती. त्याच्यामध्ये मानववशवाद्याच्या वशाबद्दलच्या उच्च नीच गुणाच्या कल्पनेची भर पडली होती. त्याचा एक परिणाम आपल्या राष्ट्राबद्दलची सर्व साधनसामग्री गोळा करण्यात, जुळविण्यात, सुरक्षित ठेवण्यात व प्रसिद्ध करण्यात झाला; दुसरा परिणाम त्या साधनांचे यथाशास्त्र परीक्षण करण्यात झाला; व तिसरा, त्याचें योग्य संकलन करून यथावृत्त इतिहास लिहिण्यात झाला. यामुळें इतिहाससशोधनाचे व सकलनाचे नवे इतिहासशास्त्र, व आकलनाचे नवे तत्त्वज्ञान बनू लागलें. त्याबद्दल भिन्न प्रकार व मते उदयाला आलीं.

### (अ) जर्मन इतिहासकार.

जर्मनीमध्यें बॅरन फॉन स्टाइनने ( Baron Von Stein इ. स. १७५७–१८३१) गेआर्ग हाईनरिच पेर्ट्झच्या ( Georg Heinrich Partz इ. स. १७९५–१८७६ ) साहाय्यानें जर्मनीच्या इतिहासाची प्रचड साधनसामुग्रीं गोळा करावयाचे काम सुरू केले. पुढे ते गेआर्ग वेट्झ ( Georg Waitz ) याने उत्तम चालविलें. इतर अगासबधीं अशीच मोठीं साधनसामग्री गोळा केली गेली. त्याबरोबर जर्मनीचा इतिहास राष्ट्रीय दृष्टीने लिहिण्याचे काम जोहान

गुस्टाव्ह ड्रायसन ( Johaun Gustav Droyson, इ. स. १८०४–१८८४ ), हाईनरिक फॉन ट्राइट्चके ( Heinrich Von Treitschke, इ. स. १८३४–१८९६ ) आणि हाईनरिक फॉन सिबेल ( Heinrich Von Sybel, १८१७–१८९५ ) यासारख्या नामांकित इतिहासकारांनी केले. त्यांनी राष्ट्रजीवनाच्या प्रत्येक अंगाचे पूर्ण व जोरदार वर्णन केले आहे. त्यांनी प्रशियाच्या कर्तबगारीच्या इतिहासाची फार प्रशंसा केली आहे. त्यांची आग्रही व पक्षपाती राष्ट्रीय दृष्टि होती.

गुलीएल्मो फेरेरो ( Guglielmo Ferrero ) ह्याने आपल्या 'Greatness and Decline of Rome ' या नामांकित ग्रंथात सामाजिक, आर्थिक व नैतिक कारणांचा व अंगांचा विचार केला आहे. त्याचा रोमन इतिहासाच्या रहस्याचा उलगडा ( re-interpretation ) फार नवीन आहे. त्यामध्ये संस्थांच्या विकासाचे विवरण आहे. त्याच्या लिखाणावर लाम्प्रेक्टच्या मताचा–इतिहासाच्या विकासामध्ये सामुदायिक मनःस्थितीचे महत्त्व–परिणाम झाला आहे.

### (आ) फ्रेंच इतिहासकार

इतिहासाची साधने गोळा करण्याचे व संपादण्याचे काम जॉं माबिऑं (इ.स.१६३२-१७०७) च्या वेळेपासून फ्रान्समध्ये सशास्त्र चालले होते. १९ व्या शतकात हे काम प्रचंड प्रमाणावर केले गेले. असे काम करणारे व रान्केच्या पद्धतीचे इतिहासकार फ्रान्समध्ये अनेक झाले.

फ्रान्सुआ गीझोने ( Francois Guizot इ. स. १७८७–१८७४) ह्या कामात स्टाईनसारखा पुढाकार घेतला. तो फ्रान्सचा पहिला मोठा इतिहासकार आहे. तो विद्वत्तेमध्ये व चोख साधनज्ञानामध्ये रान्केच्या तोडीचा नसला तरी त्याच्यामध्ये घटनांचे विश्लेषण व संश्लेषण करण्याची मोठी शक्ति होती. त्यानेच फ्रान्समधील ऐतिहासिक अभ्यासाला मोठे प्रोत्साहन दिले. गीझोने वर्णनाच्या ऐवजी विवरणाकडे व तात्पर्य सांगण्याकडे विशेष लक्ष दिले. त्याला व्यक्तीपेक्षा सामुदायिक जीवन रेखाटणे अधिक योग्य वाटे. त्याला उत्तम वर्णन करता येत नसे. परंतु त्याचे विचार व्यापक व दृष्टि खोल होती. त्याच्या लिखाणात कलेची मोहकता नाही, पण विचाराचे आकर्षण आहे. घटनांच्या अंतर्भूत असलेले संबंध, तत्त्वे व कल्पना तो आकलन करून त्यांचा यथायोग्य उलगडा करू शके. पण त्याला मानवी जीवनाच्या अपूर्वतेचे, व त्यातील व्यक्तींच्या विशेष स्वभावाचे निरूपण करता आले नाही.

गीझोच्या मते साधने शोधावी, ती तपासून घटना निवडाव्या, त्यांचे संबंध व त्यांची कारणे हुडकावी, त्यांची बाह्य स्वरूपे आणि त्यांची आंतरिक तत्त्वे व अपूर्व लक्षणे वर्णावी. आणि अशा प्रकारे गत इतिहासाची चित्रे काढून

त्यांचे परिणाम, रोख, गति हीं दाखवावीं. गीझोने युरोपीय संस्कृतिचा सामान्य इतिहास लिहिला आहे.

फ्रान्समध्यें इतिहासाच्या विद्यार्थ्यांना ऐतिहासिक सशोधनाचे शिक्षण देणारी संस्था L'Ecole des Chartes ( साधन-सशोधन-शाळा ) त्याच्या वेळेस १८२९ मध्यें स्थापन झाली. तिचे इतिहासाविषयींचे काम व प्रसिद्धि फार मोठी आहे.

फ्रान्सुआ मिन्येचे ( Francois Mignet इ. स. १७९६-१८८४ ) ग्रंथ नव्या ऐतिहासिक पद्धतीचे उत्तम प्रमाण आहेत. त्याची कारणमीमासा उत्कृष्ट आहे. मिन्येला घटनाची साखळी जुळविणे, त्यातील प्रगतीचा धागा दाखविणे व त्यासबंधीं विचार करणें, याबद्दलची योग्यता होती. त्याची भाषा सुबोध व सरळ आहे. तो साधनग्रथ संपादन करण्यात कुशल होता. त्याचा इतिहास उत्कृष्ट प्रतीचा आहे. तो फ्रान्समधील त्यावेळचा फार मोठा इतिहासकार समजला जातो. तसेच ऑगुस्तीन थिएरी ( Augustin Thierry इ. स. १७९५-१८५६ ) लुई अडॉल्फ थिएर्स (Louis Adolfe Thiers, इ. स. १७९८-१८७३ ), जाँ व्हिक्टर दुरुआ ( Gean Victor Duruy, इ.स. १८११-१८९४ ) व अर्नेस्ट लाव्हिस ( Ernest Lavisse ) हे या वृत्तीचे प्रसिद्ध इतिहासकार झाले. ते सर्व भावनात्मक होते. त्यानीं पुष्कळ ग्रथ लिहिले.

अल्फान्से ओलार्ड ( Alphonse Aulard ) याचा फ्रेन्च राज्यक्रातीचा इतिहास त्यातील ऐतिहासिक पद्धतीच्या व अचूक ज्ञानाच्या दृष्टीनें उच्च प्रतीचा आहे. आल्फ्रेड राम्बो ( Alfred Rambaud इ. स. १८४२-१९०५ ) व चार्लेस साइनोबो ( Charles Seignobos ), यानीं फ्रेन्च संस्कृतीचा इतिहास व इतर युरोपचे इतिहास लिहिले आहेत.

## (इ) इंग्रज इतिहासकार

इंग्लंडमध्ये टॉमस कार्लाईल ( Thomas Carlyle इ. स. १७९५-१८८१ ) हा स्वतत्र वृत्तीचा इतिहासकार झाला. त्याच्या मते इतिहासघटनेमध्ये व्यक्तीला व विशेषतः वीराला मोठे महत्त्व आहे,व इतिहास हा एक collective biography ( व्यक्तींचे साकल्यरूपी चरित्र ) आहे. इतिहास हा अनेक व्यक्तीचरित्रांचें सार व सकलन आहे. तो घटनाचा नैतिक दृष्टीने विचार करतो. व्यक्तींच्या स्वभावाचे आणि मनोगत विचाराचे व भावनाचे,त्याच्या कृत्याच्या अनुरोधाने परीक्षण केल्याने इतिहास समजतो. त्याने मोठ्या फ्रेडरिकचा, फ्रेन्च राज्यक्रांतीचा व क्रॉमवेलचा इतिहास लिहिला आहे. इतिहासकार या दृष्टीने तो कमी दर्जाचा आहे. त्याच्या इतिहासात चिकित्सक पद्धत नाहीं, प्रमाणित

साधने नाहींत, बारीकसारीक माहिती चुकीची आहे, आणि दृष्टि पक्षपाती आहे. त्याचीं मतें व अनुमानें यथार्थ व सप्रमाण नाहींत. तो इतिहासाला व्यवहारात आलेली अथवा आणलेली ईश्वरी योजना समजतो. या ईश्वरी नाटकात कोणत्या मनुष्यानीं काय भाग घेतला व त्यामध्ये काय हृदयद्रावकता, कोणते सुखदुखःकारक प्रसग, कोणते रस ( करुण, वीर, भयानक इ. ) आहेत, हे इतिहास दाखवितो. त्याचा इतिहास हा नाट्यकथारूपी आहे. त्याने लोकाच्या अविरत व सामुदायिक जीवनापेक्षा व्यक्तीच्या उत्कट जीवनाकडे अधिक लक्ष दिले. त्याचीं व्यक्तींचीं चित्रे उत्कृष्ट आहेत. तो वीर पुरुषाना इतिहासाला वळण लावण्याचे श्रेय देतो. तोच इतिहास घडर्णीत आरभकर्ता आहे.

हेन्री टॉमस बकल (इ.स.१८२१-१८६२) याच्या विचारामध्ये मात्र नव्या बौद्धिक. प्राकृतिक व जीवनशास्त्राचा प्रभाव दिसून येतो. त्याने आपल्या ‘ इग्लडमधील सस्कृतिचा इतिहास ’ यामध्ये प्राकृतिक भूगोलाचे नियम व मर्यादा, याचा मानवसमाज व समजुती यावर होणारा परिणाम, तद्वत् मनुष्याच्या कर्तृत्वाचा उलट त्याच्यावर परिणाम, याचा विचार केला आहे व त्याबद्दल आपलीं काहीं मते प्रतिपादिलीं आहेत. जेव्हा बौद्धिक जाणीव व कर्तृत्व कमी असते तेव्हा भौगोलिक प्रभाव जास्त असतो. अशी परिस्थिति प्राथमिक समाजामध्ये असते. पण त्याच्या उलट प्रौढ समाजात मानवाच्या बौद्धिक शोधामुळे व कर्तृत्वामुळे भौगोलिक प्रभाव कमी होतो, परिस्थितीची पकड कमी होते, व मनुष्याचा पगडा तिच्यावर बसतो. त्याच्या मतें “ The Advance of European civilisation is characterised by a diminishing influence of physical laws and an increasing influence of mental laws, ” and that “ the measure of civilisation is the triumph of the mind over external agents. ” त्याच्या मते मनुष्य हा निसर्गाचाच एक भाग आहे. तेव्हा इतिहासाच्या गतीचे नियम हे सृष्टीच्या नियमासारखे आहेत. यावरून तो इतिहासाच्या गतीचे काहीं प्राकृतिक नियम ठरवूं पाहात आहे.

१९ व्या शतकाच्या सुरवातीला इंग्लंडमध्ये इतिहासाचा यथाशास्त्र अभ्यास फारच मागे होता. हेनरी हॉलमने ( Henry Hallam, इ. स. १७७७–१८५९ ) इतिहासलेखनाची आधुनिक परंपरा सुरू केली. त्यानें १८१७ मध्यें युरोपच्या मध्ययुगाचा ( View of the state of Europe during the Middle Ages ) इतिहास लिहिला. तो वर्णनात्मक व विवरणात्मक आहे. त्याने मुख्यतः सस्थाच्या वाढीबद्दल लिहिले; त्या काळच्या लोकव्यवहाराबद्दल अथवा विचाराबद्दल नाहीं. त्याची वृत्ति समतोल व न्यायी होती. त्यानें इंग्लंडचा वैधानिक ( Constitutonal History of

England इ. स. १४८५–१७६० पर्यंतचा ) इतिहास उदारमतवादी दृष्टीनें लिहिला. त्याला प्रजास्वातंत्र्याची व पार्लमेंटसंस्थेची आवड होती. त्याची विद्वत्ता, त्याचे परिश्रमपूर्वक संशोधन व त्याची न्यायी वृत्ति हीं वरच्या दर्जाचीं होतीं.

इंग्लडमध्ये इतिहासाच्या साधनांचे व्यवस्थित सशोधन व संपादन १९ व्या शतकाच्या पूर्वी झाले नाहीं. या शतकाच्या इंग्रज इतिहासकारामध्ये जातीय, वांशिक व राष्ट्रीय भावना प्रबळ होती. त्यानीं जर्मन व अँग्लोसॅक्सन लोकाच्या वर्चस्वाचे व कर्तृत्वाचे खूळ ( myth ) व मत आपल्या इतिहासात माडलें. त्याच्या मते स्वतत्रतेच्या कल्पनेचा उदय, वाढ व पालन जर्मन जातींच्या लोकसभामध्ये झालें. अशा मताचे इंग्रज इतिहासकार टॉमस मेकॉले ( इ. स. १८००–१८५९ ) जान केबल ( John Kemble इ.स. १८०७–१८५७ ), विल्यम स्टब्स ( William Stubbs, इ. स. १८२५–१९०१ ), एडवर्ड फ्रीमन ( Edward Freeman इ. स. १८३३–१८९२ ) जेम्स फ्रुड ( James Froude, इ. स. १८१८–१८९४ ), सर जॉन सीली ( Sir John Seeley, इ. स. १८३४–१८९५), सर रिचर्ड ग्रीन (Sir Richard Green ) इत्यादि होते. ह्या सर्व इतिहासकारानीं इग्रज लोक, इग्रजाचा इतिहास, व सस्था व समजुती, त्याचे राज्य व साम्राज्य याचे गोडवे गायले. त्यांनीं इतिहासात राजकारणाला प्रमुख स्थान दिलें; आणि इग्रजाच्या राज्यनीतीला व साम्राज्यनीतिला, आणि लोकप्रतिनिधि सभेला व सस्थाना वर्चस्वाचें स्थान दिले. हीं मते पुढे काहीं अशानीं खोटीं ठरलीं व त्यामुळे बदलावीं लागलीं. फ्रेडरिक सीबाम ( Frederick Seebohm इ. स. १८३३–१९१२ ) फ्रेडरिक विल्यम मेटलड ( Frederick William Maitland इ. स. १८५०–१९०६ ) व पॉल व्हिनोग्रडॉफ ( Paul Vinogradoff इ. स. १८५४–१९२५ ) यानीं या आत्यतिक आग्रही मताला मुरड घातली. त्यानीं इतर जानींच्या प्रयत्नाचा, पराक्रमाचा व कामाचा आढावा घेऊन त्याचा इतिहासामधील भाग दाखविला.

बिशम विल्यम स्टब्स याने इतिहासाच्या व्यवस्थित सशोधनाचे व सपादनाचें काम मोठ्या प्रमाणावर केले. त्याने १८६३ पासून बरेच इतिहाससाधनाचे खंड प्रसिद्ध केले. त्याला इतिहासपद्धतीचे सर्व अभ्यासप्रकार व लेखनप्रकार चागले अवगत होते. साधने गोळा करणे, संशोधणे, जुळविणे, आणि त्याच्या यथार्थ परीक्षणानतर त्यातील घटना विषयवार व क्रमवार रचून त्याचे योग्य वर्णन व अर्थ करणे आणि तदनुरोधाने इतिहासाचे खरे व सपूर्ण चित्र योग्य भाषेंत मांडणें, ह्या सर्व गोष्टी त्याने यथामति पण यथाशास्त्र केल्या. त्याचा दीर्घ उद्योग, बिनचूक वर्णन, सूक्ष्म अवलोकन व सावध विवेचन, हीं सर्व फार वाखा-

णणीय आहेत. त्याने इग्लडच्या व युरोपच्या काहीं भागाच्या इतिहासाचें वास्तविक चित्र उत्तम दिले आहे. त्याची विद्वत्ता मोठी होती. तो कुशाग्र बुद्धीचा होता. त्याचीं अनुमाने व परीक्षण न्यायी व बिनचूक असे. त्याचीं स्वभावचित्रे उत्कृष्ट आहेत. त्याचा इग्लंडचा वैधानिक इतिहास ( Constitutional History of England, 3 vols. ) हा नमुनेदार आहे. त्याने मिळालेलीं सर्व साधने उपयोगात आणलीं आहेत. त्याचा मुख्य पक्षपात इंग्लड हे जगाला राजकीय स्वातंत्र्याचा संदेश देणारे राष्ट्र आहे असा होता.

फ्रीमन हा विद्वान्, परिश्रमी व व्यापक दृष्टीचा इतिहासकार होता. त्याने ॲंग्लो–सॅक्सन लोकाच्या इतिहासावर बरेच लिहिले आहे. पण त्याच्या इतिहासांत पाल्हाळ आहे, मोजकेपणा नाहीं. त्याचे मन पूर्वग्रहाने व आवडीनिवडीने भरलेले होते. त्याने लोकाच्या चालीरीती, सस्था व कायदे यांच्या इतिहासाकडे विशेष लक्ष दिले नाहीं. त्याने केवळ प्रसिद्ध साधनाचाच उपयोग केला, अप्रकाशित साधनाचा केला नाहीं. त्याने उपयोगात आणलेल्या साधनाचे मात्र योग्य परीक्षण करून तीं वापरलीं. तो वीरव्यक्तींचा पूजक होता व आपल्या मताचा आग्रही होता. त्याच्या मते " History is past politics and politics is present history." इतर अगाचा त्याने विचार केला नाहीं. राजकारणालाच त्याने इतिहासाचे मुख्य अग व क्षेत्र ठरविलें. शिवाय, त्याने इतिहासाच्या अंतर्गत असलेल्या एकतेचा ( Unity of History ) मुद्दा प्रतिपादिला. तो म्हणतो " The essence of history is continuity and the essence of continuity is politics. " त्याच्या ग्रथामध्ये भाषेचा ओघ व ओजस्विता आहे.

टॉमस बॅबिंग्टन मेकाले (इ.स. १८००–१८५९ ) हा काहीं खोल विचार करणारा इतिहासकार नव्हता. जरी त्याची वर्णनशक्ति मोठी होती तरी त्यामध्ये योग्य प्रमाणता नव्हती. फ्रूडमध्ये पक्षपात व निष्काळजीपणा आहे.

सिलीच्या इतिहासात देशाचे केवळ राजकीय जीवन व कारभार, आतरराष्ट्रीय युद्धें व तह, आणि राज्याचा प्रसार व विस्तार याचा विचार व वर्णन आहे. त्यानें इग्रजी सत्तेचा व साम्राज्यनीतीचा गौरव वर्णिला आहे. त्याचे वर्णन पक्षपाती पण उपदेशात्मक आहे. त्याच्या मते, " History is the root and politics is the fruit, " ( इतिहासाचे फळ राजनीति व राजनीतीचे मूळ इतिहास ) आहे. तो नुसते वृत्तात वर्णनाला महत्त्व देत नाहीं. त्याचा हेतु व्यावहारिक राजकारणाची फोड करणे व त्याला विशिष्ट वळण लावणें असा आहे. तेव्हा सगळ्या घटनाचें वर्णन न करता आपल्या उद्देशाच्या दृष्टीनें त्याची निवड करावयाची असते. त्याच्या मते, " History should not

merely gratify the reader's curiosity about the past, but modify his views of the present and his forecast of the future."

ग्रीनच्या इतिहासात इंग्रज लोकांच्या जीवनाच्या सर्व अंगांना सामाजिक, साहित्यिक, धार्मिक, राजनैतिक, सांस्कृतिक इत्यादि स्थान मिळाले आहे. त्यानें अनावश्यक गोष्टी सोडल्या आहेत व कालाचे कुशलतेने खंड पाडिले आहेत. केवळ राजवंश व राजे यांच्या अनुरोधाने त्याने कालखंड पाडले नाहींत. त्याचें वाचन विपुल होते, त्याची माहिती पुष्कळ होती व त्याची दृष्टि व्यापक होती. तो संशोधनामध्ये निष्णात होता. त्याची वर्णनशैली आकर्षक आहे. त्याला लोकांच्या जीवनामागे असलेले नानाप्रेरक भाव, संबंध व कारणे यांचें ज्ञान होते. त्याने इंग्रज लोकांचा सुंदर इतिहास लिहिला आहे.

हे इंग्रज इतिहासकार भावनाप्रधान राष्ट्रीय वृत्तीचे होते. त्याचा परिणाम इतिहासाची साधने गोळा करण्यात, संपादण्यात व त्याचा अर्थ लावण्यात पुष्कळ झाला. त्यामुळे पुष्कळांना ते अभ्यासण्याची व संशोधित इतिहास लिहिण्याची संधी मिळाली. मात्र त्याबरोबर स्वतःच्या राष्ट्राबद्दल व लोकांबद्दल पक्षपाती दृष्टि उत्पन्न झाली. त्यांची फाजील स्तुति व स्तोम माजविले गेले. साधनांचे परीक्षण सगळ्यांनीं चोखपणे व पूर्णपणे केले नाहीं, आणि आपल्या आग्रही विधानांनीं इतिहासाला विकृत वळण दिले. विल्यम एडवर्ड हार्टपूल लेकी ( William Edward Hartpole Lecky, ( इ. स. १८३८–१९०३ ) चा इतिहास मात्र निःपक्षपाती आहे. त्याची विद्वत्ता मोठी आहे. त्याची भाषा सरळ आहे. त्याने नुसता आपल्या काळचा सामान्य (General ) इतिहास लिहिला नाहीं. त्याने युरोपातील नीतिकल्पनांच्या ( European morals ), व बौद्धिक विचारसरणीच्या अथवा विवेकवृत्तीच्या ( Rationalism ) उदयाचा व विकासाचा इतिहास लिहिला आहे आणि त्याबरोबर सामाजिक व आर्थिक हालचालींचाहि वृत्तांत दिला आहे.

सॅम्युअल रॉसन गार्डिनर ( इ. स. १८२९–१९०२ ) हा शास्त्रशुद्ध पद्धतीचा इंग्लंडचा इतिहासकार झाला. त्याने इंग्लंडचा इतिहास ( इ. स. १६०३–१६६० ) अनेक भागांत लिहिला. त्यामध्ये त्याची विद्वत्ता, चोखपणा, अपक्षपात, परिश्रम व सत्यान्वेषण हे गुण प्रगटपणे दिसून येतात. त्याची माहिती, रचनाकौशल्य व योग्यता श्रेष्ठ प्रतीची आहेत. त्याच्या लेखनांत वास्तविकता आहे.

तसेंच काम फ्रेडरिक विल्यम मेटलंड याने मध्यकालीन इतिहास, संस्था व कायदा यांसंबंधीं केले. त्यांच्यासारखे नंतरचे इंग्रज इतिहासकार चार्ल्स

फर्थ, एच्, ए. एल्. फिशर, ए. एफ्. पोलार्ड, जे. बी. ब्यूरी, जी. एम्. ट्रेव्हे- ल्यान, बर्ट्रांड रसेल इत्यादि आहेत. त्यांनींहि निरनिराळ्या भागासंबंधीं उत्तम प्रतीचे इतिहासलेखन केलें आहे.

मेटलंडच्या लिखाणात विद्वत्ता, कुशाग्रता, मौलिकता व मोहकता आहे. त्याच्या मतें " Such is the unity of all history that any one who endeavours to tell a piece of it must feel that his first sentence tears a seamless web. "

## लॉर्ड ॲक्टन

लॉर्ड ॲक्टन ( इ. स. १८३४–१९०२ ) यानें इतिहासाचा ग्रंथ म्हणून लिहिला नाहीं. पण त्याची अनेक विषयाबद्दलची विशेषतः इतिहास व राज- कारण याची विद्वत्ता बिनतोड व अगाध होती. त्याने इतिहासाची कल्पना व्यापक धरली व खोल केली. त्याची भावना नैतिक स्वातंत्र्याची होती. त्याचीं इतिहासविषयक, त्यांतील मोठ्या व्यक्ति, फ्रेन्च राज्यक्रान्ति, स्वतत्रता, राष्ट्रीयत्व यावरचीं ऐतिहासिक परीक्षणाचीं भाषणें व इतर ऐतिहासिक विषयांवरचे लेख फार प्रसिद्ध आहेत. त्याचे विचार अतिशय गहन असून बिनतोडीचे आहेत. त्याच्या मतें इतिहासाच्या कक्षेत मानवी जीवनाची व सस्कृतीच्या घडामोडीची सर्व क्रिया येते. तो उदारमतवादी होता. त्याला स्वातत्र्याची विशेष आवड होती. त्यानें स्वातत्र्यकल्पनेचा उदय व वाढ यावर उत्तम लेख लिहिले. त्याच्या मतें राष्ट्रीय विधानाचा व लोकाच्या सुखाचा मुख्य आधार स्वतत्रता हीच आहे. तिची शक्ति इतिहासाच्या धार्मिक व राजकीय घटनामध्ये फार मोठी आहे. त्यानें या बाबतींत पोपच्या कट्टर धार्मिक मताचा विरोध केला. त्याच्या मतें " It is the office of historical science to maintain morality as the sole impartial criterion of men and things. " तो कोणत्याहि विषयावर त्यासंबंधीं सगळे वाचल्यावाचून लिहीत नसे. त्यामुळे त्याने फारच थोडे लिहिले. त्याच्या मते घटनांचा विचार त्यांचा तत्त्वाशीं असलेल्या सबधावरून व त्याच्याशीं जुळवून केला पाहिजे. त्यावरूनच सत्य समजण्याचा मार्ग सापडतो. याकरिता बाह्य घटनाबरोबर मनुष्याचे आतरिक विचार याना महत्त्व आहे. इतिहासामध्यें विचाराना मोठे स्थान त्याने दिलें आहे. मनुष्याचे विचार व कृत्ये याच्या योगाने इतिहासातील महत्त्वाच्या घटना बनतात. घटनाचे परीक्षण करून त्याच्या क्रमामध्ये असलेलीं तत्वे शोधलीं पाहिजेत. त्याच्या विचारात गहनता व यथार्थता होती. त्याने १८८२ मध्यें स्वातत्र्याच्या इतिहासाची एक बृहत् योजना तयार केली तशीच योजना त्यानें " केम्ब्रिज आधुनिक इतिहासाची " रचली. स्वतंत्रता हेंच त्याच्या मतें सर्व

भिन्न वाटत नसून एकच वाटत होतें. एक त्याचे रूप, तर दुसरा त्याचा अर्थ आहे. तो म्हणतोः—

"Politics and History are interwoven but not commensurate. Ours is a domain that reaches further than affairs of the state. It is our function to keep in view and to command the movement of ideas, which are not the effect but the cause of public events."

त्याच्या मते आधुनिक इतिहासाचा मुख्य आशय "The emancipation of conscience from authority" अथवा "the advance of man towards ordered freedom" हा आहे. धर्म आणि स्वातंत्र्य हेच मानवी जीवनाचे दोन प्रधान हेतू आहेत व त्याचाच इतिहासात मुख्यतः विचार केला पाहिजे. केवळ आर्थिक भरभराट अथवा ज्ञान आणि सत्ता याची प्राप्ति याचा विचार नव्हे.

त्याची विचारशक्ति अपूर्व कल्पकतेची होती. त्याच्या मानसिक शक्तीची पोहोच अलौकिक होती. त्याचे बारीक गोष्टीचे ज्ञान व त्याची त्यामधील सूक्ष्म दृष्टि व मर्मज्ञता फार मोठी होती. त्यानें इतिहासाला जगाचें न्यायालय धरले. त्याने इतिहासाच्या घडामोडींत वीर विभूतींना व विचारवताना महत्त्व दिले आहे. त्याचप्रमाणे इराणी, यवन व टयूटन लोकाना महत्त्व दिले आहे. त्याच्यामतें इतिहासाच्या मागे एखादी पूर्व योजना, समतेची अथवा स्वातंत्र्याची प्रेरणा, प्रवृत्ति अथवा निवृत्ति, धर्माचे आकर्षण, राष्ट्रीयत्वाचे व मानवतेचे प्रोत्साहन असते. त्याची मते व अनुमाने आग्रहात्मक व व्यापक असल्यामुळे त्यामध्ये इतिहासाच्या घडामोडीबद्दलच्या विधानाला लागणारे सापेक्षत्व कमी आहे. त्यामध्यें आर्थिक प्रश्नाचा विचार नाहीं.

बर्ट्रान्ड रसेल हा मुख्यतः तत्त्वज्ञ आहे. त्याने Freedom and Organisation इ. स. १८१४–१९१४) नावाचा इतिहास लिहिला आहे. त्याच्या मते सत्तेची आकांक्षा हेच सामाजिक जीवनाचे अथवा ऐतिहासिक घडामोडीचे मुख्य कारण आहे, ते आर्थिक कारण नाहीं. तो म्हणतो राजकीय मत, आर्थिक तत्र व मोठीं माणसे याच्या सयोगाने इतिहास घडत असतो. त्याशिवाय योगायोगालाही ( Chance ) तो कारणपरपरेत स्थान देतो.

फिशरच्या मते इतिहासांत एखादी ठराविक योजना अथवा सविधानक सांपडत नाहीं, पण अनेक प्रसग एकामागून एक लाटाप्रमाणे अवचितपणानें येतांना दिसतात. " I can see only one emergency following upon another as wave follows upon wave. " याकरता इतिहा-

सांच्या घटनाक्रमाबद्दल सर्वसामान्य सिद्धान्त न बांधणे, हाच नियम इतिहासकाराला उपयुक्त आहे. इतिहासामध्ये आकस्मिततेचा व योगायोगाचा खेळ आहे, केवळ कार्यकारणपरंपरेचा नाहीं.

जॉर्ज पिबडी गूच हे आजकालचे मोठे राजकीय हालचाली व आतरराष्ट्रीय राजनीतीचे इतिहासकार आहेत. त्यांनीं (History of the Historians of the 19th Century ) व अनेक समकालीन राजनैतिक वृत्तांताचे इतिहास लिहिले आहेत. ते मोठे समतोल व निःपक्षपाती आहेत.

* * * * *

## १४ सांस्कृतिक व सामाजिक विचारसरणीचे इतिहासकार

१९ व्या शतकात मानवी जीवनाचे सास्कृतिक अग मुख्य घेऊन त्याच्या उत्पत्तिबद्दल, वाढीबद्दल व भिन्न प्रकाराबद्दल इतिहास लिहिणारे अनेक झाले. त्यांनीं मानवी सस्था, साहित्य, कला, विद्या, चालीरीती, आचार, विचार याबद्दलचे बरेच सुसगत, यथाक्रम, व यथादेशकाल लेखन केले. त्या इतिहासकारामध्ये जर्मनींत कार्ल लाम्प्रेक्ट, विल्हेल्म डिल्टाय, व ओस्वाल्ड स्पेन्गलर; फ्रान्स देशात हेनरी बेर व त्याचे सहयोगी; अमेरिकेंत जेम्स हार्वे राबिनसन व जेम्स शॉटवेल व त्याचे अनुगामी; इंग्लड देशात लार्ड ॲक्टन, जे. बी. ब्यूरी, एफ्. एस्. मार्व्हिन, आर्नोल्ड टॉयन्बी इत्यादि, यानीं या प्रकारचे स्वतत्र ग्रंथ एकट्यानीं अथवा अनेकाच्या सहकाराने व साहाय्याने लिहिले आहेत.

केवळ सास्कृतिक दृष्टीने लिहिलेल्या इतिहासामध्ये कांहीं बाबतींत एक प्रकारचा काल्पनिक सामान्यपणा आला आहे व घटनाच्या घडामोडी व हालचाली, त्याचा ओघ व भिन्नत्व, याचे यथार्थ स्वरूप नष्ट झाले आहे. त्यामुळे इतिहासाचे इतिहासत्व काहीं अशाने गेले आहे.

कार्ल लाम्प्रेक्टने ( Karl Lamprecht, इ. स. १८५६–१९१५ ) अशा व्यापक व विस्तृत योजनेचा जर्मनीचा बौद्धिक इतिहास १५ भागामध्ये लिहिला. त्याच्या मतें प्रत्येक देशाच्या इतिहासाचे अनेक कालखड पडतात, व प्रत्येक खंडाचे लक्षण त्या काळच्या लोकाच्या प्रचलित असलेल्या सामुहिक मनोविचारांत ( a collective psychological condition ) सापडते, व त्याच्यामुळे या युगातील व्यवहाराचा व संस्थाचा स्वभाव बनतो. इतिहास हा त्या युगायुगाच्या विशिष्ट सामूहिक मनोविचाराचा प्रभाव व अनुक्रम यांचा वृत्तात आहे. पण त्याची ही युगविभागाची विशिष्ट योजना व त्याचीं खास वैचारिक लक्षणें, हीं सर्व देशाच्या इतिहासाला लागू पडत नाहींत.

इतिहासाच्या विकासक्रमाला एका सामान्य योजनेमध्ये समन्वयाने बसविण्याचा लाम्प्रेक्टचा प्रयत्न हा कॉंतच्या प्रयत्नासारखा आहे. त्याला तो Kulture

Historische Methode ( सांस्कृतिक इतिहासपद्धत ) म्हणतो. पण तिच्या योगे मनुष्यानीं केलेले स्वतंत्र उपक्रम व प्रभावी प्रयत्न ओळखता येत नाहींत. इतिहासक्रम एका विशिष्ट निश्चित रूपाच्या सरळ मार्गानें होत नाहीं. सभोंवतीं असलेल्या मानसिक परिस्थितीच्या मर्यादामध्येसुद्धा निवड करण्याला व इच्छित वळण घेण्याला अनेक संभवनीय मार्ग असतात. ते काम व्यक्ति करते. त्यामुळे तिच्याकडे निर्णायक भूमिका येते. कोणतेहि घडलेले कृत्य अथवा घटना ही अवश्य म्हणून व पूर्वयोजनेप्रमाणें अथवा परिस्थितीच्या पकडीमुळे घडणारच होती असें नाहीं. इतिहासाच्या घडामोडींत व हालचालींत जे भिन्न व असंख्य प्रकार ( types ) घडून येतात ते एखाद्या योजनेस अथवा आवश्यकतेस अनुसरून असतात असें नाहीं.

### डिल्टाय

विल्हेल्म डिल्टाय ( Wilhelm Dilthey इ. स. १८३३–१९११ ) या जर्मन इतिहासकाराने आपल्या " ऐतिहासिक तर्कपद्धतीची समीक्षा " A Critique of Historical Reason)या विद्वत्तापूर्ण ग्रंथामध्ये इतिहासाच्या अभ्यासाबद्दल एक नवी मौलिक पद्धति पुढे मांडली. त्याने प्रथम प्राकृतिक शास्त्रें व मानवी सांस्कृतिक शास्त्रे यांच्या अभ्यासपद्धतीमध्ये मुळातला फरक दाखविला. त्याच्या मते दोघांच्या पद्धती एक नसून भिन्न आहेत. मानवी अभ्यासविषयामध्ये त्याने इतिहास विषयाची गणना केली. मानवी सांस्कृतिक व सामाजिक जीवनाचें खरे ज्ञान कोणत्या पद्धतीने मिळवावयाचें हा त्याच्यापुढे प्रश्न होता.

रान्केप्रभृति केवळ खऱ्या घटनांचे योग्य वर्णन करण्याचे मागे लागले होते. येवढ्यानेंच मानवी जीवनाचा खरा अभ्यास होणे शक्य नव्हते. डिल्टायनें या अभ्यासाचा खरा मार्ग दाखविला. तो केवळ घटना, संस्था इत्यादींच्या वर्णनाचा नसून तो मानवी जीवन अनुभवण्याचा व त्याचे रहस्य ओळखण्याचा आहे. त्याच्या मतें सर्व ज्ञान हे अनुभवावर अधिष्ठित आहे. आपल्या अनुभवाची मौलिक एकता व त्याचे तज्जन्य प्रामाण्य ही आपल्या समान जाणीवेवर ( Consciousness ) अवलंबून आहेत. आपल्या जाणीवेच्या शक्तीनें प्राप्त झालेल्या स्वानुभवावरूनच आपल्याला वास्तविक मानवी घटना समजतात. मानवी जीवनाचे अभ्यासविषय हे आपल्या जाणीवेनेंच समजतात. तेव्हां त्याकरता आपल्याला या मानसिक जाणीवशक्तीच्या सर्व अंगाचा अभ्यास करणें जरूर आहे.

डिल्टाय हा इतिहास व मानसशास्त्रज्ञ होता. त्याचे क्षेत्र सर्व मानवी जीवनाचा व संपूर्ण मानवाचा अभ्यास हे होते. मनुष्याच्या सर्व विविध शक्ति,

इच्छाशक्ति, भावनाशक्ति व विचारशक्ति–याना त्याने आपल्या ज्ञानाचा पाया केला, व त्याच्या योगे त्यानें आपल्या ज्ञानविषयक कल्पना रचल्या. त्याच्या पद्धतीचीं मुख्य लक्षणें अशीं आहेत. ( १ ) आपल्या सर्व काल्पनिक विचाराचा संबंध अनुभवानें, भाषेने व इतिहासाने प्रगट केलेल्या मनुष्यस्वभावाशीं जोडणे, ( २ ) त्याचा एकमेकाशीं सबध शोधणे, ( ३ ) आणि ज्या मार्गानें आपण वास्तविक घटना चित्रित करतो व ओळखतो त्या मार्गाचे महत्त्वाचे मानसिक घटक दाखविणे त्याच्या ' ऐतिहासिक तर्काची समीक्षा ' ( A Critique of Historical Reason) पुस्तकाचा मुख्य उद्देश मानवी अनुभवाच्या सहाय्याने मानवी विद्यामध्ये ( human studies ) अतर्भूत असलेलीं ज्ञानाचीं खरीं तत्त्वे हळूंहळूं अनुमानाने काढणे हा आहे. स्वतःच्या जाणिवेने " Understanding दुसऱ्याचा अनुभव समजणे, मग तो सामाजिक, सांस्कृतिक, ऐतिहासिक, अथवा चारित्रिक स्वरूपात ग्रथित असो, याच योगाने मानवी विद्यासबंधीं ( human studies ) केलेले अनेक प्रकारचे अभ्यास व त्याचे परस्पर संबंध व परिणाम समजणे शक्य आहे. येथे द्रष्टा अथवा जाणणारा हा जाणण्याची घटना, विषय अथवा वस्तु याहून स्वभावाने भिन्न नसतो. वास्तविक जगामध्ये जाणणारा व जाणलेले यामध्ये एकात्मता असते म्हणून गत घटना अनुभवाने समजतात. इतिहासाचा आधार ह्या वास्तविक घटनामध्यें अंतर्भूत असलेला अनुभव समजण्याची जाणिवेची शक्ति अथवा ज्ञानशक्ति आहे. आपल्याला दुसऱ्या माणसाचीं मने व अनुभव समजतात, याचे कारण आपल्या स्वभावामध्ये साम्य आहे; त्यामुळे आपली जाणीव दुसऱ्याचे मन व अनुभव समजते. प्रत्येकजण आपल्या जाणीवेने व कल्पनेने दुसऱ्याचा प्राप्त अनुभव त्यामध्ये शिरून स्वतः अनुभवू ( re-live ) अथवा त्याची प्रत्यक्ष प्रचीती घेऊ शकतो. तेव्हा सर्व ऐतिहासिक ज्ञानाचा पाया हीच जाणीवशक्ति व कल्पनाशक्ति आहे. प्रत्येक घटना–ती सामान्य असो अथवा अपूर्व असो–आपल्या जाणीवेने अनुभवाने ओळखण्याची शक्ती पाहिजे. याच योगे आजचा मनुष्य सर्व गत मानवी जीवनाचे चित्र आपल्या जाणीवेच्या सहाय्याने आपल्यापुढे उभें करू शकतो, व ते नव्याने अनुभवू शकतो. हें त्याचे जाणणे सामान्यरूपाचे अथवा गोळाबेरजेचे नसून प्रत्येक घटनातर्गत असलेल्या अपूर्व अनुभवाचे आहे. इतिहासकार वास्तविक विशिष्ट घटनाचे रूप सागतो. त्याचे काम घटनातील सर्वसाधारणत्व अथवा साम्यत्व सागण्याचे नसतें. मानवी जीवन दोन प्रकारचे आहे--सर्वसाधारण सामाजिक, आणि विशिष्ट अथवा अपूर्व वैयक्तिक. समाजाचे व इतिहासाचे घटक व्यक्ती ह्या आहेत, व त्या एकमेकाहून भिन्न आहेत, व त्याबरोबर मानवी जीवनाचे निरनिराळे प्रकार आहेत.

इतिहासामध्ये अंतिमसत्ये व मूल्ये नाहींत. त्याचा खरेपणा त्याच्या

त्रिविधपणामध्ये व अपूर्व गोष्टीमध्ये आहे. त्यामध्ये दैवी योजना, दैवी इच्छा, अंतिम पूर्णता, अथवा विशिष्ट हेतुता नाहीं. ऐतिहासिक अनुभव ही एक चालू प्रक्रिया ( process ) आहे. त्यामध्ये सर्वव्यापी प्रमाणभूत व गुणातीत काहीं आहे असे तो सागत नाहीं. ज्यानीं ज्यानीं अशीं सर्वव्यापी विधाने केलीं आहेत ते आपल्या काळच्या विचारमर्यादेने बाधलेले होते. इतिहासकाराला इतिहासाचे अध्ययन त्यामधील मानवी जीवनाचीं अनेक कृत्ये, व्यवहार व वर्तणुकी याच्या विश्लेषणाच्या आधारे केले पाहिजे. त्याला त्याच्या अनुभवाच्या बाहेर जाता येत नाहीं. ऐतिहासिक घटना व प्रसग आपल्यासमोर घडलेले नाहींत. ते आपल्याला आज प्रत्यक्ष पाहता येत नाहींत. तेव्हा त्याचे स्वरूप ओळखण्याच्या पद्धतीला ऐतिहासिक तर्कपद्धति म्हणतात. जे घडले त्याचा वास्तविक रूपाने आपल्या विचाराशीं काहीं सबंध नाहीं. पण आपण जे त्याबद्दलचें चित्र आज उभे करतो त्याच्याशीं आपल्या विचाराचा संबध आहे. आपल्या त्याबद्दलच्या आजच्या कल्पना ह्याच आपण ऐतिहासिक घटना समजतों. त्या कल्पना चुकीच्या व विपर्यस्त असू शकतात. घटनाचे सर्वसाधारण स्वरूप सागितल्यानें इतिहासाचा उद्देश सफल होत नाहीं. त्या कशा खऱ्या घडल्या व त्यांचें वास्तविक रूप कसे होते हें समजले पाहिजे. आपण गतघटनाचे आपले वर्तमानचित्र हेच गतघटनाचें खरे चित्र घेऊन चालतो. सध्या अस्तित्वात असलेला पुरावा व सध्याच्या त्याबद्दलच्या कल्पना यावरच गतघटनाचें आपले वास्तविक चित्र अवलबून असतें. आणि त्याबद्दलचे आपले मत ते जसे आपल्या जाणिवेला पुनरनुभवाने ओळखता येते तसे असते. त्यामुळे प्रत्येक काळच्या इतिहासकाराचे गत इतिहासाचे चित्र त्या काळच्या विचारसरणीला व अनुभवाला अनुसरून बदलते. " Therefore the past in history varies with the present, rests upon the present, is the present." " The facts of history are present facts. Historical events are facts-ideas in the world of the historian's experience, and there are no facts at all which are not present absolutely. "

यावरून असे अनुमान निघते की " History is the series or system of our judgment about the past and the written words in which they are expressed. " " We do not describe what really happened, but what the evidence obliges us to believe. " Therefore " all historical judgments are dubitable and fallible. " इतिहासकाराने काढलेलीं तीं अनुमाने सापेक्ष असतात. अंतिम नसतात. मनुष्यस्वभाव हा इतिहासाच्या प्रवाहाचा भाग आहे. तो ठराविक साचाच्या रूपानें माडता येत नाहीं. तो

परिस्थितीप्रमाणे बदलणारा आहे. तेव्हां मानवी जीवनाचें सर्व ज्ञान व अभ्यास इतिहासाच्या ज्ञानावर व अभ्यासावर अवलंबून आहेत. त्याना प्राकृतिक शास्त्राच्या पद्धती व समजुती लागू पडत नाहींत. त्यामध्ये मनुष्याचे कर्तृत्व व कृत्यें हीं मुख्य निर्णायक आहेत. परिस्थिति केवळ मर्यादारूपी नियामक आहे. डिल्टायने मानवीजीवनाच्या अभ्यासाची पद्धति अथवा तर्कशास्त्र रचले. ही पद्धत मानसिक घटनाच्या ज्ञानाची आहे, प्राकृतिक गोष्टीच्या ज्ञानाची नाहीं. मानसिक जीवनाच्या अथवा घटनाच्या अतंरगात आपल्या प्रकृतिसाम्याने आपण शिरूं शकतो. प्राकृतिक घटनाचे केवळ बहिरगच आपण पाहू शकतो. मनुष्यस्वभाव हा असंख्य संभवनीय घटनाचे भाडार आहे. पण इतिहासकार हा केवळ जे प्रकार घडलेले आहेत त्याचाच शोध करतो. दुसरे सभवनीय पण न घडलेले प्रकार त्याला सोडून द्यावे लागतात. प्रत्येक युगामध्ये जीवनप्रकाराचे विचार व व्यवहार काहीं विशिष्ट रूपाचे असतात. पण त्याना नित्य असे म्हणता येत नाहीं. इतिहासकाराला त्याची युगायुगाप्रमाणे असलेली भिन्नता शोधावी लागते. तेव्हा त्याचे शोध हे सापेक्ष रूपाचे असतात. यालाच त्याची historical relativity अथवा historicism म्हणतात. इतिहास हा अनेकान्तवादी आहे; एकान्तवादी नाहीं.

### स्पेन्गलर

ओस्वॉल्ड स्पेन्गलर ( Oswald Spengler इ. स. १८८०–१९३६ ) याची इतिहासाच्या क्रमाची अथवा गतीची कल्पना नावीन्यपूर्ण आहे. इतिहासाच्या रहस्याचा त्याचा मुख्य ग्रथ "पाश्चात्य सस्कृतीची अधोगति" ( The Decline of the West ) हा फार प्रसिद्ध आहे. चालू ऐतिहासिक ओघाची अथवा क्रमाची कल्पना ही सरळ रेषेप्रमाणे जाणारी इष्ट व अनिवार्य प्रगतीची आहे. मार्क्सच्या मताप्रमाणे मात्र ती विरोधविकासरूपाने होणारी आहे एवढेच. मानवी समाज एक आहे. मानवी जीवन अखड व गतिमान् आहे. आणि जीवनाचें सुवर्ण अथवा सत्य युग पुढे येणार आहे.

स्पेन्गलरला हें मत मान्य नव्हते. त्याने सगळीं शास्त्रे व तत्त्वज्ञान, विद्या व कला, लोक व देश, याचा अभ्यास केला. त्याची विद्वत्ता दाडगी होती. त्याच्या मते मानवी जीवनाची खरी खोल ओळख करून त्याचा प्रवाह व प्रकार, गति व सगति समजणे, व नंतर त्यास अनुसरून त्यातील भिन्न संस्कृतीचें आयुष्य व जीवन सागणे हा इतिहासाचा मुख्य उद्देश आहे. याकरता त्यानें गत संस्कृतींचे प्रकार ओळखून त्याच्या विकासाचे व अवनतीचे एक तुलनात्मक मानचित्र तयार केलें, आणि त्यावरून त्या प्रत्येकींतील भिन्न अवस्था अथवा युगें आखलीं व शेवटीं त्याचे पर्यवसान काय झाले अथवा होतें हें सांगितलें.

त्याच्या मते इतिहास हा भिन्न व उच्च सस्कृतींमध्ये घडलेल्या वृत्ताचा अथवा जीवन प्रकाराचा स्थलकालानुसार तुलनात्मक अभ्यास होय. इतिहास हा केवळ कार्यकारणात्मक वृत्तात नसून तो सस्कृतीचे सपूर्ण जीवन दर्शवितो. जगामध्यें एकच संस्कृति नसून अनेक सस्कृतींची प्रगति व अधोगति आहे, व तिच्या जीवनाला ठराविक कालमर्यादा अथवा आयुष्य आहे.

इतिहासाच्या घटना अपूर्व असतात, त्या वारवार तशाच घडत नाहींत. त्या 'अनुभव' रूपी आहेत. इतिहास हा सतत नव्यानें घडणारी कालरूपी क्रिया आहे. जागतिक मानवी जीवनाच्या घडामोडीचे जाळे उकलून त्याच्यातील भिन्न सस्कृतींचे गट व प्रवाह शोधून काढणे, व त्याच्या अध्यात्मिक जीवनाचीं आतरिक लक्षणे व बाह्य मर्यादा ओळखणे, हे त्याचे कार्य आहे. इतिहास ही अनेक सस्कृतिक्रमाची माला आहे, व त्याचे काम विशिष्ट काळात चालू असणाऱ्या सस्कृतीच्या उच्च जीवनाची ओळख करून देणे आहे. जगामध्ये अनेक उच्च सस्कृति झाल्या आहेत. त्याच्या सर्व अवस्थाची व युगाची तुलना करणें आवश्यक आहे. स्पेन्ग्लरला ऐतिहासिक घडामोडींचे सापेक्षत्व मान्य आहे. त्या प्रत्येक कालाला व स्थलाला अनुसरून घडतात. त्यामुळे त्याचीं रूपे अथवा लक्षणे एका सत्य स्वरूपाचीं नसतात. तीं त्या त्या काळचा अनुभव दर्शवितात.

त्याला ऐतिहासिक कालात मानवी सस्कृतीचीं नऊ रूपे अथवा प्रकार झालेले दिसतात. त्या प्रत्येकीमध्ये चार अवस्था अथवा युगे दिसतात, आणि त्याची पहिल्या अवस्थेतून शेवटल्या अवस्थेत जाण्याची गति तुलनेनें सारखेपणाची वाटते. त्याच्या गतीमध्ये अथवा क्रमामध्ये स्थलमाहात्म्य असते व कालमाहात्म्य असते. प्रत्येक सस्कृतीला आपला आत्मा अथवा विशिष्ट भाव असतो. इतिहासात उत्पन्न होणाऱ्या सर्व कला, कल्पना व सस्था याचा समुच्चय म्हणजे सस्कृति. तिच्यामध्ये चेतनवृत्ति असते. तिला उत्पत्ति, स्थिति, गति व अवनति अथवा लय या स्वरूपाच्या अवस्था व आयुष्य असते.त्याना शैशव, यौवन, वार्धक्य व मृत्यु म्हणतां येईल. या नऊ मुख्य सस्कृतीमध्ये सारख्या घटना व अवस्था आहेत. त्याचे परिणाम सारखे आहेत, पण प्रत्येकाचा 'आत्मा' अथवा 'भाव' निराळा आहे. ह्या सर्व सस्कृती आपल्या स्वजात प्रेरणेने उदय पावतात, फुलतात, फळतात व नष्ट होतात. त्याचे कालखड व क्रम व त्याचे आविष्कार सारख्याच स्वरूपाचे व अवधीचे असतात. त्या प्रत्येकामध्ये मानवी जीवनाच्या मूळ असलेल्या भावना व विचार भिन्न नामरूपे घेतात. पहिल्या अवस्थेत वीराचे (उषःकाल), दुसऱ्यात कुलीनाचे (प्रातःकाल) तिसऱ्यात श्रीमताचे (माध्यान्हकाल) व चौथ्यात सामान्य मूढ जनतेचे वर्चस्व (सायंकाल) असतें. चौथ्या अवस्थेत संस्कृतीचा विनाशकाळ (रात्र) येतो. हे असे प्रत्येक संस्कृ-

तीच्या कालगतीचे चार अंकी नाटक आहे. ज्याला आपण आजची चालू संस्कृति म्हणतों, त्या पाश्चात्य संस्कृतीचा म्हणतो आत्मनाश अथवा अंतकाळ जवळ आला आहे. त्यामध्यें संशयवाद, नास्तिकवाद, प्रत्यक्षवाद, भोगवाद, अर्थवाद, व बहुजनवाद याचे प्राबल्य आहे. त्यामुळे पाश्चात्य संस्कृतीचे धागेदोरे तुटत आहेत व ती नाश पावत आहे. प्रत्येक नवी संस्कृति एखाद्या नव्या अज्ञात भावनेने उत्पन्न होते व तिच्या चार अवस्था मिळून ती सुमारे १२०० वर्षे टिकते व नंतर लय पावते. ती लय पावत असताच दुसऱ्या भावनेने प्रेरित झालेली नवी सस्कृति एकदम उदयाला येते. हे येणे बाह्य परिस्थितीचा परिणाम नसून एक आतरिक प्रेरणा आहे. ती प्रेरणा कोठून तरी पलीकडून ( beyond ) येते.

सर्व मानवी कल्पना, भावना व सत्ये हीं युगाला अनुसरून सापेक्ष स्वरूपाचीं असतात. त्यावरून मानवसमाज अथवा मानवी जीवन हें काहीं एक प्रकारचे नाहीं, असें अनुमान निघते. प्रत्येक सस्कृतीला भवितव्यता आहे व तिच्या becoming ( आयुष्य ) चा इतिहास आहे. तेथें तर्करूपी कार्य-कारणसबंध नाहीं. जीवन गतिमान् आहे. त्याला ओघ आहे. त्याला घटनारूपी भूत व भविष्य आहे. तेथे कार्यकारणाचा प्रश्न उत्पन्न होत नाहीं. जशी जशी वेळ पडते तसे तसे होणे तिच्याकडून घडते.

स्पेन्ग्लरनें सस्कृतीचा इतिहास कालक्रमवार न देता विषयवार दिला आहे. त्याचा मुख्य उद्देश मानवीजीवनाच्या सास्कृतिक घटनाचे, विश्लेषण करून त्यावरून एक जागतिक इतिहासाचे तत्त्वज्ञान रचावयाचें असा होता. त्याला इतिहास असा लिहावयाचा नव्हता. भिन्न सस्कृत समाजाच्या सपूर्ण जीवनाची निरनिराळ्या अवस्थेतील आविष्काराची व अनुभवाची तुलना करून त्यावरून त्याची आयुर्मर्यादा ठरवावयाची होती. तेव्हा त्याचा ग्रंथ विशेषतः आत्मगत विचारानीं ओतप्रोत भरलेला आहे. त्याच्या तुलना बऱ्याच ठिकाणीं योग्य नसून काल्पनिक वाटतात. त्यामध्ये कालबद्धता बिनचूकपणें धरलेली नाहीं. सर्वसामान्य अथवा साधारण अनुमानें प्रतिपादण्याकरिता घट-नाच्या अपूर्वतेकडे व कालक्रमाकडे त्याचे दुर्लक्ष झालेले आहे. त्यामध्ये उपमा व साम्य याना अधिक महत्त्व दिलें आहे.

एका कल्पनेच्या अथवा क्रमाच्या तत्त्वज्ञानांत सर्व मानवी जीवनाची भिन्न रूपें व रूपान्तरें बसविण्याचा हा प्रयत्न आहे. तो तसा बसत नाहीं. स्पेन्ग्लरचा प्रयत्न सफल झालेला नाहीं. त्याचें प्रत्येक संस्कृतीचें वेळापत्रक व आयुष्यमान फारच कृत्रिम व ओढून ताणून केलेलें दिसतें. तो मानवी जीवना-मध्यें नवे आविष्कार, नवे प्रयत्न व नवीं वळणे उत्पन्न होतील असें मानीत

नाहीं. त्याच्या विचारात बराच मताग्रह आहे. आधुनिक संस्कृति आपल्या शास्त्रीय शोधानें व जागतिक सहयोगाने प्रगति करू शकेल, अधोगतीला जाणार नाहीं.

हेन्री बेर हा ' मानवतेच्या विकास' ( The Evolution of Humanity ) या फ्रेन्च भाषेतील प्रचड व व्यापक १०० खंडाच्या ऐतिहासिक ग्रथमालेच्या उत्पादक व सपादक आहे. त्याचेंच रूपान्तर इग्रजीमध्ये ' सस्कृतीचा इतिहास ' ( History of Civilization ) या ग्रंथमालेच्या रूपाने झालेले आहे. त्यामध्ये मानवी जीवनाच्या सर्व सास्कृतिक अंगाचे व सामाजिक संस्थाचें देशानुसार, विषयानुसार व कालानुसार ऐतिहासिक वर्णन व विवरण येत आहे. इतिहासाच्या दृष्टीने ह्या माला अतिशय महत्त्वाच्या आहेत. त्याच्या प्रत्येक खडाच्या प्रस्तावनेत बेरने आपल्या इतिहासाच्या कल्पना विशदपणाने माडल्या आहेत. ' ऐतिहासिक समन्वय ' ( १९११ ) ह्या ग्रथात त्याने आपले सिद्धान्त दिले आहेत. त्याच्या मते ऐतिहासिक समन्वय म्हणजे एक प्रकारचे इतिहासासबधीं सिद्ध असे गृहीत तत्त्वज्ञान मात्र नाहीं.

त्याने घटनेचे अथवा वृत्ताचे विश्लेषण तीन प्रकारे केले आहे. त्याच्या योगाने सर्व इतिहासाचा उलगडा होतो व त्याची खोल कारणमीमासा समजते असें तो सागतो. घटनाचे कारणसबध तीन प्रकारचे असतात.

एक आकस्मिकतेचे अथवा योगायोगाचे. दुसरे सामाजिक आवश्यकतेचे व कार्याचे. तिसरे वैयक्तिक कर्तृत्वाचे व कल्पनाचे. एकामध्ये योगायोगाचे अथवा भिन्न गोष्टी पाठोपाठ घडण्यामुळे होणारे सबंध असतात. दुसऱ्यामध्ये घटनाचे अन्योन्य सबध सामाजिक कार्यामुळे व आवश्यकतेमुळे उत्पन्न झालेले असतात. तिसऱ्यामध्ये मनुष्याच्या वैचारिकत्वामुळे अथवा प्रयत्नामुळे परिणामरूपी सबध घडून येतात. हे तिन्ही प्रकारचे सबंध समजून " ऐतिहासिक समन्वय " केला पाहिजे. केवळ घटनाचें विश्लेषणरूपी वर्णन करून चालणार नाहीं. समन्वयाने गत इतिहासाचे पुनरुज्जीवन होते, आणि मानवी जीवनाचे यथासाग बाह्याभ्यन्तर स्वरूप समजते. ते सर्व कारणाचा खेळ, अथवा मेळ म्हणा, रचून दाखविते.

मानवी संस्थाचा विकास समजण्यास तो सामाजिक दृष्टि समग्ररूपाने वापरतो. केवळ एका अंगालाच महत्त्व देत नाहीं. त्याची दृष्टि व्यापक आहे. तो सर्व मानवजातीचा अभ्यास करून, एक ' ऐतिहासिक समन्वयाचें ' तर्कशास्त्र अथवा तार्किक पद्धति निर्माण करूं पहातो.

इतिहास हा विशिष्ट समाजाचे वर्णन स्थल, काल, जातिदृष्ट्या करतो तें त्यापुरतें हुबेहुब असतें. ते सामान्य गोळा बेरजेने केलेले नसतें. ह्यातच इतिहासाचे वैशिष्टय आहे. तें समाजाचें व परिस्थितीचे त्या त्या काळाचे व स्थळाचें

वास्तविक चित्र दाखविते. ते समाजाचे सामान्य नमुने अनेक काळाच्या व स्थळांच्या भिन्न प्रकाराचे समीकरण करून मांडीत नाहीं. ऐतिहासिक समन्वय हा हळूहळू विशेषाकडून सामान्याकडे जातो, पण तो त्याला विशेषाचे पक्के रूप मानीत नाहीं. त्याच्या मते " Historical reality is complex and cannot be brought under formulas. There are differences between similar phenomena found in different societies and at different times. " " The complex interplay of the various factors of that evolution–manifold accidents, institutional necessities, social and intellectual logic–is clearly seen in this very objective study. "प्रत्येक अनुमान झालेल्या व होणाऱ्या वास्तविक घटनाना धरूनच केले पाहिजे.

इतिहासाचा मुख्य उद्देश ज्या मार्गाने मानवी सामाजिक जीवन बदलते व पसरते तो मार्ग शोधणे व दाखविणे हा आहे. त्याकरता मुख्य झालेल्या घटना व प्रसग, सामाजिक कार्याचा व आवश्यकताचा ( सस्थाचा ) जोर व वैयक्तिक आवश्यकता, कर्तृत्व व कल्पना, याच्या सबधाकडे लक्ष द्यावे लागते, व त्याचा परिणाम ओळखावा लागतो. समाजशास्त्रात आकस्मितत्तेला ( chance ) जागा नाहीं, केवळ कार्याला व आवश्यकतेला ( necessity ) जागा आहे. इतिहासामध्ये दोन्हीला जागा आहे, शिवाय मानवी कर्तृत्वालाहि आहे. "History in its widest sense is logic that is lived. " The historical point of view is the point of view of change. History is the study of change in humanity." त्याच्या मते सत आगुस्तीनप्रभृति ख्रिस्ति धार्मिक इतिहासकार, हेगेल प्रभृति तात्त्विक इतिहासकार, आणि मार्क्सप्रभृति भौतिक इतिहासकार हे जरी मोठे काल्पनिक अथवा वास्तविक असले तरी ते भ्रामक व घोटाळ्यात पाडणारे आहेत. ते मानवी कर्तृत्वाला, भौगोलिक शक्तीला, वाशिक गुणाना, अकल्पित गोष्टींना आपल्या कारणपरपरेमध्यें स्थान देत नाहींत. इतिहासाचा विषय व्यक्तीचें कर्तृत्व, घटनेची अपूर्वता व तिचा बदलण्याचा प्रकार, हीं आहेत. तो विशेष व वैयक्तिक गोष्टींचा विचार करतो. तो " Science of the particular and individual things "आहे. History deals with facts of succession, not with facts of repetition. " त्याच्या मते ऐतिहासिक समन्वय विशेषाकडून सामान्याकडे घटना न सोडून व त्याचे पूर्ण विश्लेषण करून विचारपूर्वक कसे जावयाचे ह्याचा यत्न असतो. " Historical synthesis is the endeavour to generalise, to disentangle a complex causalty in order

to discover general factors without eliminating any of them a-priori." इतिहासामध्ये केवळ एकामागून दुसऱ्या येणाऱ्या घटना असतात ( facts of succession ); अथवा एकाबरोबर दुसऱ्या असणाऱ्या घटनाचे सबंध ( facts of causation ) असतात. त्याच्या घडणीचे नियम असे खास नसतात, व सागता येत नाहीत.

## ब्यूरी

जॉन बॅग्नेल ब्यूरीने ( John Bagnel Bury इ. स. १८६१–१९२७ ) योजलेली व सहयोगी पद्धतीनें सपादलेली प्राचीन व मध्ययुगीन इतिहासाची केम्ब्रिजची ग्रथमाला फार उच्च प्रकारची आहे. त्याचे 'विचार-स्वातंत्र्याचा इतिहास,' 'प्रगतीचा इतिहास,' 'प्राचीन ग्रीक इतिहासकार' व 'ऐतिहासिक निबंध' असे व इतर ग्रीक व रोमन राज्याचे इतिहासविषयक अनेक ग्रंथ आहेत. तो आधुनिक काळचा एक मोठा नामांकित इतिहासकार समजला जातो. त्याची इतिहासाची कल्पना व्यापक आहे. त्याने मानवी जीवनाच्या सर्व अगाला इतिहासवृत्तातात स्थान दिले आहे.

ब्यूरीला हेगेल, कॉन्त व क्राऊसचे ऐतिहासिक तत्त्वज्ञान व युगकल्पना मुळींच मान्य नाहींत. त्याला इतिहासाच्या घटनात दैवी सत्ता अथवा नीतिसूत्र अथवा प्रगतितत्त्व गोवलेलें आहे असे मुळींच कबूल नाहीं.

ब्यूरीच्या मते सस्कृतीच्या वाढीचा मुख्य सुगावा मनुष्याच्या मानसिक क्षेत्रामध्ये व जाणिवेमध्येच शोधला पाहिजे. मनुष्य आपल्या नव्या कल्पनेच्या, शोधाच्या, सस्थाच्या द्वारे नवी परिस्थिति निर्माण करतो, व त्यायोगें प्राकृतिक मर्यादेला अथवा नैसर्गिक निवडीला नवे वळण देतो.

समाजशास्त्रासारखे इतिहासाचे शास्त्र आहे असे तो मानीत नाहीं. इतिहासामध्यें 'नियम' असत नाहींत. त्यामध्ये आकस्मिततेचा योगायोग सुद्धा असतो. दोन भिन्न घंटनाच्या सपर्काने अथवा सघर्षाने इतिहासात मोठे परिणाम होऊ शकतात. एखाद्या नेत्याच्या अकल्पित मरणाने अथवा एखाद्या राजाला मूल न झाल्याने मोठमोठे राजकीय परिणाम घडलेले आहेत. व्यक्तीच्या निर्णायक विचारानीं, कृत्यानीं व पराक्रमानीं घटना बदलल्या आहेत. त्याबद्दल नियम रचता येत नाहीत. त्यामध्ये कर्तृत्ववान् समूहाच्या व व्यक्तींच्या कृत्याचा विचार करावा लागतो. तो म्हणतो "But it may be urged that it is patent on the face of history that its course has constantly been shaped and modified by the wills of individuals, which are by no means always the expression of the

collective wills, and that the appearance of such personalities at the given moments is not a necessary outcome of the conditions and cannot be deduced. Nor is there any proof if such and such an individual had not been born, some one else would have arisen to do what he did. In some cases there is no reason to think that, what happened need ever have come to pass."

"Hence it may be argued that the acton of the individual wills is a determining and disturbing factor, too significant and effective to allow history to be grasped by sociological formulae."

"General principles do not account for a particular sequence, they embody necessary conditions; but there is a chapter of accidents too. It is the same in the case of history."

ब्यूरीच्या मते "History should be studied for its own sake." मानवी जीवनाच्या विकासातील अपूर्व गोष्टी अथवा घटना इतिहासाच्या द्वारेंच समजतात. त्याचा अभ्यास एखाद्या नैतिक अथवा दैविक कल्पनेच्या आधारें करण्यात काहीं अर्थ नाहीं. आजच्या इतिहासकाराचें ध्रुणें चें बोधपर वाक्य "History for its own sake" असें आहे. दुसऱ्या कोणत्याहि शास्त्राच्या साहाय्यानें त्यात ग्रथित झालेलें सर्वांगीण मानवी जीवन व त्यातील अपूर्वता हीं कळत नाहींत. या बाबतींत ब्यूरीचे विचार फार मननीय आहेत. तो म्हणतो

"If human development can be entirely explained on the general lines of a system such as St. Simon's or Comte's or Spencer's, then I think we must conclude that the place of history, within the framework of such a system, is subordinate to sociology or anthropology. There is no separate or independent precinct in which she can preside supreme. But on an idealistic interpretation of knowledge, it is otherwise. History then assumes a different meaning from that of a higher zoology and is not merely a continuation of the process of evolution in nature. If thought is not the result, but

the presupposition, of the process of nature, it follows that history, in which thought is the characteristic and guiding force, belongs to a different order of ideas from the kingdom of nature and demands a different interpretation. Here the philosophy of history comes in." इतिहासामध्ये एखादी विशिष्ट तात्विक योजना अनुस्यूत अथवा अंतर्भूत आहे हे ब्यूरीला मुळींच मान्य नव्हते. तो म्हणतो. "The radical defect of all these philosophical reconstructions of history is that the framework is always made a-priori with the help of a superficial induction. The principles of development are superimposed on the phenomena, instead of being given by the phenomena and the authors of the schemes had no thorough or penetrative knowledge of the facts which they undertook to explain". बोसुए, हेगेल, कॉन्त व क्राऊस यांचे या प्रकारचे प्रयत्न फारच निष्फळ झालेले आहेत. या प्रयत्नाना ब्यूरी to screw history into one's iron bed असे म्हणतो. त्या प्रत्येकाला वाटते कीं आपली योजना ही खरी व पूर्ण आहे, आणि मानवी इतिहास आपण दर्शविलेल्या त्याच मार्गाने अतापर्यंत चालणार आहे. या सर्व योजनाची व कल्पनाची किंमत तात्पुरती सापेक्षच आहे. भावी मानवी विकास अज्ञात पण अफाट आहे. त्याच्या विस्ताराचे क्षेत्र व विकासाचे स्वरूप गत गोष्टींच्या साहाय्याने आजच सागून ठेवणे हे मूर्खपणाचे व अशास्त्रीय आहे. ते केव्हाहि अपुरेंच पडणार आहे.

इतिहास हा मानवतेचा स्वानुभव आहे. तो सपलेला नाहीं. याकरतां इतिहासाचा अभ्यास 'for its own sake' करावा लागतो. त्याचे कोणत्याहि शास्त्राने व तत्त्वज्ञानाने पूर्ण आकलन होत नाहीं. ते शास्त्र अथवा ज्ञान अपुरे पडतें.

इतिहासाच्या कारणमीमासेत योगायोगाला अथवा आकस्मिततेला ( Contingency, chance ) ब्यूरीच्या मते पुष्कळ जागा आहे. दोन भिन्न घटनांच्या आकस्मिक योगायोगाने अथवा सपाताने महत्त्वाच्या अकल्पित घटना घडतात व त्यामुळे इतिहासक्रमाला नवे वळण लागते. रानटी लोकाच्या स्वाऱ्या व जय, रोगाच्या भयंकर साथी, हिम व जलप्रलय, व्यक्तींचे गुण, इत्यादिमुळें इतिहासाला नवे वळण मिळते. ब्यूरी म्हणतो "The course of history seems, then, to be marked at every stage by con-

tingencies some of greater, some of smaller imports. In some cases they produce a situation to which the antecedent situation does not logically lead. In others, they determine the form and means of the realisation of a logical tendency " It is the complex of coincidences which prove decisive. " ब्यूरीची कारणमीमासा अनेकान्तिक आहे. त्याच्या मते इतिहासकाराची मते अगदी निःपक्षपाती व अतिम प्रकारची होऊ शकत नाहीत. त्यावर त्याच्या काळची छाप रहाते. रान्केची मते सुद्धा त्याकाळच्या राष्ट्रीयत्वाच्या व तत्त्वज्ञानाच्या प्रभावाने दूषित होती. डॉर्विनच्या सिद्धान्ताचा ( evolutionary hypothesis ) परिणाम इतिहासाचे ऐक्य ( unity ) व सातत्य ( continuity ) प्रस्थापित करण्याकडे झाला. ब्यूरीने ईश्वराला अथवा एखाद्या तत्सम नैतिक शक्तीला अथवा इष्ट प्रगतीच्या कल्पनेला इतिहासाच्या मागे असलेले प्रधान सूत्र मानले नाही.

### आर्नोल्ड टॉयन्बी

आर्नोल्ड टॉयन्बी ( Arnold Toynbee ) हे आजचे एक मोठे इतिहासकार व इतिहासज्ञ आहेत. त्याचा १९१९ च्या सधीचा इतिहास व त्यानतरचे वार्षिक Surveys of International Affairs हे प्रसिद्ध आहेत. परतु त्याचा Study of History हा बृहत् ग्रथ त्याच्या इतिहासाच्या व्यापक कल्पनाचे भाडार आहे. तो १३ भागात प्रसिद्ध व्हावयाचा आहे. केवळ ६ भागच सध्या प्रसिद्ध झाले आहेत. त्याची योजना अशी आहे. पहिल्या भागात त्यानी मुख्यतः आपल्या इतिहासाच्या व सस्कृतीच्या कल्पना माडल्या आहेत. दुसऱ्या भागात सस्कृतीचा उदय, तिसऱ्यात सस्कृतीची वाढ, चौथ्यात संस्कृतीचे पतन, पाचव्यात सस्कृतीचे विदीर्ण होणे, सहाव्यात जागतिक राज्ये, सातव्यात जागतिक धर्मसप्रदाय, आठव्यांत वीरविभूतींची युगे, नवव्यात संस्कृतींचे स्थलसानिध्यामुळे होणारे सपर्क, दहाव्यात सस्कृतींचे कालौघातील संपर्क, अकराव्यात सस्कृतीच्या इतिहासाचे गतिसाम्य व मेळ, बाराव्यांत पाश्चात्य सस्कृतीचे भवितव्य अथवा तिचा पुढील रग व रोख, आणि तेराव्यांत इतिहासकाराच्या प्रेरणा, हे विषय चर्चिले आहेत. त्यानें गत व वर्तमान सस्कृतींचें वर्गीकरण २१ प्रकारात केले आहे, व नतर त्याचे परीक्षण व तुलना केल्या आहेत. त्याच्या मते इतिहासाचे खरे काम अथवा विषय म्हणजे समाजांच्या जीवनाची बाह्य व आतरिक अगे, याचे कालस्थलसमाजानुसार वर्णन करणें, व त्याची उत्पत्ति व स्थिति, वृद्धि व क्षय सांगणे. इतिहासकारांनी राज्यापेक्षा समाजाचाच विचार अधिक केला पाहिजे कोणत्याही काळच्या समाजाच्या

इतिहासाचा अभ्यास हा त्या स्थलकालाच्या प्रबल प्रवृत्तीने नियमित असतो. त्यामुळे ऐतिहासिक विचाराला सापेक्षत्व असते. टॉयन्बी समाजाचे दोन भाग करतो. एक प्राथमिक प्राकृत समाज व दुसरा प्रौढ संस्कृत समाज. संस्कृत समाजाच्या उत्पत्तीचे कारण साधे एक प्रकारचे नसून तिची कारणे अनेक व गुतागुतीची आहेत. समाज हा एकरूपी नसून, अनेक संबंधाचा व अंगाचा समन्वय आहे. संस्कृत समाजाची उत्पत्ति ही दोन घटकाच्या संपर्काने व संघर्षाने होते. प्राकृतिक परिस्थितीच्या मर्यादा व आव्हान ( Challenge ) आणि मानसिक व शारीरिक बलाने युक्त असलेल्या लोकाचे त्याला उत्तर (Response) याच्या योगाने समाजाची व संस्कृतीची निर्मिति होते. केवळ परिस्थितीला अथवा लोकाना महत्त्व देऊन चालत नाही. याच्यायोगे इतिहासाचे कथानक बनते. त्यामध्ये लोकाची मने कठीण परिस्थितीला अथवा प्रसगाला कशी तोंड देतात हे पहावे लागते, आणि ते त्या दिव्यातून कोणत्या प्रकारे पार पडतात, त्यावरून ऐतिहासिक घटनेचे स्वरूप व गति ठरवावी लागते. ते अगोदर पूर्व कल्पनेने ठरविता येत नाही. कारण तीच परिस्थिति व तेच लोक एकदा एक प्रकारे सफल दिसले तर दुसऱ्या वेळी विफल झालेले दिसतील, किंवा अन्य प्रकारे सफल झालेले दिसतील. या क्रियेत एकच रोग्य व एकच प्रकार अनिवार्य दिसत नाही, व याबद्दल एकच नियम व क्रम असत नाही.

इतिहासकारांनी साधने गोळा केली पाहिजेत, आणि त्यावरून काही तात्पुरती अनुमाने व विधाने रचली पाहिजेत, आणि ही कामे बरोबर चालली पाहिजेत. ती अनुमाने मात्र नव्या नव्या साधनाच्या साहाय्याने वेळोवेळी परिक्षिली पाहिजेत, व त्याना अनुसरून पुन्हा रचली पाहिजेत.

संस्कृति ही एक नसून, अनेक आहेत. इतिहास हा एका संस्कृतीचा horizontal ( आडवा ) स्वरूपाचा अभ्यास नसून, तो भिन्न संस्कृतींचा vertical ( उभा ) स्वरूपी अभ्यास आहे.

प्रत्येक ऐतिहासिक घटना वास्तविकपणाने अपूर्व असते व त्यामुळे तिची दुसऱ्याशी योग्य तुलना करता येत नाही. त्याच्या मते ‘ History repeats itself has no truth in it ’ पण एखादी घटना जरी काही बाबतींत अपूर्व असली तरी दुसऱ्या बाबतींत तिचे इतरांशी साम्य असू शकते. “Every manifestation of life is in one sense unique in as much as it contains within itself a capacity for variation and mutuation which is uniquely creative and original, yet certain manifestations of life are shown to be in some sense comparable.”

त्याच्या मतें मानवी जीवनामध्ये आध्यात्मिक शक्ति प्रबळ व प्रधान आहे. इतर प्राकृतिक गोष्टी गौण आहेत. मनुष्य परिस्थितीच्या आव्हानाला, विरोधाला अडचणीला कसे उत्तर देतो, त्याचा उपयोग कसा करून घेतो, त्याला उत्साह व स्फूर्ति कशी उत्पन्न होते, हे पाहणे आहे. हे परिस्थितीचे आव्हान व लोकांचें उत्तर सतत चालू असते, व त्याप्रमाणे सस्कृतींचे वर्धन अथवा पतन होत असतें. पण मनुष्य हा हळू हळू प्रकृति व परिस्थितीवर जय मिळवीत असतो. त्याच्या मतें

' In a general way it is evident that a society in process of civilisation articulates itself through the individual human beings who belong to the society and to whom the society belongs. " तो " unconscious factor in history " वर विश्वास ठेवीत नाहीं. तो म्हणतो " The shake is always given by somebody. " सस्कृतींची वाढ ही आत्मप्रवर्तक व्यक्तींच्या अथवा अल्प जनसमूहाच्या शक्तीने होते. तेच त्याचे नेते असतात. त्याची निर्माणशक्ति गेली म्हणजे इतर बाह्य आक्रमक जाती ( external prolatariat ) अथवा आतरिक बहुजनसमाज ( internal prolatariat ) आक्रमण अथवा विरोध करू लागतात. त्यामुळे त्या सस्कृतींचे पतन होते. टॉयनबी संस्कृतीचा ऱ्हास आर्थिक कारणानेच होतो असे मानीत नाहीं. "The leadership slips out of the hands of the cultivated class because they have lost the power to fulfil the tasks with which they are confronted. They have nothing more to offer to the world. " तेव्हा कोणत्याहि समाजाचे पुनरुज्जीवन त्याला पुन्हा योग्य नेता व त्राता मिळाला म्हणजे होते. पण टॉयनबी हा जर घटना वगळून अथवा घटनाची अपूर्वता सोडून इतिहासाचे व्यापक व सामान्य तत्त्वज्ञान योजित असला तर ते आपणाला मानता येणार नाहीं.

### बेनेडिट्टो क्रोचे

बेनेडिट्टो क्रोचे ( Beneditto Croce इ. स. १८६६–) हा सध्यांचा इटलीचा प्रसिद्ध इतिहासकार आहे. त्याने इटलीचे व युरोपचे उत्तम इतिहास लिहिले आहेत व इतिहासलेखनाचें तत्त्वज्ञानही प्रथरूपाने सागितलें आहे. क्रोचे हा चैतन्यवादी तत्त्वज्ञानी आहे. त्याच्या मते इतिहास व तत्त्वज्ञान एकच आहेत. इतिहासाच्या घटनात तत्त्वज्ञान भरले आहे. तेव्हां इतिहासाचा पुरावा, त्याचीं कारणे, त्याचें तत्त्वज्ञान व त्याचे रूप, रग, अथवा सूत्र म्हणा, त्याच्या घटनांमध्येच अतर्भूत आहे. इतिहास हा आपल्या चैतन्यशक्तीच्या व्यावहारिक जीवनाचे वर्णन करतो. त्यामध्ये दोन्ही क्रिया व कल्पना, नीति व न्याय, आचार व

विचार एकवटलेले आहेत. इतिहासलेखन घटनान्तर्गत अनुभव व विचार याच्या ओळखण्यानेच शक्य आहे. ते केवळ साधनें, घटना व तारखा गोळा केल्याने होत नाहीं, अथवा एखाद्या धार्मिक कथेच्या व कल्पनेच्या अनुरोधानें होत नाहीं. पण गत घटनामध्ये अनुस्यूत असलेल्या विचारप्रवाहाचा अर्थ व मार्ग समजल्याने होते. इतिहासातील विशेष घटनाच्या अनुरोधाने तत्त्वज्ञानाचें सामान्य तत्त्व समजते. त्यामुळे इतिहासात व तत्त्वज्ञानात एकता आहे. इतिहासाला विशेषाचे वर्णन करून, त्याचे परस्पर सबध ओळखून, मग सामान्य तत्त्वाशीं त्याचे सबध दाखविले पाहिजेत. इतिहासात दोन्ही Being (झालेले) व Becoming (होणारे) प्रसग आहेत. त्यामध्ये कल्पनेला (Imagination) जागा नाहीं. त्याचा संबध मानवी जीवन व सस्कृति याच्याशीं आहे. तो मानवी विचारशक्तीने समजतो. इतिहास हा एक वैचारिक क्रिया (Thought Process) आहे.

इतिहास हा केवळ वृत्ताताचे सकलन नव्हे. तो त्यातील अनुभव, तत्त्वज्ञान व परिस्थिति ही समजून घेणे हा आहे. याला क्रोचे hsitorical judgment अथवा ऐतिहासिक मत अथवा अभिप्राय म्हणतो.

क्रोचेचा इतिहासाबद्दलचा मुख्य सिद्धान्त असा आहे. त्याच्या मतें " All history is contemporary, " कारण इतिहासलेखन हे इतिहासकाराचा अभिप्राय आहे. ते नुसते वृत्तसकलन नव्हे. त्यामध्ये आतापर्यंत घडलेल्या गोष्टीचे ज्ञान, अथवा स्थल, काल व समाज या विशिष्ट गुणानीं विभागलेल्या युगखडाचे ऐतिहासिक ज्ञान येते. ऐतिहासिक अभिप्राय (Historical judgment) हा केवळ तत्कालीनच असू शकतो, कारण त्यामध्ये लेखकाला ऐतिहासिक घटनाची निवड व त्याचा अर्थ आपल्या समकालीन विचाराच्या, अनुभवाच्या व तयारीच्या दृष्टीनेच करता येतो. त्याचा इतिहासाचा अभ्यास व मत स्वतःच्या तत्कालीन नडी, विचार, भावना व दृष्टि याच्या अनुरोधानेंच होते.

क्रोचेच्या मते इतिहास हा काहीं स्वतत्र घटनाची जुळलेली माला नव्हे. तो एक तरगरूपी प्रवाह आहे. त्या प्रवाहाबद्दलचे इतिहासकाराचे मत हा त्याचा अभिप्राय आहे. त्या मताचा त्याचा पुरावा (Documents) हा त्याच्या मतामध्ये असतो. सर्व जुन्या साधनाबद्दलच्या व त्यात ग्रथित झालेल्या घटनाबद्दलच्या खरेखोटेपणासबधी व स्वरूपासबधीं त्या लेखकाचे मत हाच त्याच्या ऐतिहासिक अभिप्रायाचा खरा पुरावा आहे. हा अभिप्राय बाहेरून येत नाहीं, पण तो त्याच्या मनातच तयार होतो. आपली जी व्यावहारिक दृष्टि व अपेक्षा असते, त्या दृष्टीने व अपेक्षेने आपण कोणताही इतिहासाचा प्रश्न अभ्यासाला,

समजण्याला व ठरविण्याला घेतो. त्यामुळे "Every true history becomes contemporary history." झालेल्या घटनाची लेखकाची जाणीव हा लेखककालीन इतिहासाचा अभिप्राय आहे. त्यालाच क्रोचे contemporary (present) history म्हणतो. पूर्वीच्या लेखकानी आपल्या काळच्या अपेक्षेनें दृष्टीनें, विचाराने व अनुभवाने लिहिलेला इतिहास हा आपणाला गत इतिहास (past or noncontemporary history) आहे. पण त्या लेखकाच्या काळच्या दृष्टीने तो conetmporary आहे. क्रोचे म्हणतो, "The deed of which the history is told must vibrate in the soul of the historian. The documents before the historian must be intelligible." The past does not live otherwise than in the present resolved and transferred in the present." The past fact does not answer to a past interest but to a present interest, in so for as it (past fact) is unified with an interest of the present life. It is concerned with a current historical problem"

त्याचा मुख्य सिद्धान्त असा आहे. "To have history of a particular thing, we must have the capacity for living again of the particular states of the individual soul, or the experience assumed by the narrator of events."

यावरून तो असे प्रतिपादतो कीं, इतिहासकाराच्या मतापासून (living documents) वेगळे केलेले सर्व इतिहास हे खरे इतिहास नसून तीं केवळ भाकड व निरर्थक वर्णने आहेत. तेव्हा इतिहासामध्ये घटना व त्याबद्दलचा अनुभवरूपी अभिप्राय याचा निकट संबध असतो. इतिहास हा विचारप्रेरित व अनुभवयुक्त आहे. विचारानेच घटनाना इतिहासत्व येते. "History writing is always judgment" प्रत्येक इतिहासकाराच्या पुढे नवा पुरावा, नवे प्रश्न, नवी दृष्टि, व नवे हित हीं असतात. त्याकरिता इतिहासाचा अभ्यास व मांडणी नव्याने करावी लागते. हे काम जुना लिहिलेला इतिहास करू शकत नाहीं, त्याकरिता contemporary हा गत इतिहास नव्याने लागतो. "True history is that of which an interior verification is possible and is therefore history ideally contemporary and present."

रान्के हा गतकालांतील घटनांकडे वर्तमान विचार सोडून स्वतःला घेऊन

जातो. क्रोचे हा गत घटनांना वर्तमान विचार व अनुभवापुढे घेऊन येतो. रान्के गत इतिहास जशाचा तसा सांगू पहातो. क्रोचे तो आज कसा दिसतो तें सांगतो. रान्केच्या दृष्टीने घटनेचे महत्त्व तिच्या काळाशीं संबद्ध असते, व तिचे स्वरूप मर्यादित असते. क्रोचेच्या मते घटनांचे महत्त्व तत्कालीन असून ते पुढे टिकणारें असते. पण ते निरनिराळ्या काळीं नवे स्वरूप धारण करते अथवा अनुभव सांगते.

या क्रोचेच्या विचारसरणीमुळे Contemporary दृष्टीने अभ्यास-लेल्या घटनांचे कारण व कार्य यांचा विचार करण्याची आवश्यकता उरत नाही. त्यांना कारण व कार्य असू शकत नाहीं. त्यामध्ये विशिष्ट कार्य विशिष्ट बाह्य अथवा आंतरिक हेतूने घडलेले आहे, असा हेतुवाद ( Teleology ) अथवा सर्व घटना एका विशिष्ट कारणामुळे ठराविक मार्गाने घडतात असा एकान्तवाद ( Determinism ), अथवा सर्व घटना बाह्य परमशक्तीच्या योजनेप्रमाणे घडतात, असा परमवाद ( Transcendentalism ), ह्या कोणत्याही वादाची अथवा विचाराची आवश्यकता नाहीं. घटनांचा हेतु, कारण, कार्य हीं सर्व लेखकाच्या समकालीन प्रश्नावर व हेतूवर अवलंबून असतात. ती घटनांतर्गत असतात. त्यांना केवळ त्या घटनांचा अन्योन्य संबंध व त्यांचा आपल्या दृष्टीने अर्थ लावावयाचा असतो.

इतिहासकाराचा विचार हाच घटनांना वास्तविक स्वरूप देतो. " History is a history of life not of death. " इतिहासामध्ये गत कार्यांचा, कारणांचा व हेतूंचा उपयोग नाही. तीं सर्व मृत आहेत. आजच्या गत घटना जिवंत आहेत, त्यांचे कार्य, कारण, हेतु भिन्न आहेत. ती सर्व आजच्या जीवनाचे आधारस्तंभ आहेत. तेव्हा इतिहासाचे तत्त्वज्ञान असे काही होऊ शकत नाहीं. इतिहास व तत्त्वज्ञान भिन्न नाहींत. ते दोन्ही एकच आहेत. एकामध्ये दुसरे गोवलेले आहे.

क्रोचेच्या दृष्टीने इतिहास हा घटनांचे विवरण करीत नाही, पण त्यांच्या-बद्दल आपला अभिप्राय सांगतो. पहिली क्रिया वस्तुगत ( objective ) आहे. दुसरी आत्मगत ( Subjective ) आहे.

इतिहासामध्ये बऱ्या अथवा वाईट घटना अशा नसतात. त्या जर बरो-बर व पुऱ्या समजल्या तर त्या सर्व चांगल्याच असतात. इतिहासाचा हेतु त्यांची निंदा अथवा स्तुति करण्याचा नसतो, पण त्या योग्य रीतीने समजून घेण्याचा असतो.

इतिहास हा मानवी मनाची कृति व इच्छेचा परिणाम आहे. खराखुरा

मनुष्य हाच इतिहासाचा निर्माता आहे. केवळ काल्पनिक व्यक्ति अथवा मानवता, ह्या नव्हेत.

मनुष्याला क्रियास्वातंत्र्य आहे. तो एका विशिष्ट तर्काने अथवा विचारसरणीने चालत नाहीं. इतिहासात एकच योजना अथवा कल्पना नाहीं, एकच आदि कारण अथवा आद्य शक्ति नाहीं. त्यामध्ये कोणत्याही बाह्य प्रयोजनाची अथवा अतीत कारणाची आवश्यकता नाहीं. त्याचप्रमाणे पुढचे भविष्य सांगण्याच्या दूरदृष्टीची जरूरी नाहीं.

इतिहास हा केवळ विशिष्ट घटनेचा व तिच्या समग्र जीवनाशीं संबंधाचा अभ्यास नसून त्याबद्दलचा लेखकाचा अभिप्राय हा होय. गताबद्दलचा वर्तमान अभिप्राय हाच इतिहास होय. आपण गताकडे जात नाहीं. गताला वर्तमानात आणतो. इतिहास हा living history आहे lived history नाहीं, आणि "in external essence history is the story of human mind and its ideals, in so far as thev express themselves in theories and in works of art, in practical and moral activity."

क्रोचेच्या मते स्वतत्रतेचे तत्त्व हे सर्व इतिहासात अनुस्यूत आहे. तें एकाच कालात, देशात अथवा समाजात सापडते असे नाहीं. सर्वसामान्य इतिहास हा ethico-political—नीति व राजकारण यानीं युक्त—आहे. त्यामध्यें परस्पर संबंध, व्यवहारमर्यादा, व अधिकारस्वातंत्र्य याचे निरूपण असते. कला, तत्त्वज्ञान, व अर्थ याचे इतिहास हे खास एका अंगाचे इतिहास आहेत. तो म्हणतो "True and proper history is the history of the state viewed as an ethical state and as a discipline of life." नीतीचे फल देणारे राज्य—याचा इतिहास हा खरा इतिहास होय. त्यामध्ये दुष्टवृत्तीचा व अपकर्माचा विरोध आहे. "Ethico-political history penetrates into all histories." नीतीचे मुख्य ध्येय अथवा प्रेरक शक्ति ही स्वतंत्रता होय. म्हणून 'Liberty is the eternal creator of history and itself the subject of every history. It is the explanatory principle of the course of history and the moral ideal of humanity. Liberty is the main spring of life."

यामुळेच इतिहासकाराचा इतिहासाचा अभिप्राय आपापल्या काळास व दृष्टीस अनुसरून असतो. त्यामध्ये त्याची ethico-political कल्पना गोवलेली असते.

"Ethico-political history is a history which examines and exposes the operations and practice of ethics in politics. It is concerned with the character of the achievement–the new political and moral institutions."

यावरून दिसेल की क्रोचेची ऐतिहासिक दृष्टि नैतिक तत्त्वाची आहे, आर्थिक तत्त्वाची नाहीं. नैतिक जीवनाच्या मूल्याना प्रधान धरून तो इतर अगाचा विचार करतो. त्याला स्वातंत्र्याची लालसा व त्याकरता धडपड सर्व इतिहासकालात दिसते. व्यक्ति, वर्ग, वर्ण, समूह इत्यादींच्या सत्ताविरोधात इतिहासाचा आत्मा आहे. तो आत्मा स्वातंत्र्याची लालसा आहे. त्यामध्यें मानवी जीवनाचे रहस्य व पूर्णता आहे. हे सर्व इतिहासात भरून राहिलेले आहे व त्याचा उलगडा आपल्या कालविचाराला अनुसरून इतिहासाच्या रूपाने नव्याने करावा लागतो. राज्यशास्त्राचाही मुख्य प्रश्न सत्ता व स्वातंत्र्य याच्या क्षेत्राचा व मर्यादेचा आहे. त्यामध्ये स्वातंत्र्यलाभ व पालन हे साध्य असून, सत्ता हे त्याचे साधन आहे. इतिहास हा सत्ता व स्वातंत्र्य ह्याच्या सघर्षाचे त्या त्या काळच्या लेखकाच्या दृष्टीने निरूपण आहे.

जेम्स हार्वे रॉबिनसन (इ. स. १८६३–१९३६) हा 'नव इतिहास' प्रणालीचा मुख्य पुरस्कर्ता आहे. त्याने 'New History' व 'Human Comedy' हे ग्रथ लिहिले आहेत व त्यामध्ये त्याने आपल्या इतिहासाची पद्धति, व त्याचे क्षेत्र व स्वरूप, याचे विवेचन केले आहे. त्याची दृष्टि विकास ओळखण्याची असून, तो ऐतिहासिक सरणीमध्ये विचार, सस्कृति व सस्था याच्या उगमाचे, विकासाचे व सबधाचे वर्णन व विवरण करतो. त्याने पाश्चात्य युरोपच्या मानसिक वाढीचा व इतर इतिहास लिहिले आहेत. त्यामध्ये त्याची सास्कृतिक विचारसरणी आहे. तसेच सि. जे. एन्. हेयेस व हेनरी एल्मर बार्नेस यानीं युरोपचे सास्कृतिक व बौद्धिक इतिहास लिहिले आहेत.

एफ्. जे. टेगार्टने नव्या इतिहासाची दृष्टि व विचारसरणी आपल्या Prolegomena to History, the Process of History and the Theory of History या तीन ग्रथामध्ये माडली आहे. तो इतिहासाला सामाजिक परिवर्तनाचे शास्त्र मानतो (a science of social change).

### पिटीरिम सोरोकिन

पिटीरिम सोरोकिन याने "सामाजिक व सास्कृतिक गतिशास्त्र" या नावाचा एक मोठा तीन खडाचा ग्रंथ लिहिला आहे. तो एक आधुनिक समाजशास्त्रज्ञ आहे. त्याने आपले मानवी जीवनाच्या इतिहासाच्या गतित्वाचे स्वरूप

या ग्रंथात सांगोपाग माडले आहे. त्यामध्ये इतिहासाचे एक नवे तत्त्वज्ञान आहे. त्याचा उद्देश इतिहासाच्या ओघामध्ये कोणते तत्त्व व कोणते 'पाटण' (pattern) दिसते ते शोधावयाचे, व त्याच्या योगे समग्र मानवी सस्कृतीची स्थित्यतरे व अनेक भिन्न प्रकार याचा अनुक्रम व ओघ समजून घेणे हा आहे. ते जर समजले तर गतघटना योग्यप्रमाणे समजतील व भावी घटनाचे भाकित समजेल.

हा सोरोकिनचा प्रयत्न सत ऑगुस्तीन, हेगेल अथवा स्पेन्गलरसारखाच स्वमताचा आग्रह करण्याचा आहे, का त्याहून भिन्न आहे ? सोरोकिनने मानवी जीवनाच्या सर्व अगाचा, घटनाचा, विद्या व कलाचा, नीति व तत्त्वाचा फार खोल व विस्ताराने काल स्थल व समाजदृष्टया उत्तम केला आहे. त्याने त्यासबधी अतिशय विपुल माहिती गोळा केली आहे. ती त्याच्या इतिहासाची व वाढीची आहे. त्याने सर्व पूर्व ग्रह टाकून दिले आहेत. केवळ झालेल्या गोष्टीवरून जो अर्थ व अनुमाने निघतात तीच तो माडीत आहे. त्याची दृष्टि व पद्धत अनुगमनाची आहे. त्याचे विश्लेषण पद्धतशीर आहे. त्याने सर्व कला व साहित्य, तत्त्वज्ञान व नीति, धार्मिक व आर्थिक, सामाजिक व राजकीय घट-नाचे प्रथम आलोचन केले. त्याचे बदलणारे प्रकार, त्याची कालमर्यादा व त्याचे परिणाम शोधले. नतर त्याच्या प्रत्येक क्षेत्रातील निर्णायक गोष्टी काढून, शेवटी विशिष्ट कालातील सस्कृतीच्या भिन्न क्षेत्रातील परस्परसबधाचे पृथक्करण केले. मग असा स्वतत्रपणे सर्वांगपूर्ण अभ्यास करून त्याने आपले सश्लेषणात्मक विधान अथवा अनुमान माडले आहे. त्याच्या मते इतिहासक्रमात Fluctuation ( हेलकावा ) आहे, व ते a variable recurrent pattern अशा स्वरूपाचे आहे. त्यामध्ये एक निरतरची एका रेखेने वा दिशेने जाणारी प्रवृत्ति अथवा चक्रगति नाही. सस्कृतीमध्ये (culture) दोन मुख्य प्रकार दिसून येतात व ते एकामागून एक असे येतात. एक ideational ( धर्ममोक्षवृत्तीचा ) व दुसरा sensate ( अर्थकामवृत्तीचा ). एका वृत्तीचा वीट किंवा परिणाम वाईट झाला की दुसरी वृत्ति हळूहळू पुढे येते, व पहिली मागे सरते. या दोन्हीमध्ये एक संक्रमणकालातील वृत्ति असते. या वृत्तीचे पुनरावर्तन होते. तो म्हणतो

" All the essential swings of the currents of culture-mentality (science, philosophy, religion, art in all forms, ethics, law, economics, political, and social forms) appear to be but a manifestation of the passage of these cultures from one of the main types–ideational, idealistic and sensate–to another."

* * * * *

## १५ भौतिक पण आर्थिक विचारसरणीचे इतिहासकार

जडवादी इतिहासकार कोणत्याहि बाह्य ( From above ) दैवी कर्त्याला अथवा अतर्भूत मानासिक चैतन्य तत्त्वाला ( From within ) मानीत नाहीत. ते भोवतालच्या ( From around ) भौगोलिक, आर्थिक व सामाजिक परिस्थितीला महत्त्व देतात. मानवी जीवनाची दिशा ही परिस्थिति ठरविते. तिला अनुसरून मानवी आचार व विचार, आहार व विहार, व्यापार व व्यवहार, सस्था व समजुती, समूह व समाज उत्पन्न होतात. या विचारसरणीमध्ये मानवाचे स्थान गौण आहे. त्याच्या कर्तृत्वाला, स्वतत्र कल्पनाना व भावनाना, प्रमुख स्थान नाहीं. तो परिस्थितीने बराच मर्यादित आहे. तिच्यामध्ये तो गुरफटला आहे. व तिला अनुसरून त्याला वागावे लागते. त्याचे स्वातंत्र्य ( Freedom) परिस्थितीच्या आवश्यक मर्यादा ( Necessity ) ओळखूनच वावरू शकते. ती त्याचा विरोध सफल होऊ देत नाहीं. तेव्हा जडवाद्याचे मते इतिहासाचे प्रवर्तक कारण अथवा चालकशक्ति ही जड परिस्थिति आहे.

### कार्ल मार्क्स

समाजवादी इतिहासकाराना मार्क्स ( इ. स. १८२०-१८९५ ) व एन्गल्स (इ.स.१८१८-१८८३) यानीं एक इतिहासाची नवी दृष्टि व कारण-मिमासा दिली आहे. ते जडवादी आहेत. जडातच चैतन्य अतर्भूत आहे. जड हेच चैतन्य आहे. ते जड आपल्या स्वयस्फूर्तीने पण आतरिक घटनाच्या विरोधाने विकास पावते. प्राकृतिक निसर्गाचा व सास्कृतिक मानवाचा व त्याच्या जिवनाचा सदैव विकास होत असतो व तो विरोधरूपाने होत असतो. ह्या विरोध-विकासरूपाच्या तर्कप्रणालीमध्ये तीन अवस्था त्याने कल्पिल्या आहेत. एक चालू घटना ( Thesis ), दुसरी विरोधी घटना ( Antithesis ), व तिसरी नवी समन्वयाची घटना ( Synthesis ) या प्रक्रियेला ‘ affirmation ’ व ‘negation of the negation’ अशी नावे त्यानीं दिली आहेत. त्यानीं जरी मानवी जीवनाची मनुष्याचे प्राकृतिक ज्ञान व त्याचा उद्योग व शिल्प-कला याच्यापासून फारकत केली नाहीं, तरी त्यानीं मानव हा स्वतत्र धरला नाहीं. तो एक परिस्थितीने बद्ध अथवा मर्यादित असा एक कामकरी ( functionary ) धरलेला आहे. त्याच्या सामाजिक व इतर कल्पना, भावना विचार, आचार इत्यादि त्या परिस्थितीला अनुसरून तिने उत्पन्न केलेल्या आर्थिक व्यवस्थेत व सबधात उत्पन्न होतात. मार्क्सच्या मते केवळ परिस्थिति अथवा केवळ मनुष्य हा ऐतिहासिक घटनेला कारण नाहीं. तर भौगोलिक परिस्थितीच्या, मनुष्याच्या श्रमाच्या, साधनसामुग्रीच्या व शिल्पकलेच्या संयो-

गानें उत्पन्न झालेली उत्पादन व्यवस्था (mode of production) हेच इतिहासातील सर्व घटनांचे व जीवनाचे आद्य कारण अथवा निर्णायक सूत्र (determining factor) आहे. त्याच्याचमुळे व त्यालाच अनुसरून समाज व्यवस्था व संस्था, धर्मसमजुती व मते, राजसंस्था व व्यवस्था आणि इतर मानवी संबंध व व्यवहार ही उत्पन्न होतात. ही उत्पादन व्यवस्था बदलली की, मनुष्याच्या सर्व संस्था, समजुती, विचार, व्यवस्था व संबंध बदलतात. त्या बदलणे इष्ट व अनिवार्य असते. त्याचा नवा अनुक्रम प्रगतीचा असतो. पण ही प्रगति मनुष्याच्या आर्थिक व सामाजिक घटनेमध्ये असलेल्या आंतरिक विरोधाने होते. ती त्यातील घटकाच्या सहयोगाने घडत नाही. अशा विरोध विकास पद्धतीने होणाऱ्या मानवी जीवनाच्या इतिहासाला मार्क्सचा इतिहासवाद म्हणतात. हा वाद समजण्याला त्याचे तत्वज्ञान व दृष्टि आपणास समजून घेतली पाहिजे. त्याच्या तत्वज्ञानाला dialectical materialism विरोधविकासरूपी जडवाद म्हणतात. तो भौतिक वस्तूना नित्य व खऱ्या मानतो. अध्यात्माला अथवा परमेश्वराला अथवा परमतत्वाला सत्य मानीत नाहीं. मार्क्सच्या मते सर्व बाह्य जगत्-वस्तु व पदार्थ हे खरे आहे. त्याच्या मागे कोणतीच निराळी स्वयभू अशी शाश्वत शक्ति अथवा तत्व नाहीं. जगाची उत्पत्ति, त्यातील वैचित्र्य व विकास, आणि त्यातील जीवनचैतन्य, ही त्यामध्ये स्वाभाविकपणे अंतर्भूत आहेत. जगातील सर्व नैसर्गिक वस्तु व पदार्थ व मानवी जीवनाच्या घटना याच खऱ्या आहेत. त्या सर्व बदलणाऱ्या प्रवाहरूपी व वैकासिक आहेत. त्या नुसत्या स्थावर नाहींत. त्या जंगमात्मक आहेत. जग व त्यातील वस्तू ही चराचरात्मक आहेत. त्याना स्थितिगतीचे स्वरूप आहे. मार्क्सने त्याच्या स्थितिगतीच्या नियमाचा शोध करून त्यामध्ये अनुस्यूत असणारा गतिक्रमाचा मार्ग 'विरोधविकास' (dialectics) म्हणून सांगितला आहे.

मार्क्सच्या मते सर्व सामाजिक संस्थाच्या व समजुतींच्या उत्पत्तीचे मूळ व त्याच्या प्रगतीची प्रेरणा ऐहिक गोष्टींत आणि आर्थिक साधनात व व्यवस्थेत आहे. त्यामुळे जे सामाजिक संबंध व समजुती, जे वर्ग व व्यवस्था उत्पन्न होतात त्यामध्येच मानवी इतिहासाचे स्वरूप, स्थिति, गति व परिणति दिसते. मनुष्यांचे धर्म, विचार, संस्कृति व इतर सर्व राजकीय, सामाजिक, शैक्षणिक, कलात्मक वगैरे अंगे व उपांगे याचा उगम, वाढ व बदल त्यापासून होतो.

मार्क्सच्या मते मनुष्याचे मन व ज्ञान, त्याचे विचार व कल्पना ह्या स्वयंभू व स्वतंत्र नाहींत. त्या बाह्य परिस्थिति व पदार्थ याचे मनुष्याने पाहिलेले अथवा बनविलेले चित्र आहे. मनुष्य हा सुद्धा काही एक स्वतंत्र व्यक्ति नसून जगातील इतर पदार्थासारखा एक वस्तु अथवा जीव आहे. याकरिता या

जीवाची व जगातील इतर वस्तूची फारकत करणे चुकीचे आहे. मनुष्याचा स्वभाव व नीति, आणि त्याच्या सामाजिक आकांक्षा, ह्या काहीं स्वतंत्र स्वरूपाच्या अथवा ठराविक ठशाच्या नसून, त्या परिस्थितिनुसार बदलणाऱ्या व तिला सापेक्ष आहेत. जगातील पदार्थ व घटना, यामध्ये सदैव स्थित्यतर, अवस्थातर व विकास चालू आहे, व ते सर्व विरोध पद्धतीने अथवा संघर्षाने होते. तसेच मनुष्य हा काहीं स्वभावाने स्वतत्र नाहीं. तो आपल्या वर्गाच्या हिताचा व आकाक्षाचा प्रतिनिधि अथवा प्रतिध्वनि आहे. तो एक कर्मचारी ( Functionary ) आहे.

अशा समजुतीवर मार्क्सचा इतिहासवाद रचलेला आहे. त्याचा प्रयत्न मनुष्याचा सर्व सामाजिक व सास्कृतिक इतिहास एका सूत्रात गोवण्याचा आहे, व त्यामध्ये एक मूळ कारणमीमासा व एक प्रगतीचा अनुक्रम दाखविण्याचा आहे. त्याच्या मते इतिहासाच्या सर्व क्रमामध्ये व अवस्थान्तरामध्ये एक ठराविक सामाजिक अनुक्रम व आर्थिक कारणपरंपरा आहे. त्यामध्ये वैचित्र्य व विविधता असली तरी यदृच्छा, अकारणत्व व असूत्रता नाहीं. मनुष्याच्या सामाजिक जीवनातील स्थित्यतरे व फेरफार त्याच ठराविक कारणाने, क्रमाने व मार्गाने घडतात.

मार्क्सच्या इतिहासवादातील दोन मुख्य सिद्धान्त म्हटले म्हणजे: एक, मानवी स्वभावाचे स्वरूप त्या काळच्या आर्थिक उत्पादन व्यवस्थेप्रमाणे बनते, व दुसरा, त्याची अवस्थान्तरे अथवा विकास ही उत्पादनव्यवस्था ( mode of production ) व सामाजिक संबध ( Social relations ) यामध्ये उत्पन्न झालेल्या विरोधाने होतात. हा विरोधविकासाचा क्रम व नियम इतिहासाच्या प्रत्येक घटनेच्या स्थितिगतिमध्ये अनुस्यूत आहे. तो त्याचा प्रेरक आहे.

मार्क्सने मानवी इतिहासाचे पाच अवस्था खंड पाडले आहेत ते असेः—

१ इतिहास पूर्वकालातील प्राथमिक सामुदायिक समाजअवस्था (Gens or preclass society) २ ऐतिहासिक प्राचीन कालातील गुलामी समाज अवस्था, (Slave society ), ३ मध्ययुगीन कालातील सरजामी समाज अवस्था ( Feudal society ), ४ अर्वाचीन कालातील भाडवलीसमाज अवस्था, ५ भावी कालातील अंतिम वर्गविहीन सामुदायिक समाज अवस्था ( Classless communist society ). ह्या प्रत्येक अवस्थाखडाचे विशेष लक्षण म्हणजे त्यातील विशिष्ट आर्थिक उत्पादनपद्धति व त्यामुळे बनलेली विशिष्ट समाजव्यवस्था. आणि त्या सर्व अवस्थाखडाचे दुसरे सामान्य लक्षण

म्हणजे त्यात वावरत असणारे विरोधविकासाचे लक्षण व त्याच्यायोगे प्रत्येक अवस्थाखंडाचे स्थित्यंतर होऊन नवें अवस्थाखंड निर्माण होणे. या प्रत्येक खंडांतील सांस्कृतिक व सामाजिक नियम व नीति, रचना व रूपे, आचार व विचार, भिन्न असून तीं त्यामधील उत्पादनव्यवस्थेवर व वर्गसंबंधावर आधारलेलीं आहेत.

या प्रकारे मार्क्सने इतिहासाचे स्वरूप स्थायी व गतिमान असे दाखविले आहे, आणि त्यातील कारणपरंपरा व अनुक्रम हीं एका विशिष्ट वळणानें, विशिष्ट नियमाने व इष्ट मार्गाने जाणारीं आहेत असे प्रतिपादिले आहे. एका आर्थिक व सामाजिक व्यवस्थेतूनच दुसरी भिन्न व्यवस्था विरोधविकासाच्या तत्त्वाने व मार्गाने निर्माण होते व झाली आहे, असे मार्क्सचे म्हणणे आहे. एका विशिष्ट आर्थिक उत्पादन व्यवस्थेच्या योगाने एक विशिष्ट प्रकारची वर्गपद्धति, संपत्तीची वाटणी व देवघेव, आणि नीति व धर्म याबद्दलच्या कल्पना उत्पन्न होतात. यानंतर त्या जुन्या उत्पादनव्यवस्थेमधील उत्पादनाचीं साधनें व शक्ति (Forces of production ) बदलल्यामुळे एक नवी उत्पादनव्यवस्था उत्पन्न होते. त्यामुळे जुन्या सामाजिक व आर्थिक व्यवस्थेमध्ये वर्गकलह घोटाळा व असंतोष उत्पन्न होतो, आणि असंतोषी वर्गाच्या विरोधाने नवी सामाजिक, आर्थिक व नैतिक व्यवस्था नव्या उत्पादन व्यवस्थेस अनुकूल होईल अशी उत्पन्न होते.

यावरून मार्क्सचे मत केवळ मनुष्याच्या कर्तबगारीला अथवा केवळ भौगोलिक परिस्थितीला इतिहासाच्या घटनाक्रमात व कारणपरंपरेत आरंभस्थान अथवा प्रधानस्थान देत नाहीं. ते नुसत्या आर्थिक उत्पादनव्यवस्थेलाच ( mode of production ) मानाचे निर्णायक स्थान देते, व तिला आद्य व मुख्य शक्ति ( sole determining factor ) समजते. हे चूक आहे. उत्पादनव्यवस्थाच मुळीं (१) मनुष्याच्या कर्तबगारीवर व उद्देशावर, आणि त्यानीं उत्पन्न केलेलीं नवीं साधने, यंत्रे व कला ( Tool making power and technique ) निर्माण करण्याच्या व त्याचा विनियोग व उपयोग करण्याच्या शक्तीवर, आणि (२) त्याचीं भौगोलिक साधने व परिस्थिति याच्या संभाव्य अनुकूल प्रतिकूलतेवर ( possibilities ) अवलंबून असते. तेव्हा इतिहासघटनेची कारणपरंपरा व अनुक्रम शोधताना या दोन घटकाना प्रधान व समानस्थान दिले पाहिजे. त्यानीं उत्पन्न केलेल्या आर्थिक उत्पादनव्यवस्थेलाच प्रामुख्य देऊन चालणार नाहीं. त्या दोहोमध्येसुद्धा मनुष्य हाच नव्या मार्गाचा आरंभ करतो. तोच कर्ता व कारक आहे. जशी उत्पादनव्यवस्था ही त्या दोन घटकांच्या संयोगाने, तशी ती बदलण्यात तेच घटक कारणीभूत होतात. ती

आपोआप बदलत नाहीं. इतिहासाच्या प्रत्येक घटनेमागे हे दोन घटक आहेत. त्याची एकमेकावर क्रिया व प्रतिक्रिया चालू असते. एक कल्पना व योजना पुरवितो व दुसरा उपाय व उपकरणे देतो. पण मार्क्स हा आपल्या ऐतिहासिक विवेचनामध्यें वैचारिक मनुष्य व प्राकृतिक परिस्थिति याना स्वतंत्र कर्तृत्वाचें स्थान देत नाहीं. तो केवळ वर्गविशिष्ट मनुष्य व केवळ आर्थिक परिस्थिति विचारात घेतो. स्वतंत्र विचारवान् मनुष्य घेतला तर त्याच्या अनेकविध वृत्तीला व कर्तृत्वाला मार्क्स आपल्या विशिष्ट सिद्धान्तामध्ये बसवू शकत नाहीं. त्याला मनुष्याच्या स्वभावाचे व कृतींचे वैचित्र्य नको, केवळ मानसिक सामान्यत्व पाहिजे. तसेच परिस्थितीचे विविधत्व व त्यातील अनेक अपूर्व संभाव्यता नको, केवळ आर्थिक सामान्यत्व पाहिजे. वर्गरचनेच्या व उत्पादनव्यवस्थेच्या अनुरोधाने त्याने मनुष्य व परिस्थिति याचे स्वातंत्र्य व शक्ति गौण ठरवून त्याच्या वार्गिक व आर्थिक सामान्यत्वाच्या आधारे आपले विरोधविकासाचे शास्त्रमत रचले. कोणत्याहि शास्त्राला काहीं सामान्य घटना व वारवार घडणाऱ्या क्रिया असल्या म्हणजेच नियम अथवा सूत्रे बाधता येतात. वारवार घडणाऱ्या गोष्टी जर अपूर्व व विशेष प्रकारच्या असल्या तर त्याचे शास्त्र व अनुक्रम ही रचता येत नाहीत.

इतिहाससबधी मार्क्सचे विचार व सिद्धान्त फार ठोकळ व वरवर आहेत. त्याच्या योगे इतिहासातील अनेक व विविध घटनाचे रहस्य उलगडत नाहीं. इतिहासातील अपूर्व व आकस्मिक घडणाऱ्या घटनाची उपपत्ति, संबध, योगायोग, महत्त्व व परिणाम त्याच्या विवेचनाने व वादपद्धतीने कळत नाहींत. इतिहासातील असख्य घटना अशा एकागी व ठोकळ सिद्धान्ताच्या रूपरेषेंत व चाकोरींत मुळीच बसत नाहीत. इतिहासाचे रहस्य समजण्याला व खरा उलगडा होण्याला मनुष्याच्या व परिस्थितीच्या अनेकविध शक्तींचा, कार्यांचा, प्रसगाचा व योगायोगाचा विचार करावा लागतो.

मार्क्सची इतिहासाची अवस्था खड योजना फारच ठोकळ व सामान्य असून ती बरीच सदोष आहे. तिच्यामध्ये पौर्वात्य देशाच्या ६००० वर्षांच्या इतिहासाच्या प्रवाहाला, विकासाला व क्रमाला जागा नाहीं. त्याने तो इतिहास इतिहासपूर्वकालातील प्राथमिक सामुदायिक समाज अवस्थेच्या मध्ये नेऊन बसविला आहे. फार जुन्या, रानटी व प्राथमिक लोकाचा ( Paleolithic peoples जुन्या पाषाणयुगाचे लोक व जाती ) त्याने विचारच केला नाहीं. मॉर्गन ( Morgan ) च्या "प्राचीन समाज" ( Ancient society ) च्या चुकीच्या मतावर बसविलेली त्याची व एन्गल्सची कुटुंब, मत्ता व राज्य याच्या उत्पत्तीची व वाढीची कल्पना सर्वथा चुकीची आहे. एकाच खंडाच्या

कालामध्यें जरी आर्थीक उत्पादनव्यवस्था एक असली तरी निरनिराळ्या प्रकारचे धर्म, राज्ये, समाज, संस्था व समजुती तेथे सापडतात, आणि निरनिराळ्या उत्पादन व्यवस्थेखालीं एकाच प्रकारचे धर्म इत्यादि दिसून येतात. हें मार्क्सने ओळखले नाहीं. सामुदायिक, गुलामी, सरजामी व भांडवली समाज एकच प्रकारचे नाहींत. नामांकित इतिहासकार व आधुनिक खरे समाजशास्त्रज्ञ यांचीं मानवसमाजाचीं व त्याच्या प्रगतीचीं अथवा अधोगतीचीं वर्णनें, कारण-परंपरा, अवस्थानुक्रम इत्यादि वाचली तर मार्क्सची ठराविक योजना कोठेच यथायोग्य लागू पडत नाहीं. त्याना अनेक कारणाचा व अनुक्रमाचा, स्वभावाचा व कृतींचा, परिस्थितीचा व प्रसंगाचा व आकस्मिक योगायोगाचा इतिहासामध्ये मेळ दिसतो व त्याचा विचार करावा लागतो.

मार्क्सच्या मते एका अवस्थेतून दुसऱ्या अवस्थेत मानवी समाज विरोध-विकासाच्या तत्त्वानुसार जातो. पण gens (सामुदायिक) समाजाचे slave (गुलामी) समाजात व त्या slave समाजाचे सरजामी (feudal) समाजात जे रूपान्तर झाले त्याच्यामध्ये एन्गल्सच्या ग्रथावरून mode of production व त्याचे dialectics चा खेळ अथवा झोंबाझोंबी दिसून येत नाहीं. अनेक कारणामुळे—राजकीय, धार्मिक, आर्थिक, नैतिक वैचारिक, पारिस्थितिक—अशीं रूपांतरे होतात. परचक्रे, नव्या कल्पना, नवी साधने (मनुष्याने आपल्या कल्पनेने व कर्तृत्वाने उत्पन्न केलेलीं), आणि आकस्मिक प्रसंग व योगायोग या सर्वांना त्यामध्ये स्थान व भाग आहे. एन्गल्सच्या Origin of the Family, Property and State या ग्रंथातील कारणपरंपरा चुकीची आहे व वास्तविक नाही असे सर्व समाजशास्त्रज्ञ आज मानतात. मार्क्सच्या इतिहासाच्या प्रत्येक अवस्थाखंडामधील आर्थिक व सामाजिक व्यवस्थेमध्ये अनेक अवस्था व स्थित्यंतरे सापडतात. त्याचे त्यानें विवेचन केले नाहीं व कारणपरंपरा दिलेली नाहीं.

मार्क्स हा गत इतिहास आपल्या आधुनिक दृष्टीने व भावी क्रांति ध्येयाच्या धोरणाने पाहतो. त्यामुळे इतिहासाची प्रकृति व संस्कृति न समजता तिची विकृति मात्र झाली आहे. इतिहासामध्ये उत्पादनशक्ति, व्यवस्था व संबंध हीं आपोआप उत्पन्न झालेलीं, वाढलेलीं व बदललेलीं सापडत नाहींत. त्याच्यावर मनुष्याच्या स्वतंत्र मानसशक्तीचा व कर्तृत्वशक्तीचा, आणि सर्व प्रकारच्या परिस्थितीचा प्रभाव व परिणाम होत असतो. त्याना बाजूला सारून किंवा गौण स्थान देऊन चालत नाहीं. मनुष्ये जरी परिस्थितीने मर्यादित असलीं तरी तीं नवी परिस्थिति, नवी साधने व नवे उद्देश निर्माण करतात व त्याचा विविध तऱ्हेनें उपयोग व व्यवस्था करतात.

मार्क्सच्या मते विरोधविकासातील स्थिति—विरोधगति हा क्रम प्रत्येक वस्तूमध्ये अथवा घटनेमध्ये, अवस्थेमध्ये अथवा व्यवस्थेमध्ये अंतर्भूत असून वावरत असतो. त्याला मनुष्याच्या स्वतंत्र विचार व कर्तृत्वशक्तीचे बळ नको आहे. कोणीहि मनुष्य हा केवळ त्या दृष्टीने निमित्तमात्र आहे. त्याची करणी स्वतंत्र नाहीं, आर्थिक आवश्यकतेने मर्यादित व प्रेरित आहे. त्या क्रमाचा ओघ आवश्यक, शक्य व इष्ट आहे. जगातील सर्व समाजसंस्था व घटना यामध्ये आंतरिक सद्योगाऐवजीं अंतर्भूत विरोध व द्वैधभाव आहे. तो वर्गकलहाच्या रूपाने चालत असतो व त्यामुळे नव्यानव्या रचना व नवे नवे संबंध उत्पन्न होतात. पण खरोखर उत्पादनपद्धति, वर्गकलह व विरोधविकासाचें तर्कट अथवा अनुमानपद्धति हीं स्वतःच एखाद्या व्यवस्थेमध्ये बदल अथवा प्रगति घडवून आणू शकत नाहीत. त्याना मानवी, सुखी व नैतिक जीवनाचीं उच्च ध्येये व उद्देश व हीन जीवनाचा अनुभव याचे साहाय्य व प्रेरणा पाहिजे.

इतिहासाच्या घटना, त्याची स्थिति व गति, त्याचा अर्थ व अनुक्रम समजण्यास अनेक भौतिक शास्त्राचा, सामाजिक शास्त्राचा व मानसिक शास्त्राचा अभ्यास, अनुभव व ज्ञान पाहिजे. ते मार्क्स व एन्गल्स याना आजच्या दृष्टीने अपुरे होते. त्याचप्रमाणे त्याची इतिहासाची माहिती व अभ्यास अपुरा होता. ते आपल्या एकांगी ठराविक दृष्टीने व उद्देशाने सर्व घटनेकडे पाहात होते. म्हणून त्याच्या वादामध्ये व दृष्टीमध्ये अनेक दोष राहिले आहेत. मनुष्याचे मन, विचार व कल्पना ह्या स्वतंत्रपणे विषयाचे आकलन करू शकतात. त्याला स्फूर्ति व प्रेरणा व स्वानुभव स्वतंत्र रीतीने होऊ शकतो.

मार्क्सची ऐतिहासिक दृष्टि व वाद एकांगी आहेत. तो आर्थिक ध्येयाला व व्यवस्थेला फाजील महत्त्व देतो. तो वर्गकलहाला प्रोत्साहन देतो. त्याच्यामुळे कलह व हिंसावृत्ति, अतिरेक व अत्याचार वाढत आहेत.

इतिहासामध्ये एकच नियम, धारा व क्रम दिसत नाहीं. तोच आवश्यक व इष्ट असतो असें नाहीं. मानवी समाजाची प्रगति व स्थित्यंतरे केवळ विरोधानेच होत नाहींत. त्याच्या घटनेमागे अनेक अज्ञात व आकस्मिक सुद्धा कारणे, सहयोग व योगायोग आहेत. त्यामध्ये यदृच्छेलासुद्धा स्थान आहे. इतिहासाला ‘ भविष्यपुराण ’ सांगावयाचे नाहीं व सांगता येणार नाही. त्यातील घटनेमध्ये स्थलकाल व कार्य याचे सापेक्षत्व आहे. त्याचा संबंध नुसत्या आर्थिक व्यवस्थेशीं नाहीं. इतिहासाच्या घटनेमध्ये अयुक्तिकता ( irrationality ), यदृच्छा (contingency), योगायोग ( coincidence ), विशेषता (singularity) व आकस्मिकता ( suddenness ) इत्यादि अनिश्चित शक्तींचा भाग व बल आहे. तीं सर्व वगळून त्याचे एक समाजशास्त्र, क्रांतिशास्त्र, अथवा भविष्यपुराण बनविणें हें धोक्याचे, धाष्टर्याचें व चुकीचे आहे.

प्रसिद्ध अमेरिकन इतिहासकार जेम्स शॉटवेलचे 'Interpretation of history' बद्दलचे मत असे आहे. " We have two main elements in our problem, which must be brought together in the psychic on the one hand and the material on the other. The interpretation of history lies here in the interplay of both these factors. Both facts and processes are the stuff of history. The statement of a process may be glorified into a 'law', but a law merely means a general fact of history. It holds good under certain conditions, which are either historical or purely imaginary. It is not the business of history to consider ultimate realities. "

* * * * *

## १६. जागतिक विचारसरणीचे इतिहासकार

मानवी जीवन व संस्कृति याना मूलतः व अतिमतः एक धरून तिच्या भिन्न रूपाचा व विविध अगाचा सपर्काने, सघर्षाने व फैलावाने एकमेकावर कसा परिणाम होतो व तिचे रूप हळूहळू अनेक धागेदोरे मिळून एक कसे होत आहे, अशा जागतिक दृष्टीचे अनेक इतिहासकार आज आहेत. जगाच्या हालचालींचे व घडामोडीचे सर्व धागे व परिणाम उकलून ते मानवी इतिहासाच्या गुतागुतीचे स्पष्टीकरण करीत आहेत. यामध्ये एच्. जी. वेल्स* (H.G. Wells) हा प्रमुख आहे. त्याची ' जगाच्या इतिहासाची रूपरेषा (Outline of World Histry ) हा ग्रथ लोकमान्य आहे. अशाच प्रकारचे जगाचे सामान्य इतिहास इतरानीं लिहिले आहेत. त्यापेक्षा अधिक विस्तृत व व्यापक असे जगाचे इतिहास मालेच्या ( series ) रूपानें सांप्रत लिहिले जात आहेत.

१. हेन्री बेरचा "Evolution of Humanity Series" इतिहास.

२. त्याचाच अनुवाद सि. के. ऑगडेनचा " History of Civilisation Series " इतिहास.

३. लुई हालफेन ( Louis Halphen ) व फिलिप सान्याक ( Philippe Sagnac ) यांचा " Peoples and Civilisations " ( २० भाग ) इतिहास.

४. गुस्टाव ग्लोट्झचा ( Gustave Glotz "General History") इतिहास.

---

*हा ग्रंथकार नुकताच ता. १३-८-४६ ला मृत्यु पावला.

५. चार्लेस रीचे ( Charles Richet ) चा " The Universal Cultural History" इतिहास.

६. जे. बी. ब्यूरीचा "Cambridge Ancient and Medieval History Series" इतिहास.

७. The Legacy Series of Israel, Greece, Rome, Islam, Middle Ages, and India.

८. सर जॉन हॅमरटनचा ( Sir John Hammerton ) " A Universal World History " इतिहास.

९. जेम्स शॉटवेलचे ( James T. Shotwell ) " Records of Civilisation " इतिहास.

१०. " Historians ' History of the World. " देशवार इतिहास.

११. "Story of the Nations Series" देशवार इतिहास.

यामध्ये काहीं केवळ देशवार व काहीं विषयवार व इतर क्रमवार असे आहेत. त्यामुळे इतिहासाच्या तुलनात्मक, ओघात्मक व रहस्यात्मक अभ्यासाला पुष्कळ मदत झाली आहे. मानवी जीवनाचीं निरनिराळ्या काळाचीं व स्थळाचीं चित्रे, व मानवी संपर्कांचे व संघर्षांचे एकंदर परिणाम, आणि मानवी कृतींचे एकंदर सांस्कृतिक व सामाजिक स्वरूप या जागतिक इतिहासाच्या योगानें आपणास समजत आहे. मानवसंस्कृति व समाज व तिचा क्रम व कारण एक का अनेक हा आज इतिहासाचा मुख्य प्रश्न आहे.

* * * * *

## १७. निष्कर्ष व अनुमानें.

इतिहासाचे दोन अर्थ होऊ शकतात. एक, गत घटना (events themselves ) अथवा पूर्ववृत्त; दुसरा, त्या घटनांची अथवा वृत्ताची कथा अथवा वृत्तान्त ( records of events ). इतिहासामध्ये मुख्यतः काय घडले याचे वर्णन येते. त्याबरोबर ते का घडले व कसे घडले याचा विचार होतो. ह्या तिन्ही प्रश्नाचा मेळ बसविणे हे इतिहासकाराचे मुख्य काम आहे. ज्यानीं काय घडले याचे यथासांग व यथोचित वर्णन समजून इतिहास लिहिला नाहीं अथवा अभ्यासिला नाही, त्यानीं ते का घडले व कसें घडले हे प्रतिपादणें योग्य ठरत नाहीं. इतिहासकार हा प्रायः घटनावादी व वास्तविक दृष्टीचा पाहिजे, केवळ आदि अन्तवादी अथवा क्रमवादी समीक्षक दृष्टीचा नको. इतिहास हा एका दृष्टीने गत घटनांची रचना यथाकाल व स्थल आणि यथाक्रम व यथासंबंध,

या पद्धतीने करतो व त्याचे हुबेहुब चित्र आपणांपुढें मांडतो, आणि दुसऱ्या दृष्टीने आपल्या साप्रतच्या मानवी जीवनाच्या विविध अगांची उत्पत्ति व वाढ कोणत्या घटनामुळे व कोणत्या प्रकारे व क्रमाने झाली यांचे विवरण करतो.

इतिहासाच्या कल्पना चार सदरात पडतात. ( १ ) घटनाचें संशोधन कसे करावयाचे, ( २ ) त्याचे आकलन व संकलन कसें करावयाचे, ( ३ ) त्याचे उत्कलन अथवा समीक्षण कसे करावयाचे, आणि ( ४ ) त्याचे लेखन कसे करावयाचे. यामध्ये घटनाचे स्वरूप, प्रकार व आशय, त्याची निवड, व कार्यकारणमीमासा, हीं सर्व येतात.

अशाप्रमाणे इतिहासाच्या लेखनाचा सर्वांगानें विचार करणारे व त्याच्या अर्थाचे, कार्यकारणभावाचे, क्रमाचे व व्याप्तीचे विवरण करणारे अनेक पाश्चात्य ग्रंथकार झाले आहेत. इतिहासकाराबरोबर काहीं समाजशास्त्रकार, मानसशास्त्रकार, भूगोलशास्त्रकार, मानववंशशास्त्रकार, राजशास्त्रकार, अर्थशास्त्रकार आणि तत्त्वज्ञानी ह्यानींहि इतिहासाबद्दल आपल्या कल्पना व सिद्धान्त माडले आहेत. येथे आपण मुख्यतः इतिहासकाराच्या मुख्य कल्पना व अनुमाने याचे विवरण करणार आहोत. प्रत्येक काळाच्या परिस्थितीला व कल्पनाना अनुसरून ज्यानीं स्वतः मोठ्या प्रमाणावर इतिहास लिहिले आहेत व त्याबद्दल आपल्या कल्पना माडल्या आहेत, त्याचाच येथे विचार करावयाचा आहे. त्याचे मुख्य काम इतिहासाला प्राधान्य देऊन इतिहासलेखनाचे व त्याच्या अर्थविवरणाचे आहे. इतर शास्त्रकार व तत्त्वज्ञ आपापल्या शास्त्राच्या व तत्त्वाच्या परिपोषार्थ इतिहासाला साहाय्यक पण गौण समजून व आपल्या सामाजिक, तात्विक, धार्मिक, आर्थिक, भौगोलिक अथवा राजनैतिक मताना अथवा सिद्धान्ताना प्राधान्य देऊन इतिहासाच्या काहीं सामान्य व अनुकूल घटनाचा उपयोग करून घेतात. तेव्हा त्याची ऐतिहासिक पद्धति व विचारसरणी एकागी असते. ते अपूर्व, विरोधी, असामान्य व आकस्मिक घटना गाळून टाकतात. ते मानवी इतिहासातील घटना व घटक, आणि त्याचे वैशिष्ट्य याचा सागोपाग व यथास्थित उपयोग करीत नाहींत. अशा लेखकामध्ये सत ऑगुस्तीन, ओरोसियस, व्हीको, कॉन्त, हेगेल, मार्क्स, एन्गल्स, स्पेन्सर, स्पेन्गलर, इत्यादि ग्रथकार येतात. पण त्याच्या इतिहाससबधीं तात्त्विक विचाराचा परिणाम काहीं इतिहासकारांवर झाल्यामुळे व त्याचा पगडा काहीं लेखकावर बसल्यामुळे त्यांच्या इतिहाससंबधीं कल्पनाचे सक्षेपाने दिग्दर्शन करावे लागेल.

इतिहासकारामध्ये सुद्धा काहींजण नुसता ‘ जसा घडला तसा ’ इतिहास सागणारे आहेत. ते इतिहासातील रहस्याचा व कारणपरपरेचा उलगडा करणे आपले कार्य समजत नाहींत. दुसरे घटनाचे नुसते यथावृत्त व यथाक्रम वर्णन करणे पुरे समजत नाहींत. ते त्याच्या रहस्याचे व कारणपरपरेचे उत्कलन करूं

पहातात आणि इतिहासाबद्दल आपली अनुमाने व प्रमेये माडतात. यासंबंधीं इतिहासकारामध्ये अनेक मते व वाद आहे. त्याचे वर्गीकरण सामान्यरूपानें असे करता येईल.

१. पौराणिक गूढ–गाथावादी, २. ईश्वरी सूत्रवादी, ३. मूलतत्त्ववादी, ४. कालवादी, ५. प्रकृतिवादी अथवा अर्थवादी, ६. पौरुषवादी, ७. भूगोलवादी, ८. वंशवादी, ९. शिल्प–शास्त्र–कलावादी, १०. समाजसत्तावादी, ११. राजसत्तावादी, १२. सर्वांगाचे समीक्षण करणारे सयोगीकरणवादी.

या इतिहासमतकारामध्ये घटनाच्या कारणाच्या व क्रमाच्या दृष्टीनें कोणी निश्चयात्मक मताचे तर कोणी सभवमताचे आहेत, कोणी आकस्मिकमताचे तर कोणी दैवयोग मताचे आहेत, कोणी पुरुष प्रयत्नवादी आहेत तर कोणी परिस्थितिबधनवादी आहेत, कोणी अतीत शक्तीचा तर कोणी अंतर्गत शक्तीचा प्रभाव मानणारे आहेत, कोणी एकान्तवादी आहेत तर कोणी अनेकान्तवादी आहेत. त्याची माहिती आपणास त्याच्या इतिहासावरून मिळते, किंवा त्यानीं स्वतत्र माडलेल्या इतिहाससबधी कल्पनावरून मिळते.

प्रथम इतिहाससबंधीं कोणते प्रश्न उत्पन्न होतात ते आपण पाहू. इतिहासाचा अभ्यास कसा करावा, त्याचे लेखन कसे करावे, तो कोणत्या हेतूनें लिहावा, त्याची साधने कशी जमवावीं व जुळवावीं, त्याच्या घटना कशा संशोधाव्या, त्या समजण्याला कोणत्या अन्य शास्त्राचे व पद्धतींचे साहाय्य घ्यावे, सकलन, व माडणी कशी करावी, त्यातील रहस्य, गति, क्रम अथवा प्रवाह कसा आकलावा, त्यातील सस्थाचे व समजुतींचे अर्थ, त्यातील अन्योन्य सबधाचे ओघ व अनुक्रमाचे रोख, याचे मूल्यमापन कसे पारखावे, अशा प्रकारचे अनेक प्रश्न इतिहासकाराच्या मनश्चक्षूसमोर येतात. शिवाय, समग्र मानवी इतिहासाची घडण अथवा सरणी एका आद्य सूत्रात निश्चित नियमरूपाने बाधता येईल काय, आणि त्याची प्रेरक, नियामक व निर्णायक शक्ति अथवा नियम एकच आहे काय, अशाही प्रश्नाचा कांहीं इतिहासकार विचार करतात.

सध्या इतिहासाचे क्षेत्र वाढलेले आहे. त्याची कालमर्यादा हजारो वर्षे मागे गेली आहे. त्याची स्थलमर्यादा पृथ्वीभर पसरली आहे. त्याची समाज–मर्यादा सर्व मानव समाज व्यापित आहे. त्याची अग–मर्यादा मानवी जीवनाचा सागोपाग शोध व वर्णन करण्यात गुतली आहे.

एका दृष्टीने इतिहास हा 'काय घडले,' 'कोठे व कधीं घडले,' 'कसें घडले,' एवढेच सागतो, म्हणजे त्याचे कार्य केवळ वर्णनात्मक होते. दुसऱ्या दृष्टीने तो ते 'का घडले,' 'कोणीं घडविले' व 'कशा क्रमाने घडलें' हेंही सागतो. यामध्ये त्याचे कार्य अधिक व्यापक होतें. ते त्यातील रहस्य उलगड-

त्यांचें व ओघ सांगण्याचे होते. रान्केसारखे कांहीं इतिहासकार पहिली मर्यादित दृष्टीच पत्करतात व योग्य मानतात. इतर दुसरी अधिक व्यापक दृष्टि पत्करतात. पहिली दृष्टि केवळ बाह्यरूपाची आहे. दुसरी बाह्याभ्यन्तर परीक्षणाची आहे. कांहीं इतिहासकार घटनांचे नुसते स्थलकालक्रमानुसार–जसे घडले तसे–वर्णन करणे हाच मुख्य उद्देश समजतात. पण इतर इतिहासकार त्यापुढे जाऊन घटनामध्ये किंवा त्यांच्या मागे असलेली कारणपरंपरा, प्रेरकशक्ति, कर्ते पुरुष, आणि नियामक परिस्थिति यांची मीमांसा करतात आणि त्यांचे मूल्यमापन ठरवून घटनांच्या आविष्कारात त्यांचा होणारा प्रभाव व असणारे स्थान दाखवितात, आणि त्या घटनांचा मानवी जीवनावर होणारा परिणाम दर्शवितात. पहिल्या प्रकारचे इतिहासलेखन म्हणजे पूर्ववृत्तान्ताचे अथवा प्रसंगाचे नुसते स्थलकालक्रमानुसार संकलन व वर्णन होय. दुसऱ्या प्रकारचे इतिहासलेखन म्हणजे त्या संकलित वृत्तान्ताचे संशोधन व आकलन करून, त्याच्या कार्यकारणभावाचा, घटनानुक्रमाचा व अन्योन्यसंबंधाचा उलगडा करणे व त्याला अनुसरून कांहीं ऐतिहासिक सूत्रे व सिद्धान्त ठरविणे, हे होय. पहिले वर्णनकार इतिहासाला रहस्यात्मक कथेचे चित्ररूप देतात. दुसरे रहस्यकार त्याला रहस्यात्मक ज्ञानाचे तत्त्वरूप देतात. पण खरे पाहिले असता कोणताहि इतिहासकार एकाच दृष्टीने व पद्धतीने इतिहास लिहीत नाहीं. त्याच्या इतिहासात शास्त्रशुद्ध वर्णन व तत्वरूप रहस्यहि असते. मात्र कांहीं इतिहासकार त्याच्या शास्त्रशुद्ध वर्णनालाच प्राधान्य देतात व इतर त्याच्या तत्त्वरूप रहस्याला प्राधान्य देतात. कोणताहि इतिहासकार आपल्या वर्ण्य विषयापासून पूर्णपणे अलिप्त राहून त्यातील रहस्य अथवा भाव अल्पांशाने सुद्धा सूचित करणार नाहीं, असे शक्य नाही. प्रत्येक इतिहासग्रंथामध्ये कथावर्णन व त्याची शास्त्रपद्धति असते व त्याबरोबर त्यातील कथारहस्य व त्याची सूचकता असते. इतिहासामध्ये शास्त्र, कला व तत्त्व या तिन्ही गुणांचे अधिष्ठान आहे. तो केवळ घटनाभांडार नाहीं. त्यामध्ये मानवी सामाजिक व मानसिक शास्त्रांचे ज्ञान सांपडते व त्याच्या तत्वज्ञानाचा अनुभव मिळतो. त्यामध्ये समाजशास्त्राची कारणमीमांसा, तत्वज्ञानाची संबंधमीमांसा मानवी क्रियांची क्रममीमांसा व त्यांचे परिणाममापन आहे. त्यामध्ये व्यक्ति, समाज, व परिस्थिति यांच्या संपर्काने व संघर्षाने उत्पन्न होणाऱ्या अन्योन्यसंबंधाचे व परिणामाचे परीक्षण आहे.

तेव्हा इतिहासाचे कार्य असे आहे:–

१. गत घटनांचा शोध करणे. त्यांचे संपूर्ण सांगोपांग चित्र देणे आणि त्यांतील रहस्य सांगणे.

२. गत घटनांतून वर्तमान कसे उत्पन्न झाले ते दर्शविणे व त्यावरून वर्तमान ओळखणे.

३. गत घटनावरून मानवी जीवनाचा प्रवाह अथवा ओघ शोधणे व त्यातील गूढ उकलणे.

४. घटनाची कारणपरपरा, त्याचे अन्योन्य सबध, त्याचा अनुक्रम, त्यांच्या अवस्था व त्याचे परिणाम अथवा कार्य उलगडून दाखविणे.

पण इतिहासाच्या ह्या महनीय कामगिरीला त्याचे साधनक्षेत्र व त्याचा साठविलेला अनुभव फार अपुरा आहे. आपला लिखित व प्रमाणशुद्ध इतिहास केवळ ६००० वर्षाच्या दरम्यानचा आहे. तत्पूर्वीचा इतिहास जरी लाखो वर्षाचा असला, तरी त्याचे ज्ञान होण्यास पुराणवस्तुसशोधनशास्त्राशिवाय दुसरे साधन नाहीं, व जे आहे ते फार अपुरे आहे. त्यामध्ये व्यक्तींचे कर्तृत्व, त्याचे व्यापार व व्यवहार, सपर्क व सघर्ष सागणारे लिखित अथवा भाषित साधन नाहीं. पुराणवस्तूच्या अवशेषावरून काहीं सामान्य सिद्धान्त बाधता येतात. पण मानवी जीवनातील अपूर्व घटना, आकस्मिक योगायोग, व वैयक्तिक कर्तृत्व याचे ज्ञान होत नाहीं. तेव्हा इतिहासकाराच्या कल्पना व अनुमाने, सिद्धान्त व सूत्रे हीं केवळ ह्या ६००० वर्षाच्या ग्रथित घटनावर व अनुभवावर बसविलेलीं आहेत. पण त्याची साधने त्रुटित व दूषित आहेत. ती सर्व प्रकारे विपुल, समकालीन व विश्वसनीय नाहींत. तेवढ्याच साधन-प्रमाणावरून इतिहासाच्या गतीमध्यें एखादे विशिष्ट रहस्य व कल, एखादे कार्य व हेतू, एखादा सिद्धान्त व सूत्र अतर्भूत आहे असे ठरविणे अप्रस्तुत आहे. तरी पण अनेक समाजशास्त्रकारानीं तसा प्रयत्न केला आहे. त्याना इतिहासामध्ये वावरणारे एखादे सूत्र, शक्ति अथवा गति दिसते. त्या गतीचें स्वरूप रेषारूपी, हेलकावारूपी, चक्ररूपी, वक्र-रूपी अथवा द्वन्द्वरूपी असू शकते. काहीना त्या गतींत एक अनिवार्य प्रगति अथवा अधोगति दिसते. काहीजण ती गति इच्छित, आवश्यक अतएव अनि-वार्य स्वरूपाची असते असे समजून तिला अनुसरून इतिहासातील घटनाची निवड करतात व त्याची इतिहासरूपी माळ बनवितात.

इतिहासातील घटना दोन प्रकारच्या असतात. (१) सामान्य, वारवार घडणाऱ्या, आणि (२) अपूर्व, विशिष्ट रूपाच्या अथवा आकस्मिक घडणाऱ्या. इतिहासकाराचे कार्यक्षेत्र म्हणजे मानवाच्या सामाजिक जीवनामध्ये स्थल-काल-क्रमानुसार घडलेल्या घटना व प्राप्त झालेला अनुभव हे होय. इतिहासकाराचे क्षेत्र अव्यक्त, अज्ञात व दैवी शक्तीची प्रेरणा, अथवा मानवाच्या अननुभवित पण सभाव्य जीवनाचे स्वरूप, ही शोधण्याचा नसतो. ते अध्यात्मवाद, दैववाद अथवा गूढवाद याच्या आधाराने घटनाकडे पाहत नाहींत. घडलेल्या वास्तविक घटनावरून व त्याच्या बाह्याभ्यतर स्वरूप-संबधावरून ते मानवी जीवनाचे चित्र, चारित्र, क्रम व सबध ओळखू पाहतात, आणि त्यामध्ये अनुस्यूत असलेल्या

अनुभवावरून मानवी जीवनाच्या हालचालीचे व प्रवाहाचे रहस्य जाणू पाहतात. तेव्हा इतिहासरचनेत घटना, त्याचे यथावृत्त वर्णन व त्यातील रहस्याची फोड, हीं एकमेकाशीं अगदीं निगडित आहेत. इतिहासरहस्याची कसोटी व आधार इतिहासाच्या घटनाक्रमामध्येच आहे. तेव्हा खऱ्या घटना शोधणे, व त्याचा सग्रह करून, त्या क्रमवार लावून त्याचा अर्थ समजून घेणे, हे इतिहासकाराचे मुख्य काम आहे.

घटनाचे कालमान व महत्त्व कसे ओळखावयाचे हा मोठा प्रश्न आहे. घटना स्थलकालसबद्ध असतात. त्याना परपरा व परिस्थिति असते. घटना सारख्या नसतात. त्या वारवार त्याच प्रकाराने घडत नाहींत. काहींचा प्रभाव दूरवर जातो. काहीचे महत्व प्रगतिकारक अथवा क्रातिकारक ठरते. इतर तात्कालिक स्वरूपाच्या असतात. सर्वच घटना समान महत्वाच्या नसतात. काहींचे महत्व कालत्रयींमध्ये–भूत, वर्तमान, भविष्य–पसरते. इतर एकाच कालात नष्टस्मृत होतात. घटनाचे महत्व स्थळ, काल, समाज व कार्य याना अनुसरून ओळखावे लागते. तेव्हा अशा परिणामकारी खऱ्या घटनाचे सशोधन व सकलन करणे व नतर त्याचे आकलन करणे, हेच इतिहासकाराचे मुख्य कर्तव्य आहे. इतिहास हा केवळ वर्णनात्मक घटनासमुच्चय नसून तो रहस्य-विवरणात्मकहि आहे. त्यामध्ये मानवी जीवनाचा अर्थ व आविष्कार अंतर्भूत आहे. प्रत्येक घटनेच्या बाह्य स्वरूपात मानवी मनाची व इच्छेची आतरिक प्रेरणा व भावना असते. त्याबरोबर तत्कालीन बाह्य परिस्थितीची पकड व अनुकूलता प्रतिकूलताहि असते.

प्रत्येक स्थायी घटनेच्या मागे अनेक भिन्न प्रसगाचे आकस्मिक योगायोग आणि अनेक व्यक्तींचे सपर्क-सघर्ष असतात. आणि तिच्यामुळे पुढे असेच योगायोग व सपर्क-सघर्ष घटनाप्रवाहात परिणामरूपाने उत्पन्न होतात. घटनाच्या अंतरगात अनेक अज्ञात व अज्ञेय भाव व प्रवाह असतात. ते सहजरीत्या व संपूर्ण समजणे मोठे कठीण आहे. हेन्री बेरचे मत आहे कीं, घटना घडण्याला तीन गोष्टी कारणीभूत असतात. (१) परिस्थितीची आवश्यकता व कार्य, (२) अज्ञात व आकस्मिक योगायोग, आणि (३) मनुष्याचे कर्तृत्व. घटनेला वळण एक परिस्थितीच्या पकडीमुळे व प्रेरणेमुळे लागते; दुसरे पुरुषाच्या प्रयत्नामुळें व ध्येयशक्तीमुळे लागते, तिसरे एखाद्या अज्ञात योगायोगाने व आकस्मिक घडामोडीने लागते. या सर्वांचा बरोबर उलगडा होणे कठीण असते. तेव्हा इतिहासकारानीं माडलेली घटना ही दुसऱ्याचा श्रुत, कथित, व दृष्ट वृत्तान्त वाचून नतर सशोधन करून ठरविलेली असते. घटना अथवा प्रसंग घडलें तसे आपणाला दिसत नाहींत व सापडत नाहींत. दुसऱ्याच्या समकालिन लिखाणावरून अथवा श्रुतपरपरेने ते आपणास कळतात. तेव्हा आपल्या

माहितीमध्ये व घडलेल्या वृत्तातामध्ये एक अथवा अनेक मध्यस्थ येतात. त्याच्या योग्यतेवर व अनुभवावर, अचूक अवलोकनावर व स्मृतीवर त्या त्या घटनांचें प्रमाणत्व अवलंबून असते. अशा घटना घेऊन आपण त्याना आपल्या अनुभवाने, ज्ञानाने व अभ्यासाने तपासतो व नतर त्याचे खरे नामरूप ठरवितो, आणि पुढे त्याचा अर्थ आपल्या दृष्टीने उलगडतो. पण हे रूप व हा अर्थ मूळ वास्तविक घटनाशीं कितपत जुळतो, व त्याचा ऐतिहासिक परिणाम कसा व कोठपर्यंत दर्शवितो हा आणखी एक प्रश्न आहे. आपला अनुभव, ज्ञान व दृष्टि यामुळे आपली घटनाची जाणिव मर्यादित असते. या अनेक कारणामुळे ऐतिहासिक साधनाचे स्वरूप व महत्त्व, व्याप्ति व अर्थ प्रत्येक इतिहासकाराच्या दृष्टीप्रमाणे बदलतात. बाह्यतः साधने दिसावयाला तींच असलीं, तरी अर्थतः त्याची निवड, स्पष्टीकरण, अर्थविवरण, इत्यादि इतिहासकाराच्या दृष्टीवर व योजनेवर अवलबून असतात. घटना बोलत नाहींत. इतिहासकार त्याना निवडतो, जुळवितो व बोलवितो अथवा त्याच्यातर्फे बोलतो आणि त्याचे मूल्य व माप ठरवितो.

घटना ह्या एकातून एक अशा उत्पन्न होणाऱ्या, जोडून असणाऱ्या, व एका कारणपरपरेने अथवा एका सूत्राने चालणाऱ्या असतात, का त्या स्वतत्र व अपूर्व असून एकामागून एक अथवा अनेक येणाऱ्या आकस्मिक योगायोगाने जुळणाऱ्या व कार्यरूपाने सबद्ध झालेल्या असतात ? खरे पाहिले तर घटना तीन प्रकारच्या—आवश्यक कारणाने, आकस्मिक योगायोगाने, व आतरिक प्रेरणेनें घडणाऱ्या असतात. कोणतीहि घटना ही एकाच कारणाने घडत नाहीं. तिच्या मागे अनेक कारणे, योगायोग, सबध व प्रेरणा असू शकतात. तसेच तिच्यामुळें एकच कार्य उत्पन्न होत नाहीं अथवा प्रभाव पडत नाहीं. तिच्यापासून अनेक परिणाम होतात. तिचा इतर घटनाशीं सबध येऊन हे परिणाम अनेक प्रकारें घडतात. प्रत्येक घटनेमध्ये कार्यशक्तीचे अनेक धागेदोरे असतात. तेव्हा कोणतीही घटना इतर घटनापासून स्वतत्र अथवा अलिप्त नसते. कारण, कार्य, व सबध या दृष्टीने ती इतर घटनाशीं आणि अनेक व्यक्तींशीं व परिस्थितीशीं निगडित असते. इतिहासाच्या साधनाची छाननी व जुळणी कशी करावी, आणि त्याची नंतर माडणी व मोजणी कशी करावी याबद्दल आता फारसे मतभेद राहिले नाहींत. इतिहासामध्ये मानवी जीवनाच्या सर्व अगाचे चित्र व चरित्र असावे हेहि मान्य आहे. मतभेद उत्पन्न होतात ते घटनाची कार्यकारणपरपरा, क्रम, सबध व परिणाम याबद्दल होतात. अथवा त्यामध्ये प्रधानशक्ति, प्रेरक सूत्र अथवा चालक भाव काय आहेत याबद्दल होतात. त्यासबधीं जे अनेक वाद अथवा मते आहेत ती वर दर्शविलीं आहेत. पौराणिक गूढ—गाथावादी सर्व ज्ञात ऐतिहासिक घटनांची लावणी व माडणी एखादी बाह्य काल्पनिक गूढ अथवा अद्‌भुत घटना

मानून तिची गाथा तयार करून करतात. ते इतिहासाचे रहस्य उलगडण्यास ज्ञात ऐतिहासिक घटनांच्या बाहेर जातात.

ईश्वरी सूत्रवादी सर्व सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व लय व तिचा कर्ता, धर्ता व हर्ता ईश्वर हाच एकमेव समजतात. त्याच्याच इच्छेने व योजनेने सर्व चराचर व मानव इतिहास चाललेला आहे असे ते मानतात. त्यामध्ये मनुष्याच्या स्वतंत्र कर्तृत्वाला स्थान नाहीं. ह्या दृष्टीचे इतिहासकार इतिहास हा त्यांच्या धर्माचा-इसाई अथवा इस्लामी-धर्माच्या प्रसाराची कथा व परिणतीची गाथा आहे असे मानतात. सर्व ऐतिहासिक घटना, पूर्वीच्या व नंतरच्या त्याच्या वाढीला प्रेरक व पोषक आहेत असे ते समजतात. त्याच्या प्रसारांत व अंतिम जयांत सर्व इतिहासाचे व ज्ञानाचे पर्यवसान व परिसमाप्ति आहे असे ते धरतात.

मूलतत्त्ववादी एखादे आद्यतत्त्व अथवा आदिसूत्र कल्पून त्याच्या प्रेरणेने व प्रभावाने सर्व मानवी इतिहास घडतो व त्याची कार्यकारणपरंपरा लागते, असे मानतात. इतिहास हा त्याचा आविष्कार आहे असे त्यांचे मत आहे. त्याचीं नाना रूपे मानवी समाजाच्या हालचालींत, व्यापार-व्यवहारांत, संस्था-समजुतींत स्थलकालानुसार उत्पन्न झालेलीं दिसतात असे ते सांगतात. सर्व सृष्टीच्या अथवा प्रकृतीच्या उत्पत्तीच्या व आविष्काराच्या मुळाशीं असे निश्चित चैतन्य तत्त्व आहे, असे धरून ते सर्व इतिहासाचा त्याच्या आविष्काराच्या अनुरोधाने अर्थ लावतात.

काल-अथवा-युगवादी हे कालाचे युगविभाग पाडतात व प्रत्येक युगाचे ठायीं विशिष्ट प्रेरणा व कालात्मा, प्रभाव व धर्म कल्पून त्या त्या युगाच्या इतिहासाचा व घटनांचा अर्थ त्याप्रमाणे लावतात.

ही चारी मते इतिहासाच्या घटनांच्या व घटकांच्या बाहेर जाऊन एखाद्या अज्ञात व अव्यक्त अशा बाह्य गूढाचा, शक्तीचा अथवा तत्त्वाचा आधार घेऊन इतिहासाचा अर्थ लावतात.

यानंतरचीं मते वास्तविक घटनांना अनुसरून आहेत. तीं बाह्य शक्तींना व तत्त्वांना सोडून इतिहासाच्या घडामोडींत वावरणाऱ्या घटकांना-व्यक्ति व परिस्थिति-घटनांचे प्रेरक व कर्ते समजून आपली मते इतिहासाचा अनुभव अभ्यासून मांडतात. सध्याची इतिहाससंबंधी विचारसरणी मानवी प्रेरणा व प्रयत्न आणि परिस्थितीची पकड व प्रोत्साहन यांना तोलून मांडली जाते.

भौतिक प्रकृतिवादी अथवा अर्थवादी हे परिस्थितीच्या अनुकूल अथवा प्रातिकूल मर्यादांना प्राधान्य देतात. ते आर्थिक उत्पादनव्यवस्थेला व साधनांना निर्णायक महत्त्व देतात आणि त्यांना इतिहासाची नियामकशक्ति समजतात. यामध्यें ईश्वर अथवा गूढ याऐवजीं प्रकृति अथवा उत्पादनपद्धति त्याची जागा घेऊन बसते.

पौरुषवादी हे मनुष्याच्या प्रयत्नाला प्रधान स्थान देतात. इतिहासाच्या घट-नाना वळण लावणारे मोठे प्रयत्नवान् व प्रज्ञावान् पुरुषच असतात. वीर अथवा विभूती ह्या इतिहासाच्या घडामोडीचे व हालचालीचे प्रमुख जनक आहेत, असें ते सांगतात. भूगोलवादी हे मानवी जीवनावर भौगोलिक परिस्थितीचा फार प्रभाव पडतो व परिणाम होतो, असे प्रतिपादितात. हवा, पाणी, नद्या पर्वत, इत्यादींचा परिणाम मानवी जीवनावर व इतिहासावर पुष्कळ असतो हे त्यांचें मत आहे. वंशवादी हे मानवी वंशाची असमानता व उच्चनीचता कल्पून काहींना ते इतिहासाच्या घडामोडींत प्रमुख स्थान देतात, व त्याच्याच जातीय प्रेरणेने इतिहासातील मोठीं कार्यें व कृत्ये घडलीं आहेत असे ते दाखवितात.

शिल्प—शास्त्रवादी अथवा विज्ञानवादी हे शास्त्राच्या व यंत्राच्या आवि-ष्कारानुसार इतिहासामध्ये फेरबदल होतात, असे मानतात. मानवी जीवन व त्याचे संबंध तदनुसार बदलतात. इतिहास ही प्राकृतिक शक्तीच्या साहाय्याने, उत्पन्न केलेल्या यंत्राच्या उपयोगाने मानवी जीवनाची चाललेली प्रक्रिया आहे, असे ते सांगतात.

समाजसत्तावादी हे सामाजिक परंपराना व संबंधाना, त्यातील वर्गरचनाना व वर्गकलहाना अधिक महत्त्व देतात. व्यक्ति ही वर्गात्मक व वर्गनिष्ठ आहे व ती वर्गोचित कर्म करते, आणि ती स्वतंत्र व स्वैर अशी राहू शकत नाहीं व काहीं करू शकत नाहीं असे ते मानतात.

राजसत्तावादी हे राज्यसत्तेला इतिहासाच्या हालचालींत व काळाच्या घडामोडींत मुख्य स्थान देतात. ते तिला इतिहासाचा आत्माच धरतात व सर्व घटना तिच्या प्रेरणेने व अधिकाराने घडतात असे मानतात. हीं सर्व मते एकागी व आग्रही आहेत. या सर्वांचा समन्वय करून व मानवी जीवनाचीं सर्व अंगे व पुरुषार्थ ध्यानात घेऊन एक संयोगीकरणवादी मत प्रचलित आहे. ते कोणत्याच एका अंगाला प्राधान्य देत नाहीं. पण सर्व अंगे विचारात घेते व इतिहास हा एकान्तवादी नसून अनेकान्तवादी आहे असे दाखविते.

हे सर्व वाद अथवा हीं मते मनुष्यसमाजाच्या त्या त्या काळच्या ज्ञानाच्या अवस्थेतून व मानसिक विश्वासातूनच उत्पन्न झालेलीं आहेत. मानवी जीवनाचा प्रवाह अनेकरूपी व अनेकांगी आहे. तो नाना भावनानीं व नाना रसानीं युक्त आहे. त्यामध्ये अनेक सूर व प्रेरणा सापडतात. तो केवळ तर्कगम्य अथवा तत्त्वनिष्ठ नाहीं. त्याचे स्वरूप नानाविध आहे.

जसजशी शास्त्रीय ज्ञानाची ( प्राकृतिक व सामाजिक ) दिवसेदिवस वाढ होत आहे, तसतसे आपले इतिहासाचे आकलन अधिक होत आहे. पूर्वींच्या गूढ कल्पना व अतर्क्य विचारसरणी सोडून प्राकृतिक परिस्थिति व पुरुषप्रयत्न

यांच्या संयोगाने मिळालेल्या अनुभवाच्या साहाय्याने इतिहासकार आपल्याला इतिहासाची ओळख करून देत आहेत. आजची नवी ऐतिहासिक दृष्टि ही शास्त्रशुद्ध समन्वयवादावर अधिष्ठित आहे. ती अंतर्मुख व बहिर्मुख आहे. ती आत्मगत व वस्तुगत आहे. केवळ एका कल्पनेकडे अथवा सूत्राकडे बघणारी नाहीं. मानवी जीवनप्रवाह अगाध, अनंत व बहुविध आहे. तो एकांगी नसून एकाच चाळणींतून पारखला जाणे शक्य नाही.

इतिहासाचे मुख्य कार्य केवळ सामान्य घटना शोधून त्यातील एकत्वाची अथवा साधारणत्वाची ओळख करून देण्याचे नाही. त्याचा उद्देश वैयक्तिक घटना घेऊन त्याचे वैविध्य व स्वभाव यांची ओळख करून द्यावयाचे आहे. इतिहास हा एखादे समाजशास्त्र अथवा मानसशास्त्र नाही. ते समाजाचे सांगोपांग चित्र व चरित्र आहे. त्यामध्ये व्यक्तींच्या भावना व कर्तृत्व, सामाजिक व्यवहार व क्रिया, आणि परिस्थितीच्या मर्यादा व प्रेरणा यांचें वर्णन व विवरण आहे. मानसशास्त्र, समाजशास्त्र, वंशशास्त्र, वर्गशास्त्र, प्राणिशास्त्र, भूगोलशास्त्र, अर्थशास्त्र व राजशास्त्र या सर्वांचा मात्र त्यातील घटनांचा अर्थ समजण्यास फार उपयोग होतो.

आपण आर्थिक परिस्थिति हीच समुच्चयाने सर्व घटनांचे सामान्य कारण म्हणजे मुख्य मर्यादा समजलो तर जीवनाच्या आर्थिक अंगाला अधिक महत्त्व द्यावें लागेल. पण कारण या शब्दाचा अर्थ घटनांना विशिष्ट व निर्णायक वळण लावणे असा घेतला तर त्यात मनुष्याच्या कर्तृत्वाला अथवा नेतृत्वाला प्रमुख स्थान द्यावे लागेल. तेच नवा मार्ग दाखविते, नवे उपाय शोधते, नवीन उपकरणें काढते, आणि नव्या कल्पना व योजना सुचविते. शिवाय कारणामध्ये मानवी जीवनाचा नैतिक ओघ, मानसिक आकर्षणे, मानवी ध्येये व अकल्पित योगायोग अथवा संपर्क यांचा समावेश केला तर त्यानाही कारणपरंपरेत नियामकाचे स्थान द्यावे लागेल. इतिहासातील दृश्य होणारे परिवर्तन अथवा अवस्थान्तर हे मानवी प्रयत्नानें व परिस्थितीच्या परिवर्तनाने होते. त्यात एकालाच प्राधान्य देऊन चालत नाहीं. तरी पण मानवी मनाने प्रयत्न केल्यावाचून व त्याच्या दृष्टीमध्ये परिवर्तन झाल्यावाचून इतिहासाला गति मिळत नाहीं.

इतिहासवृत्त हे समकालीन लोकांनीं अवलोकनाने नमूद केलेल्या हकीकतीवर अधिष्ठित अथवा अवलंबून असते. त्यामुळे त्यामध्ये लेखकाच्या निरीक्षणशक्तीचे अधिक महत्त्व असते. शुद्ध वास्तविक घटनेपेक्षा त्याच्यावर लेखकाच्या अवलोकन व आकलनशक्तीची छाप पडते. त्यामुळे इतिहासवृत्तांताचे शास्त्र बनूं शकत नाहीं. त्यामध्ये प्रत्येक लेखकाच्या आत्मगत दृष्टीचा व शक्तीचा रंग जोडला जातो. त्याचप्रमाणे त्या काळच्या विचाराचा पगडा त्यावर बसतो.

आपल्याला खरे वास्तविक घडलेले वृत्त कळत नाहीं, पण ज्यांनीं ते पाहिले व वर्णिले त्याच्या डोळ्याने ते दिसते.

इतिहासाचे कार्य घटनाचे नुसते चोख वर्णन करणे नसून त्या का घडल्या व त्याच्या मागे मुख्य अथवा प्रधानकारणे आहेत असे आहे. याकरता इतिहासकाराला घटनाकर्त्यांचे स्वभाव व हेतु आणि त्या कालची परिस्थिति–प्राकृतिक, सामाजिक व सांस्कृतिक–हीं समजून घेतली पाहिजेत. इतिहासकाराला मनुष्याच्या आत्मगत स्वभावाचा, स्फूर्तीचा व हेतूचा प्रभाव समजावयाला पाहिजे. इतिहासाच्या घटनामध्ये मानसिक विचाराना व कल्पनाना महत्त्वाचे स्थान आहे.

इतिहासाचे रहस्य अथवा घाट इतिहासाच्या घटनामध्येच गोवलेला आहे. त्या घटनामध्ये व्यक्ति, परिस्थिति व समाज याच्या संपर्क–संघर्षाचे परिणाम दिसून येसात. प्रत्येक घटनाही पुढच्या घटनाचे कारण होऊ शकते व मागच्या घटनाचे कार्य होऊ शकते.

इतिहासाचे क्षेत्र व त्याचा उद्देश आदि व अंत, अव्यक्त व अनंत शोधण्याचा नाहीं. त्याचे काम 'व्यक्त–मध्याचा' म्हणजे वास्तविक घटनाचा व ज्ञात अनुभवाचा शोध व संकलन करून त्याची स्थलकालक्रमानुसार संगति लावण्याचे व वर्णन करण्याचे आहे. खऱ्या इतिहासाची कसोटी ऐतिहासिक घटनाच्या छाननींत, जुळणींत व मांडणीतच असते. आपणास इतिहासाच्या घाटाची परीक्षा ऐतिहासिक घटनाच्या योगानेच केली पाहिजे.

मानवी मानासिक कर्तृत्वशक्ति व सामाजिक कर्तेपण आणि बाह्य सृष्टीची विकासशक्ति व विविधता हीं अनेकरूपी व नानाप्रवाही आहेत. तेव्हा मानवी इतिहासाची घडणी व मांडणी एका सूत्रामध्ये अथवा नियमामध्ये बांधता येते काय असा इतिहासकारापुढे मोठा प्रश्न आहे. सर्वस्थली सर्वकालीं व सर्व समाजामध्ये एकच प्रेरकसूत्र प्रबल असते काय, अथवा भिन्नकाळी, भिन्नस्थळीं व भिन्न-भिन्न समाजामध्ये भिन्न भिन्न नियम लागतात काय, असा प्रश्न आहे. काहीं इतिहासकार एकान्तवादी असतात व एकाच नियमाचा धागादोरा ऐतिहासिक घटनामध्ये गोवलेला आहे असे धरतात. इतर अनेकान्तवादी असतात. ते अनेक नियमाच्या संयोगाने घटनाक्रम चालतो असे प्रतिपादितात. तो एका सूत्रात व क्रमात बसत नाहीं. त्यामध्ये भिन्न घटनाचे व प्रेरणाचे योगायोग, प्रसंगाची आकस्मिकता, नाना कारणाचे संयोग, नाना भावनाचे मेळ, अकल्पित अन्योन्य-संबंध सापडतात. तेव्हा त्याची रूपे एका साच्याचीं व वळणाची असत नाहीत. तीं नानाविध व नानारूपीं असतात. धर्म अर्थ व काम, वंश जाति व राष्ट्र, मानवता, स्वतंत्रता, समानता व एकता इत्यादि भावनेने तीं प्रेरित असतात.

घडलेल्या इतिहासाच्या अवलोकनाने व आकलनाने हा प्रश्न सोडवावा लागतो. त्याचे उत्तर काही ठाम कल्पना अथवा निश्चित तत्त्व घेऊन मिळत नाही. इतिहासाचे जर एखादे शास्त्र अथवा तत्त्वज्ञान स्थापावयाचे असेल तर ते इतिहासाच्या वास्तविक घटना घेऊनच ठरवावे लागेल. त्याच्याबाहेर जाऊन चालावयाचे नाहीं. मनुष्य हा काहीं परिस्थितीने मर्यादित सामान्य थड गोळा नाहीं. त्याच्या अंतर्गत शक्तीमध्ये व स्वभावामध्ये अनेक एषणा व प्रेरणा, अनेक विचार व विचार, विविध कर्तृत्व व कल्पना आहेत. ती निरनिराळ्या काळीं व योग्य परिस्थितीत उदय पावतात व प्रभावी होतात. त्याला ज्ञानप्राप्तीच्या ( will to know ) जीवनाच्या ( Will to live ) कर्तृत्वाच्या ( will to good) व सुखप्राप्तीच्या ( will to joy ) प्रबळ भावना आहेत. त्याच्या कर्तृत्वाला परिस्थितीची अनुकूलता लागते. प्रतिकूल परिस्थितीमुळे त्याच्या कार्टक व साहसी गुणाचा परिपोष होतो आणि त्याच्या स्वभावाला व कर्तृत्वाला निराळे वळण लागते. पण जसजसे मनुष्याचे शास्त्रीय व यांत्रिक ज्ञान वाढते, तसतसे तो परिस्थितीच्या मर्यादा व प्रतिकूलता आपल्या कह्यात आणतो व आपली प्रगति करतो. मनुष्य हा इतिहासाच्या घडामोडीमधील कर्ता वीर आहे.

या विवेचनावरून दिसेल की, कोणतेहि एक कारण अथवा सत्र इतिहासाच्या घडणीची अथवा बनावाची सार्वत्रिक व सार्वकालिक माहिती देऊं शकत नाहीं. ती समजण्यास मानवी जीवनाच्या सर्व अंगाचा व सूत्राचा विचार समन्वयरूपाने अथवा संयोगीकरणाने केला पाहिजे. इतिहासामध्ये परिस्थितिवादाचे अथवा इतर वादाचे एकमेव प्राबल्य सापडत नाहीं. निरनिराळ्या स्थळीं, काळीं व समाजामध्ये अनेक अंगाच कमीअधिक प्राबल्य असलेले दिसून येते.

इतिहासाची घडणी म्हणजे नुसती भिन्न कथाचा संग्रह अथवा कोश नाहीं. त्याला काहीं सतत गति व प्रवाह आहे, आणि घटनाच्या संपर्कामुळे व संबंधामुळे काहीं रचना व बांधणी आहे. पण ती कोणत्या प्रकारची आहे याबद्दल अनेक तर्क व मत आहेत. ती अशीं आहेत. ( १ ) इतिहासाची गति एका सरळ रेषेप्रमाणे एकान्तिक आहे, ( २ ) ती चक्रनेमिक्रमासारखी उच्चनीच आहे, ( ३ ) ती नागमोडीप्रमाणे वक्र आहे, ( ४ ) ती वृक्षशाखाप्रमाणे बहुविध आहे. ( ५ ) ती भिन्न स्थळीं भिन्न प्रकारची अनेकान्तिक, पण सरळ रेषेप्रमाणे आहे, ( ६ ) ती हेलकाव्यासारखी आहे, ( ७ ) ती चढउताराची टप्याटप्याने पुढे जाणारी युगात्मक आहे, ( ८ ) ती इष्ट व अनिवार्य प्रगतीची आहे, ( ९ ) ती अनिष्ट व अनिवार्य अधोगतीची आहे, (१०) ती विरोधविकासाची पण एकान्तिक आहे.

शिवाय या गतिप्रकारामध्ये काहीं ठाम स्वरूपाच्या अवस्था व अवस्था-

न्तरें, युगें व युगान्तरें कल्पिलेलीं आहेत. हीं सर्व मते खऱ्या इतिहासकारांचीं नसून कांहीं तत्त्वज्ञ, समाजशास्त्रज्ञ, नीतिज्ञ व धर्मज्ञ, इतिहासाच्या साह्यानें तीं जोराने प्रतिपादितात. इतिहासकाराना अजून असे तर्कवितर्क करण्यास सबळ व सशास्त्र पुरावा मिळाला नाहीं.

इतिहासकाराच्या अभ्यासाला अनेक मर्यादा आहेत. तो पूर्णपणें काला-तीत व घटनातीत होऊन त्रिकालज्ञ होऊं शकत नाहीं. तो वर्तमानकालातीत होऊन पूर्णपणे भूतकालज्ञ होऊं शकत नाहीं. तो कितीहि वर्तमाननिरपेक्ष होऊन घटनागत झाला तरी त्याची विचार-शक्ति, त्याच्या भावना व दृष्टि, हीं त्याला सोडूं शकत नाहींत. तो नुसतें घटनाचें वर्णन करूं लागला तरी आवश्यक घटनाची निवड त्यालाच करावी लागते. घटना समजणें व निवडणें तो आपल्या अनुभवाने व कल्पनेने करतो. त्याचा अनुभव व कल्पना, त्याचें ज्ञान त्याच्या काळचेंच असते. तो जर इतिहासाचें रहस्य सांगूं लागला तर जास्ती आत्मगत होतो. त्यामुळें इतिहासाचे स्वरूप व महत्त्व, त्यातील घट-नाची सागड, अर्थ व वर्णन हीं इतिहासकाराच्या काळाप्रमाणे व त्याला अनु-कूल असलेल्या साधनसामग्रीप्रमाणे व शास्त्रीय ज्ञानसामग्रीप्रमाणे बदलतात. तेव्हा ऐतिहासिक घटनाबद्दल व रचनेबद्दल कोणताहि अंतिम निर्णय अथवा मत-विधान करता येत नाहीं. घटनाचे परिणाम दूरवर चालू रहातात, व कधींकधीं कांहीं काळानतर अकस्मात् दिसूं लागतात. तेव्हा प्रत्येक ऐतिहासिक विधानाचा आधार त्या त्या इतिहासकाराच्या योग्यतेवर, साधनसामग्रीवर, ज्ञानसामग्रीवर व दृष्टीवर, आणि त्याचप्रमाणे त्याच्या वेळीं घटनाच्या व्यक्त झालेल्या भूत व वर्तमान परिणामावर अवलंबून असतो.

इतिहासकार हा शास्त्रज्ञासारखा एकाच प्रकारच्या सामान्य घटना घेऊन, त्याची तुलना करून, त्यातील भिन्न स्थलकालसमाजाने उत्पन्न केलेले विरोध काढून टाकणारा असता तर, त्याचीं वैयक्तिक मते व दृष्टि याचा पूर्वग्रह बाजूस करता आला असता. पण इतिहासकाराला प्रत्येक घटनेचे व प्रसगाचे, तसेच व्यक्तीचे, लोकाचे, परिस्थितीचे व समाजाचें विशेषत्व, महत्त्व व रहस्य शोधा-वयाचे असते, आणि त्याच्या गुणाच्या व कृत्याच्या परिणामाचे मोल ठरवाव-याचें असते. त्यामुळे त्याला त्याच्या सामान्यत्वाचा व तुलनाचा फारसा उपयोग होत नाहीं. इतिहासाचा सबंध प्रत्यक्ष वैयक्तिक कृत्याशीं व वास्तविक घटनाशीं आहे, त्याच्या सामान्य कल्पित स्वरूपाशीं नाहीं. व्यक्तींची अपूर्वता व घटनाची विशेषता इतिहासाचा क्रम व क्राति ठरवितात. त्यामुळे इतिहासकार मानवी जीवनांतील कोणत्याहि प्रसंगाबद्दल व प्रसंग-समुच्चयाबद्दल, विशेषतः ज्या प्रसं-गांचा परिणाम पुष्कळ काळ चालू असतो व दूरवर जातो व पूर्णपणे शात नसतो, अंतिम निर्णय देऊं शकत नाहीं. त्याचीं मते स्थल-काल-समाज-सापेक्ष

 

न्तरें, युगें व युगान्तरें कल्पिलेलीं आहेत. हीं सर्व मतें खऱ्या इतिहासकारांचीं नसून कांहीं तत्त्वज्ञ, समाजशास्त्रज्ञ, नीतिज्ञ व धर्मज्ञ, इतिहासाच्या साह्यानें तीं जोरानें प्रतिपादितात. इतिहासकारांना अजून असे तर्कवितर्क करण्यास सबळ व सशास्त्र पुरावा मिळाला नाहीं.

इतिहासकाराच्या अभ्यासाला अनेक मर्यादा आहेत. तो पूर्णपणें कालातीत व घटनातीत होऊन त्रिकालज्ञ होऊं शकत नाहीं. तो वर्तमानकालातीत होऊन पूर्णपणें भूतकालज्ञ होऊं शकत नाहीं. तो कितीहि वर्तमाननिरपेक्ष होऊन घटनागत झाला तरी त्याची विचार–शक्ति, त्याच्या भावना व दृष्टि, ह्या त्याला सोडूं शकत नाहींत. तो नुसतें घटनांचें वर्णन करूं लागला तरी आवश्यक घटनांची निवड त्यालाच करावी लागते. घटना समजणें व निवडणें तो आपल्या अनुभवानें व कल्पनेनें करतो. त्याचा अनुभव व कल्पना, त्याचें ज्ञान त्याच्या काळचेंच असतें. तो जर इतिहासाचें रहस्य सांगूं लागला तर जास्ती आत्मगत होतो. त्यामुळें इतिहासाचें स्वरूप व महत्त्व, त्यांतील घटनांची सांगड, अर्थ व वर्णन हीं इतिहासकाराच्या काळाप्रमाणें व त्याला अनुकूल असलेल्या साधनसामग्रीप्रमाणें व शास्त्रीय ज्ञानसामग्रीप्रमाणें बदलतात. तेव्हां ऐतिहासिक घटनाबद्दल व रचनेबद्दल कोणताहि अंतिम निर्णय अथवा मतविधान करतां येत नाहीं. घटनांचे परिणाम दूरवर चालू रहातात, व कधींकधीं कांहीं काळानंतर अकस्मात् दिसूं लागतात. तेव्हां प्रत्येक ऐतिहासिक विधानाचा आधार त्या त्या इतिहासकाराच्या योग्यतेवर, साधनसामग्रीवर, ज्ञानसामग्रीवर व दृष्टीवर, आणि त्याचप्रमाणें त्याच्या वेळीं घटनांच्या व्यक्त झालेल्या भूत व वर्तमान परिणामावर अवलंबून असतो.

इतिहासकार हा शास्त्रज्ञासारखा एकाच प्रकारच्या सामान्य घटना घेऊन, त्यांची तुलना करून, त्यांतलि भिन्न स्थलकालसमाजानें उत्पन्न केलेले विरोध काढून टाकणारा असता तर, त्याची वैयक्तिक मतें व दृष्टि यांचा पूर्वग्रह बाजूस करता आला असता. पण इतिहासकाराला प्रत्येक घटनेचें व प्रसंगाचें, तसेंच व्यक्तीचें, लोकांचें, परिस्थितीचें व समाजाचें विशेषत्व, महत्त्व व रहस्य शोधावयाचें असतें, आणि त्यांच्या गुणांच्या व कृत्यांच्या परिणामांचें मोल ठरवावयाचें असतें. त्यामुळें त्याला त्यांच्या सामान्यत्वाचा व तुलनांचा फारसा उपयोग होत नाहीं. इतिहासाचा संबंध प्रत्यक्ष वैयक्तिक कृत्यांशीं व वास्तविक घटनांशीं आहे, त्यांच्या सामान्य कल्पित स्वरूपांशीं नाहीं. व्यक्तींची अपूर्वता व घटनांची विशेषता इतिहासाचा क्रम व क्रांति ठरवितात. त्यामुळें इतिहासकार मानवी जीवनांतील कोणत्याहि प्रसंगाबद्दल व प्रसंग–समुच्चयाबद्दल, विशेषतः ज्या प्रसंगांचा परिणाम पुष्कळ काळ चालू असतो व दूरवर जातो व पूर्णपणें ज्ञात नसतो, अंतिम निर्णय देऊं शकत नाहीं. त्याचीं मतें स्थल–काल–समाज–सापेक्ष

असतात. त्यामुळेच इतिहासाबद्दलची ठाम मते, तर्क, नियम, सूत्रे, टप्पे, अवस्था, अथवा युगे ठरविता येत नाहीत. इतिहासामध्ये एकतेची व सरळ रेषेची गति दिसत नाही. त्यातील घटना अनेक प्रवाहरूपाने घडत असतात. त्यातील व्यक्ती व समाज अनेक मार्गांनी जात असतात. त्यातच इतिहासाचे विशिष्टत्व, श्रेष्ठत्व व गौरव आहे. मानवी जीवनातील अपूर्व सामाजिक कृतींचा व क्रांतीचा आणि वैयक्तिक स्वभावविशेषाचा व गुणाचा अभ्यास करणारे इतिहास हे एक 'शास्त्र' आहे. मात्र ते समाजशास्त्रासारखे केवळ समाजाच्या सामान्य कृतींचा, संस्थाचा व समजुतींचा अभ्यास करीत नाही, किंवा मानसशास्त्रासारखे मनुष्याच्या सामान्य भावनाचा, गुणाचा व वागणुकीचा विचार करीत नाही. इतिहास हा केवळ घटनासमुच्चय नव्हे, तो मानवी जीवनाची विकासी घडण व तिचा स्थलकालसमाजानुसार घाट दाखविणारा आहे. त्यामध्ये निरंतर परिवर्तन होत असते व नवा अनुभव येत असतो. तेव्हा कोणताहि वाद व विधान त्याच्या रहस्योद्घाटनाला पुरा पडत नाही. घटना एकसारख्या समान व पुनरावृत्तीच्या नसतात. त्या अपूर्व व विकासी असतात व नव्या नव्या रूपाने घडत असतात. तेव्हा केवळ गत घटनावर आधारलेले वाद व विधाने टाकून दिली पाहिजेत. गत फार थोडे आहे भविष्य फार मोठे व बहुविध आहे, व ते अज्ञात आहे. आपणाला समग्र परिस्थितीची माहिती, समग्र मानवाची ओळख आणि समग्र मानवी अनुभवाची जाणीव आज होणे अशक्य आहे. भविष्य अगाध व अज्ञात आहे. ते अकल्पित व अनपेक्षित आहे. त्यात पुढे होणारे कर्ते, घडणाऱ्या क्रिया व कृत्ये अव्यक्त व अनंत आहेत. इतिहासकार हा भविष्यकार व भविष्यवादी होऊ शकत नाही. त्याचे क्षेत्र गत घटनाशी संबद्ध आहे.

इतिहासामध्ये पुनरावृत्ति होत नाही. त्यातील घटना त्याच रूपाने व अर्थाने, प्रभावाने व परिणामाने घडत नाहीत. इतिहासाचे लक्षणच विविधता, भिन्नता, अपूर्वता आहे. केवळ सामान्यता व पुनरावृत्ति नव्हे. कारण लोकजीवन हे नाना रसानी भरलेले आहे. सध्या इतिहास हा केवळ धार्मिक, वांशिक अथवा राजकीय दृष्टीने लिहिला जात नाही. त्यामध्ये सामाजिक व आर्थिक अंगाना बरेच महत्व दिले जाते. त्याबरोबर समाजाच्या सांस्कृतिक जीवनाचे व संस्थाचे स्थलकालानुसार वैशिष्ट्य वर्णिले जाते. शिवाय, समाज व संस्कृति गतिमान असल्यामुळे त्याच्या विकासाचे, विस्ताराचे व परिवर्तनाचे स्वरूप विशद केले जाते. त्याबरोबर परिस्थितीचा मानवी प्रयत्नावर होणारा परिणाम व असलेला संबंध याचे स्पष्टीकरण केले जाते. त्याशिवाय मनुष्यसमाजाची ध्येये, धोरणे व योजना याचा परिणाम दाखविला जातो, आणि समाजान्तर्गत असलेले गट व वर्ग आणि समाजबाह्य असलेले समूह व वर्ण याच्या हालचालीचे लोकाच्या जीवनावर होणारे परिणाम शोधले जातात.

सगळ्या ऐतिहासिक गतींची कारणपरंपरा व संबंधपरंपरा एकाच अंगाला प्राधान्य देऊन उलगडता येत नाहीं. त्या त्या काळची सामुदायिक वृत्ति व भाव घेऊनच त्याचा उलगडा करता येतो. तेव्हां इतिहासकाराचें कार्य, मानवी जीवनाचीं व व्यवहाराचीं सर्व अंगें शोधून, त्याचें वर्णन व विचार करून, मग त्याच्या प्रभावामुळे उत्पन्न होणारी सामुदायिक मानसिक दृष्टि आणि तिच्या योगें समाजाचे जीवनार्थ व उन्नतिप्रीत्यर्थ होणारे प्रयत्न समजून घेणें हें आहे. इतिहासाची कारणपरंपरा साधारणतः अशी आहे. लोकांचें सामान्य बौद्धिक वातावरण त्यांची शास्त्रविद्या व यंत्रकला याबद्दलची दृष्टि ठरवितें. शास्त्रविद्या व यंत्रकला यांच्या योगें आर्थिक संस्था प्रकार निर्मिले व नियमिले जातात. आर्थिक प्रकाराच्या व प्रयत्नाच्या योगें सामाजिक संबंध व नीति, राजकीय प्रकार व धोरण, आणि इतर संस्था व नियम, व एकंदर दृष्टि व वळण ठरविलें जातें. पण ह्या सर्वांच्या मुळाशीं, बाहेरून येणाऱ्या दुसऱ्या संस्कृतींशीं होणारा संपर्क, अथवा देशांत कलहामुळे अथवा नेतृत्वामुळे उत्पन्न होणारे नवे विचार, यांचें प्रोत्साहन व आवश्यकता असतात.

इतिहासकारांमध्ये मानवी जीवनाच्या सामाजिक व सांस्कृतिक विकासाबद्दल दोन मुख्य मतें आहेत. एक, त्याचा विकास सार्वत्रिक नियमित मार्गानें, ठराविक अवस्थेतून, एकाच दिशेनें होत आहे असें मानणारें, त्यामुळे पुढें काय घडणार याचें दिग्दर्शन करता येतें. दुसरें, त्याचा विकास अनेक मार्गांनें, अनेक अवस्थांतून व अनेक दिशेनें होतो असें मानणारें. एक मत facts of repetition कडे लक्ष देतें. दुसरें facts of succession कडे लक्ष देतें. आधुनिक इतिहासकाराच्या दृष्टीनें दुसरें मत ग्राह्य आहे. त्यामुळे दुसऱ्या मताच्या इतिहासकाराला इतिहासाचें एखादें मर्यादित क्षेत्र आखून घेऊन त्याचें विशिष्ट रूप यथासांग वर्णन करावें लागतें. तो मानवी जीवनाच्या सार्वकालिक सामान्य प्रकारच्या काल्पनिक संस्थांचे आचार, व्यवहार, संबंध इत्यादींचें शोधन व वर्णन करीत बसत नाहीं. त्याच्या खास, विशेष, अथवा अपूर्व रूपाचें स्थलकाल समाजानुसार वर्णन करणें हेंच इतिहासाचें आद्य कर्तव्य आहे.

त्यामुळे सर्वसामान्य स्वरूपाचें इतिहासाचें एकान्तिक तत्त्वज्ञान आज प्रौढ इतिहासकारांना मान्य नाहीं. हे सर्व प्रयत्न अपुरे व अशास्त्रीय आहेत. आज संत ऑगुस्तीन प्रभृतींचें, हेगेल प्रभृतींचें अथवा मार्क्सप्रभृतींचें सर्वव्यापी धार्मिक, तात्त्विक अथवा भौतिक विकासाचें तत्त्वज्ञान हें इतिहासकाराच्या दृष्टीनें त्याज्य आहे. जग हें एकाच बिंदूकडे, घटनेकडे अथवा रूपाकडे चाललें आहे, हें असिद्ध व अशास्त्रीय मत आहे, मग ही मानवी जीवनाची हालचाल एखाद्या बाह्य शक्तीच्या अथवा आंतरिक स्फूर्तीच्या योगानें होणारी आहे असें धरलेलें असो वा

नसो. इतिहासामध्ये अनेक सभाव्यता व शक्यता असतात. त्यातील मानवी जीवनाचीं स्वरूपे अनेक असून तीं जाति–स्थल–काल सापेक्ष असतात. त्याना एका दोरींत अथवा गोठ्यात बाधणे शक्य नाहीं. त्यामध्ये " असे घडले आहे " येवढेंच म्हणता येईल. " असें घडलेंच पाहिजे " असे म्हणता येणार नाहीं. सर्व मानव समाजाना व संस्कृतींना एकाच सिद्धान्ताने बाधू पहाणें चुकीचे आहे. प्रत्येक समाज व सस्कृति याचे खास विशिष्ट जीवन असू शकते.

इतिहासाचा समग्ररूपाने मोठ्या प्रमाणावर विचार केला तर त्याच्या विकासात पुनरावर्तन दिसत नाहीं. त्याच्यामध्यें विविध जिवन व त्याचीं भिन्न रूपें व प्रकार दिसतात. पण जर लहान प्रमाणावर खडाच्या रूपाने विचार केला तर काहीं ठिकाणीं पुनरावर्तन अथवा तीच परिस्थिति दिसू शकते व त्यामध्यें अनेक साम्यें सापडूं शकतात. पण साम्ये ततोतत जुळतात असे नाहीं. स्पेन्गलरनें वर्णिलेलीं मोठ्या प्रमाणावर तुलनेने रचलेलीं भिन्न सस्कृतीचीं विकासाचीं व अवनतीचीं साम्यें हीं त्याज्य ठरलीं आहेत, किंवा हेगेल प्रभृतींची सगळ्या मानवी जीवनाच्या विकासाला एका बाह्य चैतन्याच्या दोरींत गोवू पहाणारीं सूत्रे, अथवा मार्क्स प्रभृतींची समग्र मानवी जीवनाच्या विकासाचीं रूपे एका जडान्तर्भूत अथवा जडाधिष्ठित विरोधविकासवादाच्या चतुष्टयीमध्ये बसविणारी केवळ आर्थिक दृष्टींची मीमासा, हीं मुद्दा त्याचप्रमाणे त्याज्य ठरलीं आहेत. सोरोकिनचा Fluctuation ( हेलकाव्या ) चा सिद्धान्त–ideational, idealistic and sensate युगाचा–हा केवळ स्पष्टीकरणात्मक आहे, विधानात्मक नाहीं.

आपण ज्या समाजाचे, सामाजिक अथवा सास्कृतिक जीवनाचे, अथवा घटनाचे वर्णन व विवरण करतो तीं सर्व जरी काहीं बाबतींत दुसऱ्याशीं समान दिसत असलीं तरी त्याचें अपूर्वत्व, विशेषत्व अथवा व्यक्तित्व असतेच, आणि ते पुनरावृत्त होत नाहीं, अथवा पुन्हा प्रवर्तित होत नाहीं. इतिहासाला अशा एकामागून एक येणाऱ्या विशेष घटनाची साखळी अथवा सबध जोडावा लागतो व त्याचे योगायोग ओळखावे लागतात. त्यामध्ये एकासारख्या येणाऱ्या दुसऱ्या घटना घेऊन त्याचे साधारणीकरण करणें हे इतिहासाचे मुख्य काम नाहीं. तें गौण आहे. इतिहासकाराच्या मते, " Every human being is unique, and the social relations in which he has developed are unique, and history never repeats itself in any ultimate or final sense. इतिहासकाराच्या घटना (types) ह्या मुख्यतः स्थलकालबद्ध असतात. समाजशास्त्रकाराच्या घटना (types) ह्या मुख्यतः स्थलकालविच्छिन्न असतात. तरी पण पहिल्यामध्यें काहीं अंशीं सामान्यत्वाचे लक्षण सापेक्षरूपानें असतें व

दुसऱ्यामध्ये काहीं अशीं अपूर्वत्वाचें लक्षण कालसापेक्षानें असतें. कारण प्रत्येक घटना पूर्णपणे अपूर्व व पूर्णपणे समान असत नाहीं. तेव्हां घटना ह्या सापेक्षतेने समान व सापेक्षतेने अपूर्व असतात. रान्केच्या मताच्या इतिहासकाराच्या दृष्टीने साधनाच्या बहिरंगाचे व अंतरंगाचे योग्य परीक्षण करून गत इतिहासाच्या घटना जशा घडल्या तशा वर्णन करणे, तेवढे केल्याने इतिहासकाराचें काम संपलें. पण इतिहासशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या आजच्या विद्वान् लोकांना एवढें केल्यानें खऱ्या इतिहासकाराचें काम संपतें असें वाटत नाहीं. त्यांची त्याबद्दलची टीका पुढीलप्रमाणे आहे. त्यामध्ये आजच्या इतिहासकाराच्या कल्पनांचें स्पष्टीकरण आहे.

इतिहासामध्यें पूर्ण वास्तविकता शक्य आहे काय ? मानसशास्त्राच्या मतें नाहीं. इतिहासकाराला स्वतःच्या काहीं कल्पना व दृष्टि, आणि त्या विषयाबद्दल जिव्हाळा व प्रत्यय असल्यावाचून, त्याची बुद्धि त्या क्षेत्रामध्यें जिवतपणे काम करणार नाहीं, मात्र पूर्वग्रह अथवा विशेष आग्रह नसावेत. पण अगदींच भावनारहित व हेतुरहित इतिहासकार असू शकत नाहीं.

शिवाय, ऐतिहासिक घटना कोणती हे ठरविणे व निवडणे कठीण आहे. प्रत्येक घटना त्या वेळच्या ऐतिहासिक परिस्थितीशीं संलग्न असते. ती परिस्थिति अपूर्व असते, वारंवार त्याच रूपाने पूर्णपणे घडत नाहीं, त्यामुळे ती घटनाही त्या विशिष्ट परिस्थितीशीं संलग्न असल्याने अपूर्व असते. त्या परिस्थितीच्या परिवर्तनाबरोबर तिची अपूर्वता जाते. आपण जेव्हा एखादी घटना ऐतिहासिक आहे असे ठरवितो, तेव्हा आपल्या दृष्टीने आपण जी त्या वेळच्या ऐतिहासिक परिस्थितीची अपूर्वता ठरवितो त्या आपल्या आत्मिक विचारावर तिचे ऐतिहासिकत्व अवलंबून असतें. त्या वेळच्या गत परिस्थितीचें चित्र आपण आपल्या कल्पनेनें अथवा अनुभवाने ठरवू तेंच होऊ शकतें. तेव्हा घटनेची वास्तविकता आपल्याच कल्पनाशक्तीवर व अवलोकनशक्तीवर अवलंबून असते. वास्तविक घटना काहीं स्वतंत्ररूपाने सिद्ध व मूर्त अशा इतिहासाच्या साधनसामग्रींत सापडतात असे नाहीं. त्याचें स्वरूप गुंतागुंतीचे असते. त्यांना वास्तविकतेचें रूप इतिहासकार आपल्या दृष्टीने देतो व नंतर त्या निवडतो. प्रत्येक घटनेच्या मागे अनेक घटना कारणरूपाने असतात, प्रत्येक घटनेच्याबरोबर अनेक घटना संबंधरूपाने असतात, आणि प्रत्येक घटनेच्या पुढे अनेक घटना कार्य अथवा परिणामरूपाने घडतात. तेव्हा घटना ही केवल स्वतंत्र व वास्तविक नाहीं. तिचे वास्तविक रूप इतिहासकार आपल्या वर्ण्यविषयाला व परिस्थितीला अनुसरून ठरवितो. त्यामध्ये त्याची दृष्टि, अवलोकनशक्ति व विचार अन्तर्भूत असतात. तेव्हा इतिहासकारांनीं निवडलेल्या घटना ह्या ऐतिहासिक परिस्थितीच्या द्योतक व सूचक असतात

केवळ निरपेक्ष, ठराविक निर्विकाररूपाच्या नसतात. ' घटना बोलतात ' हे इतके खरे नसून ' घटनाना दिलेले रूप बोलतें ' असे म्हणावे लागते. ते रूप इतिहासकार त्या वेळेपर्यंतच्या तिच्या व्यक्त परिणामावरून तिला देतो. अशा स्थितींत इतिहास हा केवळ गत राजकारण आहे ही इतिहासाची फार सकुचित कल्पना आहे असे म्हणावें लागते. इतिहास मानवी जीवनाचे व व्यवहाराचें सागोपाग वर्णन करतो.

केवळ सर्व घटनाचे यथोचित संशोधन व सकलन करणे हा इतिहासाचा उद्देश नसून तो त्याची प्राथमिक तयारी अथवा पूर्वरग आहे. त्याचा उत्तररंग, अशा घटनाचा उलगडा मनुष्याचा स्वभाव व परिस्थिति व त्याचा परिणाम समजून करणे, ह्यामध्ये आहे. त्याचे उत्तम रूप धटनाच्या विश्लेषणात व समन्वयात आहे, व त्याच्या उद्बोधकतेत व सूचकतेत आहे. इतिहासासंबंधी आधुनिक नव्या विचाराची माडणी अशा प्रकारची आहे. इतिहास हा गत राजकारणाचे कथारूपाने सागितलेले वर्णन नव्हे. त्याचा उद्देश समग्र मानवी संस्कृतीचे व सस्थाचे गत चित्र उभे करावयाचा असतो. मनुष्याच्या सर्व कृतीचा, विचाराचा व आशाचा यथार्थ वृत्तात देण्याचा तो असतो. रॉबिनसनच्या शब्दात सागावयाचे तर all that we know about everything that man has ever done, or thought or hoped or felt. " त्याची दृष्टि एकामधून दुसरी घटना कशी उत्पन्न होते हे पहाण्याची आहे व त्याचा क्रम व परस्पर स्थलकालसबध दाखविण्याची आहे. त्याकरता मनुष्याचा स्वभाव व कर्तृत्व ओळखणे व त्याचा प्राकृतिक व सामाजिक परिस्थितीशीं असणारा व होणारा सबध जाणणे, आणि त्याच्या योगे सस्कृतीच्या इतिहासाच्या प्रवाहाचीं अनेक अगे व अवस्था शोधून काढणे व चित्रित करणे हा होय. इतिहासकाराला मानवी जीवनाच्या सस्थाचीं उत्पत्ति व विकास याचे विश्लेषण करता आले पाहिजे. त्याचा परिस्थितीला लक्षून अर्थ व सबध समजला पाहिजे. लोकाच्या सहयोगाने व प्रयत्नाने परिस्थितीचे नियमन व तिचा उपयोग संस्थाच्या द्वारे कसे होतात, हे त्याला सागता आले पाहिजे. याकरता त्याला भूगोलशास्त्र, प्राणिशास्त्र, जाति–वशशास्त्र, मानसशास्त्र, सौंदर्यशास्त्र, समाजशास्त्र इत्यादींचे ज्ञान पाहिजे. त्यायोगे त्याला साधने तपासणे, साधनातील माहितींचा अर्थ लावणे, व घटनाचा परस्पर सबध जुळविणे सोपे जाते. मानवी जीवनाच्या ज्या ज्या अगाचा व सस्थाचा अभ्यास करावयाचा, त्याबद्दलच्या शास्त्राची माहिती असणे आवश्यक आहे. इतिहासाचे क्षेत्र वाढल्या कारणाने मानवी जीवन व व्यवहार सर्वप्रकारे व व्यापक रूपाने समजण्यास त्याला त्याचा अर्थ विशद करणारीं शास्त्रे–प्राकृतिक व सास्कृतिक–समजणे अनिवार्य होऊन बसलें आहे. नवे इतिहासकार हे नुसते गतकालाचे हुबेहुब चित्रच काढीत नाहींत. ते

गत घटनावरून वर्तमान जीवन कसे कसे उत्पन्न झाले व विकास पावले ह्याचेंहि वर्णन व विचार करतात. त्यांची दृष्टि केवळ वर्णनात्मक नसून विकास विशद करणारी आहे. नव इतिहासाच्या मते इतिहासाचे क्षेत्र सर्वव्यापक आहे. सर्व गत घटनांचा वृत्तान्त त्यामध्ये येतो. जे जे पूर्वी घडले ते ते वर्णिले पाहिजे, कोणत्याहि गोष्टीला अथवा प्रसंगाला वगळावयाचे नाहीं. त्याचा उपयोग लेखकाला मानवी जीवनाच्या ज्या ज्या युगाचा व अंगाचा विचार करावयाचा व त्याचा विकास दाखवावयाचा त्या त्याबद्दल करावा लागतो. याचा अर्थ असा कीं एक, प्रत्येक गत युगाच्या समग्र संस्कृतीचें चित्र उभारणें, आणि दुसरा, आजच्या संस्कृतीचा व संस्थांचा उगम गत घटनांच्या क्रमवार विकासानें व संबधानें दाखविणे. मानवी संस्कृतीच्या विविध अंगांचे रहस्य त्या त्या काळात त्यांना प्राप्त झालेल्या महत्त्वाप्रमाणे ठरविणें, आणि त्यांच्या सापेक्षिक महत्त्वाची कसोटी त्यांच्या आजच्या प्रभावावरून व प्रस्तुत जीवनाशीं असलेल्या संबंधावरून ठरविणे.

प्रत्येक घटनेचें महत्त्व अनेक प्रकारचें असते, विशेषतः ज्या काळात ती घडली त्या वेळचें, आणि पुढे होणाऱ्या मानवी जीवनाच्या विकासावर तिचा वेळोवेळीं घडणारा परिणाम त्या त्या वेळचें. भिन्न भिन्न काळच्या परिणामाच्या दृष्टीनें त्याच घटनाचे सापेक्षिक महत्त्व भिन्न असते. त्यांचे महत्त्व ठरविण्याची बाह्य व निरपेक्ष अशी एकच कसोटी नाहीं. तेव्हां केवळ राजकीय हालचाली घेऊन चालणार नाहीं, किंवा एकच प्रकारच्या घटना घेऊन व त्यांना प्राधान्य देऊन चालणार नाहीं. इतिहासाचें रहस्य उलगडण्यास एकच गुरुकिल्ली नाहीं. कधीं एका अंगाचा, कधीं दुसऱ्या अंगाचा, तर कधीं अनेक अंगांचा प्रभाव असतो. पण कोणतेंच एक कारण सर्व इतिहासाच्या काळात सदैव प्रभावी सांपडत नाहीं.

इतिहासाच्या कारणपरंपरेची अथवा विकासाची साखळी सामान्यतः अशा प्रकारची आहे. मनुष्यस्वभाव व कर्तृत्व आणि वास्तव्य प्रदेशाची भौगोलिक परिस्थिति हे दोन मुख्य घटक इतिहासांतील चलशक्ति किंवा सूत्रे आहेत. त्यांच्या परस्पर क्रिया व प्रतिक्रिया व अन्योन्य संबंध, यामुळें ते एकमेकांमध्ये फार गुतलेले आहेत. विशिष्ट परिस्थितीच्या संपर्कानें अथवा प्रतिक्रियेनें मनुष्याच्या मूळच्या स्वभावाला एक विशिष्ट प्रकारची जीवनदृष्टि उत्पन्न होते. मग तिच्या प्रभावानें जीवनाला आवश्यक असणाऱ्या विद्या व कला उत्पन्न होतात. त्याच्यामुळे आर्थिक जीवनाची रूपरेषा बनते. ती पुन्हा इतर मानवी जीवनाच्या व संस्कृतीच्या इतर अंगांना व संस्थांना वळण लावते. पण असाच विकासाचा क्रम असतो असें नाहीं. कधीं कधीं एखाद्या यांत्रिक कलेच्या महत्त्वाच्या शोधानें त्या युगाचें जीवन सर्व प्रकारें बदलते. तसेंच एखाद्या नव्या मूलग्राही बौद्धिक कल्पनेच्या अथवा मानवी भावनेच्या योगानें इतिहासाच्या विकासावर तसाच क्रान्तिकारक परिणाम घडतो. इतिहासाचें जाळें बरेंच गुता-

युतींचें आहे. त्यामधील संस्कृतींचा व संस्थांचा, अंगांचा व संबंधांचा विकास हा अनेक मानवांच्या व प्रदेशांच्या संपर्कानें व संघर्षानें झाला आहे. त्याला केवळ एकराष्ट्रीय व्यावृत्त स्वरूप देणें चुकीचें आहे. त्याला एक ठराविक युगाचा कालक्रम, कारणक्रम अथवा नियमक्रम देणें हें इतिहासाच्या घटनांवरून सिद्ध करता येण्याजोगें नाहीं.

इतिहासाचा अभ्यास करण्याच्या पद्धतीसंबंधीं अनेक प्रश्न उपस्थित होतात. १. साधनें कशीं परीक्षावयाचीं, त्याचें अंतरंग व बहिरंग परीक्षण कसें करावयाचें, त्यातील ग्राह्याग्राह्य कोणत्या तत्त्वावर ठरवावयाचा, २. त्यांत नमूद केलेल्या घटना, त्यांचे स्थल–काल–कार्य निश्चित कसें करावयाचें; ३. त्या घटनांची निवड व रचना कशी करावयाची, ४. त्यांचें रहस्य कोणत्या दृष्टीनें सांगावयाचें; ५. इतिहासकाराचे पूर्वग्रह कसे वगळावयाचे; त्याची दृष्टि कशी निरपेक्ष करावयाची, आणि ६. नव्या साहाय्यक शास्त्रांचा उपयोग घटनांचा सापेक्ष रूपानें अर्थ लावण्यांत कसा करावयाचा, या सर्व बाबतींत इतिहासकारांमध्ये बहुतेक एकवाक्यता दिसून येते. मात्र घटनांची निवड करणें व त्यांचें रहस्य सांगणें याबद्दल बरेच मतभेद आहेत. त्याबद्दल वर विस्तारानें लिहिलेंच आहे.

## खरी ऐतिहासिक दृष्टि

इतिहासाचीं साहाय्यक शास्त्रें पुढीलप्रमाणें आहेत.( १ ) नव्या प्रकृतिशास्त्राच्या ( Astrophysics ) साहाय्यानें शास्त्रज्ञांनीं मानवी जीवनाचें प्रकृतिव्यतिरिक्त गूढरूपी आदिकारण नाहीं असें ठरविलें आहे. ( २ ) प्राणिशास्त्राच्या ( Biology ) साहाय्यानें विकासवादाचें तत्त्व पत्करून प्रकृति व प्राणी यांच्या उत्पत्तीचा व वाढीचा इतिहास सांगितला आहे, आणि ईश्वरवादाला सृष्टीच्या क्रमांतून काढून टाकलें आहे. ( ३ ) भूगर्भशास्त्र (geology ) व प्राचीन प्राणिशास्त्र(palaeontology)यांच्या साहाय्यानें नवें पुराणवस्तुसंशोधन शास्त्र निर्माण करून मनुष्याच्या प्राचीन शारीरिक व कलाविषयक अवशेषांचा अभ्यास केला आणि त्यावरून मानवी जीवनाचा पाषाणयुगांतील इतिहास निर्माण केला, आणि त्याच्यायोगें इतिहासांतील अलौकिक कारणपरंपरेला त्याज्य ठरविलें. ( ४ ) मानववंशशास्त्र (Anthropology ) व भूगोलशास्त्र (Geography) यांच्या साहाय्यानें मनुष्य व प्राकृतिक परिस्थिति यांचें स्थान इतिहासाचे मुख्य घटक या दृष्टीनें बळकट केलें, आणि इतिहासपूर्व(Prehistorical) मानवी प्राचीन संस्कृति शोधून काढली. नव्या प्रकृतिशास्त्रकारांनीं इतिहासाच्या कारणमीमांसेंतील ईश्वरवाद्यांच्या विचारसरणीचें खंडन केलें, व धर्मग्रंथांतील सृष्टिसर्गाच्या दंतकथांचें व कल्प-

मांचें आणि त्याबरोबर मानवी व्यवहारातील बारीक सारीक गोष्टींमध्ये ईश्वरान्चे लक्ष व हात आहे याचे निराकरण केले.

भूगर्भशास्त्रज्ञांनी प्राचीन मानवी इतिहासाला वास्तविक व ठराविक कालगणना दिली. प्राचीन प्राण्याच्या अवशेषासबधाने माहिती देणाऱ्या शास्त्राने प्राचीन रानटी व प्राथमिक मृत माणसाच्या शरीराच्या रचनेची, वाढीची व राहणीची माहिती दिली.

मानववशशास्त्रज्ञ व भूगोलज्ञ यानी प्राथमिक लोक वशाची, जातींची माहिती मिळवून त्याच्या चालीरीतींची व एकदर जीवनाची वर्णनें लिहिली व इतिहासाच्या प्राचीन काळचे चित्र बरेच व्यापक केले. मानवी जीवनाचे प्राचीन व प्राथमिक गट व नमुने, त्याचे सपर्क व सघर्ष, त्याचा विस्तार व संकोच, त्याचा भौगोलिक परिस्थितीशी झगडा व त्याचे परिणाम या गोष्टींची साधार माहिती मिळवून भिन्न मानवी जीवनाच्या व संस्कृतीच्या कल्पना स्थूलरूपाने विशद केल्या.

मानववशशास्त्रकारानी (Anthropologist) प्राथमिक मानवसमाज, जाति व सस्कृति याची यथाशास्त्र माहिती गोळा करून मानवाचा अतिप्राचीन इतिहास समजण्याला मदत केली, आणि इतिहासाच्या ज्ञात व अज्ञात क्रमामध्ये खड अथवा सातत्य—भग नाहीं असें दाखवून दिले. अलिखित इतिहासकाळातून ( Prehistory ) अनेक गोष्टी लिखित इतिहासाच्या काळात ( History ) आलेल्या आहेत. हत्यारें करणें, अग्नि उत्पन्न करणे, शिकार करणे, मासे धरणे, जनावरे पाळणे, शेती करणे, कातणें, विणणे, घरें बाधणे, सहयोगाने व समूहाने रहाणे, नियम करणे, अधिकार स्थापणे, इत्यादि अनेक मानवी जीवनाच्या विद्या व कला त्या काळाच्या देणग्या आहेत. ही व इतर मानवी जीवनाची अगें मनुष्याच्या परिस्थितीशीं व इतर जातींशीं उत्पन्न होणाऱ्या सपर्कामुळे आपल्या जीवनाच्या आवश्यकता व कार्य भागविण्याकरता मनुष्याने उत्पन्न केली. मानवजातीच्या सपर्कामुळे सस्कृतीचा फैलाव होतो. प्रत्येक जाति केवळ आपल्याच स्वतत्र प्रयत्नाने सस्कृति प्राप्त करून घेते हें मत बरोबर नाहीं. मानववशशास्त्रकारानी काहीं विशिष्ट जातींच्या वाशिक श्रेष्ठतेची कल्पना व त्याचे इतिहासातील खास महत्त्व ह्याचे खडण केले. जगात जातीचे मिश्रण पुष्कळ झाले असून ‘ शुद्ध जात ’ अशी राहिली नाहीं. त्याचप्रमाणे धर्माचें विशिष्टत्व व अपूर्वत्व असे काहीं नसून सर्व लोकामध्ये धार्मिक विश्वास, समजुती व श्रद्धा उत्पन्न होण्याची कारणे समान असतात. याप्रमाणें वशाची खुळे, धर्माची खुळे, व प्रदेशाची खुळे त्यानी सप्रमाणरीतीने खोडून काढली. मानवामध्ये अनेक परिस्थितीमध्ये अनेक ज्ञात व अज्ञात संभाव्यता व गुणशक्यता आहेत. त्या काहीं खास कोणा एकाला वाटून दिल्या

नाहीत. भूगोलशास्त्रकारानीं प्राकृतिक रचनाचा व शक्तींचा–नद्या, पर्वत, मैदान, पठार, हवा, पाणी, धान्य व खजिन संपत्ति इत्यादींचा-मानवी जीवनावर व हालचालींवर होणारा परिणाम दाखविला आणि त्याचे एक शास्त्र ( Anthropo-geography )निर्माण केले. त्यानीं भौगोलिक परिस्थितींचें मानवी जीवनाच्या व संस्थाच्या वाढीवर होणाऱ्या परिणामाचें विश्लेषण केले. बकल, राटझेल, व्हिडाल, हटिंगडन, सेंपल, मॅकिंडर, हौशोफेर, यानीं हे काम उत्तम प्रकारे केले. त्यानीं असेंहि सांगितले कीं भौगोलिक घटकाचा परिणाम हा मनुष्याच्या कर्तव्याच्या दृष्टीने अधिक प्रभावी असतो असे नाही. परिस्थिति जरी काहीं निश्चित मर्यादा घालते तरी मनुष्य आपल्या हालचालीने, शास्त्रीय शोधाने व यंत्रसहाय्याने तिचे उल्लंघन करू शकतो. पुराण वस्तूच्या अवशेषासंबधाने माहिती देणाऱ्या व संशोधन करणाऱ्या शास्त्राने ( Archaeology ) मानवी जीवनाच्या प्राथमिक अवस्थाची व युगाची त्याच्या पाषाणाच्या व धातूच्या हत्याराच्या व इतर साधनाच्या योगाने माहिती दिली. त्याने प्राचीन इतिहासाची कालमर्यादा हजारो वर्षे मागे नेली. त्यामधील पूर्वपाषाणयुग ( Palaeolithic age ), मध्यपाषणयुग ( Mesolithic age ), व नवपाषाणयुग ( Neolithic age ), याच्या सामाजिक व आर्थिक जीवनाचे वर्णन केले.

त्याचप्रमाणे नील नदी, युफ्रेतीस व टायग्रीस नद्या, सिंधु नदी व इतर नद्याच्या काठच्या प्रदेशातील, व क्रीट, ग्रीस, व भूमध्यसागरातील द्वीपातील जुन्या व लुप्त संस्कृतींची व जीवनाची माहिती तेथील खोदलेल्या व अभ्यासिलेल्या अवशेषावरून दिली आहे. इतिहासाच्या अभ्यासाला आणखी अनेक साहाय्यक शास्त्रे आहेत. तीं म्हणजे लिपी व लेखनशास्त्रें ( Epigraphy व Palaeography ), मुद्रा व शिक्के याचे शास्त्र ( Sphragistics ), नाण्याचे शास्त्र ( Numismatics ), मूर्तिशास्त्र ( Sculpture Iconography), वास्तुशास्त्र ( Architecture ), वेषभूषा, शस्त्रास्त्रे, ध्वजचिन्हे-चिलखतें, वजनेमापे इत्यादींची शास्त्रे आहेत.

मानववंशशास्त्र,समाजशास्त्र व मानसशास्त्र या सामाजिक शास्त्राच्या खोल व पद्धतशीर अभ्यासामुळें मानवी समाजाच्या जीवनाचे, व्यवहाराचे, कृतींचे व संस्थाचे नव्या दृष्टीनें आलोचन व आकलन सध्या सुरू आहे. त्याचप्रमाणे प्राकृतिक शास्त्रे, प्राणिवाचक शास्त्रे व यंत्रशिल्पशास्त्रे, याच्या उपयोगाने मनुष्याच्या सामाजिक व्यवहार, व्यापार व जीवन याच्यावर झालेल्या परिणामांचा व त्यातील परिवर्तनाचा व अन्योन्यसंबंधाचा उलगडा करण्याचें काम सुरू आहे. त्यामुळें सर्व सामाजिक, प्राकृतिक व यांत्रिक शास्त्राच्या गत इतिहासाचा अभ्यास करण्याकडे इतिहासकाराचे लक्ष लागलें आहे. त्याचप्रमाणे

साहित्याचा व कलेचाहि अभ्यास लेखक करीत आहेत. या नव्या व्यापक कल्पनेच्या इतिहासकाराचें मत असें आहे कीं इतिहासकाराचें कर्तव्य, लोकांच्या प्रत्येक सांस्कृतिक अंगाचें व संस्थारूपी जीवनाचें—बौद्धिक, आर्थिक, सामाजिक, राजकीय, वैज्ञानिक, धार्मिक, नैतिक, सौंदर्यात्मक, कलात्मक वर्णन करणें, त्यांचे अन्योन्य संबंध व गतिक्रम दाखविणें, हें होय. मानसशास्त्र हें मनुष्याच्या कृतींच्या व कृत्यांच्या, मतांच्या व विश्वासांच्या मागें असलेले हेतू, भावना व वासना व त्यांचें नियमन करणारे यमनियम, यांचें दिग्दर्शन करते. त्यावांचून इतिहासकाराला मनुष्याचे त्या त्या काळचे आचार व व्यवहार समजणें कठीण आहे.

इतिहासकाराला समाजशास्त्राचा बराच उपयोग आहे. सामाजिक समूह, संस्था, समजुती, परिस्थिति, व संपर्क यांचा मनुष्याच्या स्वभावावर व कृत्यावर पुष्कळ परिणाम होतो. त्यांचा विचार समाजशास्त्र करते. त्याचप्रमाणे ते मनुष्याच्या समूहावर होणारे भौगोलिक, आर्थिक व इतर अंगाच्या परिणामाचें विश्लेषण करते, आणि नंतर सामाजिक आचारांचे व व्यवहाराचे, नीतींचे व नियमांचे, चालीरीतींचे, व राहणीचे प्रकार व स्वरूप ठरविते. ते सामाजिक विकासाचें व कार्यकारणाचें सामान्यरूप दाखविते. इतिहासकाराला त्याचा उपयोग होतो. कारण त्याला सर्व प्रकारच्या समूहांच्या वर्तनाचें व कृत्यांचें, आणि संस्थांच्या प्रभावाचें यथायोग्य वर्णन व विवरण करावें लागते. अर्थशास्त्राचा उपयोग इतिहासाच्या घडामोडींत आर्थिक हेतु व आर्थिक उत्पादन व वितरणपद्धति, यांचा काय प्रभाव पडतो हें उकलण्यांत होतो. त्याचप्रमाणे राज्यशास्त्राचा उपयोग सत्ता व स्वातंत्र्य, अधिकार व रक्षण, राज्य व साम्राज्य या लालसांचें इतिहासाच्या हालचालींतील स्थान व प्रभाव ओळखण्यांत होतो. शिवाय, इतिहासकारांना राजनीति, राज्यकारभार व राज्यसंस्था हीं समजणें आवश्यक असतें. त्याचप्रमाणे नीतिन्यायशास्त्र ( Ethics ) व व्यवहारधर्मशास्त्र ( Jurisprudence ) समजणेंहि आवश्यक आहे.

## इतिहासाचा अभ्यास

ऐतिहासिक दृष्टिमध्यें व रचनेमध्यें विकासवादानें ( Evolutionary hypothesis ) बरीच विचारक्रांति घडवून आणली आहे. सृष्टिक्रमाप्रमाणें व प्राणिक्रमाप्रमाणें मानवी जीवनामध्यें सुद्धां अव्याहत विकासरूपी बदल आहे असें आग्रहरूपी नवें मत उत्पन्न झालें आहे. त्या मताप्रमाणें मनुष्याचें बौद्धिक व सांस्कृतिक जीवन हळू हळू विकसत आहे. त्यामध्यें नित्य प्रगतिकारक बदल होत आहे. मानवी नीति, संस्था व समजुती ह्या वैकासिक दृष्टीनें परिस्थितिसापेक्ष असतात. त्या पहिल्याप्रथम होत्या तशाच पुढें राहिलेल्या नाहींत.

परिस्थितीला व यांत्रिक शोधाला अनुसरून त्याच्यामध्ये नव्याने मांडणी होत आहे. ह्या मतामुळे इतिहासातील घटनांची दैविक बाह्य कारण–मीमांसा जाऊन त्या जागी परिस्थितिसापेक्ष, प्राकृतिक व नैसर्गिक वाढीची आंतरिक कारण-मीमांसा ग्राह्य झाली आहे. ही कारणमीमांसा त्यांच्या उत्पत्ति ( Arrival ), स्थिति ( Survival ) व लय ( Disappearance ) याबद्दल वापरली जात आहे. जगामध्ये गुणांच्या समानतेच्या व सारखेपणाच्या ऐवजी त्यांची विविधता व विचित्रता या ग्राह्य आहेत. त्याचप्रमाणे त्यामध्ये कोणत्या एक प्रकारची पूर्णता, अंतिमता व स्थिरता नाही असे धरले आहे. ही वैकासिक दृष्टि म्हणजेच खरी ऐतिहासिक दृष्टि असे मानले जात आहे.

---

# इतिहासाचें तात्विक स्वरूप

लेखकः—कै. द. वि. आपटे

*इतिहासाची गणना सायन्समध्ये करावी की वाङ्मयात करावी ? दिक्-कालाच्या बंधनात घडणारी विशिष्ट घडामोड हा इतिहासाचा प्रांत व दिक्-कालाचे बंधन नसणारे आणि व्यापक सिद्धांत सांगणारे ते सायन्स अशी ग्रीकांची समजूत होती. अद्याप पुष्कळांची तीच आहे व समाजशास्त्राचा मदतनीस इतकीच किंमत कित्येक लोक इतिहासास देतात.

प्रो. ट्रेव्हेलन यांनीं इतिहासाला ही जागा न देता त्याची गणना वाङ्मयात केली आहे. ॲक्टनने इतिहासकारास moral censor बनविले आहे आणि क्रोचेने इतिहासास 'philsophical intuition' म्हटले आहे.

तथापि ही भूमिका पुष्कळ लेखकांना मान्य नाहीं. एडवर्ड मायर याने १९१० सालीं असें प्रतिपादन केले आहे की, समाजशास्त्र व इतिहास यांत अंतर आहे. इतिहासाने विशिष्ट प्रसंगाच्या वर्णनापलीकडे जाऊ नये, कार्यकारणभाव व निष्कर्ष हे काम इतिहासकाराचें नव्हे. प्रत्यक्ष घडामोड वर्णन करून ती चित्रित करणे हा त्याचा विषय. कार्यकारणभाव व निष्कर्ष काढण्याच्या भानगडींत त्याने पडूं नये.

पण केवळ फॅक्ट्स् जमविणे व निष्कर्ष न काढणे हा ब्यूरी याच्या मतें पोरखेळ आहे.

सायन्स म्हणजे सामान्य सिद्धान्त ही भूमिका सुटून दिक् व काल यांचें बंधन सायन्सच्या सिद्धान्तांनाहि आहे व त्यांतहि निश्चितता जाऊन अनिश्चित-पणा व Probability यास मान्यता मिळत आहे. आणि सजीव सृष्टशास्त्रात उत्क्रांति किंवा विकासवाद हा महत्त्वाचा आहे. आणि विकासवाद म्हणजे इतिहास आहे.

त्याचप्रमाणे इतिहासकाराचे लक्ष केवळ राजे व महाराजे किंवा सरदार यांच्या असाधारण घडामोडींचे वर्णन करण्याकडे होते ते जाऊन सामान्य लोकांची उत्क्रांति अथवा संस्कृति काय होती आणि तिच्यांत काय फरक होत गेले हें सांगण्यावर आहे. यामुळें या उत्क्रांतीच्या मुद्यावर इतिहासाची गणना शास्त्रात करणे योग्य आहे असें कांहींचे म्हणणे आहे.

---

* भा. इ. सं. मंडळाच्या शक १८५६ च्या संमेलनात वाचलेला निबंध ( अप्रकाशित ).

निःपक्षपातीपणा असावा याचा अर्थ काय हे सांगणें कठीण आहे. अफजलप्रसंगानं झालेला शेवट बरा कीं वाईट हे कसे ठरवावे ! मराठ्यांना ही गोष्ट बरी वाटणार आणि आदिलशाहींतल्या लोकांना ती वाईट वाटणार. कित्येकांच्या मतें दोनहि बाजूंनीं काय म्हणतां येण्याजोगें आहे तेवढें इतिहासकारानें सांगावे, स्वतःचे मत देऊं नये.पण हा लपंडाव आहे व इतिहासकारानें मत देण्यास भिऊं नये असे कित्येक म्हणतात. बरें, धर्मदृष्टि सोडून नीतिच्या कसोटीनें निर्णय घ्यावा तर नीतीचे नियम कालमानाप्रमाणे बदलतात. तेव्हा कसोटी कोणती हेहि सांगणें कठीण आहे.

हाच प्रकार कार्यकारणभावाचा आहे. घडामोडींचा संबंध कार्यकारणभावानें सांगता आला पाहिजे ही गोष्ट सर्वमान्य आहे. पण कारण निश्चित करणें हें सोपें नाहीं. एका ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं fat, sheep व green pasture हे दिसले कीं त्याच्यांत जो संबंध मनांत येतो तो कार्यकारणभाव. तात्पर्य, कारण ओळखणे हें कठीण आहे. खत घातल्यानें पीक अधिक येतें व न घातल्यानें तें येत नाहीं असे दाखवून अन्वयव्यतिरेकानें कार्यकारणभाव सिद्ध करतां येतो हे खरें, पण ही प्रयोगाची सोय इतिहासांत नसते. यामुळे कोणत्या गोष्टीला निश्चित कारण म्हणावे हे सांगणे कठीण आहे. आधीं घडते कारण व नंतर घडते कार्य हें मात्र खरें. यामुळे पानिपतच्या पराभवाचीं कारणे सांगतांना कोणतीहि पूर्वीची गोष्ट कारण म्हणतां येते.

---

## *महाराष्ट्रीय इतिहास-लेखन-प्रवृत्तीचा शोध

लेखकः—कै. द. वि. आपटे

*आधुनिक दृष्टीनें इतिहासाकडे पाहण्याची प्रवृत्ति युनिव्हर्सिटीच्या स्थापनेनंतर महाराष्ट्रांतील विद्वानांना होऊं लागली व या प्रवृत्तीमुळेच नीळकंठराव कीर्तने यांनीं ग्रँटडफच्या ग्रंथावर इ. स. १८६७ मध्ये टीका केली. त्यानंतर विविधज्ञानविस्तारांतून चिटणिशी बखरीचा कांहीं भाग व काशीराजाच्या पाणिपतच्या फारशी बखरीचें मराठी भाषांतर प्रसिद्ध झालें. परंतु हे बखरींचे प्रकाशन फार लहान हप्त्यांनीं व मंदगतीनें चालतें, यासाठीं एक स्वतंत्र मासिक पुस्तक काढावें अशी इच्छा का. ना. साने यांना झाली. हा विचार विष्णुशास्त्री चिपळोणकर यांच्या कानावर गेला, तेव्हा त्यांनीं मराठी व संस्कृत काव्यांचेंहि प्रकाशन करण्याची कल्पना घालून काव्येतिहाससंग्रह मासिक इ. १८७८ च्या जाने. १ तारखेस सुरू केलें. त्या वेळच्या प्रसिद्धिपत्रकांत याविषयीं असें

---

* भा. इ. सं. मंडळाच्या शक १८५६ च्या २२ व्या सम्मेलनासाठीं लिहिलेला निबंध ( अप्रकाशित ).

म्हटले आहे कीं ' या देशाचा याच देशाचे लोकानीं लिहून ठेवलेला अत्यंत विश्वसनीय इतिहास बुडत असता त्यास हात देणारा एकहि आर्यभूमीचा सुपुत्र जर निघाला नाहीं तर यासारखी काळोखी तिच्या तोंडास आणखी कोणची लागावी ? महाराष्ट्र देशातील लोकानीं गेल्या शेदोनशे वर्षांत साऱ्या हिंदुस्थानभर ज्या उलाढाली केल्या त्या विषयींच्या बखरी अद्याप पुष्कळ ठिकाणीं आहेत. त्या काव्येतिहाससंग्रहात छापण्याचा उद्देश लोकाच्या संग्रहास जुन्या बखरी रहाव्या व पुढे कोणी इतिहासकार निघाल्यास त्यास त्या आधारभूत व्हाव्या. '

यात सांगितलेल्या उद्देशाप्रमाणे बखरी छापण्यावर कै. साने याचा भर होता. बारा वर्षांच्या अवधींत त्यानीं २२ लहानमोठ्या ऐतिहासिक बखरी व ५०१ लेखांकाचा एक पत्रव्यवहाराचा खंड छापून काढला.

या प्रकाशनानें आपले पूर्वज अज्ञानी व कर्तृत्वशून्य होते असा जो समज १८१८ ते १८५८ पर्यंतच्या दोन पिढ्यात पसरला होता तो कमी होऊन स्वत्वाची व स्वाभिमानाची जागृति महाराष्ट्रात झाली व जुने ऐतिहासिक लेख प्रसिद्ध करण्याची इच्छा उत्पन्न झाली असे वि. ज्ञान वि. च्या संपादकानीं इ. १८९० मध्यें म्हटलें आहे.

विविधज्ञानविस्तारातले हे वर्णन यथार्थ आहे. कारण काव्येतिहाससंग्रहाच्या प्रकाशनाने इतिहाससंशोधनाची इच्छा खरे, पारसनीस व राजवाडे याना झाली असें म्हणण्यास जागा आहे. उदाहरणार्थ कै. खरे याच्या चरित्रात याविषयींचा उल्लेख आहे तो असा—

' लहानपणीं मोरोपंत, मुक्तेश्वर याच्या कवितांप्रमाणे 'मराठ्याची बखर' हे ऐतिहासिक प्रकरण त्यानीं हौसेने वाचलें होते, तेव्हापासून त्याना इतिहासवाचनाची गोडी लागली होती. पुढे वयाच्या २० व्या वर्षी पुण्यास आल्यावर काव्येतिहाससंग्रहातील ऐतिहासिक साधने वाचलीं. कीर्तने याचा निबंध पूर्वीच वाचला होता. त्या वेळेच्या वाचलेल्या माहितींच्या व मेणवली दप्तरातील कांहीं पत्राच्या सहाय्याने नाना फडणीसाचे चरित्र हा ग्रंथ १८९२ मध्ये छापला. हा ग्रंथ लिहीत असता मिरजमळा संस्थानचे कारभारी रा. सोहोनी यानीं मळे संस्थानच्या दप्तरातील अस्सल पत्राच्या आधारे नाना फडणीसाविषयीं कांहीं माहिती सांगितली. ती ऐकून शास्त्रीबुवाना ते दप्तर पहाण्याची इच्छा झाली. आणि त्याच्या अवलोकनामुळे ऐतिहासिक लेखसंग्रहाची कल्पना शास्त्रीबुवाना सुचली ( दा. मो. भटकृत खरे चरित्र पृ. ९८ ).

कै. राजवाडे याची हकीकत याहून कांहींशी निराळी दिसते, ती अशी-' ग्रँटफच्या चुका दाखविण्याची कल्पना राजवाडे याच्या मनात इ. स. १८८८ च्या सुमारास आली. परंतु तिला संशोधनाचे स्वरूप येण्यास कांहीं निराळाच

योगायोग जुळून यावा लागला. वाई येथील राजवाडे याचे एक विद्यार्थी रा. काकाराव पंडित याना १८९५–६ च्या सुमारास केसरींतील एका लेखाचा साराश वाचण्यास मिळाला. ते व्याख्यान रा.ब. काशिनाथपत साने यानीं 'महाराष्ट्र इतिहासाचे महत्त्व' या विषयावर पुण्यास दिले होतें. त्याचा केसरींतला साराश वाचून रा. पडित याना मराठ्याच्या इतिहासाचीं साधनें जमविण्याची स्फूर्ति झाली आणि त्यास सुरुवात आपल्या वाड्यातच केली. त्याच्या रहात्या वाड्यात तिमजल्यावरील एका अंबारींत जुन्या कागदाचे एक मोठें पेटारें सापडलें. त्यातील कागद त्यानीं व त्याचे स्नेही रा. बोपर्डीकर यानीं वाचून पाहिले. त्यात गोविंदपत बुंदेले याचे पत्र पाहून त्याना आनद वाटला. ही हकीकत त्यांनीं प्रो. काथवटे याना सागितली. नतर ते पुण्यास गेल्याविळीं कै. राजवाडे यांच्याजवळ त्या कागदासंबंधीं बोलले. त्याबरोबर राजवाडे त्याच रात्रीं पुण्याहून निघाले व सकाळीं वाईस आले. आणि त्यानीं ते कागद बारकाईनें पाहून १८९७मध्ये विठ्ठल छापखान्यात छापले. पण त्या छापखान्यास आग लाग-ल्यामुळे ती आवृत्ति जळून गेली. राजवाडे पुनः वाईस आले आणि त्यानीं पुनः नकला करून शेवटीं १८९८ मध्ये मोदवृत्त छापखान्यात पहिला खड छापून बाहेर निघाला (खानोलकरकृत राजवाडे चरित्र पृ. ३९).

तथापि याखेरीज आणखी एक इतिहासलेखनाची निराळी विचारसरणी महाराष्ट्रात चालू होती. कोल्हापुरास मोडक यानीं फेरिस्ताच्या ग्रथाधारे ब्राह्मनी व त्यानंतरच्या पाच शाह्या याचे इतिहास लिहिले. बडोद्यास गुप्ते यानीं 'शिवदिग्विजय' ही बखर व 'चाद्रसेनीय कायस्थ प्रभूच्या' इतिहासाचीं साधनें छापलीं. याखेरीज बडोद्यास मराठ्याच्या इतिहासाची तयारी होत होती तो प्रकार असा:

रा. गोविंदराव सरदेसाई १८८९ मध्ये बडोद्याच्या नोकरींत शिरले. तेथें त्याना महाराजसाहेबाकडे रीडरचे व राजपुत्राकडे ट्यूटरचे काम होते. ते करींत असतां महाराजाच्या प्रोत्साहनानें प्रो. सीली याच्या Expansion of England चे भाषातर त्यानीं केलें. त्याचप्रमाणे राजपुत्राना शिकविण्या-करिता त्यानीं इतिहासाचीं टाचणे करण्याची पद्धति स्वीकारली. आणि तींच टाचणे वाढवून रियासती लिहिण्याचें त्याना सुचलें. सरदेसाई घराण्याचा इति-हास उत्तरार्ध खंड दुसरा यात पृ. १२५ वर यासंबंधींची हकीकत आली आहे.

# संशोधक व संशोधन

( लेखकः—कै. द. वि. आपटे )

*बखरी व अस्सलपत्रे याचे प्रकाशन, आणि इतिहासलेखन अशा तीन प्रकारानीं महाराष्ट्रातील इतिहासप्रवृत्ति गेल्या साठ वर्षांत व्यक्त झाली आहे व ती यापुढेंहि चालू राहणार हे उघड आहे. पैकीं बखरींचे प्रकाशन दिवसें-दिवस कमी प्रमाणावर होणार असें दिसते. तथापि शिवशाही व मुसलमानशाही या संबंधींची माहिती बखरींच्या रूपाने बाहेर येत आहे व येणे अवश्य आहे. कारण अस्सल पत्रें या काळाची म्हणण्याजोगीं उपलब्ध नाहीत. चार वर्षांपूर्वी प्रसिद्ध केलेले शिवभारत व इलियट डौसनच्या ग्रथान उल्लेखिलेले फारशी ग्रंथ आणि यंदा प्रसिद्ध झालेली मुधोळकर घोरपडे याची फारशी बखर आणि प्रो.सरकार यानीं गुदस्ता इडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्लीमध्ये छापलेले मलिकंबराचें चरित्र हे ग्रंथ समकालीन असले तरी बखरींच्या स्वरूपाचे आहेत. त्याचा उपयोग करून इतिहासाची माडणी करण्याचे काम रियासतकार व सर जदुनाथ सरकार यांसारखे ग्रथकार करीत आले. तथापि अस्सल पत्राच्या प्रकाशनानें त्याचे ग्रंथ वेळोवेळीं मागे पडतात आणि त्याच्या दुरुस्त केलेल्या आवृत्त्या काढणे भाग पडते.

या दुरुस्त्या दोन प्रकारच्या असतात. पहिला प्रकार पुरवणींच्या स्वरूपाचा आणि दुसरा आमूलाग्र बदलाच्या स्वरूपाचा. पहिला प्रकार फारशा अडचणी उत्पन्न करीत नाहीं. पण दुसरा त्रासदायक असतो. उदाहरणार्थ, पाणिपत प्रकरणाची माडणी गेल्या तीस वर्षांत बऱ्याच अशीं अस्सल पत्राच्या आधारें केली गेली आहे. यामुळें पेशवे दप्तरातील नवीन पत्राच्या प्रकाशनानें त्यांत करावा लागणारा बदल पुरवणीच्या स्वरूपाचा असेल. त्याचे स्वरूप क्रातिकारक असणार नाहीं. रियासतकार आपल्या रियासतीचे भाग सुधारतील व त्या सुधारणाबद्दल फारसा वाद माजणार नाहीं. पण शिवकालिन रियासतीचा भाग लिहिताना जे बदल करावे लागतील ते क्रातिकारक स्वरूपाचे व वादग्रस्त ठरतील.

राजकारणात जशी एखादी रूढ घटना लोकांपुढे असावी व तिच्यात लोकमतानुसार बदल होण्यास वाव असावा म्हणजे बुद्धिमान् व कर्त्या लोकाना लोकमत बनविण्याची ईर्षा उत्पन्न होते, त्याप्रमाणे महाराष्ट्राच्या इतिहासा-विषयींच्या क्षेत्रात परिस्थिति निर्माण झाली आहे. ग्रँट डफने इतिहासाची माडणी केली व ती काहीं अंशीं आपणास बदलता आली. यामुळे परकीयानीं लिहि-लेला महाराष्ट्राचा इतिहास आमच्या मुलापुढे असूं नये, तो आमच्या लोकानीं

* अप्रकाशित. लेखन वर्ष शक १८५६.

लिहिलेला असावा,ही जी भावना ती काहीं अशीं पुरी झाली.पण ह्या भावनेच्या पूर्ततेनें शास्त्रशुद्ध इतिहासाची आकांक्षा वाढविली आहे व त्याप्रीत्यर्थ महाराष्ट्रातील विद्वानांची खटपट सुरू आहे. या खटपटींत एक गोष्ट उघड झाली आहे ती अशी कीं, इ. स. १८७८ पासून १९१० पर्यंतच्या ३२ वर्षात झालेली खटपट वैयक्तिक स्वरूपाची होती आणि या मंडळाच्या स्थापनेपासून तिला संघटित स्वरूप आलें आहे. साने, खरे, राजवाडे, वाड, पारसनीस यांनीं केलेली खटपट सुरू राहिल्यानंतर मंडळाचा जन्म झाला; आणि ते दिवंगत झाले तरी मंडळ हयात आहे व जन्मापासून त्याला आपले कार्य काय हे माहीत आहे. या प्रकाराचें उपमेने वर्णन करावयाचें असल्यास असे म्हणता येईल कीं वैयक्तिक प्रयत्न हे संघटित प्रयत्नाच्या कल्पनेस जन्म देतात. आणि व्यवहारात ज्याप्रमाणे बापाच्या हयातींत मुलगा फारसा जमा धरला जात नाहीं, पण बाप मेल्यावर किंवा काहीं वयानंतर मुलाला आपली जबाबदारी ओळखणे व ती उचलणें भाग पडते, त्याप्रमाणे राजवाडे, खरे,साने, वगैरे मंडळी मेली व त्यांनीं मिळविलेल्या संग्रहाचा वारसा मंडळाकडे आला आहे.

उपमा सोडून बोलावयाचें असल्यास असें म्हणता येईल कीं, वैयक्तिक कार्य व संघटित कार्य यांच्या स्वरूपात काहीं अशीं मूलतः अंतर असते. ज्य व्यक्तींत विशेष स्वार्थत्याग, विशेष बुद्धिमत्ता अगर विशेष अनुकूलता असेल त्याच व्यक्तींनीं आतापर्यंत इतिहासाचें काम केलें. आणि यापुढें देखील प्रतिभावान् इतिहासज्ञ आपलें काम करीलहि. तो परिस्थितीची प्रतिकूलता काहीं अशीं बदलून अनुकलता उत्पन्न करतो. परंतु मध्यम बुद्धीच्या, व मध्यम आस्थेच्या मंडळींना परिस्थिति बदलण्याचें सामर्थ्य नसतें. अनुकूलता असेल तर ते काम करू शकतील,नाहींतर ते यापासून परावृत्त होतील.या मंडळासारखी संस्था मुख्यत्वेकरून अशा मध्यम लोकांची कर्तबगारी बाहेर पडण्यासाठीं खटपट करीत राहील.

---

## इतिहासांतील अकल्पित घटना

लेखकः-डॉ. सुरेंद्रनाथ सेन
हिंदुस्थान सरकारच्या दप्तरखान्याचे प्रमुख,
नवी दिल्ली

*आकस्मिक अथवा अनपेक्षित घटना अथवा घडामोडी व्यक्तीच्या जीवनात केव्हाही घडणारच; व त्याचा त्या त्या व्यक्तीच्या जीवनावर दूरगामी चांगला

* Accidents in History अनुवादकः—श्री. म. दा. साठे एम्. ए., पुणें, निवृत्त मुख्याध्यापक, ब-हाणपूर. )

किंवा वाईट परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं. पण अधिक खोलात जाऊन विचार करावयाचा तर त्याचा परिणाम एखाद्या राष्ट्रावर होऊन त्याच्या इतिहासाला तो निराळें वळण लावू शकेल कीं काय हा महत्त्वाचा प्रश्न आहे. या प्रश्नाचें वर वर उत्तर अस्तिपक्षींच असण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, इंग्लंड आणि हिंदुस्थान या देशाच्या इतिहासाचें स्वरूप त्या त्या प्रसंगीं सहज सुटलेल्या एका बाणानें अगदीं साफ बदलून टाकलें असें दाखवून देता येईल. या आकस्मिक घटना अगदीं आणीबाणीच्या प्रसंगीं दुर्दैवानें घडून आल्या नसत्या तर हेरॉल्ड, हिमू नि राणा संग यानीं हेस्टिंग्ज, पानिपत नि कान्वा ( Kanva ) या ठिकाणीं झालेल्या लढाया जिंकल्या असत्या. स्पेनच्या आरमाराची आकस्मिक वादळानें आयत्या वेळीं वाताहत केल्यामुळे—या निसर्गाच्या लहरी स्वभावानें—इंग्लंडचा फायदा झालाच कीं नाहीं? तसेंच कुब्लाईखानच्या आरमाराची विरुद्ध दिशेनें येणाऱ्या वादळानें फाकाफाक झाल्यामुळें मोंगलाच्या स्वारीपासून जपानचें रक्षण झालेंच कीं नाहीं? वरवर पाहिलें असता राष्ट्राची स्वतःची हुकमत अनपेक्षित विधिघटनेवर चालू शकत नाहीं, मानवी कर्तृत्व तोकडें पडतें, आणि त्यानें केलेले अदमास त्याच्या बाजूनें क्वचितच जमेला धरता येतात. त्यामुळें इतिहासातील 'नियति' तत्त्वाला ( Theory of predetermination ) आपोआपच पुष्टि मिळते. परंतु इतिहासाला या 'नियति' तत्त्वाचा अढळपणा ( Theory of predestination ) जमेला धरून चालता येत नाहीं. कारण वरवर पण उघड दिसून येणाऱ्या गोष्टी नेहमीं बरोबरच असतात असें नाहीं. कित्येक प्रसंगीं त्या दिशाभूल करणाऱ्याही असतात.

दुर्दैवानें, इतिहासकार एखाद्या साध्या प्रश्नाचें उत्तर अगदी साधें व सरळ देऊं शकत नाहीं. कारण असें सरळ उत्तर—त्यात जर-तर न घातल्यानें—दिल्यानें पुष्कळशा गोष्टींचें स्पष्टीकरण तसेंच राहून जातें व त्या जमेला धरावयाच्या राहून जातात. प्रत्येक व्यक्ति अनपेक्षित चालून आलेल्या संधीचा फायदा स्वतःसाठीं घेऊं शकतेच असें नाहीं. त्याप्रमाणें प्रत्येक व्यक्ति स्वतःच्या कमनशिबापुढें दीनपणें हात टेकून आपलें बेत ढासळूं देण्यास तयार असते असेंहि नाहीं. अनपेक्षितपणें चांगली संधि चालून आली असताना जर तावडतोबीनें निर्णय घेतले आणि जोराची उचल केली तर तिचा फायदा मनुष्य घेऊं शकतो. तसेंच खंबीर मनाचा मनुष्य आकस्मिक आपत्तीनें डग-मगूनही जात नाहीं. अकल्पित घटनेनें व्यक्तीच्या जीवनावर बरावाईट परिणाम नेहमीच होतो असें नाहीं. तर अशा वेळीं त्या व्यक्तीचें चारित्र्यच निर्णयात्मक ठरतें. इंग्लंडातून अनेक तरुणबाड दक्षिण आफ्रिकेंत नूतन प्रदेश शोधून काढण्यासाठीं गेले, पण त्यापैकीं एक यशस्वी झाला. त्यानें आपले

नाव त्या प्रदेशाला देऊन तो आपल्या मायभूमीस अर्पण केला. तसेंच जो आयरिश क्रांतिकारक ऑस्ट्रेलियात वसाहत करण्यासाठीं गेला, त्यापैकीं प्रत्येकालाच काहीं त्या वसाहतींत अग्रेसर मुत्सद्दी होता आले नाहीं. तिसरें, गॅरिबॉल्डीचें उदाहरण घेऊं. किती तरी वेळा त्याला अपयश आलें, व अनपेक्षित संकटांची तर गणतीच नाहीं. पण तेवढ्यानें तो डगमगला नाहीं. अखेर यश मिळविलें. हें जर खरें, तर आकस्मिकताहि फार तर ऐतिहासिक धनाव लांबवूं शकेल. पण थांबवूं शकणार नाहीं असें म्हणावेसें वाटतें.

व्यक्तीच्या बाबतींत जें खरें तेंच राष्ट्राच्या बाबतींत खरें समजण्यास हरकत नाहीं. कोणत्याही राष्ट्राचें भवितव्य एखाद्या आकस्मिक पराजयामुळें कायमचें ठरूं शकत नाहीं. युद्धांत एखाद्या राष्ट्राचा सपशेल पराजय झाला एवढ्यावरून फार तर त्या राष्ट्रावरील तीव्र संकटाची कल्पना येऊं शकेल, पण तें राष्ट्र अधोगतीच्या मार्गाला लागलें असा निर्णायक तर्क करणें चुकीचें होईल.

हॅनिबॉलच्या डोळे दिपवून टाकणाऱ्या विजयमालिकेनें रोमचा कायमचा नाश झाला नाहीं. याचें कारण त्याच्या रक्षणार्थ दुर्दम्य व सुसंघटित अशा रोमन लोकांच्या करारी निश्चयाची भिंतच्या भिंतच उभी होती. याच्या उलट नॉर्मन लोकांच्या तडाख्यापुढें सॅक्सन लोक नमले, कारण त्यांच्यांत आपापसांतच फाटाफूट होती. जर मेवाडचें संघराज्य संघटित असतें तर तें राणा संगाच्या पराजयानंतरही तगून शाबूत राहिलें असतें, व त्याचें अपुरें कार्य दुसऱ्या एखाद्या नेत्यानें पुढें चालविलें असतें. हिमू हा एक घसरगुंडीस लागलेल्या राजघराण्यासाठीं पानिपतास लढला व समजा, त्याला त्या लढाईंत जय मिळाला असता तरी हिंदुस्थानावर चालून आलेल्या तयमूरलंगी सत्तेला तो थोपवून धरूं शकला नसता. इंग्लंड काय किंवा जपान काय जर त्यांचें नाविक दल समुद्रकिनाऱ्याचें संरक्षण करण्यास असमर्थ असतें तर वादळापासून किंवा शत्रूच्या वारंवार हल्ल्यापासून त्याचें कितपत रक्षण झालें असतें याची शंकाच आहे ! पहिल्या महायुद्धानंतर अवघ्या वीस वर्षांत जर्मनीचें पुनरुत्थान झालें. त्यामुळें त्या महायुद्धाचे परिणाम कायम स्वरूपाचे झाले नाहींत हें स्पष्ट आहे. अनेक वर्षें चाललेल्या युद्धाबद्दल जर असें आहे तर एखाद्या लहान लढाईबाबत तर बोलावयासच नको. तात्पर्य, व्यक्तीच्या किंवा राष्ट्राच्या जीवनावर आकस्मिक घटनांच्या परिणामाबद्दल अधिक भर देण्यांत अर्थ नाहीं.

याविषयीं आणखी एक गोष्ट विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं इतिहास हा एकाद्या कालखंडापुरता अथवा देशापुरता मर्यादित नसतो. त्याच्या कक्षेंत अखिल मानवजातीची प्रगति येते आणि म्हणून इतिहासाचे स्वयंपूर्ण असे कालखंड करतां येत नाहींत. तसें केल्यास चुकीचीं अनुमानें निघण्याचा संभव आहे. इतिहासाकडे संकुचित दृष्टीनें पाहिल्यास तसेंच होणार.

फ्रेंच राज्यक्रांतीच्या इ. स. १७८९ ते १८१५ या कालखंडापुरतेंच इतिहासाच्या अभ्यासकाने लक्ष दिले म्हणजे येवढाच कालखंड इतिहासातून बाहेर काढला तर असा समज होण्याचा संभव आहे कीं पुढील दशकात 'बोर्बोन' घराण्याची पुनः गादीवर स्थापना झाल्यावर क्रांतीचे वारे वाहणे बंद झाले व युरोपात सर्वत्र राजशाहीच प्रस्थापित झाली. फ्रेंच राज्यक्रांतीने नेपोलियन व त्याचे सरदार ( Marshals ) उदयास आले. व असेही वादासाठीं म्हणता येईल कीं जर क्रांतीच्या पहिल्याच अवस्थेत नेपोलियनला—या छोट्या कार्पोरलला—पॅरिसच्या रस्त्यात एखादी चुकून गोळी लागली असती तर फ्रान्सच्या किंबहुना युरोपच्या इतिहासाला नवेच काहीं वळण लागले असते. होय. इतिहासाकडे जर संकुचित दृष्टीनें पाहिले तर—अगदीं थोडा कालखंड डोळ्यापुढें ठेवला तर—हा मुद्दा अगदीं डावलता येईल किंवा त्याकडे दुर्लक्ष करता येईल असे नाहीं. कारण थोर लोकांचें व्यक्तिमत्त्व मानवी व्यवहारात नाकारता येत नाहीं आणि त्याच्या अलौकिक कर्तृत्वाने राष्ट्राचे पाऊल थोडा काल का होईना पुढे पडतें यात शंकाच नाहीं. हें जरी खरें असले तरी हेंही विसरून चालणार नाहीं कीं, जशी नेपोलियनच्या अलौकिक विजयमालिकेच्या मागे त्याची अलौकिक बुद्धि होती त्याचप्रमाणे त्याच्या अनुयायांचा क्रांतीचा दांडगा उत्साहही पण होता. शिवाय नेपोलियनचा पराभव झाल्यानंतरही लोकशाहीचे पेरले गेलेले बीज कायम राहिले आणि जरी युरोपातील राजांच्या संघटित शक्तीपुढे फ्रान्स नमला तरी क्रांतीचे तत्त्व पुसून टाकता आले नाहीं व तें पुनः पुनः डोकें वर काढीतच होतें. इतकें कीं नव्या पिढीनें तें कायमचें स्वीकारलें व राजकीय घडामोडींत त्या तत्त्वाला कायमचें स्थान मिळालें आणि सुधारलेल्या जगात व राजकारणात ते प्रभावी झालें. म्हणजे काय कीं, जरी क्रांतीच्या प्रणेत्यांना हार खावी लागली तरी अखेर ज्या राष्ट्रांनीं सशस्त्र विरोध संघटित करून क्रांतीचा प्रसार कुंठित करण्याचा चंग बांधला त्याच राष्ट्रांनीं अखेर क्रांतीचें साफल्य संपादिलें. फ्रान्सची मानखंडना झाली खरी, पण अखेर फ्रान्समध्येंच क्रांतीचा विजय झाला, तो इतका कीं, पुढे कितीही मोठ्या प्रमाणात आकस्मिक घटना घडून आल्या असत्या तरी क्रांतीच्या अंतिम यशावर त्याचा काहींही परिणाम झाला नसता.

इतिहासाची जर एखाद्या अज्ञात स्थलापासून निघून समुद्राला मिळालेल्या प्रवाहाशीं तुलना केली तर या आकस्मिक घटनांची तुलना त्या प्रवाहाआड येणाऱ्या खडकाशीं करता येईल. या प्रवाहाला जर या काळ्या फत्तराला फोडून वाट काढता आली नाहीं तर तो त्याला वळसा घालून पुढें समुद्राला जाऊन मिळेलच. तात्पर्य, अकल्पित घटनांनीं इतिहासाचा ओघ कांहीं वेळ मागे फिरलेला दिसेल, पण तो नैसर्गिक प्रवाह कायमचा आडवून धरणे शक्य

नाहीं. इतिहासाकडे संकुचित दृष्टीने पाहिले तर या उपरिनिर्दिष्ट घटनाना भलतेच विशाल स्वरूप आलेले दिसते.पण आपला दृष्टिकोन जर विशाल असेल तर त्याच घटना मूळ स्वरूपात दिसावयास लागून त्या व्यक्तीच्या अथवा राष्ट्राच्या भवितव्यावर कायमचा परिणाम करतात अशा तऱ्हेची समजूत आपण कधींही करून घेणार नाहीं.

---

## भारतीय इतिहास व पुराणवस्तुसंशोधन

( लेखक—प्रा. वा. वि. मिराशी, नागपूर )

एकोणिसाव्या शतकात ज्या अनेक शास्त्राचा उदय व विकास झाला त्यामध्ये पुराणवस्तुसंशोधन या शास्त्राची प्रामुख्याने गणना केली पाहिजे. हें शास्त्र भूमीवर अस्तित्वात असलेल्या किंवा उत्खननाने प्राप्त झालेल्या प्राचीन अवशेषाच्या साहाय्याने देशाच्या स्थापत्यादि विविधकला, लोकाच्या चालीरीति, राहणी, धर्मपंथ इत्यादि मानवी संस्कृतीचें ज्ञान करून देते. पूर्वी इतिहास व पुराणवस्तुसंशोधन याचे प्रांत परस्परभिन्न आहेत असे समजण्यात येत असे. निश्चित व लेखनिविष्ट अशा साधनाच्या साहाय्याने देशाच्या गत कालाचें ज्ञान करून देणे हे इतिहासाचे काम व पृथ्वीवर भिन्न भिन्न देशात विशिष्ट थरात प्राप्त झालेल्या वस्तूंच्या अभ्यासाने अतिप्राचीन कालात मानवी संस्कृतीचा उद्गम व विकास कसा होत आला हे दाखविणे हे पुराणवस्तुसंशोधनाचे क्षेत्र असे समजण्यात येत असे. पण सध्या केवळ प्रागैतिहासिक कालाच्याच नव्हे तर ऐतिहासिक कालातलि प्राचीन भागाच्या ज्ञानाचे प्रमुख साधन म्हणून पुराणवस्तुसंशोधनशास्त्राचा उपयोग करण्यात येतो.

आपल्या हिंदुस्थानात तर आमच्या प्राचीन इतिहासाचें ज्ञान बहुतांशीं या शास्त्राच्याच साहाय्यानें प्राप्त झाले आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं एकोणीसाव्या शतकापर्यंत आपणास इतिहासाचें महत्त्व माहीत नव्हते. आपल्या प्राचीन वाङ्मयात इतिहासाला ऋग्वेदादि वेदाच्या बरोबरीने स्थान दिलें आहे. छांदोग्योपनिषदाच्या सातव्या अध्यायात नारदानें आपण अभ्यासिलेल्या विद्याची यादी दिली आहे त्यामध्ये ऋग्वेदादि वेदाच्या बरोबर इतिहासपुराणाचा निर्देश केला आहे व या इतिहासपुराणाला पाचवा वेद किंबहुना वेदाचा वेद असे म्हटले आहे. जगातील आद्य भाषाशास्त्रज्ञ यास्काचार्य यांनीं आपल्या निरुक्तात वैदिक ऋचाचा ऐतिहासिक पद्धतीने अर्थ लावणाऱ्या ऐतिहासिकाच्या मताचा उल्लेख अनेक ठिकाणीं केला आहे. खुद्द ऋग्वेदामध्ये दाशराज्ञसूक्तासारख्या सूक्तात ऐतिहासिक घटनाचे रसभरित

वर्णन आहे. आपला महाभारत ग्रंथ हा कौरवपांडवांचा इतिहासच होय. त्या ग्रंथातच त्याला 'इतिहासोत्तम' असे म्हटले आहे. वायुपुराण, ब्रह्मांडपुराण, भविष्यपुराण इत्यादि पुराणग्रंथांत प्राचीन राजवंशांच्या याद्या आल्या आहेत व पुराणग्रंथांच्या लक्षणांमध्ये या याद्यांचा 'वंशानुचरित' म्हणून उल्लेख आहे. तथापि प्राचीन काळीं इतिहास ग्रंथ पुराणग्रंथांहून निराळे असावे. कारण वर उल्लेखिलेल्या छांदोग्योपनिषदांतील उताऱ्यांत व इतरत्रही अनेक ठिकाणीं इतिहासाचा पुराणाहून भिन्न असा निर्देश केला आहे. प्राचीन काळीं राजदरबारीं प्रत्येक राजाच्या कारकीर्दीच्या प्रमुख घटनांचे वर्णन लिहून ठेवण्याची पद्धत होती. ओरिसा प्रांतांत भुवनेश्वराजवळच्या हाथीगुंफा नामक गुहेंत कलिंगनृपति खारवेल याच्या कारकीर्दीच्या—किंबहुना त्याच्या बालपणापासूनच्या—प्रतिवार्षिक घटनांचे वर्णन कोरून ठेवलेले इतिहासज्ञांस माहीत आहे. चोलनृपति राजराज व त्याचा वंशज विक्रमचोलदेव यांच्या काळच्या कांहीं लेखांत तर त्या राजाच्या कारकीर्दीच्या अमुक वर्षाच्या अमुक दिवशीं विशिष्ट घटना घडल्याचा उल्लेख आहे. या सर्व उदाहरणांवरून प्राचीन काळीं आपणामध्येंही ऐतिहासिक लिखाण लिहिण्याची व तें जपून ठेवण्याची पद्धत होती हें दिसून येईल.

तथापि प्राचीन काळचे ऐतिहासिक ग्रंथ सध्या उपलब्ध नाहींत. बाणाचें हर्षचरित, पद्मगुप्ताचें नवसाहसांकचरित, बिल्हणाचें विक्रमांकदेवचरित, असे कांहीं हाताच्या बोटांवर मोजण्यासारखे इतिहासविषयक गद्यपद्य ग्रंथ सध्या उपलब्ध आहेत, पण ते काव्यात्मक आहेत. त्यांचा उद्देश निःपक्षपातानें इतिहास लिहिण्याचा नसून आपल्या चरित्रनायकाचे गुणगान करण्याचा होता. कारण या ग्रंथांत निश्चित असे काळाचे उल्लेख मुळींच नाहींत. त्यामुळें हे ग्रंथ संपूर्ण वाचल्यावरही त्यांत वर्णिलेले नायक कोणत्या शतकांत होऊन गेले याचेंही ज्ञान होत नाहीं! शिवाय यांत अनेक ठिकाणीं काल्पनिक दैवी घटनांचें वर्णन आहे. एखाद्या आधुनिक ऐतिहासिक कादंबरीला इतिहास समजून, तींत वर्णिलेल्या काल्पनिक घटनांवर विश्वास ठेवण्याइतकेंच वरील गद्यपद्यमय काव्य-ग्रंथांना इतिहास म्हणणें योग्य होईल.

### राजतरंगिणी

पण यावरून संस्कृत वाङ्मयांत इतिहासग्रंथांचा पूर्णपणें अभाव होता असें अनुमान काढणें योग्य होणार नाहीं. कारण, आपले अनेक ग्रंथ कालाच्या उदरांत गडप झाले आहेत. सुदैवानें त्यांपैकीं एक ग्रंथ अद्यापि विद्यमान आहे त्यावरून या ग्रंथांच्या स्वरूपाविषयीं अनुमान करतां येतें. हा ग्रंथ इ. स. च्या बाराव्या शतकांत होऊन गेलेल्या कल्हण या काश्मिरी पंडिताचा 'राजतरंगिणी' हा होय. ह्या ग्रंथाच्या आरंभीं कल्हणानें दिलेल्या माहितीवरून असें दिसतें कीं

त्याच्यापूर्वी अनेक इतिहासकार होऊन गेले होते. त्यापैकी काहींचे ग्रंथ पूर्वी विस्तृत असून कल्हणाच्या काळी त्याचे काही भाग मात्र अवशिष्ट होते. त्याचा उपयोग करून सुव्रत नामक काश्मिरी इतिहासकाराने आपला संक्षिप्त इतिहास तयार केला होता.तथापि कल्हण म्हणतो की त्यातही पांडित्यप्रदर्शनामुळे अनेक दोष उत्पन्न झाले होते. सुव्रत, क्षेमेंद्र इत्यादि अकरा इतिहासकाराच्या ग्रंथांचा त्याचप्रमाणे ' नीलमत ' पुराणाचा उपयोग करून कल्हणाने आपला ' राजतरंगिणी ' नामक सुविख्यात ग्रंथ लिहिला. या ग्रंथाकरिता कल्हणाने अनेक प्राचीन प्रशस्त्या, दानपत्रे, कोरीव लेख, हस्तलिखित ग्रंथ, नाणीं वगैरेंचा अभ्यास केला, अनेक इमारती पाहिल्या, विविध लौकिक कथांचा संग्रह केला. सारांश, सर्व प्रकारची माहिती जमवून व तिची सत्यासत्यता पडताळून नंतर त्याने तिचा आपल्या ग्रंथात उपयोग केला. गतकालाविषयींचे माझे लिखाण निर्दोष असावे याकरिता मी सर्व प्रकारे प्रयत्न केला आहे, असे तो म्हणतो. इतिहासकाराच्या अंगी निःपक्षपातिता हा गुण अत्यावश्यक आहे, याचीही कल्हणाला पूर्णपणे जाणीव होती. कारण तो एके ठिकाणी म्हणतो—

श्लाघ्यः स एव गुणवान् रागद्वेषबहिष्कृता ।
भूतार्थकथने यस्य स्थेयस्येव सरस्वती ॥

' ज्याची वाणी प्रेम व द्वेष यांपासून मुक्त असून सत्यार्थकथनात अत्यंत निश्चल असते तोच गुणी ( इतिहासकार ) प्रशंसार्ह होतो. '

कल्हणाचा ग्रंथ वाचल्यास या विधानात अतिशयोक्ति मुळींच वाटणार नाही. तो ज्या काळी झाला त्या काळचा व त्यापूर्वी सुमारे पांचशे वर्षांचा इतिहास त्याच्या राजतरंगिणीवरून उत्तम प्रकारे ज्ञात होतो यात संशय नाही. तथापि त्यापूर्वीच्या इतिहासाबद्दल मात्र त्याचा ग्रंथ परीक्षणाच्या कसोटीस उतरत नाही. उदाहरणार्थ, रणादित्य नावाच्या एका राजाची कारकीर्द तीनशे वर्षे चालू होती असे कल्हण म्हणतो ! याशिवाय त्याच्या ग्रंथात अनेक असंभवनीय घटनांचे वर्णन आले आहे. त्यावरून प्राचीन काळाबद्दल तो विश्वसनीय नाही हे उघड आहे. यांत अर्थातच कल्हणाचा दोष नाही. उपलब्ध साधनांचा त्याने कसोशीने उपयोग केला यात संशय नाही. प्राचीन काळच्या इतिहासाची साधनेंच उपलब्ध नसल्याने त्याला त्या काळी प्रचलित असलेल्या दंतकथांवर विसंबून रहावे लागले.

काश्मीर देशाच्या इतिहासाकरिता कांहीं काळापुरता का होईना राजतरंगिणी हा ग्रंथ उपयोगी पडतो. पण इतर प्रांताच्या प्राचीन इतिहासाविषयीं अशीही साधनें एकोणिसाव्या शतकाच्या आरंभी उपलब्ध नव्हती. देशांत अनेक ठिकाणीं प्राचीन काळच्या गुहा, इमारती, स्तंभ,

त्यावरील कोरीव लेख वगैरे अवशेष विद्यमान होते. तथापि त्याचें यथार्थ ज्ञान कोणासच नव्हतें. असे सागतात की, एका अशोकस्तंभावरील कोरीव लेख वाचण्याकरिता अकबराने आपल्या राज्यातील विद्वान् लोकाना जमविले, पण त्यापैकीं एकालाही त्यातील एकही अक्षर उमगेना म्हणून अकबराची तद्विषयक जिज्ञासा अतृप्त राहिली. मुबई इलाख्यात नाशिक,कार्ले, कान्हेरी वगैरे ठिकाणीं गुहातून बुद्धाच्या मूर्ति कोरलेल्या होत्या.पण अज्ञानामुळें लोक त्याना पाडवांच्या मूर्ति समजत. वाङ्मयातही भोजप्रबधासारख्या ग्रथानीं कालविपर्यासात्मक दन्तकथाच्या योगानें घोटाळा माजविला होता. ज्या मौर्य,कुशान,गुप्त, वाकाटक वगैरे सुविख्यात राजवशानीं एके काळीं हिदुस्थानात विस्तृत साम्राज्ये स्थापिलीं होतीं त्याचीं नावेंही लोकाना माहीत नव्हतीं.

### बंगाल एशियाटिक सोसायटी

अठराव्या शतकात इग्रजानी या देशात आपले आसन पक्कें जमविल्यावर त्याच्यातील काहीं जिज्ञासु अधिकाऱ्यांचे या देशाच्या प्राचीन वाङ्मयादि अवशेषाकडे लक्ष गेले व त्याच्या अभ्यासाकरिता कलकत्त्यास सन १७८४ मध्ये बगाल एशियाटिक सोसायटीची स्थापना झाली. प्रथम प्रथम कोणत्याही प्रातात ताम्रपट, शिलालेख वगैरे सापडल्यास ते या सोसायटीकडे वाचण्यासाठी पाठविले जात. काहीं प्रातात तर इग्रज रेसिडेटानीं आपल्या पदरच्या पडिताना अनेक ठिकाणीं पाठवून कोरीव लेखाची यादी करविली. नागपूरला रेसिडेट म्हणून राहिलेल्या रिचर्ड जेन्किन्सने आपला आश्रित विनायकराव औरगाबादकर यास मध्यप्राताच्या छत्तीसगड विभागात पाठवून त्याच्याकडून कोरीव लेखाचे छाप घेऊन व काहीं ताम्रपटही गोळा करून ते एशियाटिक सोसायटीकडे पाठविले. विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्यावेळीं काहीं हिंदी पडितानी इ. स. च्या पाचव्या सहाव्या शतकाइतके जुने असलेले काही लेख वाचून दाखविले. तथापि हिदुस्थानातील सर्वांत प्राचीन लिपी 'ब्राह्मी' ही त्यावेळीं पूर्णपणे ज्ञात झाली नव्हती. ती प्रथम जेम्स् प्रिन्सेप या इग्रज गृहस्थाने सन १८३७ सालीं पूर्णपणे वाचली व त्यायोगे भारतीय लिपिशास्त्राचा पाया घातला. त्यानतर वेळोवेळीं मिळालेले कोरीव लेख व नाणीं युरोपीय विद्वान् वाचून प्रकाशित करीत असत. पुढें डॉ. राजेंद्रलाल मित्र, डॉ. रामकृष्णपत भाडारकर व भगवानलाल इंद्रजी इत्यादि हिंदी विद्वानानींही या सशोधनकार्यांत भाग घेतला. तथापि त्यावेळीं देशातील प्राचीन अवशेषाचें सरक्षण करणे, प्राचीन ठिकाणाचे उत्खनन करून जुन्या इमारती, वस्तु व नाणीं उजेडात आणणे इत्यादि कामे आपल्या कर्तव्यात अन्तर्भूत होतात ही जाणीव सरकारासही नव्हती. ही स्थिति केवळ हिंदुस्था-

नांतच होती असे नाहीं. सुधारणेचा टेंभा मिरविणाऱ्या युरोपखंडातही याविषयीं त्याकाळीं अज्ञान होते. सन १८६२ मध्ये प्रथम हिंदुस्थान सरकारने पुराणवस्तुसंशोधनखात्याची स्थापना केली व जनरल अलक्झाडर कनिंग्हाम याला त्या खात्याचा पहिला डायरेक्टर नेमले. त्यावेळीं या खात्याचे काम म्हणजे देशात सर्वत्र पसरलेल्या प्राचीन अवशेषांचे यथातथ्य वर्णन करणे व त्याच्याविषयीं मिळेल ती इतिहास व परंपरागत माहिती जमविणे एवढेच होते. कनिंग्हामने तेवीस वर्षे उत्तर हिंदुस्थान व मध्यप्रांत यात प्रवास करून पुष्कळ महत्त्वाची माहिती जमविली व ती आपल्या तेवीस वार्षिक रिपोर्टांत प्रसिद्ध केली. प्राचीन ठिकाणाचा कालनिश्चय करण्यात कनिंग्हामने फार महत्त्वाची कामगिरी केली आहे. प्राचीन काळीं चिनी यात्रेकरू हिंदुस्थानात बौद्ध ग्रंथाचा अभ्यास करण्यासाठीं आले होते. त्यांनीं कित्येक स्थळांचे वर्णन लिहून ठेवलेले उपलब्ध झाले आहे. त्यावरून व वाङ्मयात आलेल्या उल्लेखावरून तीं तीं स्थळे नक्की कोठें होतीं याविषयीं कनिंग्हामने संशोधन केले. त्याकरिता त्याने व त्याच्या मदतनिसांनीं तक्षशिला, सारनाथ, बुद्धगया, सांची वगैरे ठिकाणीं थोडेंबहुत उत्खननही केले.तथापि त्यावेळीं उत्खननशास्त्र प्रारंभिक अवस्थेत असल्यानें या उत्खननानें लाभापेक्षा हानिच जास्त झाली असे तज्ज्ञाचे मत झाले आहे. प्राचीन अवशेषांचें रक्षण व दुरुस्ती करणें हे काम कनिंग्हामकडे दिले नव्हते. तें काम प्रांतिक सरकारावर सोपविलें होते, पण ते त्याच्याकडून नीट होईना म्हणून पुढे तेंही काम पुराणवस्तुसंशोधनखात्याकडे सोपविण्यात आले.

कनिंग्हाम उत्तर व मध्यहिंदुस्थानात फिरून प्राचीन ऐतिहासिक स्थलांची पाहणी करीत होता त्यावेळीं मद्रास व मुंबई इलाख्यात डॉ. बर्जेस याला पुराणवस्तुसंशोधक खात्याचा निरीक्षक Surveyor म्हणून नेमले होते. कनिंग्हाम सेवानिवृत्त झाल्यावर त्याला त्या खात्याचा प्रमुख म्हणून नेमण्यात आले. बर्जेसचे पश्चिम हिंदुस्थानातील 'बौद्ध गुहा,' 'औरंगाबाद व बेदर येथील प्राचीन अवशेष' इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत. मध्यंतरीं, उपलब्ध झालेल्या प्राचीन लेखांचे वाचन करून ते प्रकाशित करण्याकरिता डॉ. हुल्श या जर्मन विद्वानाची लेखविशारद Epigraphist म्हणून नेमणूक करण्यात आली. तेव्हापासून प्राचीन लेखाच्या प्रसिद्धीकरणास विशेष चालना मिळून आतापर्यंत हजारो कोरीव लेख प्रकाशित झाले आहेत.

## पुराण वस्तु संशोधन खातें

याप्रमाणें सन १९०० पर्यंत प्राचीन वस्तूंचे संरक्षण व संशोधन याकडे सरकारने थोडेंबहुत लक्ष दिलें होतें. पण एकंदर देशाच्या विस्ताराच्या मानाने ते अत्यल्प होते. सन १८९९ मध्ये लॉर्ड कर्झनची व्हाइसरॉय म्हणून नेमणूक

झाली. तेव्हापासून या खात्याच्या नवीन युगाला सुरवात झाली असें म्हणण्यात अतिशयोक्ति होणार नाहीं. लॉर्ड कर्झनच्या इतर कामगिरीविषयीं हिंदी लोकांनीं पुष्कळ टीका केली आहे. तथापि त्यानें हिंदी पुराणवस्तुसशोधन-खात्याची पुनर्घटना करून त्यात नवचैतन्य घातले याबद्दल हिंदी जनता त्याला सदैव धन्यवादच देईल. आपल्या कारकीर्दीच्या आरंभींच त्यानें प्राचीन इमारतींच्या सरक्षणाचा कायदा करून घेऊन अमलात आणला. या कायद्याचा उद्देश प्राचीन इमारतींचे सरक्षण व दुरुस्ती करणे, अनभिज्ञ इसमाना उत्खननाची मनाई करणे व प्राचीन वस्तूच्या व्यापाराला आळा घालणे असा होता. याप्रमाणे पुरातन वस्तूचे सरक्षण, उत्खनन व सशोधन याची तजवीज करून लॉर्ड कर्झनने (सर) जॉन मार्शल या हुशार व उत्साही इग्रज गृहस्थाची हिंदुस्थानातील पुराणवस्तुसशोधनखात्याचे प्रमुख ( Director General of Archæology in India ) म्हणून नेमणूक केली. तेव्हापासून या खात्याचे कार्य जोमानें सुरू होऊन आपल्या प्राचीन इतिहासाच्या ज्ञानात अनेकविध भर पडली आहे. सर जॉन मार्शल सन १९३१ मध्ये सेवानिवृत्त झाले त्यानतर कै. रायबहादूर दयाराम साहणी व कै रावबहादूर काशिनाथ नारायण दीक्षित या दोघा हिंदी गृहस्थाना या खात्याच्या प्रमुखत्वाचा मान मिळाला. या दोघाचीही कामगिरी प्रशसनीय झाली आहे. विशेषत कै. रा. ब. दीक्षित यानीं आपल्या सात वर्षांच्या कारकीर्दींत या खात्याच्या विविध विभागात नव चैतन्य खेळविले व खाजगी सशोधनसस्था व म्यूझियम याना उत्तेजन देऊन त्याच्याकडूनही कार्य करविले.

विसाव्या शतकात इतिहासाविषयींच्या आपल्या अपेक्षेत फार फरक झाला आहे. पूर्वीप्रमाणे राजेलोकाच्या वशावळी, त्याच्या कारकीर्दींतील प्रमुख घटना, लढाया, विजय किंवा पराभव, तह इत्यादिकातच इतिहासाने गुंतून न राहता देशाचे वाङ्मय, स्थापत्य, शिल्प, चित्र इत्यादि कला, लोकाची धार्मिक, सामाजिक व आर्थिक परिस्थिति, त्याच्या रीतीभाती वगैरेंचेही वर्णन त्यात आले पाहिजे अशी आपली अपेक्षा झाली आहे. प्राचीन इतिहासात या बाबींचे वर्णन यावयाचे तर त्याला पुराणवस्तुसशोधनशास्त्राचे साहाय्य अवश्य पाहिजे. या खात्याच्या अनेक शाखा आहेत. त्यायोगे गेल्या पन्नास वर्षांत आपल्या प्राचीन इतिहासविषयक ज्ञानात काय भर पडली हे त्रोटक रीतीने पाहू.

**प्राचीन वस्तूचें रक्षण**—जुन्या इमारती, कोरलेल्या गुहा, लेखाकित प्रस्तर, स्तभ इत्यादि प्राचीन काळची स्मारकें होत. सर्वंकष कालाच्या आघातानें ही हळू हळू नष्ट होत जातात. कित्येकदा अडाणी किंवा लोभी लोक अज्ञानाने किंवा स्वार्थानें त्याचा विध्वस करण्यास प्रवृत्त होतात. एकदां ही

स्मारकें नष्ट झालीं म्हणजे त्याचे कितीही हुबेहुब केलेले वर्णन वाचलें तरी त्यांची स्पष्ट कल्पना येणे कठीण. म्हणून तीं शक्य तों शाबूत राखणें हे आपले कर्तव्य आहे. प्राचीन काळींही लोक जीर्णोद्धार करीत पण त्यात धार्मिकतेची दृष्टि असे. त्यामुळें तो जीर्णोद्धार देवळे, मशीदी वगैरेचाच होत असे. अलीकडील सरक्षण हे महत्त्वाच्या वाटणाऱ्या सर्व वस्तूचे करण्यात येतें. अशोकाचे प्रस्तर लेख व स्तभलेख, अजिठ्याचीं लेणीं व चित्रें, वेरूळची लेणीं, कोनारकचे सूर्याचे प्रचंड देवालय, साचीचे स्तूप व तोरणें, घारापुरीचीं लेणीं इत्यादि अनेक प्राचीन स्मारकाचे पुराणवस्तुसशोधनखात्यानें संरक्षण केले आहे व अवश्य तेथें दुरुस्तीही केली आहे. पण ही दुरुस्ती करतानाही त्या त्या इमारतींचे किंवा वस्तूचे प्राचीन स्वरूप नष्ट न होईल अशी काळजी घेतली आहे.

**उत्खनन**—प्राचीन काळचे सर्वांगीण स्वरूप समजण्यास उत्खननाची अतिशय मदत होते. प्राचीन काळीं लोकाची राहणी कशी होती, ते कोणत्या तऱ्हेच्या घरात रहात, कोणतीं भाडीं, वस्त्रे, दागिने वापरीत, कोणते अन्न खात, त्याची आर्थिक स्थिति कशी होती, ते व्यवहारात कोणतीं नाणीं वापरीत, मृत्यूनतर मानवी देहाची व्यवस्था कशी लावीत इत्यादिका-विषयीं माहिती उपलब्ध प्राचीन वाङ्मयावरून किंवा अवशिष्ट अनुत्खात-साधनावरून मिळणे कठिण असते. त्याकरिता योग्य स्थळीं उत्खनन करून भूमिगत साधने उजेडात आणावीं लागतात. तक्षशिला, पाटलिपुत्र, प्रयाग जवळचे भीटा, प्राचीन वैशाली, निजामच्या राज्यातील कोंडापूर इत्यादि ठिकाणीं उत्खनन केल्यामुळें अलेक्झाडर, कुशान, गुप्त व सातवाहन याच्या काळीं लोकाची राहणी कशी होती इ. याविषयीं मनोरजक माहिती प्राप्त झाली आहे. याशिवाय या उत्खननात मिळालेले लेख, नाणीं, मुद्रा इत्यादिकावरून तत्का-लीन राजे, अधिकारी वर्ग, व्यापारी, सामान्य लोक वगैरेंचीं नावें ज्ञात झालीं असून त्याचा काळही निश्चित करण्यात मदत झाली आहे. नालदा येथील उत्खननावरून प्राचीन विश्वविद्यालयाचे स्वरूप स्पष्ट झालें आहे. पण उत्खन-नाचे महत्त्व सिंधमधील महेंजोदडो व पजाबातील हरप्पा येथील कामामुळें जसें पटले आहे तसे क्वचितच इतरत्र केलेल्या कामामुळे झालें असेल. सन १९२२ मध्यें कै. राखालदास बानर्जींना महेंजोदडो येथें एका बौद्ध स्तूपाचें उत्खनन करताना प्राचीन चित्रमय अक्षरांकित मुद्रा सापडल्या. त्याकडे विद्वानाचें लक्ष जाऊन पुढें महेंजोदडो व हरप्पा येथें विस्तृत प्रमाणावर उत्खनन करण्यात आलें. या उत्खननाने प्राचीन सिंधु संस्कृतीचे अवशेष उजेडात येऊन भारतीय प्रागै-तिहासिक कालाची मर्यादा एकदम खिस्तपूर्व ३००० वर्षांइतकी मागें गेली. १९२२ सालापूर्वी हिंदुस्थानात सांपडलेले पुराण वस्तूंचे अवशेष खिस्तपूर्व

चार पाचशे वर्षेइतकेच जुने होते. ही सिंधु सस्कृति वैदिक सस्कृतीपेक्षाही प्राचीन आहे. वेदात उल्लेखिलेल्या दास व दस्यू लोकाची सस्कृति व सिंधु सस्कृति ह्या एकच असाव्या असा अनेक विद्वानाचा तर्क आहे. या उत्खननात सापडलेल्या मुद्रावरच्या लिपीचा समाधानकारक रीतिनें उलगडा झाल्यावर याविषयीं निश्चित मत बनविता येईल. तथापि पाच हजार वर्षांपूर्वीच्या भारतवासी लोकाच्या राहणीचे जे चित्र आपणास दिसते ते उत्खननाशिवाय अन्य कोणत्याही साधनाने प्राप्त झाले नसते. ही सिंधु सस्कृति व गंगा—यमुना नद्याच्या खोऱ्यातील आर्य सस्कृति याच्या अवशेषामध्ये अद्यापि दोन अडीच हजार वर्षांचे अतर आहे तेंही उत्खननानेंच पुढे मागे भरुन निघेल असे सशोधकास वाटत आहे.

सिंधु सस्कृतीच्याही पूर्वीचे प्रस्तर व लोह—युगाचे अवशेष नर्मदा, गोदावरी वगैरे नद्याच्या खोऱ्यात व विशेषत: हैदराबाद व म्हैसूर सस्थानात कांहीं ठिकाणीं सापडले आहेत, त्यावरून या देशातील मानवी सस्कृतीच्या प्रारंभिक अवस्था अजमावता येतात. इतर देशात उत्तर प्रस्तर युगानतर ताम्रयुग किंवा कास्ययुग आलेले दिसते. पण दक्षिण हिंदुस्थानात तरी प्रस्तरयुगानतर मानवाने एकदम लोहयुगाचा टप्पा गाठला असावा असे तज्ज्ञाचे मत आहे.

**प्राचीन लेख**—भारतीय प्राचीन इतिहासाचीं मुख्य साधनें म्हणजे कोरीव लेख व नाणीं हीं होत. कारण पुरातन इमारती, शिल्पे, चित्रें इत्यादिकांनीं प्राचीन कालाचे ज्ञान झाले तरी तें मर्यादित व काहीं अशीं अनिश्चित असते. मागे लिहिल्याप्रमाणे पुराणवस्तुसशोधनखात्याची स्थापना होण्याच्या अगोदरच प्राचीन कोरीव लेखाच्या अभ्यासास सुरवात झाली होती. सन १८३७ मध्ये प्रिन्सेपने ब्राह्मी लिपी पूर्णपणे हस्तगत केल्यावर या अभ्यासास विशेष चालना मिळाली व आतापर्यंत हजारों कोरीव लेख ज्ञात होऊन त्याचे परीक्षण व अभ्यास झाला आहे. उत्तर हिंदुस्थानापेक्षा दक्षिणहिंदुस्थानात हे लेख अत्यत विपुल आहेत—इतके कीं त्याकरिता एका स्वतत्र ऑफिसाची व प्रकाशनमालेची तजवीज करावी लागली आहे. या कोरीव लेखाच्या योगानें आपल्या प्राचीन इतिहासाचा सांगाडा बुद्धजन्मापासून तो मुसलमानांच्या स्वाऱ्यापर्यंत तयार झाला असून कित्येक कालखडाविषयीं सविस्तर माहिती मिळाली आहे. मौर्य, कुशान, गुप्त, वाकाटक, कदम्ब, कलचुरि, चालुक्य, राष्ट्रकूट, मौखरि, वर्धन, पाल, सेन इत्यादि अनेक भारतीय राजवश या लेखामुळे प्रथम ज्ञान झाले. इतकेच नव्हे तर, जावा, सुमात्रा, सयाम, कांबोडिया, इत्यादि देशातून प्राचीन काळीं हिंदी सस्कृति कशी पसरली होती हेंही दिसून आलें आहे.

काहीं लेखांवरून तत्कालीन धार्मिक, सामाजिक, व आर्थिक परिस्थि-

तींचे ज्ञान झाले आहे. उदाहरणार्थ, इ. स. पूर्वी व नंतर तीन चार शतकांतील लेख बहुधा प्राकृत भाषेत असून त्यातील बहुतेकांत बौद्ध धर्माच्या प्रसारार्थ देणग्या दिल्याचा उल्लेख आहे. या देणग्या राजे लोकांप्रमाणेच श्रेष्ठी, व्यापारी, सोनार, सुतार इत्यादि विविध धंद्याच्या लोकांनीं तसेंच शक, यवनादि परकीयांनींही दिलेल्या आढळतात. त्यावरून बौद्धधर्माचा तत्कालीन जनतेंत कसा प्रसार झाला होता हें लक्षात येते. त्या वेळीं वैदिक धर्माचाही पूर्णपणे लोप झाला नव्हता हे दाखविणारे कांहीं लेख उपलब्ध झाले आहेत. त्यामध्यें अग्निष्टोमादि याग केल्याचा निर्देश आहे. पुढे वैदिक धर्माची सध्याच्या पौराणिक हिंदुधर्मांत परिणति झाल्याचेंही गुप्तकालीन व तदुत्तर लेखावरून दिसतें. हे लेख बहुतेक सर्व संस्कृत भाषेत असल्यानें त्या भाषेनें राजाश्रय मिळताच प्राकृत भाषेवर कसा पगडा बसविला हें ध्यानात येतें. याप्रमाणें इतिहासाच्या विविध अंगावर कोरीव लेखांनीं प्रकाश पाडला आहे. बहुतेक कोरीव लेख कोणत्या ना कोणत्या तरी शकाची मिती देत असल्याने त्यांचा काल निश्चित करता येतो. कारण त्या मित्याचा अभ्यास करून आपल्या देशाच्या भिन्न भिन्न प्रांतांत प्रचलित असलेल्या कृत किंवा मालव, शक, कलचुरि, गुप्त, हर्ष, गंग, सेन इत्यादि संवतांचा आरंभ निश्चित करण्यात आला आहे. शिवाय हे लेख प्राचीन इमारती, शिल्पें, चित्रें इत्यादिकांच्या सान्निध्यात उपलब्ध झाल्याने स्थापत्य, मूर्तिकला, चित्रकला इत्यादि कलांच्या उत्क्रांतीचा इतिहास लिहिण्यास मदत झाली आहे. याप्रमाणें कोरीव लेखांनीं इतिहासाच्या विविध अंगावर प्रकाश पाडून आपले प्राचीन काळाचें ज्ञान विस्तृत व निश्चित करण्यास मदत केली आहे.

**नाणीं व मुद्रा**—कोणत्याही सुधारलेल्या देशांत देवघेवीकरितां नाण्याची जरूरी पडते, त्याप्रमाणे या देशातही प्राचीन काळीं असली पाहिजे. वेद, ब्राह्मणें, उपनिषदें, पाणिनीची अष्टाध्यायी इत्यादि प्राचीन संस्कृत ग्रंथांत निष्क, शतमान, कार्षापण अशा विविध नाण्यांचा उल्लेख आहे. तथापि उत्खननानें हीं नाणीं प्राप्त होईपर्यंत तीं कशा प्रकारचीं असत हें माहीत नव्हतें. कित्येक युरोपीय विद्वानांनीं तर 'प्राचीन हिंदुस्थानात नाणीं माहीत नव्हती' 'ग्रीक लोकांच्या आगमनानंतर हिंदी लोकांस नाण्यांचा उपयोग माहीत झाला' इत्यादि तारे तोडले होते. तक्षशिला, पाटलिपुत्र, अहिच्छत्र इत्यादि ठिकाणीं उत्खनन करताना ग्रीकपूर्वकालीन थरांत प्राचीन नाण्यांचे संचय प्राप्त झाल्यानें या विधानाचें निरपवाद निराकरण झाले आहे. आपल्या देशातील अतिप्राचीन नाण्यांवर राजाचें किंवा देशाचें नाव नसून सूर्य किंवा तारे, वृक्ष, पशु इत्यादिकांच्या आकृति उमटवीत असत. त्यावरून प्राचीन इतिहासावर फारसा प्रकाश पडत नाहीं. तथापि पुढे नाण्यावर नावें उमटवूं लागले; तेव्हांपासून नाणीं हें

प्राचीन इतिहासाचें एक महत्त्वाचें साधन झालें आहे. उत्खनन करतांना हीं नाणीं प्राचीन खेळणीं, मातीचीं भांडीं, इत्यादि वस्तूंसहित सांपडल्यानें त्या त्या वस्तूंचा काल निश्चित करण्यात मदत होते. पंजाब व वायव्य सरहद्द प्रांतावर आक्रमण करून राज्य करणाऱ्या ग्रीक, शक, पल्हव, कुशान इत्यादि परकीय राजवंशाचा बराचसा इतिहास मुख्यत्वेंकरून त्यांच्या नाण्यांवरूनच ज्ञात झाला आहे. काठेवाड व माळवा या प्रांतावर राज्य करणाऱ्या क्षत्रपांचीं नाणीं तर इतकीं मुबलक सापडलीं आहेत कीं त्यांचा सुमारें तीनशें वर्षांचा अविच्छिन्न इतिहास मुख्यत्वेंकरून त्यांच्या नाण्यावरूनच सांगता येतो. या नाण्यावर तत्कालीन क्षत्रपाचें व त्याच्या पित्याचें नांव तसेंच शककालाचें वर्षही दिलें असल्यानें त्या प्रांताचा इतिहास समजण्यास त्यांची बहुमोल मदत झाली आहे. मालव, यौधेय, वृष्णि, शिबि वगैरे प्राचीन प्रजासत्ताक राजांची माहिती, कौटिल्याचें अर्थशास्त्र, महाभारत इत्यादि ग्रंथावरून झाली होती, तिला उपोद्बलक असा पुरावा त्यांच्या नाण्यांवरून मिळाला आहे. पुराणात आंध्र किंवा सातवाहन राजांचीं नांवें आलीं आहेत; पण त्यापैकीं फारच थोड्यांचे कोरीव लेख उपलब्ध झाले आहेत. त्यामुळें त्यापैकीं कांहीं नांवें तरी बनावट असावीं असा कांहीं विद्वानांना संशय येत होता. पण सात आठ वर्षांपूर्वी वऱ्हाडातील अकोला जिल्ह्यात या राजवंशाचीं दीड हजार नाणीं सापडलीं तीं प्रस्तुत लेखकानें इतरत्र प्रसिद्ध केलीं आहेत; त्यावरून पुराणात निर्दिष्ट केलेलेच राजे नव्हे तर, इतरही अद्यापपर्यंत अज्ञात असलेले सातवाहनवंशी राजे महाराष्ट्रात राज्य करीत होते असें सिद्ध झालें आहे. गुप्तांची राजवट हें प्राचीन काळातील सुवर्णयुग मानण्यात येते तें समुद्रगुप्त, द्वितीय चंद्रगुप्त, कुमारगुप्त इत्यादि गुप्तवंशी राजांच्या विविध प्रकारच्या सुंदर सोन्याच्या नाण्यावरून सर्वस्वीं सार्थ आहे असें दिसून येईल. कित्येक नाण्यांवरून जें प्राचीन स्थलाचा निश्चय करण्यात मदत होते. यौधेय, मालव, शिबि वगैरे गणाच्या प्राचीन निवासस्थानाचा निश्चय त्यांच्या नाण्यावरूनच झाला आहे. इतरही अनेक प्रकारची ऐतिहासिक माहिती नाण्यावरून प्राप्त होते. नाण्यातील सुवर्णादि धातूंच्या शुद्धाशुद्धतेवरून तत्कालीन आर्थिक परिस्थितीविषयीं अनुमान करता येतें. कांहीं नाण्यावरून धार्मिक इतिहासही कळतो. प्राचीन काळीं शक, कुशान, पल्हव, हूण इत्यादि रानटी टोळ्यांनीं हिंदुस्थानावर आक्रमण करून आपलीं राज्यें स्थापिलीं. तथापि त्यांची संस्कृति हीन दर्जाची असल्याने त्या जेत्यानाही हिंदु संस्कृतीनें जिंकलें व हिंदु धर्मानें आत्मसात् केलें, हे त्यांच्या नाण्यावरून स्पष्ट दिसतें. कुशानवंशी काडफीसस्, कनिष्क व हुविष्क, हूणवंशी मिहिरकुल इत्यादि परकी राजांच्या नाण्यावर शिव, नंदी

वगैरेच्या आकृती उमटविल्या आहेत त्यावरून त्याचे हिंदुधर्मानुयायित्व स्पष्ट दिसतें.

नाण्याप्रमाणे प्राचीन काळच्या मुद्राही अनेक ठिकाणीं सापडल्या आहेत त्यावरून नाण्यासारखीच माहिती मिळते. नाणीं केवळ राजे लोकांचीच असतात तर या मुद्रा राजकीय अधिकाऱ्याच्या तशाच सामान्य लोकाच्याही असतात. त्यावरून आपणास विविध प्रकारची धार्मिक व सामाजिक माहिती मिळते.

नाणीं, मुद्रा वगैरेचे हे महत्त्व ध्यानात घेऊन सरकारने सन १८७८ मध्यें भूमिगतनिधिविषयक कायदा (Treasure Trove Act) केला. तेव्हापासून दहा रुपयापेक्षा जास्त किंमतीची नाणीं, ताम्रपट किंवा कोणतीही महत्वाची वस्तु कोणास सापडल्यास त्याने आपल्या जिल्ह्याच्या कलेक्टरला त्याची माहिती देणे आवश्यक झालें आहे. न दिल्यास दंड किंवा कैद अशी शिक्षा होते. सापडलेल्या वस्तूची किंमत ठरवून ती महत्त्वाची वाटल्यास सरकार तिची किंमत व अधिक एकपंचमांश रक्कम देऊन विकत घेतें. अशी वस्तु ऐतिहासिक दृष्ट्या फारच महत्त्वाची असल्यास पुराणवस्तुसंशोधनखात्यातर्फे आणखी बक्षीसही देण्यात येते. या कायद्यामुळे प्राचीन नाणीं, ताम्रपट वगैरे ऐतिहासिक वस्तूचा संग्रह करण्यात फार मदत झाली आहे.

**कला**

संशोधनाने प्राचीन स्थापत्य, मूर्तिकला, चित्रकला इत्यादि कलाबद्दल विविध प्रकारची माहिती प्राप्त झाली आहे. या देशातील प्राचीन इमारतींनीं प्रथम संशोधकाचे लक्ष आपणाकडे ओढून घेतले. पुराणवस्तुसंशोधनखाते अस्तित्वात आलें ते प्राचीन इमारती सुरक्षित राखण्याकरिताच. कनिंग्हाम, बर्जेस वगैरेंनीं भिन्न भिन्न प्रांतात फिरून प्राचीन इमारती, लेणीं वगैरेचे निरीक्षण केले व त्याचे नकाशे देऊन वर्णन केले. पुढे उत्खननाने अनेक प्राचीन इमारतींचे अवशेष उजेडात आल्यावर या अभ्यासास जास्त चालना मिळाली. भारतीय स्थापत्यशास्त्राच्या उत्तर व दक्षिण अशा दोन शाखा असून त्यामध्येंही प्रांतपरत्वे भेद उत्पन्न झाले आहेत. शिवाय चंदेल्ल, पाल, कलचुरि चालुक्य, चोल, होयसळ इत्यादि राजवंशांनीं आपापल्या कारकीर्दीत आपली विशिष्ट स्थापत्यकला प्रचलित केली होती असें दिसते. या सर्वांच्या वैशिष्ट्याचा अभ्यास होऊन तद्विषयक ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत.

स्थापत्यकलेप्रमाणें मूर्तिकलेचाही अभ्यास झाला आहे. महेंजो दडो येथील उत्खननानें या देशातल्या अत्यंत प्राचीन मूर्ति उजेडात आल्या आहेत. त्यामध्ये योगाभ्यासी शिव, मातृदेवी इत्यादि देवताच्या त्याप्रमाणेच मनुष्याच्याही मूर्ति आढळतात. या मूर्तीचे शिल्प त्या काळाच्या मानाने अत्यंत आश्चर्यकारक झालें आहे. ऐतिहासिक काळांत बौद्धधर्माच्या प्रसाराने स्तूपादि-

कांच्या भूषणार्थ मूर्तिकलेला विशेष उत्तेजन मिळाले होतें. भरहूत, साची वगैरे ठिकाणच्या तोरणावर तसेच कार्ला, नाशिक, कान्हेरी इत्यादि ठिकाणच्या गुहात प्राचीन भारतीय शिल्पाचे सुंदर नमुने अद्यापि अवशिष्ट आहेत. महायान पंथाच्या प्रसाराने बुद्धाची मूर्ति करण्याचा प्रघात पडला. पंजाब व वायव्य सरहद्द प्रातांत ग्रीक शिल्पाचे अनुकरण करणारी विशिष्ट शिल्पकला प्रचलित झाली तिला गांधारकला म्हणतात. पुढे मथुरा, काशी वगैरे ठिकाणींही भारतीय शिल्पकार बुद्धाच्या व तारा, मंजुश्री वगैरे देवताच्या मूर्ति घडवू लागले. जैन तीर्थकराच्याही मूर्ति करण्याचा प्रघात पडून त्याचेही शिल्पशास्त्र विस्तृत झाले आहे.

वैदिक धर्मातही पूर्वी मूर्तिपूजेचा प्रघात असावा असे प्राचीन वाङ्मयातील वर्णनावरून व उल्लेखावरून दिसते. पण प्राचीन वैदिक देवताच्या मूर्ति अद्यापि उपलब्ध झाल्या नाहींत. तथापि गुप्तकालापासून हिंदु शिल्पकलेलाही उत्तेजन मिळून ब्रह्मा, विष्णु, शिव, देवी, गणेश वगैरेंच्या मूर्ति भारतीय शिल्पकार अनेक ठिकाणीं घडवू लागले. पुढे शिल्पकलेच्या तंत्रावर अनेक ग्रंथ होऊन मूर्तीचे विशिष्ट स्वरूप व आकार निर्णीत करण्यात आले व तदनुसार मूर्ति घडविण्याची प्रथा पडली. बौद्ध, जैन व हिंदु मूर्तिकलेसंबधीं ग्रुंडवेडल, स्मिथ, भट्टाचार्य, गोपीनाथ, कुमारस्वामी वगैरेंनीं ग्रंथ लिहिले आहेत. मराठींत श्री. ग. ह. खरे याचा हिंदु व जैन मूर्तिविषयक 'मूर्तिविज्ञान' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

मूर्तिकलेप्रमाणे प्राचीन चित्रकलेचाही अभ्यास झाला आहे. प्राचीन चित्रकलेचे नमुने फारसे उपलब्ध नाहींत. तथापि अजठ्याच्या गुहात अद्यापि सुदैवाने अवशिष्ट राहिलेल्या भित्तिचित्रावरून प्राचीन चित्रकलेची कल्पना करता येते. अजठ्याच्या चित्रकलेचा अनेक युरोपीय चित्रकारानीं अभ्यास करून विस्तृत ग्रंथ लिहिले आहेत. भारतीय चित्रकारानींही या चित्राचा अभ्यास करून तद्द्वारा प्राचीन भारतीय चित्रकलेला पुनरुज्जीवित करण्याचा प्रयत्न चालविला आहे. त्यामध्ये अवनीन्द्रनाथ ठाकूर, मुकुलचंद्र डे वगैरे बंगाली चित्रकार प्रमुख आहेत. औंध संस्थानाधिपति यानीं अजिंठ्याच्या चित्रकलेवर सुंदर पुस्तक मराठींत प्रसिद्ध केलें आहे. प्राचीन शिल्पकला व चित्रकला याचा अभ्यास करून त्यातील वैशिष्ट्य आपल्या व आपल्या आश्रयाखालीं असलेल्या इतर चित्रकारांच्या चित्रात आणण्याचा त्याचा प्रयत्न प्रशंसनीय आहे.

## पदार्थसंग्रहालयें

उत्खनन करून किंवा अन्य रीतीने प्राप्त झालेल्या पुरातन वस्तूंचे संरक्षण करण्याकरिता पुराणवस्तुसंशोधनखात्याने प्रत्येक प्रातांत पदार्थसंग्रहालयें बांधलीं आहेत. त्यामध्ये महत्त्वाच्या वस्तु वर्गीकरण करून व्यवस्थित व आकर्षक रीतीने माडलेल्या असतात. त्यायोगे दुहेरी फायदा होतो.

अभ्यासकास मूर्ति, कोरीव लेख, प्राचीन खेळणीं, मातीचीं भांडीं वगैरे वस्तूंचा कालक्रमाने पद्धतशीर अभ्यास करता येतो व सामान्य लोकातही तद्द्वारा प्राचीन इतिहासाचें ज्ञान फैलावून त्यांच्या शिक्षणांत भर पडते. कित्येकदां तर या प्रदर्शनाची प्राचीन वस्तु उजेडात आणण्यातही मदत होते. दोन वर्षांपूर्वी मध्यप्राताच्या वर्धा जिल्ह्यातील एका खेडेगावचा मनुष्य नागपुरास दलितवर्गांची परिषद भरली होती तिला हजर राहण्यास आला. त्या वेळीं तो सहज नागपूरचें पदार्थसंग्रहालय पाहण्यास गेला होता. तेथें काहीं ताम्रपट व्यवस्थितपणे मांडले होते ते पाहून आपल्या जवळही असाच एक ताम्रपट असल्याची त्यास आठवण झाली व तो त्यानें आपण होऊन क्यूरेटरकडे पाठवून दिला. यावरून पदार्थसंग्रहालयातील प्राचीन वस्तूंच्या प्रदर्शनाचा कसा उपयोग होतो तें दिसून येईल.

प्रांतिक पदार्थसंग्रहालयाखेरीज काहीं पदार्थसंग्रहालयें ज्या ज्या ठिकाणीं उत्खनन झाले तेथे तेथेंही स्थापिलीं आहेत व त्या ठिकाणीं सापडलेल्या महत्त्वाच्या वस्तु त्यामध्यें उत्तम रीतीनें मांडून ठेवल्यामुळे त्या त्या ठिकाणच्या कलाचा अभ्यास करण्यास उत्तम सोय झाली आहे. या देशातील पदार्थसंग्रहालयाची पाहणी करून त्याच्यात सुधारणा सुचविण्यासाठीं हिंदुस्थान सरकारनें एक कमिटी नेमली होती तिचा अहवाल पाच—सहा वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाला आहे. त्या कमिटीनें केलेल्या शिफारसी अमलात आणल्यास या संग्रहालयाना जास्त उपयुक्त व आकर्षक स्वरूप प्राप्त होणार आहे.

**प्रकाशन**

पदार्थ संग्रहालयाप्रमाणे प्रकाशनाचाही ऐतिहासिक ज्ञान जनतेत पसरविण्यात उपयोग होतो. देशाच्या निरनिराळ्या भागात संरक्षण, उत्खनन व संशोधन कार्य चाललेले असतें त्याचा वार्षिक अहवाल प्रसिद्ध करण्यात येतो; त्यायोगें अभ्यासकास आपलें ज्ञान अद्ययावत् ठेवण्यास मदत होते व संशोधनास साहाय्य होतें. याशिवाय महत्त्वाच्या ऐतिहासिक विषयावर निबंध व ग्रंथ लिहवून प्रसिद्ध करण्यात येतात. तक्षशिला, सारनाथ, नालंदा, अजंठा, वेरूळ इत्यादि सुप्रसिद्ध ऐतिहासिक स्थळे पाहण्यास अनेक लोक जातात. त्यास तेथील ठिकाणे व म्यूझियममधील प्राचीन वस्तु नीट रीतीनें पाहता याव्या व त्यांचे ऐतिहासिक महत्त्व समजावें म्हणून प्रदर्शिका या खात्याने प्रसिद्ध केल्या आहेत त्याचाही लोकास उपयोग होतो.

हिंदुस्थानातील पुराणवस्तुसंशोधनखात्यानीं व विद्वानानीं गेल्या शमर दीडशें वर्षांत केलेल्या कामगिरीचा हा त्रोटक वृत्तान्त आहे. त्यावरून या संशोधनाचा आपल्या देशाच्या प्राचीन इतिहासास किती उपयोग झाला आहे व त्यायोगे एकदर प्राचीन इतिहासाविषयीं आपली दृष्टि कशी निराळी झाली

अद्यापि संशोधनास मुबलक क्षेत्र आहे. या अफाट देशाच्या प्राचीन इतिहासाचे अनेक कानेकोपरे अद्यापि अंधकारात आहेत त्यावर संशोधनाचे किरण पाडले पाहिजेत. अलीकडे या क्षेत्रात काम करणाऱ्या विद्वानांची संख्या वाढत आहे. प्रत्येक प्रांतात संशोधन व प्रकाशन करण्याकरिता समित्या स्थापन झाल्या आहेत व होत आहेत. त्यांचा कार्योत्साह अत्यंत आशाजनक आहे. त्यांच्या हातून असेच उत्तरोत्तर महत्त्वाचे संशोधन होऊन या देशाचा प्राचीन इतिहास पूर्णपणे ज्ञात होवो असे इच्छून हा लांबलेला लेख पुरा करतो.

---

# इतिहासाची शास्त्रशुद्ध व्याख्या.

( प्रा. दि० वि० काळे. एम्. ए., संपादक सह्याद्रि, पुणें. )

### प्रास्ताविक

प्रस्तुत स्मारक ग्रंथाच्या विद्वान् संपादकांनी 'इतिहासाची शास्त्रशुद्ध व्याख्या' हा विषय अभ्यासासाठीं मला सुचविला तेव्हा साहजिकच त्या विषयाच्या व्याप्तीची माझी कल्पना काहींशी अस्पष्टच होती ही गोष्ट कबूल केली पाहिजे. दत्तोपंत आपटे स्मारक मंडळाचा प्रस्तुत दुसरा ग्रंथ 'इतिहास-शास्त्र व ऐतिहासिक तत्त्वज्ञान' या विषयावरचा आहे हे कळविताना चिटणि-सांनीं सोबत नियोजित लेखांची यादी दिली होती ती आणि ग्रंथाचे संकल्पित स्वरूप पाहून आपल्या लेखात काय असायला पाहिजे व कोणत्या गोष्टींची पुनरुक्ति होतां कामा नये हे ध्यानात आलें. पण त्यानंतरच्या त्यांच्या स्पष्टी-करणाच्या आणखी एका पत्रावरून 'लेखात जगातील प्रसिद्ध इतिहासकारांच्या इतिहासाच्या व्याख्यांचे संकलन असावे व त्याबरोबरच तुलनात्मक विवेचन असावे' अशी त्यांची अपेक्षाहि कळली. अशा रीतीने विषयाची व्याप्ति व त्याचे प्रयोजन यांची अपेक्षा ध्यानात आली. आता ती कशी पुरी करिता येते हे पाहावयाचे.

### व्याख्येची व्याख्या

'व्याख्या' म्हणजे काय याबद्दलहि शास्त्रीय चर्चा तर्कशास्त्राच्या कोण-त्याहि चांगल्या पुस्तकात केलेली आढळते. सामान्यत: 'कोणत्याहि सामान्य नामाचा नेमका अर्थ भाषाद्वारा स्थापन करणे' अशी व्याख्येची व्याख्या दिली जाते. आणि कित्येक वेळा समर्पक व्याख्या देणे कठीण वाटते तेव्हा 'एखाद्या वस्तूचें प्रत्यक्ष दर्शन हीच त्याची उत्तम व्याख्या होय' असे विनोदाने सांग-

ण्यात येते. इतिहासाशीं सदैव खेळणाऱ्या लोकांना या दृष्टीचे दर्शनज्ञान असल्याने इतिहास म्हणजे काय हे स्पष्ट करून सांगावे लागते, याची कल्पनाहि नसेल. परंतु प्रत्यहीं परिचयाच्या गोष्टीबद्दल देखील सूक्ष्म आणि पृथक्करणात्मक ज्ञान करून घेता आले तर कल्पना कशा अधिकाधिक स्पष्ट होत जातात हें यापुढील विवेचनावरून समजेल.

आपल्या व्यासङ्गाच्या इतिहास या विषयासंबंधीं आपल्या कल्पना शक्य तो स्पष्ट करून घेऊन त्याच्या सेवेला आपल्याला शक्यतर अधिक पात्रता प्राप्त करून घेण्याचाच आपला उद्देश असल्यामुळे शब्दाचा विशेष कीस काढण्याचे आपल्याला कारण नाही. आणि तसे करण्याला आपल्याला या छोट्या लेखात अवसरहि नाही. तथापि शक्य त्या प्रकारे छोटी, अर्थपूर्ण, अतिव्याप्ति या दोषापासून अलिप्त, सार्वकालिक आणि इतिहासविषयक प्रत्येक प्रयत्नाचा परामर्श घेणारी अशी व्याख्या देण्याचा प्रयत्न या लेखात केला जाईल. आणि त्यासाठी पुरेशी अवांतर चर्चाहि करणे अवश्य पडेल.

### इतिहास शब्दाचा उपयोग

ज्या गोष्टीची व्याख्या करावयाची आणि तीहि 'शास्त्रशुद्ध'—त्या गोष्टीबद्दल प्रथम आपली कल्पना निश्चित असावयास हवी. इतिहास हा शब्द नित्यातला आहे, तसा अपरिचित नाहीं. असे असले तरी हा सवयीचाच शब्द, आपण कसा, थोडथोड्या का होईना, पण भिन्नार्थाने वापरतो याची जाणीव सर्वांनाच असेल असे नाहीं.

सुप्रसिद्ध साहित्यिक श्री० न० चिं० केळकर याच्या 'इतिहास-विहार' या इतिहासविषयक लेखसंग्रहातीलच खालील वाक्ये पाहा. त्या प्रत्येकात 'इतिहास' हा शब्द आलेला आहे. परंतु कंसात दाखविल्याप्रमाणे त्याचा भिन्न भिन्न अर्थ घ्यावा लागतो:—

१. 'यासंबधे आजपर्यंत कोणत्याच इंग्रजी अगर मराठी **इतिहासांत** ( इतिहासविषयक पुस्तकात ) माहिती आलेली नाहीं.' ( पृ० ९० )

२. मराठ्याच्या **इतिहासांत** ( रियासतींत, गतकालीन **अमदानींत** ) प्रमुखत्वास आलेल्या दुय्यम प्रतीच्या पुष्कळ वीर मुत्सद्याची माहिती ग्रॅंड डफ किंवा इतर कोठे फारशी मिळत नाहीं.' ( पृ० ९० )

३. 'मराठ्याच्या **इतिहासाचे** ( संशोधित इतिहासाचे वा इतिहास-संशोधनाचे स्वरूप ) हल्लीचे स्थितींत इतिहास लिहिण्यापेक्षा इतिहासाचीं साधने मिळतील तितकीं जमविणे हेंच काम विशेष महत्त्वाचे आहे.' (पृ०९०)

४. 'अलीकडील पद्धतीप्रमाणे केवळ **इतिहास** ( सत्यघटना निवेदन ) या दृष्टीने बहुतेक बखरी लिहिलेल्या असाव्या असें दिसत नाहीं.' (पृ० ९२).

५. ' **खुद्द इतिहास** ( कृति, पराक्रम,—परंपरा ) निर्माण करणे ही गोष्ट ऐतिहासिक चिटोरीं गोळा करण्यापेक्षा अधिक महत्त्वाची आहे. ' ( पृ० ११८ ).

निबंधमालाकारांनीं केलेला पुढील वाक्यातील उपयोग निराळीच एक छटा दर्शवितो.

६. ' कधीं कधीं अशा क्षुल्लक गोष्टींतहि असे तात्पर्य असेल कीं, तिच्या योगाने कदाचित् **इतिहासाहि** ( घडामोडींचा ओघ म्हणजे त्यासंबधीं आज उपलब्ध असलेल्या ज्ञानावरून बनलेलें मत ) फिरूं शकेल. ' ( निबंधमाला, तिसरी आवृत्ति पृ० ९४ ).

७. जेव्हा कै० पुरातत्त्वभूषण विश्वनाथ काशिनाथ राजवाडे ' राष्ट्ररचनेत **इतिहासाच्या** ( इतिहासातून सिद्ध व प्राप्त होणाऱ्या चैतन्याच्या ) कामगिरी'बद्दल ( ऐतिहासिक प्रस्तावना, पृ० ३०५ ) बोलतात किंवा आपण—

८. ' ज्याचा **इतिहास** ( पूर्वजांचे तेज, पराक्रम ) उज्ज्वल आहे त्याचा भविष्यकालहि उज्ज्वलच होईल ' असे आशेने बोलतो तेव्हा इतिहास या शब्दामध्ये एका वेगळ्याच भावनेचे अधिष्ठान कल्पितो.

९. ' ही गोष्ट **इतिहासांत** ( गतकालात ) जमा झाली ' हा एक त्या शब्दाचा अगदीं मामूली उपयोग इंग्रजी वाक्प्रचारावरून आपण घेतला आहे. तर श्री० जननीजनकज याच्या मराठी शब्दकोशात उद्धृत केलेल्या—

१०. ' मराठ कर्तृत्वा दे संधि **इतिहासाया** ( अमर करावया ) नाव ' या काव्यपक्तींत त्याच्या उलट असे महत्त्व या शब्दाचे क्रियापद बनवून त्याला बहाल केले आहे.

**स्थूलमानाचे दोन अर्थ**

या दहा अवतरणातील अलंकारिक व सूक्ष्म अशा छटा वगळून स्थूलमानाने पाहिले तरी इतिहास या शब्दाने बोध होणाऱ्या गोष्टी निदान दोन तरी आहेत. अवतरणे २, ५, ६ यातील इतिहास हा शब्द **प्रत्यक्ष घडामोडींबद्दल** उपयोजिलेला दिसतो. तर अवतरणे १, ३, ४ यामधील इतिहास या शब्दावरून **घडामोडींचें संकलित वृत्त** असा निःसदिग्ध बोध होतो. या दोहोंचा अन्योन्य संबंध आहे यात शंका नाहीं. परंतु घडलेल्या गोष्टींबद्दल देखील ' इतिहास ' हा शब्द वापरून संदिग्धता उत्पन्न करण्यापेक्षा त्यासाठीं दुसरे शब्द वापरणे हेच केव्हाहि इष्ट ठरते. यामुळे घडलेल्या गोष्टींचा संकलित वृत्तान्त असाच इतिहास या शब्दाचा स्पष्टार्थ सर्वत्र मान्य केला गेला आहे. आणि आपल्याला जी शास्त्रशुद्ध व्याख्या करावयाची आहे ती या इतिहाससंबंधींची आहे.

## शास्त्र कीं कला ?

आतां या दुसऱ्या दृष्टीचा इतिहास म्हटला तथापि त्याचे सत्य स्वरूप थोडेसे वादविषयच झाले आहे. इतिहास हा कांहीं झालें तरी वाङ्मयाश्रयी आहे. घडामोडी हा त्याचा आत्मा आहे हे खरे; परंतु वाङ्मय हे त्याचें शरीर आहे. आणि वाङ्मय म्हटले कीं, रचनेची प्रक्रिया आली आणि तेथें कलेचा प्रांत उघड आला. यामुळे इतिहास ही कला आहे हा वाद प्रचलित झाला. परंतु वाङ्मय या माध्यमाच्या साहाय्याने प्रगट करावयाच्या ज्या घडामोडी त्याचें सत्यत्व वादातीत असले पाहिजे ही जी कसोटी हळूहळू उत्क्रान्त होत गेली, तीमुळें इतिहासातील घटनाचे सत्यत्व पारखण्याचे एक शास्त्र प्रगत झाले, आणि इतिहास हें शास्त्र आहे, असें साधार म्हणणें प्राप्त झालें. आणि इतिहासाच्या या विशेषावर भर दिला जाऊन त्याचे वाङ्मयीन महत्त्व कांहींसें नजरेआड झाले. ( कॅसिरेर, पृ. २७७). वास्तविक इतिहास हे शास्त्र आहे कीं कला आहे, हा पर्याय-वाची प्रश्नच अनाठायीं वाटतो. इतिहासाचा आत्मा हा शास्त्र—पूत सत्यान्वेषणात्मक असून त्याचे शरीर हे कलायुक्त असलें पाहिजे—असे दुवाजवी आणि दुलग उत्तर त्या प्रश्नाचें आहे.

यापैकीं इतिहासलेखनाच्या वाङ्मयीन कसोट्या हा वाङ्मय प्रांताचा भाग आहे. इतिहासवाङ्मय हे ऐतिहासिक घटितांचेच वाहन आहे. आणि म्हणून त्याचा इतिहास म्हणजे इतिहासातील घटितें याच्याशीं एकरूपतेचा संबंध आहेच. तेव्हा आपला विषय इतिहासातील घटितांशीं असलेल्या संबंधापुरताच मर्यादित असला पाहिजे. आणि इतिहासाची व्याख्या शास्त्रशुद्ध कोणती हे शोधून काढण्याचा उपक्रम करावा लागतो तोहि याच इतिहासाच्या स्वरूपाला—वर्णप्रधान स्वरूपाला, वाङ्मयप्रधान स्वरूपाला नव्हे—उद्देशून.

## सत्यकथनाचें महत्त्व

हिंदी लोकाना इतिहासाचे महत्त्व कळत नाहीं, असे दहाव्या शतकात अल्बेरूनीने लिहून ठेविलें असले तरी ' इतिहास ' हा शब्द मात्र वेदवाङ्मयात प्राचीनकालींच अवतीर्ण झालेला आढळतो. आणि इतिहास हा आपला शब्द अगदीं स्पष्टार्थवाचक आहे. कोणत्याहि चांगल्या कोशावरून इति+ह+आस= ' इतिहास '; म्हणजे हें असे झाले, घडले, हे समजून येतें. अमरकोशानें दिलेल्या ' इतिहासः पुरावृत्त ' या अर्थाहून वास्तविक इतिहासाची अन्य व्याख्या ती काय करावयाची ! ( समाजाच्या चरित्रांतील ) 'गत गोष्टींची जी हकीकत ती इतिहास'होय (ऐति. प्रस्तावना पृ. ३०६) किंवा 'वर्तमान क्षणाच्या पाठीमागील गतकाळीं पृथ्वीवरील नव्या व जुन्या दरोबस्त ( सर्व समाजाच्या ) सर्व तऱ्हांच्या

उलाढालींची जी ( **साद्यन्त व विश्वसनीय** ) हकीकत ती इतिहास होय *’ ( ऐ. प्रस्तावना पृ. ३१२ ), अशी परोपरीने सहाव्या खंडाच्या प्रस्तावनेंत जी व्याख्या घोकून घोकून सांगितली आहे, तींत आक्षेप घ्यायला जागाच नाहीं. आपल्या आर्य पूर्वजानीं हजारों वर्षांपूर्वी **इतिहासाचें** हे जे लक्षण ठरविले, ते अगदीं निर्दोष आहे, असे कै० राजवाड्याप्रमाणेच कोणालाहि वाटेल. राजवाडे म्हणतात, ‘ ताटस्थ्यवृत्तीने दोषरहित लक्षणे करण्यात त्यांचा हातखंडाच असे. इति ह आस, असे झाले, असे होते, हे इतिहासाचे लक्षण आर्यांचे आहे. ’ ( ऐति. प्रस्तावना, पृ. ३०६ परि. ८ )

आपण ज्याला ‘ इतिहास ’ म्हणतों त्यालाच पाश्चिमात्य भाषांत, आपल्याला परिचित असलेल्या इंग्रजींत, ‘ हिस्टरी ’ असे म्हणतात. आणि हिस्टरी शब्दाचा धात्वर्थ या वरील अर्थाला धरून आहे, हा योगायोग सूचकच म्हणावा लागेल. ‘ हिस्टोरिया ’ या ग्रीक शब्दाचा अर्थ ‘ शोधाअंतीं, चौकशी करून प्राप्त झालेले ज्ञान ’ असा होतो. म्हणजे ‘ हिस्टरी ’ या शब्दात सादर करावयाचा वृत्तान्त शोधपूर्ण, चौकशीनें निश्चित केलेला असा असावा, असा जो धात्वर्थ आहे, तोच ‘ इतिहास ’ या शब्दात ध्वन्यर्थ आहे. ‘ असे घडले ’ असे जे वृत्त कथन करावयाचे ते खरोखर घडलेले असले पाहिजे. इतिहासात दाखल व्हावयाची घटना ( वर्णनकालीं झालेल्या ज्ञानाप्रमाणेच अर्थात् ) सत्यरूप असली पाहिजे असाच या दोन्ही संज्ञांचा कटाक्ष आहे. दोन टोकाच्या दोन भाषांतील या पारिभाषिक संज्ञा समानार्थक आहेत, हे विशेष आहे. आणि त्यावरून **सत्यकथन हेंच इतिहासाचें एकमेव उद्दिष्ट** असले पाहिजे हे अगदीं साहजिक रीत्या सिद्ध होते. ‘ अगा जे झालेचि नाहीं । ’ त्याची वार्ता सांगण्यासाठीं इतिहासाचा अवतार नाहीं, हे आडवळणे घेऊन मुद्दाम सिद्ध करावयाला नको. तोहि प्रतिभेचा विलास वाङ्मयांत आदरणीय ठरलेला आहे. नाहीं असें नाहीं. परंतु त्यास कथा, कादंबरी अशीं अन्य नावे रूढ आहेत.

### केन्द्रस्थानीं मानव.

आणखीहि एक गोष्ट वादातीत अशी समजण्यास हरकत नाहीं. वास्तविक तिचा उल्लेख न केल्याने भागावे. परंतु विवेचनाच्या संपूर्णतेकरिता तिचा निर्देश करावा लागतो. इतिहास म्हणजे पुरावृत्त—तें कशाचेंहि असेल. मनुष्यच काय, पशु-पक्षी, वृक्ष-पाषाण, झाड-झाडोरा अशा कोणत्याहि सृष्टासृष्ट पदार्थांबद्दल ते असण्यास हरकत नाहीं. हिस्टरी म्हणजे अन्वेषण, शोधन—त्यासंबंधींहि

---

* या अवतरणातील कंस मुद्दाम घातले आहेत. कंसातील शब्द राजवाड्यांचेच आहेत. परंतु ते मूळ शब्दातून प्रत्यक्ष निघत नसले तरी रूढार्थानें अपरिहार्य आहेत हे पुढे दर्शविले आहे.

तेंच म्हणता येते. त्यात कोणत्याहि प्रकारच्या शोधवृत्ताचा समावेश व्हावा. एखाद्या गुन्ह्याच्या प्रवृत्तीच्या मूलकारणाबद्दलचा प्रबंधहि ' हिस्टरी ' म्हणता येईल. तसे म्हटले तर अलीकडे इतिहास म्हणजे हिस्टरी यामध्ये कोणत्या गोष्टींचा समावेश व्हावा यासंबंधींच्या कल्पना पुष्कळच व्यापक झाल्या आहेत. परतु एक गोष्ट अगदीं कायम आहे. इतिहासादि सर्व व्यवहार मनुष्यप्रेरित, मनुष्यनिर्मित, मनुष्यपुरस्कृत असल्यानें साहजिकच इतिहासाचें केन्द्र मनुष्य, मनुष्य समाज हेच आहे. ह्या बाबतींत शंका नाहीं.

## इतिहासाचा विषय.

मनुष्यनिर्मित सर्वच शास्त्राचे केन्द्र, निदान **अंतिम उद्दिष्ट, मानवाचें अभीष्ट साधणें** हे आहे, तसेच ते इतिहासाचेहि आहे. या कल्पनेचा आणखी थोडा विस्तार केला पाहिजे. अधिक चर्चा केली पाहिजे. 'इतिहासःपुरावृत्त' या व्याख्येनुसार किंवा ' इतिहास (हिस्टरी) म्हणजे शोध घेणे' एवढ्याच शब्दावरून इतिहासाचा असा एखादा विवक्षित, मर्यादित, बोट ठेवून दाखविण्यासारखा, एकटाच एक असा विषय सागता येत नाहीं. जे काय मानव समाजात घडले ते सर्वच ' इतिहास ' किंवा शोधाचा विषय ठरतो. या जगड्व्याळ विश्वव्यापी मानवी कर्तृत्वाच्या अफाट विस्तारातून एखादा मर्यादित कोपरा विशिष्ट दृष्टीने आखून घ्यावयाचा असेल तर इतिहाससागराला एखाद्या विशेषणाचा बांध घालावा लागतो. राज्य-व्यवहाराचा इतिहास विवक्षित असेल तर त्याला ' राजकीय ' इतिहास म्हटले पाहिजे. धर्मसस्थेचा तो ' धार्मिक ' इतिहास, अर्थव्यवहाराचा तो ' आर्थिक '. वाङ्मयीन, कलाविषयक, युद्धशास्त्रविषयक—काय वाटेल तसला स्वतत्र इतिहास अभ्यासता येईल. मनुष्यविषयक कोणतेहि क्षेत्र इतिहासाला अविषय नाहीं. म्हणजेच इतिहासाचे केन्द्र मानव आहे याचा अर्थ मानवी हितसबधाचें क्षेत्र जेवढे प्रशस्त व व्यापक तेवढेच इतिहासाचेहि. ' मनुष्ये जे जे करतात, सुख-दुःखरूपाने वगैरे भोगतात, घडवतात किंवा मोडतात, ते ते सर्व इतिहासाचेच क्षेत्र आणि इतिहासाचाच विषय होय. ' अशी जाणिव झाल्यामुळे इतिहासाची व्याप्ति अलीकडे वरवर तरी शब्दरूपात फार वाढल्यासारखी दिसत आहे. वास्तविक वर उल्लेखिलेल्या सर्व विभागाचे स्वतत्र इतिहासच निर्मिले जावे. परतु अनेक अडचणींमुळे—आणि विशेषतः पूर्वीपासूनच अशी व्यापक दृष्टि न लाभल्यामुळे—इतक्या विविध तऱ्हेचें पुरेसे साधन मिळत नाहीं आणि मिळण्यासारखे होते तें अज्ञानामुळे नष्टहि झाले. यामुळे तसे स्वतत्र अभ्यास करतां येत नाहींत आणि तसे स्वतंत्र इतिहास निर्माण करण्याऐवजीं सर्वसाधारणपणे ज्याला राजकीय इतिहास म्हणावे त्यातच धार्मिक, वाङ्मयीन, आर्थिक इत्यादि गोष्टीं-बद्दलची उपलब्ध असलेली माहिती कोंबून भरण्याची संवय इतिहासलेखकांना लाग-

लेली आहे ! आणि राजकीयेतर धार्मिक, सामाजिक इतिहासादि स्वतंत्र रचना करण्याचे भरीस न पडता, वर उल्लेखिलेल्या सर्वच गोष्टींची खिचडी इतिहासात करून त्याचा व्याप वाढला आहे. ( वास्तविक इतिहास म्हटला म्हणजे त्यात ह्या गोष्टी अभिप्रेतच आहेत ) असा अर्थवाद करण्याची पद्धति रूढ होऊं लागली आहे, आणि ती शिष्टसमतहि होत आहे.

## इतिहासाचा साधनसभार

इतिहास वाङ्मयनिविष्ट झाल्याला पौरस्त्याच्या महाभारतादिविषयक कल्पनेप्रमाणे कित्येक हजार वर्षे झालीं तर पाश्चिमात्याच्या कल्पनेप्रमाणें हिरोडोटस्, ( इ. पूर्व ५ वे शतक ) थुसिडेडिस या ग्रीक आद्य इतिहासकाराच्या कालापासून फक्त अडीच हजार वर्षे झालीं. या आरंभीच्या कालीं इतिहासाची व्याप्ति फक्त वैयक्तिक पराक्रम आणि अशा पराक्रमाचे निसर्गसिद्ध हक्कदार राजे-सेनापती अशाच्याच चरित्रापुरती मर्यादित असणे अगदीं साहजिक. आणि तत्कालीन लेखकाना जे भूगोलाचे वा कालाचे मर्यादित ज्ञान असेल तेवढ्याने त्यावेळच्या इतिहाससाधनाचा भौगोलिक व कालिक विस्तार निश्चित केला जाणेहि तसेच साहजिक. त्यानंतर नानाविध संशोधनाने पृथ्वीचा व्याप ध्यानात आला आणि लेखनादि कलामध्ये प्रगति होत जाऊन प्राचीन इतिहाससाधनाचे रक्षण करणे शक्य होऊन इतिहासवाङ्मयात उत्तरोत्तर भरच पडत गेली. आणि स्थलकाल मर्यादाचा विस्तार भरमसाट वाढला. आता पृथ्वीवरील सर्वसाधारणपणे सर्व देशभागाचे स्थानिकानीं किंवा बाह्यकानीं ( प्रवाशानी ) लिहिलेले इतिहास उपलब्ध झाले आहेत. कालमर्यादा तर दिवसेंदिवस वाढतच आहे. १९ वे शतकाचे शेवटीं जगाचा आरंभ सहा हजार वर्षांपूर्वी समजत. मानववंशशास्त्र व पुराणवस्तुशास्त्र याच्या साहाय्याने जाव्हा वानर-माणूसच ५ लक्ष वर्षांपूर्वी होता असे ठरत आहे ! मग त्यापूर्वीचे हरी जाणे ! !

जगताचे केंद्रस्थानीं सुप्रतिष्ठित झालेल्या मानवाचे बाह्य म्हणजे शारीरिक दृष्टिक्षेत्र पिढ्यानुपिढ्या वाढल्याचा हा केवळ भौतिक परिणाम झाला. परंतु मनुष्याची अंतर्दृष्टिहि क्रमशः प्रगत होत आहे. मनुष्याने या भौतिक दृष्टीमुळे लाभलेले ज्ञान सारग्रहण—पृथक्करणादि द्वारा सुसंगत बनवून त्यात एकप्रकारची शास्त्रीय व्यवस्था निर्माण केली. या शास्त्रीय प्रगतीमुळेच मानवी व्यवहाराच्या अभ्यासात सूक्ष्मता संचरून त्या व्यवहाराचेच भिन्नभिन्न पैलू अभ्यासविषय म्हणून पुढे आले. अशा तऱ्हेने एकट्या मनुष्याचाच अभ्यास करणारीं अनेक शास्त्रे संवर्धित झालीं आणि त्या शास्त्राची फिरून साहाय्यक अशीं अनेकविध पोटशास्त्रे पुढें आलीं. मनुष्याचे वसतिस्थान पृथ्वी, तिजसंबंधीं भूगोल, भूगर्भ, जलविज्ञान, खनिज, उद्भिज इत्यादि शास्त्रें वाढीस लागलीं. मनुष्याचें छत्र

आकाश; त्यातून खगोलादि ग्रहोपग्रह तारे याच्यासंबंधीं भौतिक, कालगणनात्मक इत्यादि अनंत प्रकार मनुष्यबुद्धीच्या विलासामुळें बहरून आले. पृथ्वीवरील अनंत नैसर्गिक परिस्थितिविशेषाशीं झगडण्यासाठीं मनुष्याने वैयक्तिक व सामाजिक सामर्थ्याची सघटना करण्याचे कार्मी जे कर्तृत्व प्रगट केले त्याच्या अभ्यासातून कृषि, वाणिज्य, शिल्पादि कारकशास्त्रवैभव संवर्धित झाले. तर मनुष्याने आपल्या स्वतःचाच म्हणजे मनुज बाधवाचा अभ्यास करण्यासाठीं मानववंशशास्त्र, इतिहास, समाजशास्त्र, राजव्यवहारशास्त्र, युद्धशास्त्र, अर्थशास्त्रादि जी शास्त्रसपत्ति रुजविली तिचींहि वाढ झाल्याने मानवसमाजेतिहास म्हणजे एवविध अनंत मानवी कर्तृत्वाचा इतिहास, मानवी मनाच्या बुद्धीच्या प्रगतीचा इतिहास असें अगदीं साधे समीकरण उत्पन्न झाल्याने इतिहाससाधनाची व्याप्ति अगदीं अपरिहार्यपणे वाढली.

या ठिकाणीं एवढे त्रोटक का होईना पण दिग्दर्शन करण्याचें कारण फक्त एकच आहे. आणि ते म्हणजे सर्व पृथ्वीवरील अखिल मानव-समाजाच्या, वर्तमानपूर्व म्हणजे अगदीं आजतागायत, पृथ्वीवरील सर्व देशाच्या आणि वर वर्णिल्याप्रमाणे वाढत्या मानवी कर्तृत्वाच्या आणि प्रगत झालेल्या सूक्ष्म शास्त्रीय दृष्टीमुळें अनेक विषयात विभागलेल्या अशा इतिहाससाधनाचा म्हटला तर केवढा जगड्व्याळ प्रपंच आहे, हे ध्यानात यावें. आणि त्यावरून एवढ्या अफाट इतिहासाचा परामर्श हा कोणाहि एका व्यक्तीच्या आटोक्याच्या बाहेरचा असून त्यात इतर शास्त्राप्रमाणेच विभाग करूनच अभ्यासाला हात घालावा लागणार हें स्पष्ट व्हावे. दिवसेंदिवस ही आपत्ति अधिकच वाढणार आहे. म्हणून या विशिष्टीकरणाचे काळांत एखाद्या माणसाला एखाद्या विषयाच्या विशिष्ट पैलूचाच सागोपाग अभ्यास करता येणे एवढेंच यापुढे शक्य होईल असा याचा अर्थ आहे. आणि म्हणून इतिहासाचीं व्याख्या आणि तिचे स्वरूप याचीं स्पष्ट कल्पना घेऊनच केलेला असा विशिष्ट अभ्यास एकंदर इतिहासाच्या घडणजडणीला उपयुक्त होईल, ही गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे.

**दोन महत्त्वाचे सिद्धान्त.**

इतिहासाच्या व्याख्येचा विचार चालू असताना, प्रामुख्यानें निर्देश करावयास हवा असे एक-दोन आणखीहि विचार आहेत.

पहिला विचार **इतिहासाच्या उद्देशांविषयीं किंवा हेतूविषयीं आहे.** इतिहासाचा उद्देश नीति-धर्मादि शास्त्रातील दडक प्रस्थापित करणे किंवा काहीं समजतात त्याप्रमाणे भविष्ये वर्तविणें हा नाहीं. यापैकीं एक भाग चल आहे, कालानुरूप त्यात बदल होईल. तर दुसरा भाग यशस्वी होण्यासारखें इतिहासांत काहींच नसून सृष्टींतील निर्जीव पदार्थाप्रमाणे सजीव व सुबुद्ध माणसाचे वर्तनी-

हेश नियमांनीं बद्ध आहेत असें समजण्याला उपलब्ध इतिहासावरून पुरेसा पुरावाच मिळत नाहीं. तेव्हां एखाद्या विशिष्ट कालाचा किंवा ऐतिहासिक प्रसंगाचा विचार करताना अभ्यासविषय असणाऱ्या या गोष्टी कशा रीतीनें या स्थितीला येऊन पोचल्या यासंबंधीं शोध घेऊन शक्य त्याप्रकारें निश्चिति करणे एवढाच हेतु असूं शकतो. आपण कितीहि छोटा प्रसंग निवडला तरी त्याच्या वाटी-पाठीमागील सत्य हाच आपल्या कुतूहलाचा विषय असतो. **त्याचा उदय, विकास, परिणतीचा क्रम याबद्दलच आपल्याला जिज्ञासा असते.** ज्ञान-कोशाकारांनीं हाच विचार आपल्या बुद्धपूर्व जग पृ. ३ वर असा मांडला आहे— " इतिहासाचा एक हेतु असा असतो कीं, आज लोकाना जे दिसत आहे त्याची उत्पत्ति अगर विकास सांगून तें स्पष्ट करावें. या हेतूचा इतिहास हा एक शक्य परिणाम आहे. "

एखादी व्यक्ति, संस्था, समाज किंवा घटना याचा इतिहास म्हटला म्हणजे त्याचा व्याप आणि विस्तार एवढा मोठा होतो कीं, त्या सर्वांचे संकलित वृत्त एकत्र देण्याचा उद्योग करतानाहि **एक विशिष्ट दृष्टि न ठेविल्यास** त्या संकलनाचा उपयोग करता येणे कठीण होतें. किंबहुना तशी दृष्टि न ठेविल्यास इतिहास म्हणून त्याचा उपयोग न होतां केवळ साधनसंभार म्हणजे इतिहास-लेखन या अंतिम उद्देशपूर्तीचा कच्चा माल एवढाच त्याचा मर्यादित उपयोग राहतो. मुसगत इतिहास हा अशा साधनसंभाराचा परिपाक असला पाहिजे. आणि त्या परिपाकावरून एकंदर मानवी समाजाची वर्ण्यघटनाकालीन जी अंतिम घडी दिसेल त्या घडीमधील त्या वर्ण्य घटनेचें स्थान स्पष्ट तर व्हावेंच परंतु त्याबरोबरच **हें स्थान तिला कसें आणि कोणत्या पायरीनें प्राप्त झालें** याचीहि साधार व सयुक्तिक कल्पना यावच्छक्य यावी.

दुसरा विचार ऑक्सफर्डचे प्रोफेसर श्री० इ० ए० फ्रीमन यांनीं घोषित केलेला **इतिहासाच्या अखंडत्वाचा ( यूनिटि ऑफ हिस्टरी ).** इतिहासाचे कृत्रिम कालखंड पाडतात, राष्ट्राराष्ट्राचे स्वतंत्र इतिहास सांगण्याची संकुचित दृष्टि दर्शविली जाते त्याविरुद्ध त्यांनीं प्रचंड प्रचार केला. प्राचीन ग्रीसपासून रोमन साम्राज्यापर्यंत आणि साम्राज्यशाही रोमपासून थेट मध्ययुगीन आणि अर्वाचीन युरपपर्यंत सर्व इतिहास हा एकच एक परस्परसंबद्ध व सलग प्रवाह आहे, हें त्यांनीं सिद्ध करून दाखविलें. त्याचा तात्कालिक परिणाम असा झाला कीं, इंग्लडच्या इतिहासाचे कल्पनातीत तुकडे पाडून जी हानी होई ती थांबून इंग्लंडच्या इतिहासाची विलक्षण प्रगति झाली. हाच न्याय सर्वच्या सर्व जागतिक इतिहासाला लावणे शक्य आहे. एवढेच नव्हे तर आजच्या नानाविध शास्त्रीय उपकरणांच्या प्रगतीमुळे जगाचा अभूतपूर्व संकोच झालेला प्रत्यक्ष दिसत

असताना अपरिहार्यच आहे. पूर्वीच्या कालातहि आजच्यासारखीं दळणवळ-णाचीं साधने नसताना दूरदूरच्या समाजाचा एकमेकावर चमत्कारिक प्रकारानें परिणाम झालेला दिसून येतो आणि हा इतिहासाच्या अखडत्वाचा सिद्धान्त म्हणजे केवळ कल्पना नसून प्रत्यक्ष वस्तुस्थिति असल्याचे सिद्ध होते. आणि इतिहासदेवतेच्या उपासकाने तिच्या सगुण आणि संपूर्ण मूर्तीचेच ध्यान करावें हे इष्ट ठरते. विशेषेकरून आजच्या वैशिष्टीकरणाच्या किंवा कणतज्ञतेच्या ( स्पेशलायझेशनच्या ) युगात हा इशाऱ्याचा शब्द उच्चारणे भागच पडतें.

ह्या सर्व गोष्टी ध्यानात धरून आता आपण आपली व्याख्या थोडक्यांत माडूं या. इतिहास म्हणजे '**सलग अशा मानवसस्कृतिपटांतील विवक्षित घटितांचें स्थान आणि त्या दृष्टीची त्यांची उत्क्रान्ति दर्शविणारा सत्य, संपूर्ण, साधार व सप्रमाण लेखनिविष्ट वृत्तान्त.**' वैशिष्टीकरणाचे युगातील खण्डलेखन देखील पारखण्याला कसोटी म्हणून उपयोगी पडण्यासाठीं अर्थात् **सलग अशा मानवसंस्कृतिपटांतील विवक्षित स्थानाचा उल्लेख** अपरिहार्य म्हणूनच स्पष्टीकरणार्थ येथे घेतला आहे.

### शास्त्राचा उल्लेख कां नाहीं ?

मानव समाजाच्या विविध आणि विस्तृत कर्तृत्वक्षेत्रांतून निवडून आणि अपरपार साधनसंभारातून निर्माण करून वर्णिलेला एखाद्या स्थलकाल-प्रसंगनिर्दिष्ट घटिताचा उपलब्ध सत्यकथनात्मक आणि त्याचे एकंदर अखंड इतिहासांतील स्थान व त्या स्थानापर्यंतची उदयविकासादि उत्क्रान्ति स्पष्ट करणारा लेखी वृत्तान्त म्हणजे इतिहास होय, हे येथपर्यंत प्रथम विभागशः आणि आता संकलित स्वरूपात सागून झाले आहे. परंतु या विवेचनात कित्ये-काना जें एक वैगुण्य प्रामुख्याने आढळेल ते हें कीं, या व्याख्येंत कोठे शास्त्र हा शब्द आणलेला नाहीं. अठराव्या शतकापूर्वीं लिहिले गेलेले इतिहास पूर्ण-त्वाने अशास्त्रीय होते, त्यानंतर इतिहासशास्त्राचा उदय झाला, आणि एकोणिसाव्या-विसाव्या शतकात शास्त्रीय दृष्टीचा पूर्णोदय झाल्यानें जुने तथा-कथित इतिहास आणि आजचे शास्त्रीय इतिहास यात जमीन-अस्मानाचे अंतर आहे असे यथार्थपणे म्हटलें जाते. त्याचे आणि इतरहि जे इतिहासलेखकाच्या पूर्वग्रह राहिल्याचे, अलिप्तपणाचे, निर्लेप दृष्टीचे वगैरे शास्त्रीय दृष्टिकोनाचे सामान्यतः गोडवे गाइले जातात, किंवा जात असत, त्याचे या व्याख्येंत प्रति-बिंब दिसत नाहीं. तें का दिसत नाहीं, हेच आता समारोपादाखल थोडक्यात सागावयाचे.

अठराव्या शतकामध्ये पाश्चिमात्य जगात भौतिक शास्त्राचा उदय झाल्या-नतर भौतिक शास्त्रातील सृष्ट पदार्थांच्याबद्दल निरीक्षण—प्रयोगादि साधनामुळें

अभ्यासकाला अलिप्त राहून त्याच्या वर्तनक्रमासंबंधी चिरकालिक नियम शोधून काढता येतात, असे सिद्ध झाले. तसेच ते इतिहास—समाजादि शास्त्राचा विषय झालेला जो मानव समाज आणि व्यक्तिशः मानव याच्या बाबतीतहि साध्य होईल अशा वेड्या आशेने ऑगस्ट कॉंट, बकल अशासारख्या पुष्कळांनी तसे प्रयत्न करून पाहिले. आणि काही मर्यादित क्षेत्रात त्याच्या आशेला पालवी फुटेल इतका आभासहि दिसला. ‘ इतिहासाची पुनरावृत्ति होते ’, ‘ भौगोलिक वातावरणाचा मनुष्याच्या कर्तृत्वावर परिणाम होतो ’, ‘ काही घडामोडी ठराविक क्रमाने घडतात ’ असे काही सिद्धान्त मर्यादित क्षेत्रातील अभ्यासाने सिद्ध झाल्यासारखे वाटले तरी विस्तृत क्षेत्रात आणि व्यापक कालखण्डाचा अभ्यास झाल्यानतर या सिद्धान्तातील सत्य विवादित आहे असे आढळले. मनुष्य हा इतर सृष्ट पदार्थांहून चैतन्ययुक्ततेमुळे निराळा पडला आहे आणि परिस्थितीबरोबरच त्याचे स्वतःचे मन हा अनिश्चित भाग त्याच्या वर्तनोद्देशाना प्रेरक असतो हे ध्यानात येऊ लागले. यामुळे इतिहासपद्धति ही भौतिक शास्त्राना समान नसून टीकाशास्त्राला अनुरूप आहे, हे ध्यानात आल्याने इतिहासपद्धति हाच शास्त्राचा योग्य विषय आहे, मानवी कर्तृत्व हा नव्हे, हेहि स्पष्ट झाले. आणि **शास्त्रीय इतिहास म्हणजे, साधनसंभाराला शास्त्रीय सत्यान्वेषणाचे दंडक लावून लिहिलेला इतिहास** एवढाच फक्त निष्कर्ष मागे राहिला. ( हर्नशा, ‘ सायन्स ऑफ हिस्टरी ’ )

आता हे शास्त्रीय संशोधनाचे दंडक साधन—साहित्याला लावणे हे काम तरी शास्त्रसापेक्ष निर्लेपपणें करता येते काय असा प्रश्नहि चर्चेला येणे साहजिक होतें. इतिहासातील घाटितें तन्निष्ठ ( ऑब्जेक्टिव्ह ) दृष्टीने अभ्यासावीं हेहि म्हणणें टिकण्यासारखे नव्हते. मनुष्य हा स्वतःच चालू घडामोडींतील एक घटक असल्यामुळें त्यानें अगदीं निर्लेप राहावयाचें मनात आणले तरी त्याच्या बुद्धीला, मताना, कल्पनाना त्याच्या समकालीन जगाचा जो रंग चढलेला असतो तो त्याला विसरणें शक्य नाहीं. आणि म्हणून ऐतिहासिक ज्ञान हें काहीं केलें तरी वस्तुनिष्ठ ( ऑब्जेक्टिव्ह ) असू शकत नाहीं असें सर्वांनीं मान्य केलेले आहे. ( ‘ On the objectivity of Historical knowledge ’ कॅसेरेर स्मारक ग्रंथ, पृ. १३७ )

## राजवाड्यांनीं घेतलेली अलिप्तपणाची भूमिका.

पुरातत्त्वभूषण राजवाडे याचीं इतिहासशास्त्रावरील मते १९०५ सालीं प्रसिद्ध झालेल्या त्याच्या साधनाच्या ६ व्या खंडाच्या प्रस्तावनेत प्रगट झालेलीं असून ती सर्वस्वीं या मताच्या विरुद्ध आहेत. ‘ ऐतिहासिक प्रस्तावना ’ पृ. ३१८ वर २७ व्या परिच्छेदात इतिहासाच्या आपल्या व्याख्येचा पुनरुच्चार

करून त्याला त्यांनीं कलमें ( ४ ) व ( ५ ) मध्यें जी पुस्ती जोडून दिली आहे तीवरून हे स्पष्ट होईल. ते म्हणतात, " ( ४ ) स्वतःच्या किंवा समाजाच्या किंवा दिशेच्या किंवा स्वकीय कालाच्या अभिमानाला पडून, कोणत्याहि प्रकारच्या पूर्वग्रहाना थारा देता उपयोगी नाहीं ... ... " ( ५ )"निर्मत्सर, तटस्थ, निरहंकार व निर्लेप वृत्तीने झाली असेल ती हकीकत प्रामाणिकपणें दिली पाहिजे." सर्वस्वीं आत्मनिरपेक्ष इतिहासाचा हा आदर्श म्हणजे त्या कालीं रूढ असलेल्या शास्त्रीय दृष्टिकोणाचा कडेलोट होय. याला कलाटणी देणारें सुप्रसिद्ध इटालियन तत्त्वज्ञ बेनेडेट्टो क्रोचे यांचें लिखाण १९०२ नंतरचें असलें तरी भाषांतर रूपानें इंग्रजींत ते १९२० नंतरच उपलब्ध झाल्यानें राजवाड्यांना त्याचा संपर्क झाला नाहीं हें साहजिकच आहे.

बेनेडेट्टो क्रोचे हा मोठा तत्त्वज्ञ होता. त्याचा ' थिअरी ॲण्ड हिस्टरी ऑफ हिस्टोरिऑग्राफी ' हा ग्रंथ त्याच दृष्टीचा आहे. त्याचें ' सर्व इतिहास हा समकालीन इतिहासच असतो' ( all history is contemporary ) हे वाक्य सिद्ध करण्याची त्याची पद्धति तत्त्वज्ञानात्मकच आहे. तथापि आपण सरळ आणि सोप्या पद्धतीने त्यातील रहस्य समजून घेण्याचा प्रयत्न करण्यास हरकत नाहीं. क्रोचेचा विचार असा मांडतां येईल.

आज आपल्यापुढें जो इतिहास येतो, त्याचीं सर्व साधने, ज्यांचा उपयोग त्यात केला जातो ते सर्व साहित्य, हें या घडीला अस्तित्वात असणारें असेंच आहे—असले पाहिजे. जें सर्वस्वीं गत झाले, नजरेआड गेले असेल त्याचा उपयोग करता येणें अशक्य. बरें या अस्तित्वात असलेल्या साधनातून जो इतिहास निवडून काढावयाचा तोहि या अन्वेषणाच्या क्षणीं प्रभावी असणाऱ्या विचारकल्पनाना धरूनच काढला जाणार. याचाच अर्थ असा कीं, कोणीहि इतिहासकार झाला तरी तो सभोंवतालच्या वातावरणापासून आपली सुटका करून घेऊ शकत नाहीं, शकणार नाहीं. आणि तसे अलिप्त राहण्याचा त्यानें मुद्दाम प्रयत्न तरी कशासाठीं करावा ! इतिहासकार या नात्यानें अलिप्त राहण्याचें त्याला तसे प्रयोजनहि नाहीं. कारण त्याच्या इतिहासलेखनाचा रास्त हेतूच मुळीं मागें स्पष्ट केल्याप्रमाणे आपली परिस्थिति व आपले अस्तित्व याबद्दल स्वतःची, समकालीनांची समजूत करून घेणें हा असला पाहिजे. अगदीं परमार्थतः कोणत्याहि घटनेबद्दल लिहीत असताना आपल्या समकालीन कल्पनांचाच आविष्कार तो करीत असतो. छत्रपति शिवाजी महाराजांबद्दल बखरींत व शिवभारतात प्रगट झालेली अवतारबुद्धि आणि अलीकडील इतिहासकारांनीं अभ्यासपूर्वक रूढ केलेली एक महान् व्यक्ति ही कल्पना या दोहोंमधील फरक कशामुळे झाला आहे, याचा सूक्ष्म विचार केला असतां क्रोचे याच्या तत्त्वज्ञानापाठीमागील व्यवहार चटकन ध्यानांत येईल.

**एक अगदीं नवी व्याख्या.**

इतिहासशास्त्रामध्ये या कल्पनेचे अलीकडे फार महत्त्व मानण्यात येते. वस्तुनिष्ठ व आत्मनिरपेक्ष अशी शास्त्रीय कल्पना आणि साधननिष्ठ परंतु आत्मसापेक्ष तात्त्विक कल्पना यातील विरोध—' फिलॉसॉफी ऑफ हिस्टरी ' या अर्नेस्ट कॅसिरेर याच्या सन्मानार्थ प्रसिद्ध झालेल्या ( १९३६ ), आणि प्रस्तुत लेखकाने कै० आपटे याच्यासमवेत वाचलेल्या स्मारक ग्रथातील जे. ह्यूझिंगा याच्या ' ए डेफिनिशन ऑफ दि कॉन्सेप्ट ऑफ् हिस्टरी ' ( इतिहास या कल्पनेची व्याख्या ) या लेखात बराच स्पष्ट केलेला आहे. त्या लेखात इतिहास हे शास्त्र आहे (History is the science .. ...) असा आरभ करणाऱ्या दोन व्याख्या विचारात घेऊनच त्याचे खडन केलेले आहे. शास्त्रकल्पना इतिहासाच्या सबधात अलीकडे रूढ झाली असल्यामुळे आपण ती वैशिष्ट्याने इतिहासाच्या व्याख्येत सामील केल्याबरोबर तत्पूर्वीचे इतिहास त्या कक्षेतून वगळावे लागतील. आणि अशा रीतीने हिरॉडॉटस, व्हिलानी किंवा मेकॉलेसुद्धा आणि आपल्याकडील पूर्वीचे अनेक लेखक इतिहास लिहीत नव्हते असे म्हणावे लागेल. आणि शास्त्रविषयक कल्पना अधिकाधिक प्रगल्भ होत जाईल त्याप्रमाणे आज शास्त्रशुद्ध समजले जाणारे इतिहास त्यानंतर टाकाऊ ठरतील यामुळे अशी सकुचित व्याख्या करणे हे बरोबर नाहीं. इतिहास हे ज्या ज्या कालात लिहिले गेले ते त्या त्या कालाच्या परिस्थितीप्रमाणे अनुरूपच होते. आणि सर्वसाधारण इतिहासामध्ये त्याचा समावेश होईल अशीच आपली व्याख्या असली पाहिजे, असा उपन्यास करून सदर विद्वान् ग्रथकारानीं इतिहास हा समकालीन ( लेखककालीन ) सस्कृतीचा एक विशेष आलोक किंवा घटना ( फेनॉमिनॉन ) आहे असे मानले आहे. लेखक म्हणतात, इतिहास म्हणजे गतकालाचे ( निःपक्षपाती ) वृत्त असे म्हटले जाते. परंतु तसे काहीं नसून इतिहास हे एका विशिष्ट गतगोष्टीचे **विशिष्ट प्रकारचे दर्शन** आहे, गतकालाच्या विशिष्ट भागाचे, ( आताच्या निरीक्षकाना ) **समजण्यासारखें चित्र** आहे. गतकालाचे सपूर्णीकरण किंवा जसेच्या तसे पुनर्दर्शन म्हणजे इतिहास नव्हे, तर आपण निश्चित केलेल्या मूल्याच्या अनुसार अतर्गत सबधाचा शोध सुरू झाला म्हणजे इतिहास निर्माण होतो. गतकालाला एका विशिष्ट प्रकारचा आकार देण्यापेक्षा आधुनिक इतिहासाला अधिक काहींच कर्तव्य नसते. इतिहासाने गतकालाबद्दल अगीकारलेले हे कार्य स्वतःला निवेदन करण्याच्या स्वरूपाचे ( a rendering account to oneself ) आहे. आता हे निवेदन कोणीं करावयाचे ? तर समकालीन सस्कृतीने. सस्कृतिसमन्वित इतिहासकाराने. प्रत्येक सस्कृति आपल्या इतिहासाचा एक स्वतत्र बनाव ठरवीत असते. हे निवेदन कशाचे करावयाचे ? तर तिला महत्त्वाच्या वाटतील त्या गतका-

लीन घटनाचे. या अर्थाने प्रत्येक संस्कृतीचे असें स्वतःचे गतकालक्षेत्र असतें. आणि म्हणूनच निरनिराळ्या संस्कृतीने निरानिराळे इतिहास निर्माण केले. या विचारात आपण शास्त्र हा शब्द वगळल्याने हानि होते काय ? नाहीं. आजचे इतिहास हे निःसंशय शास्त्रीयच असतील. कारण जगताचे ज्ञान संपादण्याचे आजच्या संस्कृतीचे साधन हे चिकित्सामय शास्त्रीयत्व हेच आहे. पूर्वीच्या दंत-कथात्मक व कल्पनाप्रचुर इतिहासाचा वाङ्मयीन दृष्ट्या अभ्यास आपण आवडीने केला म्हणून त्याना आपण आजच्या घटकेला इतिहास या दर्जाचा मान केव्हाहि देणार नाहीं.

हे विवेचन सिनॉर क्रोचे याच्या समकालीनत्वाच्या तत्त्वाला धरूनच करण्यात आले आहे यात शंका नाहीं. आणि या धोरणाला अनुरूप अशी व्याख्याहि सदर लेखकाने दिलेली आहे, ती अशी. ' **आपल्या स्वतःच्या गत-कालाचे स्वतःला निवेदन करण्यासाठी एखाद्या संस्कृतीनें त्याला दिलेला बौद्धिक आकार म्हणजे इतिहास होय.** '

**विद्वत्ताप्रचुर कोटी ही व्याख्या नव्हे.**

शास्त्रीय म्हटल्या जाणाऱ्या विश्वात संचार करणाऱ्या विद्व-त्तेच्या जगात अवतरलेली ही व्याख्या प्रस्तुत लेखकाच्या कल्पने-प्रमाणे, व्याख्या देण्याची प्रतिज्ञा करून आणि म्हणून काटेकोरपणे केलेली अगदीं शेवटची व्याख्या होय. या व्याख्येमध्ये अगदीं थोडक्यात आशय येण्या-साठी थोडे शब्द वापरण्याचा यशस्वी प्रयत्न केलेला दिसतो. पण सर्वांना म्हणून सहज समजण्याच्या दृष्टीने विचार केला तर यातील शब्दांवर कदाचित् बरीच मल्लिनाथी करावी लागेल. आणि तरीहि सर्व अर्थ स्पष्ट होईल असे नाहीं. तेव्हा पूर्वीच दिलेली थोडीशी विस्तृत व्याख्या घेऊन तिजमधील आशयात लेखकाच्या आत्मनिष्ठेचे तत्त्व तेवढे सामील केले—आणि ते निसर्गसिद्ध म्हणून साहाजिकच होय हे मानसशास्त्राच्या अगदीं साध्या विचाराने सुचण्यासारखे आहे—म्हणजे आपले काम भागेल, असे वाटते. प्रस्तुत नवी व्याख्या तशी सुटसुटीत असली तरी साधी वाटत नाही. अलंकारिक वाटते. आणि अलंकारचातुर्य हे वर्णनात शोभून दिसले तरी शास्त्र-सुलभ स्पष्टीकरणार्थ अभ्यासकाच्या तोंडीं व मनात बसवून घ्यावयाच्या व्याख्येच्या भाषेला शोभण्यासारखे नाहीं. विद्वत्तेची कोटी म्हणून ही व्याख्या वापरण्यास हरकत नसली तथापि जिज्ञासू लोकशाहीला सर्वां दिलेली व्याख्याच अधिक मानवेल असा लेखकाचा कयास आहे.

[ २ ]

येथपर्यंत इतिहासाची शास्त्रशुद्ध व्याख्या सांगण्याचे काम झाले. त्यापुढील अपेक्षित भाग म्हणजे ' जगांतील प्रसिद्ध इतिहासकाराच्या इतिहासाच्या

व्याख्यांचे सकलन आणि त्याबरोबरच तुलनात्मक विवेचन.' 'इतिहास-' कल्पने ( कॉन्सेप्ट )-संबधाचे जगातील नामांकित तत्त्ववेत्याचे विचार समजून घ्यावयास मिळाले आणि त्याचा तुलनात्मक विचार करता आला तर इति-हासाविषयींच्या आपल्या समजुतींत इष्ट अशी भरच पडेल. परंतु दुर्दैवानें, अशा काहीं नामांकित इतिहासकारानीं केलेल्या व्याख्या एकत्र करता येण्याइतके माझे जगातील प्रसिद्ध इतिहासकारासंबधीं वाचन झालेले नाहीं, ही गोष्ट कबूल केली पाहिजे. इंग्रजीव्यतिरिक्त इतर जर्मन, फ्रेंच, इटालियन अशा ज्या भाषा आहेत त्यातील विचारहि आपल्याला इंग्रजींतूनच ग्रहण करावे लागतात. आणि इंग्रजींतील भाषांतरित ग्रथातून देखील अशा तऱ्हेचा सग्रह मला करता आलेला नाहीं, अशी वस्तुस्थिति आहे. परंतु विशेष तऱ्हेचा प्रयत्न करूनहि ही गोष्ट साध्य होणारी आहे अशी माझी कल्पना नाहीं आणि त्याचीं कारणे अशीं आहेत. एकतर इतिहासकार कितीहि आणि केव्हापासून झाले असले तथापि त्याविषयींची शास्त्रकल्पना रूढ होईपर्यंत म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वी इतिहासाची पद्धतशीर व्याख्या करण्याचा कोणताहि प्रयत्न झाला असल्याचा संभव बराच कमी असला पाहिजे. आणि दुसरे असे कीं असा व्याख्या देण्याचा काटेकोर प्रयत्न कोणी केलेला आढळलाच तर तो कोणा मोठ्या इतिहासकाराने केलेला कठीण. वर उल्लेख केलेल्या जोहॅन ह्युझिंगा ह्या लीडेन विद्यापीठातील लेखकाच्या मते 'इतिहास या ज्ञानशाखेचा सूक्ष्म विचार करणारे अधिकारी लेखक त्या मूलभूत कल्पनेची स्पष्टपणे निश्चिति करण्याचा खटाटोप बहुधा टाळतातच. इतिहास ही प्रत्यक्ष घटना ( फेनॉमिनॉन ) पुरशी ज्ञात आहे असेच गृहीत धरून ते चालतात. व्याख्या ज्या सहजतेने आढळतात त्या ऐति-हासिक पद्धतीविषयींच्या हस्तपुस्तकात ( मॅन्युअल्स ) किंवा क्रमिक पुस्तकात ( टेक्स्ट् बुक्स ). ( कॅसिरेर स्मारक ग्रथ, पृ. १ )' अर्थात् ह्या व्याख्या साहजिकच दुय्यम प्रतीच्या असतात. असल्या ज्या एक दोन व्याख्या वर उल्लेखिलेल्या लेखकाने विचारासाठीं घेतल्या आहेत त्यापैकीं एक १८८९, १८९४, १९०३ आणि १९०८ अशा निरनिराळ्या आवृत्तींत उत्क्रान्त होत गेलेली आहे. म्हणजे कर्त्यालाच समाधानकारक वाटली नाहीं. व दुसरी १९२८ तील असून ती सागताना लेखकानेच 'इतिहासाच्या कल्पनेची व्याख्या कर-ण्याची मातब्बरी फार मोठी आहे असे निष्कारण जोराने प्रतिपादन करण्याचा माझा इरादा नाहीं' असे मुद्दाम स्वतःला सोडवून घेतले आहे! तीच आपल्या व्याख्येला तशी फारशी किंमत देऊ धजत नाहीं असाच याचा अर्थ होतो.

तर मग हा उद्योग—निरनिराळ्या वेळीं रूढ झालेल्या व्याख्याची तुलना करून, तद्विषयक उत्क्रांतीचा अभ्यास करण्याचा उद्योग—सोडून द्यावा काय ? मुळींच नाहीं. व्याख्या या नावाला शोभतील असे परिश्रमाने केलेले प्रयत्न

जरी आपल्याला आढळले नाहीत तथापि व्याख्येशी तुल्य अशा इतिहास-विषयक आपल्या प्रमुख कल्पना मांडण्याचा अभिनिवेश, शास्त्रकल्पनेचा उदय होण्याच्या पूर्वीच अर्थात्, कित्येकांनी दाखविलेला आहे आणि त्याची दखल आपल्याला घेता येईल. प्रत्यक्ष शब्दात स्पष्टपणे मांडून किंवा न मांडूनहि आपल्या कृतीमध्यें सर्वत्र आपल्या कल्पनेचें प्रतिबिंब पडेल अशी रचना कित्येकांनीं केलेली आहे. त्यासबधीं त्रयस्थाच्या दृष्टीने पाहून परीक्षणात्मक लिहिणें शक्य आहे. आणि तसा प्रयत्न प्रा० पुणतांबेकर यांच्या लेखात विस्तृतपणें केलेला आहेच. येथे तसा अप्रत्यक्ष प्रगट केलेला विचार न नोंदता फक्त स्पष्ट-पणे मांडलेली कल्पना तेवढीच थोडक्यात वेचून देण्याचे योजिले आहे. असें केल्याने संक्षेपाने हें काम होणार आहे.

(१) भारतवर्षांतील इतिहासलेखनाची परंपरा आजतागायत सलग राहिलेली नसली तथापि प्राचीन आहे आणि आपली कल्पना पद्धतशीर मांडली गेलेलीहि आहे. यामुळे तिचा प्रथम उल्लेख करताना आपल्याला अभिमान वाटावयास हवा.

सुमारे पाचव्या शतकातील अमरकोशात इतिहास व पुराण या दोन्ही शब्दाचे अर्थ दिले आहेत. पैकीं इतिहासविषयक कल्पनेचा उल्लेख पूर्वी केला आहे. कौटिल्यादिकांनीं इतिहासात पुराण, इतिवृत्त, आख्यायिका, उदाहरण, धर्मशास्त्र आणि अर्थशास्त्र अशा सहा गोष्टींचा समावेश करून इतिहासाचे त्या-वेळीं मानण्यात येणारे व्यापक स्वरूप दर्शविले आहे. इतिहास व पुराण हे शब्द जोडीने किंवा तत्सम संदर्भात येतात. अर्थशास्त्रात या दोन्ही प्रकारच्या ज्ञानाची शिफारस राजपुरुषासाठीं केलेली आहे. अमरकोशाप्रमाणे—

'सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वन्तराणि च । 'वंशानुचरितं चेति' असें 'पुराणं पंचलक्षणम्' ॥ आहे.

(२) ह्या प्राचीनतम परंपरेने आलेल्या कल्पनेत मनुष्यचरित्रावर (राजकीयादि) भर असून कौटिल्यादिकांनीं त्याचा उपदेशासाठींच उपयोग सांगितला आहे. सिसरो, डायोनिशिअस या युरोपातील प्राचीनांची (१५ ख्रि. पू.) आणि व्हायकौंट बोलिंगब्रोक (इ. स. १७३५) या आधुनिकांचीहि कल्पना '**इतिहास म्हणजे उदाहरणांनीं बिंबविलेलें तत्त्वज्ञान**' (History is philosophy teaching by example). यापूर्वी इतिहासाचा जो विस्तृत परिचय करून दिला आहे आणि तो विस्तृतपणा कसा अपरिहार्य आहे हें विशद करून सांगितले आहे त्यावरून ही कल्पना केवळ संकुचित आहे एवढेच नव्हे तर या प्रकारच्या इतिहासाचेहि क्षेत्र विनाकारण उपदेशविषयापुर-तेच मर्यादित करण्यात येत आहे, असें दिसेल. भारतीय कल्पनेत केवळ उदाहरण

या एकाच गोष्टीपेक्षा किती तरी अधिक गोष्टींचा समावेश झालेला आहे, ही गोष्ट विशेष ध्यानात घ्यावयास हवी. व्हा. बोलिंगब्रोक याचेच बरोबर डेव्हिड ह्यूम (१७११–१७७६) व एडवर्ड गिबन (१७३७–१७९४) अशासारख्या मोठ्या समजल्या जाणाऱ्या इतिहासकारांचीहि इतिहासाबद्दल असलीच कल्पना होती असे वाचले म्हणजे इतिहासशास्त्राविषयक कल्पना किती अलीकडची आहे हे ध्यानात येते.

(३) १७ व्या १८ व्या शतकात पूर्वोक्त अनेक कारणांनी साधनसंभार वाढला आणि चिकित्सक दृष्टि भौतिकशास्त्राच्या परिचयाने दृढ झाली. याचा परिणाम तीन तऱ्हांनी झाला. (१) उपदेश किंवा आपला आवडता सिद्धान्त प्रस्थापित करण्यासाठी इतिहासाचा अभ्यास करणे चूक आहे असे पटून इतिहासाचा इतिहासासाठी (केवळ गतकाल समजून घेण्यासाठी) अभ्यास मान्य झाला. (२) फक्त देश, व्यक्ति, समाज किंवा वरवरचे प्रसंग पाहण्याची दृष्टि सहजच निरुपयोगी ठरून नव्या साधनाचा परामर्श घेण्यासाठी दृष्टि व्यापक करावी लागली आणि (३) दुसरा म्हणतो म्हणून विश्वासून स्वीकार करण्याऐवजी प्रत्येक पुराव्याला कसोट्या लावून पाहण्याचे फार उपयुक्त तंत्र पुढे आले. आणि लिओपोल्ड फॉन रँके (१७९५ ते १८८६) या जर्मन इतिहासकाराने कै. राजवाड्यांनी गौरविलेले **अलिप्तपणाचें व निःपक्षपातीपणाचें ध्येय** दीर्घकाल इतिहासाची तपश्चर्या करून अमलात आणले. १८८१ मध्ये त्याचे संकलित लिखाण ५१ खंडाचे भरले. आणि सर्व एकोणिसाव्या शतकावर रँके आणि त्याचा गुरु नेबुहर यांची छाप होती. आपल्या देशात त्याच सुमारास उदयास आलेल्या इतिहासाच्या भक्तावर याच कल्पनेचा विशेष परिणाम झाला. अजूनहि तो तसाच राहिलेला आहे.

(४) इतिहासाच्या शास्त्रीय पद्धतींत कार्यकारण संबंधावर साहजिकच भर असतो. परंतु टॉमस कार्लाइल (१७९५–१८८१) या प्रसिद्ध रँकेच्या समकालीन वीरपूजकाला असल्या यांत्रिक खुलाशांनी महत्त्वाच्या अध्यात्मिक शक्तींना अन्याय होतो असे वाटे. दैवी चिच्छक्तीचे प्रतिनिधि म्हणजे वीरपुरुष होत. तेच सर्व महत्कृत्ये संपादतात—जग हालवितात. **अर्थात् इतिहासाचा अर्क म्हणजे या वीरपुरुषांचीं चरित्रें.** (Biography is the essence of history.) १८४५ त प्रकाशित झालेल्या आपल्या 'लाइफ अँड लेटर्स ऑफ क्रॉमवेल' या ग्रंथात कार्लाइलने आपल्या या म्हणण्याचे सूत उवाच केले आहे. परंतु लोकशाहीच्या युगामध्ये कार्लाइलचें हे म्हणणे टिकले नाहीं. त्याच्या हयातीतच त्याला प्रखर विरोध झाला, आणि त्यानें चिडखोरपणाने लोकशाहीवर बेछूट हल्ले करून जरी त्याचा सोबदला घेतला असला, तथापि कार्लाइलचे हे म्हणणे लोकमान्य झाले नाहीं.

आणि (५) प्रत्येक बारीक सारीक गोष्टीचा समावेश करण्याचें ध्येय हें शास्त्रपूत समजण्यात आले. इग्लडमधील मेकॉले (१८००–१८५९) हा लेखक हा या उलट प्रवृत्तीच्या लेखनाचा पुरस्कर्ता म्हणून दाखविता येईल. १६८८ पासून १७६० पर्यंतचा ७२ वर्षांचा इतिहास लिहिण्याची प्रतिज्ञा करून हे राजश्री उद्योगाला लागले. १८४८ ते १८६१ पर्यंत अतरा अतरानें फक्त ५ खंड प्रसिद्ध झाले. त्यापैकीं एक मरणोत्तर झाला. आणि या तेरा वर्षांत फक्त १७०० पर्यंतचा म्हणजे १२ वर्षांचा इतिहास कसावसा सपला! एकाने गमतीने असे गणित केले आहे कीं, या थाटात यापुढील कालाच्या सर्व साधनाचा परामर्श घ्यावयाचा तर आणखी शभर वर्षे मेकॉलेला जगायला पाहिजे होते, आणि इतिहासाचे ४० खड आणखी छापायला झाले असते. फक्त वीरांची चरित्रे सागणे हे जसे एक टोक तसेच हे दुसरे. आणि या जडजंबालातून हातास काय लागणार असा प्रश्न उपस्थित झाल्याने साहजिकच इतिहासाच्या उपयोगाच्या दृष्टीने इतिहासाचे क्षेत्र मर्यादित करण्याची कल्पना ई० ए फ्रीमन (१८२३–१८९२) व सर जॉन सीली (१८३४–१८९५) यानीं रूढ केली.

(६) काहीं काळ 'इतिहास म्हणजे गतकालीन राजकारण होय आणि म्हणून (आजचे) राजकारण हा चालू इतिहास होय' (History is past politics; politics is present history) हे इतिहासविषयक घोषवाक्य प्रचलित होते. कै. राजवाड्यानीं याची रेवडी उडविली आहे. (ऐतिहासिक प्रस्तावना पृ. ३०६–३०७). एक तर इतिहासात चालू आणि मागचा असा भेद करणे अशास्त्रीय आहे. आणि दुसरे राजकारण म्हणजे सकुचित अर्थाचे राजकारण याशिवाय इतिहासात दुसरे काहींच नाहीं हे म्हणणे अत्यंत असत्य आहे. या म्हणण्याचा पुरस्कार करणारा कोणीहि प्रतिष्ठित इतिहासकार दरबारी कागदाशिवाय इतर कागद हातातच धरीना. राजपुरुषाच्या, पार्लमेंटच्या सभासदासाठीच जणू इतिहास लिहिला जावा असे व्यवहारतः मानणाऱ्या (७) या मताविरुद्ध लॉर्ड ॲक्टन् यानीं १८९५ त ठणठणीत असे घोषित केलें कीं, "सरकारदरबारच्या व्यवहाराच्या फार पलीकडे, कोणत्याहि राज्ययंत्राच्या वर्चस्वाबाहेर असा इतिहासाचा मामला आहे. कल्पनाच्या गति-प्रगतीवर लक्ष ठेवणे, त्यावर नियत्रण ठेवणे हे आमचे कार्य आहे. आणि या कल्पना कोणत्याहि लौकिक घडामोडींचे परिणाम नाहींत, तर या कल्पनाच्यामुळें असल्या घडामोडी आकाराला येतात."

(८) इतिहासाचा एवढा व्यापक प्रात दिग्दर्शित झाला तरी देखील सर्वच्या सर्व विस्तृत साधनाचा परामर्श घेण्याचे काम कठीण असल्यामुळे आणि

जगताच्या घडामोडींमागील एकच एक सूत्र शोधून काढण्याच्या साहजिक मोहामुळे इतिहासाचे सूत्रीकरण अनेकविध प्रकारे करण्यात आल्याचे दिसते. हे प्रकार आधुनिक प्रगत विचाराचे प्रतीक म्हणून बहुधा सर्वांच्या परिचयाचेच आहेत. **इतिहासापाठीमागील आर्थिक किंवा भौतिक सूत्राला** ( Economic or materialistic conception of history ) मार्क्सप्रणीत समाजवादाने बरीच प्रसिद्धि दिलेली आहे. एकोणिसाव्या शतकाचा प्राणच म्हणता येईल तो उत्क्रान्तिवाद इतिहासाच्या चोकाटीं बसवून हेगेलने इतिहासात स्वातंत्र्याच्या कल्पनेची अखंड वाढ क्रमशः होत असल्याचे दृश्य पाहिलें. आणखीहि अनेक कल्पना इतिहासात बसवून त्याचा प्रचार होत आहे आणि पुढेहि होत राहील. हे सर्व एकांतिक वर्णनाचे प्रकार आहेत. व्याख्यापद मिळविण्याची त्याची पात्रता नाहीं. कारण वस्तुस्थिति अशी आहे कीं इतिहासाचा विस्तार फार मोठा आणि सर्वव्यापी आहे. त्याच्या अफाट आवारात कोणत्याहि कल्पक माणसाला आपलें एखाद नव्या किंवा जुन्याच कल्पनेचें घरकुल उठविण्यास मुळींच हरकत नाहीं. आणि अशा गोष्टीला प्रत्यवाय तरी कसला असणार ! वर सांगितलेले आणि याशिवायहि अन्यत्र पाहावयास मिळणारे अशा प्रकारचे सर्व विचार हे एका दृष्टीनें इतिहासातच बसणारे असले तरी त्यावर संकुचितपणाचा शेरा मारावाच लागेल. आणि इतिहासाची खरीखुरी व्याख्या फारच उदारपणाने करावी लागेल. इतिहासात हेहि येते, पण याहून पुष्कळच अधिक येते असे प्रत्येकाला सांगता येण्यासारखे आहे. अगदीं आरंभापासून एकोणिसाव्या शतकाच्या अंतापर्यंत राजकीय इतिहासालाच प्राधान्य मिळे. थुसिडिडेसचे सोडून द्या. त्याने अथेन्स, स्पार्टा यांच्या सांस्कृतिक चळवळींचा व आर्थिक अडचणींचा परामर्श घेतला नाहीं, ते त्याचे अज्ञान म्हणून म्हणता येईल. परंतु आदर्श इतिहासकार रँके यानेहि तीच चूक करून इतिहासाला संकुचित राजकारणाच्या गायमुखातूनच वाहू दिले. इंग्लंडमधील फ्रीमन-सीली या जोडीचे ते प्रसिद्ध घोषवाक्य वर उद्धृत केलेच आहे. या इतक्या शतकात जी गोष्ट झाली नाहीं ती विसाव्या शतकात अल्पावधींत दृढमूल झाली हा नव्या युगाचा प्रभावच म्हटला पाहिजे. एकोणिसाव्या शतकातच शेवटीं शेवटीं संशोधनाला बंधनें घालणाऱ्या कल्पनांचा अंत झाला आणि आता इतिहासाच्या क्षेत्राच्या बाहेर किंवा दर्जाला विसंगत काहींच राहिलेले नाहीं. मनुष्याच्या सर्व कृति, सर्व अडचणी, आपत्ति इतिहासाचाच विषय आहेत. यापुढेहि जाऊन आता असाहि साक्षात्कार झाला आहे कीं, इतिहासकार असा सर्वव्यापी फेरफटका न करतील तर त्यांनीं विशेष अभ्यास करून म्हणून जरी काहीं सांगितले तरी ते संदर्भहीन, असंबद्ध म्हणजे विकृतच ठरणार. इतिहास हा आता एकलकोंडा सोवळा विषय राहिलेला नाहीं. 'समाजाचे शास्त्र' ज्या अनेक अभ्यास-

विषयानीं बनते त्या विषयात इतरांच्या बरोबरीनेच इतिहासाला बसले पाहिजे. लायपझिगचा इतिहासकार कार्ल लॅम्प्रेक्ट याचें नाव या नव्या समाजशास्त्रीय कल्पनेशीं कायमचें निगडित झालेले आहे.

आता इतिहासाचे बरोबरीने समाजाचे अभ्यासात अर्थशास्त्र, भूविज्ञान, मानववंशशास्त्र व पुराणवस्तुशास्त्र हीं सर्व अहमहमिकेने भाग घेताना आढळतात. त्यानीं आपआपल्या विशेष क्षेत्रात अमर्याद प्रगति केली आहे. एवढेंच नव्हे तर परस्पराच्या सहकार्याने परस्पराचे अनेक प्रश्न सोडवून एकमेकाचीं क्षेत्रेहि वाढविलीं आहेत. इतिहासाच्या कोणत्याहि व्याख्येच्या कक्षेत या सर्वांचाहि प्रपंच पडतो. म्हणून कोणत्याहि काटेकोर शब्दयोजनेने संकुचितपणा येऊं देण्यापेक्षा इतिहासाच्या व्याख्येंत लवचिकपणा ठेवणेच इष्ट ठरते. कारण समाज या कल्पनेला आणि समाजाच्या अभ्यासाच्या अंगणाला मर्यादा कोणी आणि कशी घालावी?

[ हा विषय बराच गुतागुतीचा आहे. या विषयाचा मराठीमध्ये संपूर्ण परामर्श घेतल्याचे माझ्या पाहण्यात नाहीं. व्याख्या देण्यासाठीं म्हणून लिहिलेले जे इंग्रजींतील लेख मी वाचले तेहि तसे पूर्णपणे मार्गदर्शक वाटले नाहींत. यामुळे त्या सर्वांचे वाचन करून, केवळ मराठींतून ह्या कल्पना समजून घेण्याची इच्छा करणाऱ्या माझ्या बांधवासाठीं जसे मला सुचले तसे लिहिले आहे. ह्या विषयाला हात घालण्यापूर्वी इतर अवांतर किती तरी गोष्टी पाहिलेल्या असाव्या लागतात, याची जाणीव असल्यामुळेच अनेक गोष्टींचा उल्लेख लेखात मी बुद्ध्याच केला आहे. लेखात ठिकठिकाणीं संदर्भ दिले आहेत. इंग्रजी जाणणाऱ्याना मी देऊ शकेन त्यापेक्षा किती तरी इतर संदर्भ आठवतील आणि मराठी वाचकाना यादी देऊनहि तिचा उपयोग करता येणार नाहीं म्हणून यादी दिलीच नाहीं. या लेखातील सर्वच माहिती इतर कोठून तरी घेतलेली आहे, हे उघड आहे. तेव्हा त्या सर्व लेखकाचे व ग्रंथकाराचे प्रकट आभार मानितो.. —लेखक. ]



# विरोधविकासी भौतिकवाद्

## आणि

# इतिहासमीमांसा

### लेखक—आचार्य श. द. जावडेकर

या लेखात मार्क्सच्या इतिहासमीमांसेचा थोडक्यांत विचार करावयाचा आहे. ही इतिहासमीमांसा विरोधविकासी भौतिकमीमांसा (Dialectical materialistic interpretation of history) या नावाने प्रसिद्ध आहे. कोणी तिला केवळ भौतिक इतिहासमीमांसा (materialistic interpretation of history) एवढेच म्हणतात, पण विरोधविकासी भौतिकवाद हा एक भौतिकवादाचा विशिष्ट प्रकार आहे हे लक्षात घेतल्यावाचून मार्क्सच्या विशिष्ट तत्त्वज्ञानाचा व विशेषतः इतिहासमीमांसेचा स्पष्ट उलगडा व यथार्थ आकलन होऊ शकणार नाहीं. नुसती भौतिक इतिहासमीमांसा म्हटल्याने मानवी इतिहासावर, समाजाच्या घडामोडींवर व सांस्कृतिक प्रगतीवर, त्याच्या भौगोलिक परिस्थितीचा कसा परिणाम झाला आहे, त्याचे विवेचन करणारी अथवा भौगोलिक परिस्थितींचे निरनिराळ्या समाजातील संस्कृतींवर जे सतत परिणाम घडत असतात, त्यावरून त्यांचे उच्च-नीचत्व किंवा पुरोगामी-प्रतिगामित्व अथवा इतर कोणतेहि वैशिष्ट्य उलगडून दाखविणारी मीमांसा असाहि बोध होऊ शकतो. बकलप्रभृति इतिहासकारांनीं या मीमांसेचा उपयोग केलेला आहे. पण केवळ भौगोलिक परिस्थितीच्या आधारें समाजाच्या संस्कृतींच्या विकास—विनाश अथवा वैशिष्ट्य याचा उलगडा होऊ शकतो हें मत मार्क्सवादाला मान्य नाहीं. मार्क्सवादी इतिहासमीमांसेत केवळ भौगोलिक परिस्थितीस इतके महत्त्वाचे स्थान दिलेले नाहीं. समाजाच्या इतिहासावर केवळ भौगोलिक परिस्थितीचे जे परिणाम घडतात त्याहून त्याच्या आर्थिक घटनेचे परिणाम अधिक महत्त्वाचे घडतात असे मार्क्सवादाचे मत आहे. मनुष्यसमाज हा केवळ भौगोलिक परिस्थितीचा गुलाम नाहीं, तर तो आपल्या ज्ञानाने आणि उद्योगाने या भौगोलिक परिस्थितीवर आपले प्रभुत्व प्रस्थापित करण्याचे प्रयत्न करीत असतो. मानवाच्या या प्रयत्नातूनच त्याचा इतिहास घडत असतो. केवळ भौगोलिक परिस्थितीवरून मानवाचे भवितव्य ठरत असेल, तर मानवी प्रयत्नास वा कर्तृत्वास मुळींच अवसर मिळणार नाहीं. तसेच एकाच भौगोलिक परिस्थितींत हजारो वर्षे नांदणाऱ्या समाजात जे मूलभूत फेरबदल घडून येतात व क्रांत्या

घडतात, त्याचा उलगडा होण्याच्या दृष्टीने ही भौगोलिक मीमांसा उपयोगी पडूं शकत नाहीं. उदाहरणार्थ, हिंदुस्थानात जे आर्य लोक येऊन हजारो वर्षे राहिले आहेत, त्याच्या संस्कृतींत व समाजघटनेत या काळात ज्या घडामोडी झाल्या त्याची कार्यकारणमीमांसा या काळात प्रायः स्थिर असणाऱ्या भौगोलिक परिस्थितीच्याच केवळ आधाराने करता येणे शक्य नाहीं.

मार्क्सवादाने आपल्या इतिहासमीमांसेत समाजाच्या आर्थिक घटनेस अग्रस्थान दिलेले आहे. समाजाची जीवितयात्रा त्याच्या आर्थिक घटनेवर अवलंबून असते म्हणजे समाजजीवनास लागणारी भौतिक संपत्ति उत्पन्न होणे हे त्याच्या आर्थिक घटनेवर अवलंबून असते. व्यक्तीच्या जीवनात शरीर धारणेला जे महत्त्वाचे स्थान आहे तेच महत्त्वाचे स्थान समाजजीवनात त्याच्या आर्थिक घटनेला आहे. धनोत्पादनाचे कार्य सतत चालू राहावें लागते, इतकेच नाहीं तर समाजातील भौतिक संपत्तींत एकसारखी वाढती भर पडत राहणे, हा त्याच्या सर्वांगीण विकासाचा भौतिक आधार आहे असे म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. समाजाची जीवनशक्ति भौतिक धनोत्पादनाच्या कार्यात जितकी व्यय पावेल, तितकी ती त्याच्या इतर अंगाच्या विकासास उपयोगी पडू शकत नाहीं. अर्थात् समाजजीवनास आवश्यक अशा भौतिक धनोत्पादनातील प्रगतीवर त्याच्या संस्कृतीच्या इतर अंगाचा विकासहि अवलंबून राहावा हे साहजिकच आहे. हे भौतिक धनोत्पादनाचे कार्य योग्य प्रकारे चालू राहून त्याची वाढ व्हावी, हे समाजाच्या आर्थिक घटनेचं उद्दिष्ट कार्य आहे. धनोत्पादन करीत असता त्या कार्यात निरनिराळ्या व्यक्तींचे परस्परांशीं आर्थिक संबंध निर्माण होत असतात; निरनिराळ्या व्यक्तींचे व वर्गांचे आर्थिक व्यवहार हे आर्थिक संबंध निर्माण करतात, आणि ते संबंध योग्य प्रकारे चालू राहतील अथवा त्याना योग्य स्वरूप प्राप्त झालेले असेल, तरच त्या समाजातील आर्थिक व्यवहार सुरळीतपणे चालू राहतील व समाजाच्या धनोत्पादनकार्याची वाढ होत राहील. याच्या उलट हे आर्थिक संबंध योग्य प्रकारचं नसतील तर त्या संबंधामुळे समाजातील आर्थिक व्यवहारात बिघाड होईल, ते व्यवहार समाजावर अरिष्टे ओढवून घेऊ लागतील आणि त्या व्यवहारावर उभारलेल्या आर्थिक घटनेमुळे समाजाच्या संपत्तींत भर पडण्याऐवजीं त्याच्या आपत्तींत भर पडू लागेल. अशा वेळीं त्या समाजातील आर्थिक व्यवहार ज्या शास्त्रानुसार चालले असतील ते शास्त्र अर्थशास्त्र न ठरता अनर्थशास्त्र ठरूं लागेल. या आर्थिक अरिष्टातून, आपत्तींतून अथवा अनर्थपरंपरेतून समाजाची मुक्तता होण्यास त्याचे आर्थिक व्यवहार निरनिराळ्या तत्त्वावर चालू राहण्यास योग्य असे नवे आर्थिक संबंध स्थापन व्हावे लागतात. समाजाच्या आर्थिक व्यवहाराना नियंत्रित करणारे सामाजिक संबंध बदलून ते नव्या

तत्त्वानुसार म्हणजे पूर्वीच्या तत्त्वाहून भिन्न तत्त्वावर चालू करणें म्हणजेच समाजाच्या आर्थिक घटनेत आमूलाग्र क्राति करणे होय. आर्थिक घटनेत क्राति घडताना व घडून आल्यानतर समाजाच्या सस्कृतींत एक सर्वांगीण क्राति घडत असते किंवा घडावी लागते. मानवी समाजघटनेत अशी एक सर्वांगीण क्राति घडून येण्याचा काळ आज आला असून या क्रातीस 'समाजवादी' असे नाव मार्क्सवादी देत असतात. ही एक जागतिक क्राति असून सर्व जगांत समाजवादी सस्कृति स्थापन होईपर्यंत आजच्या मानवसस्कृतीवर क्रात्या व युद्धें याची जी अनर्थपरपरा ओढवत आहे तिला खड पडणार नाहीं असे मार्क्सवादाचे मत आहे. हे त्याचे मत इतिहासाच्या विरोधविकासी भौतिक मीमासेवर आधारलेले आहे. ही विरोधविकासी भौतिक मीमासा मार्क्सला समाजवादी क्रातीचा विचार करीत असता सुचली आणि या मीमासेच्या आधारेच त्याने समाजवादाला शास्त्रीय स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. सामाजिक घटनाशास्त्र आणि सामाजिक क्रातिशास्त्र या दोहोतहि या मीमासेने महत्त्वाची भर घातलेली असून इतिहासमीमासकाना एक नवी शास्त्रीय दृष्टि प्राप्त करून दिलेली आहे. अर्थात् इतिहासमीमासा शास्त्रातहि तिच्यामुळे महत्त्वाची भर पडलेली आहे.

## विरोधांतून विकास आणि विकासांतून विरोध

आता समाजाच्या आर्थिक घटनेत विरोध का व कसे निर्माण होतात आणि त्या विरोधातूनहि समाजाचा विकास होणे कसे शक्य असते, यासबधीं मार्क्सच्या मताचा विचार करू. मनुष्याच्या भौतिक ज्ञानामुळे त्याला निसर्गाच्या साहाय्याने भौतिक धन निर्माण करून उपभोगता येते. या ज्ञानात जशी भर पडत जाते तशी त्याची धनोत्पादन शक्ति वाढत जाते. पण मनुष्य हा समाजसस्थेच्या साहाय्यावाचून आपल्या धनात व ज्ञानात भर टाकू शकत नाहीं. किंबहुना समाजावाचून त्याच्या जीविताचे सरक्षण व सवर्धनहि तो करू शकत नाहीं. त्याचे सर्व जीवन समाजजीवनात गुरफटलेले असते. आणि हे समाजजीवन धनोत्पादन कार्यावर आधारलेले असते. या उत्पादनकार्यासाठीं समाजात निरनिराळ्या व्यक्तींत व वर्गांत उत्पादनसबध ( Productive relations ) निर्माण होत असतात. या उत्पादनसबधाना योग्य वळण लावून समाजाच्या उत्पादनशक्तीचा विकास व्हावा अशी व्यवस्था करण्यासाठीं जे नियम, रूढी, कायदे, नीति अथवा धर्म अस्तित्वात येतात, ती सर्व त्या समाजाची आर्थिक घटना होय. सामाजिक रूढी, राजकीय कायदे, धार्मिक बधने या सर्वांना समाजजीवनास आधारभूत असणारी ही आर्थिक घटना रक्षण करणे इष्ट वाटत असते. आणि हिच्या रक्षणासाठीं सर्व सामाजिक सस्था आपल्या प्रयत्नाची शिकस्त करीत असतात. यासाठीच कोणी कोणतीं कामे करावीत, त्या कामा-

बद्दल कोणास किती मोबदला मिळावा, कोणत्या वस्तूंना किती मोल किंवा किंमत मिळावी अथवा द्यावी, कोणत्या वस्तू व्यक्तीच्या मालकीत असाव्यात व कोणत्या समाजाच्या मालकीत असाव्यात, व्याज, खड, नफा, वेतन यासबधी कोणते नियम लोकानी पाळावे, अशासारखे अनेक नियम धनोत्पादनाच्या कार्याची वाढ व गुतागुंत होत जाईल, त्या मानाने समाजात निर्माण होतात. संपत्ति मिळविणे, तिचा सग्रह करणे, तिचा विनिमय करणे आणि तिचा उपभोग घेणे, इत्यादि व्यवहारातून मालमत्तेचा कायदा अस्तित्वात येतो, आणि त्याचे रक्षण, नियमन अथवा नियत्रण समाज, राज्य, धर्म या सस्था करीत असतात.

ज्या वेळी समाजाच्या भौतिक ज्ञानात भर पडून नवी उत्पादनपद्धति स्थापन होते, तेव्हा नवे आर्थिक व्यवहार अस्तित्वात येतात. किंवा जुनेच व्यवहार फार मोठ्या प्रमाणावर होऊ लागल्याने त्याचे समाजावर होणारे परिणाम, भिन्न बनतात. अशा प्रकारे आर्थिक व्यवहाराचा प्रकार बदलला म्हणजे आर्थिक उत्पादनसबध बदलू लागतात. जे व्यवहार पूर्वी न्यायाचे वाटत असतात किंवा ज्या व्यवहारापासून फारच अल्प अन्याय होईल असे वाटत असते, ते अन्यायाचे वाटू लागतात किंवा त्याच्यापासून कोणावर तरी घोर अन्याय होत आहे असा अनुभव येऊ लागतो. जेव्हा पूर्वापार न्याय्य मानिलेल्या व्यवहारातून अन्याय होत आहे अशी ओरड ऐकू येते व ती एकसारखी वाढत जाते त्या वेळी समाजाच्या आर्थिक घटनेत काही तरी मूलभूत फरक झालेले आहेत, असे अनुमान करून ते खरे आहे किंवा नाही याचे निरीक्षण व परीक्षण करावे लागते. हे फरक मनुष्याच्या उत्पादनशक्तीत वाढ झाल्याने नित्य थोडे फार घडतच असतात, पण जेव्हा ही वाढ फार मोठ्या प्रमाणावर होऊन उत्पादनाचे नवे प्रकार अस्तित्वात येतात, नवे नवे आर्थिक व्यवहार व आर्थिक संबंध निर्माण होतात आणि त्याची संकीर्णता एकदम वाढते तेव्हा जुनी आर्थिक घटना विकृत बनते आणि न्यायाचा अन्याय बनू लागतो. आर्थिक घटनेत नवा प्रकार अस्तित्वात आल्याचा हा परिणाम असून ती आर्थिक घटना मोडून नवी अधिक न्यायी घटना निर्माण करण्याचा क्रातिकाळ या वेळी प्राप्त झालेला असतो.

पण ही आर्थिक घटनेतील अभिप्रेत क्राति समाजातील सर्वच वर्गांना सारखीच प्रिय किंवा लाभदायक नसते. काहींना जुनी आर्थिक घटना चालू राहावी आणि सर्व आर्थिक व्यवहार परपरागत पद्धतीनेच चालत राहावेत असे वाटत असते, तर याच्या उलट इतराना हे व्यवहार निराळ्या तत्त्वानुसार चालू लागले नाहीत तर आपली धडगत लागणार नाही, असा अनुभव येऊ लागतो. अशा वेळी परंपरावादी आणि क्रातिवादी असे दोन पक्ष निर्माण होतात. क्रातिवादी

व प्रतिक्रांतिवादी अशा दोन विचारसरणी पुढे येतात. ज्याना परंपरागत उत्पादन-संबंध फायदेशीर व रक्षणीय वाटतात ते परंपरावादी अथवा प्रतिक्रांतिकारक बनतात आणि ज्याना ते संबंध अन्यायाचे व विध्वंसनीय वाटतात ते प्रगतिवादी किंवा क्रांतिकारक बनतात. या मतविरोधाच्या रूपाने समाजातील निरनिराळ्या वर्गांचे हितविरोध अथवा स्वार्थविरोध प्रकट होत असतात. या मतविरोधाचा, हित-विरोधाचा अथवा स्वार्थसंघर्षांचा उगम उत्पादनकार्यात जो फरक पडलेला असतो त्या फरकातून झालेला असतो. समाजाच्या उत्पादनशक्तीच्या विकासातूनच हा विरोध अथवा संघर्ष निर्माण होतो असे म्हणता येईल. याप्रमाणे समाजातील उत्पादनशक्तीच्या विकासातून सामाजिक वर्गविरोध जन्मास येतो हे दिसून येईल.

आता या वर्गविरोधातून समाजाच्या उत्पादनशक्तींचा व एकंदर समाज-जीवनाचा विकास कसा होतो, त्याचा विचार करू. 'उत्पादनशक्तींचा' (Productive forces) विकास होऊन त्या विकासास अनुरूप आणि पोषक असे 'उत्पादनसंबंध' (Productive relations) निर्माण झाले नाहीत, म्हणजे एक संघर्ष निर्माण होतो, याच संघर्षास 'उत्पादनशक्ति' आणि 'उत्पादनसंबंध' यांच्यामधील झगडा असे नाव मार्क्सवादी देत असतात. जुन्या आर्थिक घटनेच्या आवरणाखाली नव्या प्रबळ शक्तींचा विकास होत नाही. आणि म्हणून जुन्या आर्थिक घटनेचे आवरण तरी तोडून टाकिले पाहिजे किंवा नव्या शक्तींचा विकास थांबून विनाश तरी झाला पाहिजे, असा एक पेच निर्माण होत असतो; हा पेच तुटला नाही म्हणजे समाजाची आर्थिक घटना कोसळून पडू लागते. ती कोसळून पडू लागली म्हणजे राज्य व धर्म या संस्था तिला सावरून धरण्याचा प्रयत्न करू लागतात आणि तिच्याबरोबर त्या राज्य व धर्मसंस्थाहि कोसळून पडू लागतात व समाजात सर्वांगीण क्रांति यशस्वी होते. असा मार्क्सच्या विवेचनाचा मथितार्थ आहे. ज्या वेळी सरजामशाही समाज-घटना कोसळून पडली, तेव्हा भांडवलशाही उत्पादनशक्ति वाढीस लागली होती आणि सरंजामशाही युगातील 'उत्पादनसंबंध' म्हणजे मालमत्तेचे व आर्थिक व्यवहाराचे नियंत्रण करणारे जुने कायदे या वाढीस अडथळा करीत होते म्हणून ती सरंजामशाही समाजघटना मोडून पडली व समाजात एक सर्वांगीण क्रांति घडून आली असे मार्क्सला दिसून आले. सरंजामशाहीचा अंत आणि भांडवल-शाहीचा उदय या वेळी जी क्रांति पश्चिम युरोपात घडून आली, ती भांडवलशाही क्रांति मार्क्सच्या वेळी म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास सर्व युरोपात व युरोपेतर जगात पसरू लागली होती. भांडवलशाही, साम्राज्यशाही आणि भांडवलदार लोकशाही हे एक मानवसंस्कृतीतील नवे युग असून त्या

युगात जी संस्कृति निर्माण झाली व जी समाजघटना अस्तित्वात आली तिचा उगम नव्या उत्पादनशक्तींत असून तिची पुढील वाढ होण्यासही भांडवलशाही संस्कृति आता अडथळा करीत असल्याने तिचा अंतकाळ नजीक आला आहे, असे भविष्य मार्क्स व एञ्जल्स् यांनीं एकोणिसाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास वर्तविले. भांडवलशाहीचा उदय आणि वाढ होताना सरंजामदार व भांडवलदार या वर्गांचा कलह चालू होता. त्या वेळीं सरंजामदार हा प्रतिगामी व भांडवलदार हा पुरोगामी वर्ग होता. पुढे पुरोगामी भांडवलदारवर्गाचा विजय होऊन भांडवलशाही संस्कृति विजयशाली झाली. पण हा विजय होताच तिचा विनाश सुरू झाला आहे. भांडवलदारवर्गाबरोबरच कामगारवर्गाचा उदय झाला व तो कामगारवर्ग संघटित होऊन भांडवलदारवर्गाच्या विरुद्ध भांडू लागला आहे. भांडवलशाही युगात जीं सामाजिक ध्येये निर्माण झालीं, तीं ध्येये आपल्या उन्नतीस पुरीं पडत नाहींत असे पाहून कामगारवर्ग समाजवादी-संस्कृतीचे ध्येय पुकारू लागला आहे. भांडवलदार विरुद्ध कामगार असा वर्ग-कलह आज निर्माण झाला असून कामगारवर्गाला विरोध करण्यासाठीं जमीन-दार व भांडवलदार एक होत आहेत. या नव्या वर्गकलहातून समाजसत्ताक क्रांति होणार असून ती यशस्वी करण्यासाठीं सर्व जगातील कामगार हळूहळू एक होतील व भांडवलशाही संस्कृतीचीं बंधने तोडून टाकतील असे मार्क्सचे म्हणणें आहे. मार्क्स व एञ्जल्स् यांनी १८४७ मध्ये भविष्य वर्तविले त्याला आज एक शतक झाले. या शतकातील मानवसंस्कृतीचा इतिहास पाहिल्यास त्याचे भविष्य स्थूलमानाने तरी बरोबर असल्याचे प्रत्येक निःपक्षपाती विद्वानास मान्य करावें लागत आहे. यावरून मार्क्सने ऐतिहासिक घडामोडींची जी विरोधविकासी भौतिक मीमांसा मांडली तिच्याकडे इतिहासशास्त्रज्ञाचे व समाजशास्त्रज्ञाचे लक्ष जोरानें वेधिले गेले आहे. विशेषतः १९१७ सालीं रशियात समाजसत्ताक क्रांति मार्क्सवाद्यांनीं यशस्वी केल्यानंतर या मीमांसेचा अधिक खोल अभ्यास सुरू झाला आहे.

### हेगेल, सेंट सायमन आणि मार्क्स.

मार्क्सवादी इतिहासमीमांसेचा विचार करीत असतां त्याचे प्रतिस्पर्धी कोण होते व कोणत्या विचारसांप्रदायांना उद्देशून त्याने आपली मीमांसा प्रतिपादिली आहे, त्याचा आपण विचार केला पाहिजे. मार्क्स हा एके काळीं हेगेल सांप्रदायाचा अनुयायी होता. विरोधविकासाचे तत्त्व तो हेगेलपासून शिकला व ते आत्मसात् केल्यानंतर त्याने त्या तत्त्वास भौतिक स्वरूप दिलें. त्याचप्रमाणे सेंट सायमन प्रभृति फ्रेंच समाजवाद्यांपासून तो समाजवाद शिकला आणि त्यांच्या विचारातील अशास्त्रीय भावनावशता काढून टाकून त्यानें

आपल्या भौतिक विरोधविकासी दृष्टीनें समाजवादाला शास्त्रीय स्वरूप दिलें. म्हणून हेगेलसारखे अध्यात्मिक विरोधविकासवादी (Spiritual Dialecticians) आणि सेंट सायमनसारखे भावनावश समाजवादी (Utopian Socialists) या दोहोंचेहि विचारसंप्रदाय खोडून काढून त्यानें आपला विरोधविकासी भौतिकवाद (Dialectical materialism) हा संप्रदाय प्रस्थापित केला. हेगेल हा अध्यात्मवादी होता आणि समाजाचा विकास विरोधातून होतो असे तो मानीत असे. पण हा विरोध म्हणजे मतविरोध असे तो मानी. मानवसमाजाची नैसर्गिक प्रवृत्ति एका विशिष्ट दिशेनें होत आहे. ही दिशा म्हणजे सर्व मानवाचा मोक्ष, आत्मप्राप्ति अथवा आत्मिक स्वातंत्र्य हीच होय असे तो म्हणतो. मानवसमाजाला आत्मोन्नती करता यावी व आत्मप्राप्तीचा मोक्ष सर्वांस लाभावा यासाठींच राज्यसंस्थेचा उद्भव झालेला आहे. या राज्यसंस्थेचीं बंधनें पाळणे हे आपले नैतिक व अध्यात्मिक कर्तव्य आहे. राज्यसंस्थेचीं स्वरूपे व घटना यासंबंधीं निरनिराळी मते निर्माण होऊन त्याबद्दल वाद होतात व त्यातून आदर्श राज्यघटना निर्माण होत असते. अन्यायी राज्यपद्धति मागे पडून न्यायी राज्यपद्धति यशस्वी होतात आणि या ऐतिहासिक घडामोडींतून न्यायाचा, सत्याचा व स्वातंत्र्याचा विजय होत असतो. या ऐतिहासिक घडामोडी म्हणजे मानवी समाजाच्या अंतरात्म्याची आत्मस्वरूपप्राप्तीची धडपडच होय असे म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. या धडपडींत जीं नवीं नवीं सामाजिक ध्येये अथवा विचार निर्माण होतात, त्याना मानवबुद्धि सिद्धान्ताचे स्वरूप देत असते. पण कोणत्याही सिद्धान्ताच्या उद्भवाबरोबर त्याचा विरोधी असा प्रतिसिद्धान्तहि जन्मास येत असतो. यानतर काहीं काल हा सिद्धान्त व प्रतिसिद्धान्त याच्यात द्वंद्व निर्माण होते व ते एकमेकास नष्ट करण्याचा प्रयत्न करतात. अखेरीस या विरोधातून या दोहोंहून भिन्न पण दोहोंतीलहि सत्यांशाचा समावेश करून घेणारा तिसराच समन्वयसिद्धान्त निर्माण होतो, व हे द्वंद्व, हा विरोध अथवा हा लढा काहीं काळ स्थगित होतो. पण हा नवा समन्वयरूप सिद्धान्तहि पूर्ण सत्य, पूर्ण न्याय, किंवा पूर्ण स्वातंत्र्ययुक्त असूं शकत नाहीं. पुन्हा तो अपूर्ण आहे याची जाणिव होऊन तद्विरोधी प्रतिसिद्धान्त निर्माण होतो. यातून पुन्हा सिद्धान्त (Thesis), प्रतिसिद्धान्त (Antithesis) आणि समन्वयसिद्धान्त (Synthesis) हीं विचाराचीं आंदोलनें मानवी बुद्धीला बसूं लागतात. या विचाराच्या आंदोलनांतून किंवा हेलकाव्यातून मानवसमाजाची प्रगति होत असते. मानवसमाजसंघटनेसंबंधींच्या विचाराच्या या हेलकाव्यांमुळेच निरनिराळ्या क्रान्त्या व ऐतिहासिक घडामोडी होत असतात आणि या घडामोडींतून मानवाचा किंबहुना विश्वाचा अंतरात्मा आपले नित्य, शुद्ध, बुद्ध, किंवा मुक्त स्वरूप प्राप्त

करून घेत असतो. मानवसमाजाचा विकास हा तात्त्विक दृष्ट्या विश्वाचाच विकास आहे. या सर्व विश्वघटनाच्या व समाजघटनाच्या विकासामागें विश्वात्म्याचा एक आदिसकल्प ( Idea ) आहे आणि या आदिसंकल्पाची पूर्तता करणे हेंच या घडामोडींचे अंतिम उद्दिष्ट आहे. विश्वात्म्याची शुद्ध, बुद्ध, मुक्तस्वरूपप्राप्ति हे त्या आदिसकल्पाचें उद्दिष्ट आहे आणि मानवी इतिहासाची मीमांसा करीत असतानाहि त्याच्या बुडाशीं असणाऱ्या या विश्वात्म्याच्या प्रेरणेचा व तिच्यातून जन्मास येणाऱ्या विचारसृष्टीचा विचार आपण केला पाहिजे. मानवाच्या अतरात्म्याची जी आत्मस्वरूपप्राप्तीची धडपड, ती विचारसृष्टीच्या उत्पत्ति–वृद्धि–विनाशाच्या रूपानें प्रकट होत असते हीच हेगेलची अध्यात्मिक विरोधविकासी इतिहासमीमांसा, असें थोडक्यात म्हणता येईल.

कार्ल मार्क्सनें हेगेलचा विरोधविकासी सिद्धान्त स्वीकारला, पण त्याचे अध्यात्मिक अधिष्ठान बदलून त्यानें त्याला भौतिक अधिष्ठान दिले. विश्वात्मा, त्याचा आदिसकल्प, मानवाचा अतरात्मा, त्याचे अंतिम उद्दिष्ट आणि त्याची अंतिम आत्मस्वरूपप्राप्ति हे सर्व शब्दजजाळ असून या गूढ अरण्यात शिरण्याचे इतिहासमीमांसकाला मुळींच कारण नाहीं, किंबहुना ही गूढ भाषा म्हणजे एक शुद्ध भ्रमाचा ब्रह्मघोटाळा आहे असें मार्क्स व त्याचे अनुयायी मानितात. मनुष्याचे समाजघटनेसबधींचे, न्याय–अन्यायासबधींचे, सामाजिक ध्येयासबधींचे विचार पालटतात, त्यात क्रांति घडते, निरनिराळ्या विचाराचे व ध्येयाचे सघर्ष निर्माण होतात, हे सर्व खरे आहे. या विचारविरोधातून किंवा ध्येयसघर्षातून मानवी प्रगति होते, ही प्रगति होत असता सिद्धान्त-प्रतिसिद्धान्त याचे द्वद्व निर्माण होते, व अखेरीस समन्वयसिद्धान्त जन्मास येऊन, कांहीं काळ हे विरोध व सघर्ष शात होतात किंवा झाल्यासारखे भासतात हेहि खोटे नाहीं. पण या सर्व घडामोडीच्या बुडाशीं विश्वात्म्याचा आदिसकल्प आहे व त्याच्या आत्मप्राप्तीच्या प्रयत्नातून हे संघर्ष निर्माण होतात, अशी उपपत्ति माडण्याचे कांहींच कारण नाहीं. मानवी जीवनाचे जे भौतिक अग आहे त्या अगातील विकास आणि मानवाचा भौतिक सृष्टीशीं जो संघर्ष चालू आहे त्या सघर्षाच्या स्वरूपातील पालट व विकास याचा सूक्ष्म अभ्यास, निरीक्षण व परीक्षण केल्यानेच सामाजिक व ऐतिहासिक घडामोडींची खरी उपपत्ति लागून तिची मीमांसा करता येते.

मानवसमाजाला आपल्या जीवनासाठीं व त्या जीवनाच्या सर्वांगीण विकासासाठीं भौतिक सृष्टीशीं झगडा करावा लागतो. हा झगडा त्याच्या भौतिक ज्ञानावर, उत्पादनसाधनावर, उत्पादनपद्धतींच्या शोधावर, त्या उत्पादनपद्धतींतून निर्माण होणाऱ्या सामाजिक संबंधाच्या नियत्रणावर, हे नियत्रण करण्यासाठीं

निर्माण झालेल्या समाजघटनावर आणि त्या समाजघटनांतील विकासावर अवलंबून असतो. उत्पादनपद्धतींतील बदल, त्या बदलामुळे प्रस्थापित सामाजिक संघटनेत माजणारे घोटाळे, त्या घोटाळ्यातून होणारी नव्या संघटनेची जाणीव, या जाणिवेमुळे निर्माण होणारी नवीं मतें आणि त्यातून निर्माण होणारे विचारकलह याचा उलगडा समाजाच्या भौतिक धडामोडींवरून केला पाहिजे व करता येतो. अशा संक्रमणकालात जो विचारकलह चालू असतो तो मतविरोधाच्या रूपाने प्रत्ययास येतो. तथापि या मतविरोधाच्या मागे हितविरोध लपलेले असतात. हे मतविरोध समाजजीवनाच्या भौतिक अंगातील वर्गहितविरोधाचा बोध झाल्यावाचून बरोबर समजू शकत नाहीत. जुनीं मतें व नवीं मतें यांचा लढा सुरू झाला असता कोणते वर्ग कोणता पक्ष घेतील याचा कयास बांधण्यास या वर्गविरोधाच्या सिद्धान्ताचा व भौतिक हितविरोधाच्या सिद्धान्ताचा उपयोग इतिहासमीमांसकांनीं केला पाहिजे. तो उपयोग कसा करावा हे मार्क्सने दाखवून दिले आणि आजच्या समाजघटनेस तो सिद्धान्त लागू करून त्यात सुरू असलेल्या क्रांतीनंतर प्राप्त होणाऱ्या समाजवादी संस्कृतीची अपरिहार्यता सिद्ध करून दाखवली. अशा प्रकारे हेगेलच्या गूढ अध्यात्मवादी विरोधविकासी इतिहासमीमांसेस बुद्धिग्राह्य, भौतिक विरोधविकासी इतिहासमीमांसेचे स्वरूप दिले.

आता सेंट सायमन प्रभृति समाजवाद्यांच्या अनुयायांचा जो भावनावश समाजवादी ( Utopian Socialists ) सांप्रदाय होता, त्यांच्या विचारातील चूक दाखवून देऊन, मार्क्सने समाजवादाला शास्त्रीय स्वरूप दिले या म्हणण्याचा थोडा विचार करू. समाजवादी समाजघटना स्थापन होण्यास अनुकूल परिस्थिति कशी व केव्हा प्राप्त होईल ते दाखवून देऊन मार्क्सने आपल्या भौतिक इतिहासमीमांसेच्या आधारे समाजवादाला शास्त्रीय स्वरूप दिले.समाजवादी ध्येयाचा उगम भांडवलशाली समाजघटनेतील आंतरविरोधातून झालेला आहे. हा आंतरविरोध जुने मालमत्तेचे कायदे आणि नवी उत्पादनशक्ति व नवी उत्पादनपद्धति यातील विरोधातून निर्माण झालेला आहे. या आंतरविरोधामुळेच आजच्या भांडवलशाही जगात वर्गविग्रह माजला आहे व या विग्रहातूनच आंतरराष्ट्रीय युद्धें निर्माण होत आहेत. या निरनिराळ्या विरोधामुळे चालू समाजघटना कोसळून पडेल तेव्हाच जागतिक क्रांति होईल व समाजसत्ताक संस्कृति प्रस्थापित होईल. या दृष्टीने वर्गसंघटना, वर्गविग्रह, आर्थिक अरिष्टे, महायुद्धाची व समाजसत्ताक क्रांतीची अपरिहार्यता यांची मीमांसा मार्क्सने केली. समाजवादाची स्थापना केवळ भावनावशतेने वाटेल तेव्हा करतो म्हटल्याने होणार नाहीं. केवळ ध्येयवादाचा नैतिक उपदेश केल्याने होणार नाहीं. सर्व वर्गांच्या न्यायबुद्धीला आळविल्याने होणार नाही. त्याच्या प्रस्थापनेने सर्व मनुष्यतेचे अंतिम हित होईल असा वेदान्ती उपदेश केल्याने होणार नाहीं. तर ज्या वेळीं

वर्गविरोध विकोपास जातील, वर्गसंघटना प्रबल बनतील, प्रचलित समाजघटना आतरविरोधानीं कोसळून पडेल, जुन्या समाजघटनेखालीं समाजाची जीवितयात्रा चालणेच अशक्य आहे असा प्रत्यक्ष अनुभव सर्व समाजाला येईल, क्रातिसघटना दडपून टाकण्याचे व जुनी समाजघटना जिवत ठेवण्याचे सर्व प्रतिगामी अघोरी उपाय विफल ठरतील, दडपशाही करणाऱ्याचे शस्त्रबल फितुरीने बेदिल होईल, त्याच वेळीं काहीं काळ अनियंत्रित कामगारशाहीची स्थापना होऊन समाजसत्ताक नवयुगाची सुरुवात होईल. त्या वेळीं ज्यानीं कष्टजीवी कामकरी शेतकऱ्याच्या श्रमशक्तींतून निर्माण होणाऱ्या धनाचा कायदेशीर मार्गाने अपहार केलेला आहे त्याच्या मालमत्तेचा अपहार करून समाजात न्यायाची सस्थापना होईल. त्या वेळीं मालमत्तेचा नवा कायदा अस्तित्वात येऊन कोणाच्याहि श्रमफलाचा अपहार दुसऱ्यास करता येणार नाही. सर्वच समाजाचे सेवक बनतील आणि सर्वच समाजाच्या सपत्तीचे समायिक मालक बनतील. या वेळीं मालक मजूर हा भेद राहणार नाहीं आणि एक वर्गसमाज स्थापन होईल. ही शास्त्रीय दृष्टि देऊन मार्क्सने भावनावश समाजवाद्याची चूक कामगारवर्गाला व त्याच्या पुढाऱ्याना दाखवून दिली. कोणती सामाजिक ध्येये कोणत्या भौतिक परिस्थितीत फैलावू शकतात, कोणते वर्ग त्याना पाठिंबा देतात व कोणते वर्ग त्याना विरोध करतात, कोणत्या वर्गाचा कोणत्या परिस्थितीत विजय होतो व कोणत्या ध्येयाची कोणत्या वर्गाच्या सघटित शक्तीने कोणत्या परिस्थितींत सस्थापना होऊ शकते या प्रश्नाची उत्तरे मार्क्सने आपल्या विरोधविकासी भौतिक मीमासेच्या आधारे दिली.

अशा प्रकारे हेगेलचा अध्यात्मिक गूढ विरोधविकासवाद आणि सेंट सायमन प्रभृतींचा भावनावश, केवळ ध्येयनिष्ठ, अशास्त्रीय व अवास्तव समाजवाद या दोहोंचाहि पाडाव मार्क्सने केला. हेगेलचे अनुयायी आपल्या गूढ अध्यात्मिक इतिहासमीमासेचा उपयोग करून प्रचलित कायद्याना व प्रस्थापित राज्यसस्थेला विश्वात्म्याच्या आदि सकल्पाचा आविष्कार मानून त्याची व तिची बंधने पाळण्यातच व्यक्तीची आत्मोन्नति होईल असा भ्रम उत्पन्न करीत होते व त्या बधनाविरुद्ध बड करणाऱ्या क्रातिकारकास अध्यात्माच्या व धर्माच्या नावानें विरोध करीत होते. तर सेंट सायमनचे भावनावश अनुयायी ध्येयवादाच्या उपदेशाने व प्रार्थनेने समाजवादाचा स्वर्ग भूमीवर अवतरेल अशी आशा करून भावी समाजघटनेची काव्यात्मक रमणीय चित्रे शब्दानीं रेखाटण्यात व त्याच्या चिंतनात किंवा एकाद्या आश्रमातील प्रयोगात निमग्न झाले होते. पहिले प्रस्थापित समाजघटनेस आदर्श समजत होते, तर दुसरे आदर्श समाजघटना आपल्या चिंतनाने व प्रचाररूप प्रार्थनेने खालीं अवतरेल अशी आशा करीत होते. पहिले

क्रांतीचे उघड शत्रु होते, तर दुसरे क्रांतिकार्यापासून निवृत्त होऊन प्रतिभाजन्य स्वप्नसृष्टींतच रममाण होत होते. दोघेहि आपापल्या परीनें समाजहिताचा घात करीत होते.

हेगेलने समाजातील विचारकलहाचा उगम आत्मचिंतनात, विश्वात्म्याच्या पूर्व संकल्पित आत्मविष्काराच्या व आत्मप्राप्तीच्या प्रयत्नात कल्पिला होता. ही गूढवादी अध्यात्मदृष्टि बदलणे मार्क्सला अवश्य वाटले. याचे कारण तसे केले नाहीं तर रूढ समाजघटना व राज्यघटना यानाच विश्वात्म्याचा पूर्वसंकल्पित आत्मविष्कार मानून त्याच्यापुढे लोटांगणे घालणे हेच आपले कर्तव्य आहे असे लोक समजू लागतात व लागले होते. हेगेलचे अनुयायी प्रशियाच्या राजसत्तेची अशी पूजा करू लागले होते. आणि हेगेलच्या विरोधविकासी इतिहासमीमांसेचे क्रांतिकारक स्वरूप या वृत्तीमुळे पूर्णपणे प्रतिक्रांतिकारक बनले होते. याच्या उलट सेंट सायमन प्रभृति समाजवाद्यांचे अनुयायी समाजक्रांति घडण्यास व आपल्या ध्येयाच्या प्रस्थापनेस अनुकूल परिस्थिति केव्हा व कशी प्राप्त होईल, याचे मुळींच ज्ञान नव्हते, म्हणून केवळ ध्येयचिंतनात, मतप्रचारात व आदर्श समाजरचनेचे लहानमोठे प्रयोग करून दाखवण्यातच ते धन्यता मानीत होते. पण समाजक्रांति घडविण्याचा शास्त्रीय मार्ग हा नसून समाजातील पीडित वर्गाचा पीडक वर्गाशीं किंवा शोषित वर्गाचा शोषक वर्गाशीं जो लढा चालू आहे त्यात भाग घेऊन शोषित वर्गाची संघशक्ति वाढवीत जाणे, त्याला शास्त्रीय दृष्टि देऊन त्याचा आत्मविश्वास जागृत करणे आणि आर्थिक व राजकीय अरिष्टामुळे जुनी समाजघटना कोसळून पडली असता तिच्या जागी नवी समाजघटना स्थापन करणारी राज्यसंस्था उभी करणे हाच खरा मार्ग आहे असे मार्क्सने दाखवून दिले. हेगेल व सेंट सायमन या दोघांच्याहि अनुयायाना समाजजीवनाच्या भौतिक अंगातील आर्थिक हितविरोधात मतविरोधाचीं बीजे असतात आणि या हितविरोधाच्या वाढीबरोबरच हे मतविरोध वाढत जातात, याचा बरोबर बोध झालेला नव्हता. तसेच आपणास आज प्रबल व सुस्थिर दिसणारी भांडवलशाही आपल्याच आंतरविरोधानीं विनाश पावत आहे आणि तिचा विकासकाल आता संपला आहे याचीहि जाणीव झालेली नव्हती. ती जाणीव करून देण्यातहि मार्क्सने विरोधविकासी इतिहासमीमांसेला भौतिक स्वरूप दिले आणि भांडवलशाही अर्थघटनेची उत्पत्ति, विकास आणि विनाश याचा अर्थशास्त्रीय कायदा करून दाखवून दिला.

मार्क्सला भांडवलशाहीची उत्पत्ति, विकास व विनाश यासंबधींचे विवेचन करण्यासाठी अर्थशास्त्रात शिरावे लागले. अर्थशास्त्राची वाढ ब्रिटन-

मध्ये झाली होती व रिकार्डोचे सिद्धान्त त्या शास्त्रात त्या वेळीं प्रतिष्ठा पावलेले होते. याच सिद्धान्तांत नवी भर घालून त्याना मार्क्सने क्रांतिकारक स्वरूप दिले. रिकार्डो व ॲडम स्मिथ याच्या श्रम-मूल्य सिद्धान्ताच्या आधारे भांडवलशाहींतील कायदेशीर व्यवहारातच श्रमिक वर्गाचे रक्तशोषण कसे अतर्भूत झालेले आहे, ते मार्क्सने प्रथम स्पष्ट करून दाखविले. तसेच ही भांडवलशाही अर्थघटना कामगारवर्गाच्या रक्तशोषणावर अधिष्ठित झाली असल्याने हिच्याबरोबर हे रक्तशोषणहि एकसारखे वाढत जाईल आणि त्यामुळे भांडवलशाही आर्थिक व्यवहारावर एकसारखी अनर्थपरंपरा ओढवेल असे मार्क्सने औपपत्तिक दृष्टीने सिद्ध केले. अशा प्रकारे हेगेलची इतिहासमीमासा, ब्रिटिशाचे अर्थशास्त्र आणि फ्रेंचाचा समाजवाद या तिहींना मार्क्सने शास्त्रीय व क्रातिकारक स्वरूप दिले आणि तसे करीत असता समाजशास्त्रांत व इतिहासशास्त्रात विरोधविकासी भौतिक मीमासेला प्रतिष्ठित स्थान प्राप्त करून दिले.

## भौतिक नियतिवाद व भौतिक सुखवाद नव्हे.

मार्क्सची विरोधविकासी भौतिक इतिहासमीमासा समजून घेताना अथवा तिला मान्यता देताना ज्या दोन मुद्यासबधी विशेष दक्षता घेतली पाहिजे, पण ज्यासंबधीं प्रायः दक्षता घेतली जात नाहीं, ते दोन मुद्दे म्हणजे ही भौतिक मीमासा मनुष्यस्वभाव, मानवी मते व बुद्धि याच्यासबधींच्या भौतिक नियतिवादावर ( Materialistic determinism ) किंवा भौतिक सुखवादावर ( Materialistic hedonism ) आधारलेली नाहीं. येथे भौतिक नियतिवाद आणि भौतिक सुखवाद म्हणजे काय, याचे थोडे स्पष्टिकरण सामान्य वाचकासाठीं करणे अवश्य आहे. मार्क्सच्या मताप्रमाणे सर्व जगाचे आदिकारण हे भौतिक असून या भौतिक तत्त्वातूनच मानवाची व इतर प्राण्याची उत्पत्ति झालेली आहे. तथापि या भौतिकतत्त्वाचा विकास होत असल्याने जडजगत्, जीवजगत् आणि मानवीजगत् असे तीन विभाग व्यावहारिक दृष्टया करणे अवश्य आहे. जडजगतातूनच जीवजगत् आणि जीवजगतातूनच मानवीजगत् निर्माण झाले आहे आणि जडजगत् हे जीवजगतास व मानवजगतासहि आधारभूत आहे हें केव्हाहि विसरता कामा नये. मानवी जीवनाला हे एक जड अग आहे व ते आधारभूत आहे हेंहि विसरता कामा नये असा आग्रह मार्क्सवादी धरतात, पण त्याबरोबर मानवी जीवन हे केवळ जड पदार्थाचे जीवन नव्हे, हेंहि त्यानीं आग्रहपूर्वक प्रतिपादन केलेले आहे. जड पदार्थांचे व्यापार, मानवेतर जीवकोटींचे व्यापार आणि मानवाचे व्यापार यांत प्रकारभेद आहे. केवळ जड सृष्टीच्या व्यापाराचे नियम जीवसृष्टीच्या व्यापाराचा व मानवी व्यवहाराचा उलगडा करण्यास पुरे पडतील असा भ्रम

मार्क्सवाद्याना झालेला नाहीं. जड पदार्थांपासून बनविलेलें घड्याळ जसे यंत्राप्रमाणे चालते, ते स्वयप्रेरणेने आपले व्यापार बदलूं शकत नाहीं, त्याला मन व बुद्धि हीं नाहींत, त्याला इद्रियप्रेरणा नाहींत, त्याला विकार किंवा वासना नाहींत, तशी स्थिति जीवकोटींची नाहीं. जीवकोटींत इद्रियें, मन व बुद्धि याचा विकास अथवा उद्भव झालेला आहे, आणि म्हणून इद्रियें, मन व बुद्धि या शक्तींच्या योगाने जीवाचे व्यापार जड पदार्थांच्या व्यापाराहून भिन्न, संकीर्ण आणि विशिष्ट बनलेले आहेत असे मार्क्सवादी मानतात. यामुळे जे लोक जीवसृष्टीचा उद्भव जडसृष्टींतूनच झालेला आहे एवढ्या आधारावरून जीवसृष्टीचे सर्व व्यापार केवळ जड्सृष्टीच्या नियमावरूनच उलगडून दाखविण्याचा प्रयत्न करतात व तशी श्रद्धा ठेवतात, त्याना मार्क्सवादी लोक "यात्रिक भौतिकवादी" ( Mechanical materialists ) असे म्हणतात. यात्रिक भौतिकवादी जड पदार्थांपासून बनविलेले घड्याळ, जीवसृष्टींतील पशुपक्षाचे जीवन आणि मानवी जीवन यात तत्त्वतः प्रकारभेदच मानीत नाहींत. मनुष्याचेहि सर्व व्यापार पूर्वनियत व परिस्थितिनिबद्ध असतात, असे हे मानितात. मनुष्याला विचारशक्ति आहे हे त्याना अर्थातच मान्य आहे. पण मनुष्याचे विचार अथवा त्याचा विवेक हे सर्वस्वीं बाह्य परिस्थितीने नियत असतील तर त्याचे सर्व व्यापार एकाद्या जडयंत्राप्रमाणेच घडत जातील. त्याला विचार व विवेक यासबधींचे स्वातत्र्य नसल्याने त्याला स्वतत्र कर्तृत्वहि उरणार नाहीं. त्याचे मन हा एक वस्तुस्थितींचे प्रतिबिंब पाडून घेणारा जड आरसा कल्पावा लागेल. यात स्वयप्रेरणा, ध्येयनिर्मिति, ध्येयनिष्ठा अथवा पौरुष याना कोणताहि अवसर राहणार नाहीं. माझी इच्छाशक्ति व बुद्धि या स्वतत्र शक्ति आहेत, हा मानवाचा अनुभव केवळ भ्रम आहे असे मानून मानवाच्या व्यवहाराची मीमासा केवळ यात्रिक पद्धतीने करणारा एक भौतिकवाद इंग्लड, अमेरिका, फ्रान्स इत्यादि देशात आहे व यालाच शास्त्रीय भौतिकवाद (Scientific materialism ) असे नाव इग्लिश भाषेतील ग्रंथात आतापर्यंत दिलें गेले आहे. पण इंग्लिश तत्त्वज्ञान्याना व साहित्यिकाना परिचित असणाऱ्या या यात्रिक भौतिकवादाहून मार्क्सचा विरोधविकासी भौतिकवाद भिन्न आहे. मार्क्सच्या भौतिकवादात मनुष्याचे स्वतंत्र कर्तृत्व, विचारस्वातत्र्य आणि विवेकस्वातत्र्य यांना अवसर दिलेला असून इतर जीवकोटीहून मनुष्याचे मन व बुद्धि हीं अधिक विकसित असल्याने त्याच्या व्यवहाराचा उलगडा केवळ जड पदार्थांच्या अथवा मानवेतर प्राण्याच्या व्यवहाराचा उलगडा करण्यासाठीं पुरे पडणाऱ्या नियमावरून होऊ शकत नाहीं, असे मार्क्सवादी मानतात. तात्पर्य, सृष्टीचे आदिकारण भौतिक आहे असा त्यांचा सिद्धान्त असला तरी हें भौतिक तत्त्व स्वयंविकासी आहे, त्याच्या ठायीं उत्तरोत्तर अधिकाधिक नव्या गुणांचा आवि-

भाव होत असतो, त्याचप्रमाणे मानवाच्या अगीं मानसिक व बौद्धिक गुणाचा विकास झालेला आहे व या गुणाच्या वैशिष्ट्यामुळे जड पदार्थांच्या व जीव-कोटींच्या व्यापाराहून मानवसमाजाचे व्यापार विशिष्ट, विभिन्न आणि उन्नत झालेले आहेत हें न ओळखणाऱ्या यांत्रिक भौतिकवादाला मार्क्सवादी अशास्त्रीय मानतात. याच्या उलट भौतिक तत्त्वाच्या स्वयंविकासाचे महत्त्व ओळखणारा आपला विरोधविकासी भौतिकवाद हाच खरा शास्त्रीय भौतिकवाद आहे असे ते आग्रहपूर्वक प्रतिपादतात. हे मार्क्सवादाचे वैशिष्ट्य समजून न घेता त्याच्यावर भौतिक नियतिवादाचा आरोप करणे आणि मार्क्सची इतिहास-मीमांसा भौतिकवादी आहे म्हणून तींत मानवी कर्तृत्व, विवेक व विचार-स्वातंत्र्य आणि ध्येयनिष्ठा याना महत्त्व देण्यात आलेले नाहीं अशी टीका करणे अथवा त्या मीमांसेवर जडनियतिवादाचा आरोप करणे हे अज्ञान आहे. मनुष्याच्या बुद्धीच्या अगीं बाह्य परिस्थितीचें प्रतिबिंब पाडून घेण्याचे व तिचें आकलन करण्याचे जसें सामर्थ्य आहे, तसेच त्या परिस्थितीचे गुणदोष विवेचन करण्याचे, तिचे मूल्यमापन करण्याचे आणि तिच्यावर आपला प्रभाव पाडून आपणास अनुकूल स्वरूप प्राप्त करून देण्याचेंहि सामर्थ्य आहे हे मार्क्सवाद मोकळ्या मनाने मान्य करतो, पण हे मानवाचें विचारस्वातंत्र्य व क्रियास्वातंत्र्य यालाहि भौतिक मर्यादा आहेत व त्या मर्यादा ओळखून मनुष्याला आपला इतिहास बनविता येईल असे मार्क्सला सांगावयाचे आहे. मानवी बुद्धीच्या, कर्तृत्वाच्या व पौरुषाच्या भौतिक मर्यादा ओळखिल्यावाचून इतिहासमीमांसा केल्यास ती मीमांसा शास्त्रीय ठरणार नाहीं असे मार्क्सचे म्हणणे आहे. मानवी बुद्धींत समाजघटनेसंबधीं जीं ध्येये निर्माण होतात, तीं भौतिक परिस्थितिसापेक्ष असतात, आणि म्हणून त्या ध्येयाची संस्थापना होण्यासहि अनुकूल आर्थिक व राजकीय परिस्थिति निर्माण व्हावी लागते, हे ओळखूनच ध्येयनिष्ठ क्रांतिवाद्यानीं आपले धोरण आणि कार्यक्रम आखले पाहिजेत, ही वास्तववादी दृष्टि मार्क्सने समाजवाद्याना दिली. ही दृष्टि देताना त्याला ध्येयशून्य वास्तववाद किंवा स्वार्थ-निष्ठ व्यवहारवाद पुरस्कारावयाचा नव्हता, तर ध्येयनिष्ठेसाठीं सर्वस्व अर्पण करूं इच्छिणाऱ्या क्रांतिकारकाना यशप्राप्तीच्या दृष्टीने आवश्यक असणारा वास्तववाद शिकवावयाचा होता. त्याला पौरुष नष्ट करावयाचे नव्हते, तर त्या पौरुषाच्या व्यावहारिक व वास्तविक मर्यादा विशद करावयाच्या होत्या. तसे करताना त्याला एकदर मानवसमाजाच्या घटनेत सर्वांगिण क्रांत्या केव्हा होतात व त्या का होतात, याची मीमांसा करावी लागली. मार्क्सची इतिहासमीमांसा ही मानवाच्या इतिहासातील सर्वच घडामोडींची संपूर्ण मीमांसा आहे असे मानण्याचे कारण नाहीं. ती मीमांसा मानवसमाजातील सर्वांगिण क्रांतीची मीमांसा आहे आणि अशा सर्वांगीण क्रांत्या

जेव्हा घडतात, तेव्हा समाजाच्या आर्थिक घटनेत मूलग्राही फरक झालेले असतात व या मूलग्राही आर्थिक फरकामुळे पूर्वीचे मालमत्तेसबधींचे कायदे, त्या कायद्यात प्रतिबिंबित झालेली सामाजिक नीति, त्या कायद्याना रक्षण करणारी राज्यसस्था आणि त्या नीतीला व राज्यसस्थेला पाठिंबा देणारी धर्मसस्था या सर्वांना प्रतिगामी व प्रतिक्रातिकारक स्वरूप प्राप्त होत असते, असे मार्क्सला दिसून आले. अशा वेळीं समाजात सर्वांगीण क्राति केल्यावाचून त्याची जीवितयात्राहि चालू शकत नाहीं अशी अवस्था प्राप्त होते व सर्वत्र अदाधुदी व बेबदशाही माजू लागते. या अदाधुदींतून व बेबदशाहींतून समाजाला वाचविण्यास केवळ सर्वांगीण क्राति यशस्वी करणे एवढाच मार्ग असतो. अशी परिस्थिति प्राप्त होईपर्यंत क्रातिकारकाची ध्येये यशस्वी होत नाहींत व तशी परिस्थिति प्राप्त झाली असता तीं यशस्वी होऊ शकतात. पण यशःप्राप्ति अर्थात् मानवाच्या पौरुषावर व प्रयत्नावरच अवलबून असते. अमुक वेळी सूर्याला किंवा चद्राला ग्रहण लागेल अशीं भविष्ये ज्योतिषी वर्तवितात, आणि तीं खरीं ठरतील असे गृहीत धरून आम्ही त्या ग्रहणाची वाट पाहात स्वस्थ बसतो. कारण या नियतिनिबद्ध ग्रहणाना आम्ही थाबवू शकत नाहीं किंवा त्याचा काळहि बदलू शकत नाही. क्रातीसबधींचीं भविष्ये हीं अशा अर्थाने पूर्वनियत किंवा निश्चित कालीं घडणारी नसतात व तीं पौरुषनिरपेक्ष नसतात. मार्क्सचें समाजसत्ताक जगत्क्रातीचे भविष्य अशा प्रकारच्या भौतिक नियतीवर आधारलेले नाहीं. त्याचा आधार मानवी प्रयत्न व पौरुष हाच आहे. फक्त या प्रयत्नाच्या व पौरुषतेच्या सफलतेच्या परिस्थितिघटित मर्यादा त्याने दिग्दर्शित केल्या आहेत.

मार्क्सची भौतिक इतिहासमीमासा ही जशी भौतिक नियतिवादावर आधारलेली नाही, हे जसे काही लोकाना समजत नाहीं तसेच मार्क्सचा भौतिकवाद हा भौतिक जडसुखवाद नाहीं हेहि अनेकाना समजत नाहीं. भौतिकवादी म्हटला कीं, तो केवळ इद्रियसुखनिष्ठ, स्वार्थी व ध्येयशून्य जीवनाचा पुरस्कर्ता असला पाहिजे असे अनेक लोक मानतात. पण मार्क्सच्या भौतिकवादाचा या इंद्रियसुखवादाशीं काहीं सबध नाहीं. सर्व मनुष्ये केवळ इद्रियसुखासक्तच असतात किंवा त्यानीं तसेच बनावे असे मार्क्सवादाचे म्हणणे नाही. अर्थप्रेरणा हीच मानवस्वभावातील एकच एक प्रेरणा आहे, किंवा तीच सर्वश्रेष्ठ आहे अथवा ती नेहमीच प्रभावी असते अथवा राहावी असेहि मार्क्सवाद मानीत नाहीं. त्याचे एवढेच म्हणणे आहे कीं, आज समाजघटनेला जे भाडवलशाही स्वरूप प्राप्त झालेले आहे, त्या समाजघटनेनेच मनुष्यस्वभावातील अर्थप्रेरणेला अधिक प्रबल व प्रभावी बनविले आहे. भाडवलशाही समाजघटनेची आदि प्रेरकशक्तीच ही अर्थप्रेरणा बनली असल्याने या समाजात स्वार्थ, स्पर्धा, लोभ, मोह

आणि इंद्रियसुखासक्ति याना अधिक व प्रमाणाबाहेर चालना मिळत असते. जोपर्यंत ही आर्थिक घटना मोडली नाही तोपर्यंत ही अर्थप्रेरणा सामान्य मनुष्याच्या व्यवहारात प्रभावी राहील. पण ही घटना मोडून स्पर्धेऐवजी सहकार्य आणि स्वार्थाऐवजीं समाजसेवा या भावनावर आधारलेली आर्थिक घटना निर्माण झाली म्हणजे ही अर्थप्रेरणा सहकार्य व सेवावृत्ति याच्या आधीन राहील. अर्थात् सामान्य मनुष्याच्या अंतःकरणात उच्च मानसिक, बौद्धिक व आत्मिक सुखासंबधींची आकांक्षा जागृत व प्रभावी राहण्यास विशिष्ट प्रकारच्या तत्त्वावर समाजाची आर्थिक घटना असावी लागते. अशी समाजघटना भांडवलशाही ही नसून ती समाजसत्ताकच असली पाहिजे. अशा प्रकारे मनुष्य हा ध्येयनिष्ठ असणे किंवा स्वार्थनिष्ठ असणे हे तो ज्या समाजात नांदत असेल, त्या समाजाच्या आर्थिक घटनेवर व तिच्या विशिष्ट अवस्थेवर अवलंबून असते. मनुष्यसमाजात ज्या निरनिराळ्या वृत्ति व प्रेरणा आहेत, त्यापैकी कोणत्या वृत्ति व कोणत्या प्रेरणा त्याच्या वर्तनावर प्रभाव पाडतील आणि विशिष्ट समाजातील सामान्य मनुष्याचे वर्तन कसे होईल, हे त्या समाजात रूढ असलेल्या आर्थिक घटनेवर आणि त्या घटनेतील त्या व्यक्तीच्या स्थानावर किंवा वर्गावर अवलंबून असते. म्हणून मानवी व्यवहार आणि मनोरचना याचा उलगडा केवळ मनुष्यस्वभावातील मूळ प्रेरणा व वृत्ति याचाच अभ्यास करून होऊ शकणार नाही. हा उलगडा करण्यास निरनिराळ्या समाजघटनेचे प्रकार, त्या प्रकारामुळे मनुष्यस्वभावाला मिळणारा आकार, एकाच समाजात एकाच वेळीं नांदणाऱ्या निरनिराळ्या वर्गाच्या मनावर घडणारे त्या समाजघटनेचे परिणाम याचा विचार करावा लागतो. मनुष्यस्वभावात ध्येयनिष्ठा व कर्तव्यनिष्ठा या वृत्ति आहेत, या वृत्तींना वश होऊन आपल्या सर्वस्वाचा त्याग करण्यासहि अनेक लोक तयार होतात आणि अशा त्यागाने व पराक्रमाने मनुष्यसमाजाचा इतिहास घडत असतो हें सर्व मार्क्सच्या भौतिकवादाला मान्य आहे. पण मनुष्याची कर्तव्यनिष्ठा व ध्येयनिष्ठा समाजाच्या भौतिक घटनेतील फरकाबरोबर बदलत जाते व त्याचे आकार भिन्नभिन्न बनतात, हे इतिहासमीमांसकानीं ध्यानात घेतलें पाहिजे. सामाजिक नीतिमत्ता ही एकंदर सामाजिक घटनेवर आणि एकंदर सामाजिक घटना त्याच्या आर्थिक घटनेवर अवलंबून असते असें म्हटल्याने नैतिक ध्येयवादाच्या व्यावहारिक मर्यादाचा उलगडा होतो पण नैतिक ध्येयवादाला त्यामुळें गौणत्व येते हें खरे नाहीं व म्हणून नैतिक ध्येयवादाच्या व्यावहारिक मर्यादा दाखवून देणाऱ्या मार्क्सच्या भौतिकवादाला ध्येयशून्य इंद्रियसुखवाद म्हणणें समर्थनीय ठरत नाहीं.

## वर्गयुद्ध आणि मानवी इतिहास

मार्क्स व एन्जल्स् यांनी तयार केलेल्या कम्युनिस्ट जाहीरनाम्यात असे म्हटले आहे की, मानवाचा आजपर्यंतचा इतिहास हा एक वर्गयुद्धाचा इतिहास आहे. अशा प्रकारची विधानें कांहीं अशीं अतिशयोक्तीचीं असतात आणि कित्येक वेळा त्याचा अर्थ करताना दिशाभूल होण्याचा बराच संभव असतो. वरील विधानाचा अर्थ असा होऊ शकत नाहीं कीं, मानवी इतिहासातील प्रत्येक घटना अथवा धडामोड ही वर्गयुद्धाचीच होती किंवा मानवी इतिहासात वर्गयुद्धावाचून दुसरे कांहींच घडलेले नाहीं असे मार्क्स व एन्जल्स् यांचे मत होते. असा अर्थ करणे हा त्यांच्या विधानाचा सर्वस्वीं विपर्यास आहे. अगदीं प्राथमिक असा फिरत्या टोळ्यांचा इतिहास वगळल्यास आजपर्यंत मानव-समाजात आर्थिक शोषण (economic exploitation) कोणत्या तरी स्वरूपात चालू असून कष्टजीवी जनतेच्या श्रमातून निर्माण झालेल्या संपत्तीचा अकष्टाने उपभोग घेणारा, एक श्रेष्ठ गणलेला, नेहमींच समाजात सत्ताधारी बनलेला असा वर्ग आढळून येतो. समाजातील सत्ता व संपत्ति यांचा उपभोग घेणारा पण त्या उपभोगाचा योग्य मोबदला न देणारा हा वर्ग आणि त्याच्या दास्यात राबून आपल्या श्रमाचे फल अंततः वरिष्ठ वर्गाच्या पदरात टाकणारा बहुसंख्य कष्टजीवीवर्ग अशी द्विवर्ग समाजरचना अगदीं प्राचीन काळापासून आतापर्यंत सर्वत्र दिसून येते. प्राचीन युरोपातील गुलाम, मध्ययुगातील भूदास आणि अर्वाचीन युरोपातील कामगार हे वर्ग युरोपीय संस्कृतीच्या द्विवर्गघटनेची साक्ष देत असून हिंदू, मुसलमान, बौद्ध इत्यादि धर्मांतून निर्माण झालेल्या प्राचीन व मध्ययुगीन संस्कृतींचा अभ्यास केला तरीहि त्यांत सर्वत्र एक शोषित व एक शोषक असे दोन स्थूल वर्ग असल्याचे दिसून येते. हिंदुस्थानाच्या इतिहासातील आर्य-अनार्यांचे झगडे, नंतर त्रैवर्णिक व शूद्र-अतिशूद्र यांच्यातील झगडे, हिंदु संस्कृतीच्या अंतकालात दृढतर बनलेली व अद्यापि हिंदुसमाजाला गुलाम बनविणारी त्याची जन्मसिद्ध जातिसंस्था यांचा जर सूक्ष्म अभ्यास केला तर हिंदु संस्कृतीचा इतिहास हा वर्गयुद्धाचा इतिहास आहे हे मार्क्सचे मत भारतीय इतिहासास लागू पडते असे आपणास दिसून येईल.

या बाबतींत आधुनिक युरोपच्या इतिहासात व युरोपेतर खंडाच्या इतिहासात एक मोठे अंतर पडलेले आपणास दिसून येईल. इसवी सनाच्या सोळाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत युरोप व आशिया दोनहि खंडातील मध्ययुगीन समाजात व राज्यात एक प्रकारची चातुर्वर्ण्य समाजघटना नांदत असल्याचे दिसून येते. धर्माधिकारी, सरंजामदार,व्यापारी,सावकार आणि शेतकरी-कामकरी इ. (ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशीं नावें या वर्गांना हिंदु संस्कृतीने दिलीं होतीं.)

त्यांपैकीं हिंदूंचें चातुर्वर्ण्य हे जन्मसिद्ध व जातिनिबद्ध पद्धतीने अत्यत दृढ व जुलमी बनलेले होते, तितके मुसलमान, ख्रिस्ती व बौद्ध सस्कृतींतील चातुर्वर्ण्य जन्मानें व ज्ञातीनें दृढ व जुलमी बनलेले नव्हते. त्यात व्यक्तिस्वातत्र्याला व व्यक्तिविकासाला अधिक अवसर होता, तरीहि या चातुर्वर्ण्यामुळे व्यक्तिस्वातंत्र्य व सामाजिक समता याचा सर्वत्रच अभाव असलेला दिसून येतो. तसेच सत्ताधाऱ्याच्या राजकीय जुलमाचा प्रतिकार करण्याचे सामर्थ्य प्रजेच्या अगीं अगदीं प्राथमिक अवस्थेत किंवा प्राचीन काळीं जितके होते तितकेहि मध्ययुगात कोठेंच उरलेले दिसत नाहीं. अशा अवस्थेत सर्व जग असताना सोळाव्या व सतराव्या शतकात पश्चिम युरोपातील व्यापारी सावकारवर्गात किंवा वैश्यवर्गात एक नवे तेज निर्माण झाले आणि त्यातून आधुनिक युरोपात एक नवी व्यापारी किंवा वैश्य सस्कृति निर्माण झाली. मध्ययुगात धर्माधिकारी व सरजामदार या वर्गांना समाजात जे श्रेष्ठ स्थान होते ते नष्ट झाले आणि त्या जागीं व्यापारी-सावकार, कारखानदार याचा वैश्य किंवा भाडवलदार वर्ग आरूढ झाला. हीच आधुनिक युरोपाची भौतिक संस्कृति किंवा भाडवलशाही संस्कृति होय. या भाडवलशाही सस्कृतीचा उदय सरजामदार विरुद्ध भाडवलदार याच्या वर्गयुद्धातून झाला असून त्यातूनच व्यक्तिस्वातत्र्य, सामाजिक समता आणि लोकसत्ता हीं सामाजिक ध्येये निर्माण झालीं. भाडवलदार वर्गानें सरजामशाहीविरुद्ध युद्ध करून जी सस्कृति आधुनिक युरोपात निर्माण केली तिचा उद्भव भौतिक विद्येची वाढ आणि आर्थिक उत्पादनशक्तीचा विकास यांतून झाला असून या शक्तीच्या विकासास सरजामशाही सामाजिक सबंध व मालमत्तेचा कायदा याचा विरोध होत होता म्हणूनच भाडवलदार वर्गाची ही क्राति यशस्वी झाली आणि मध्ययुगीन सस्कृतीहून अधिक पुरोगामी सस्कृति निर्माण झाली. यामुळे मानवसस्कृतींत व सपत्तींत मोठी भर पडली आहे. पण भाडवलशाही सस्कृति फारच अल्पकालात ऱ्हास पावू लागली आहे व तिच्यातील आतराविरोधानीं ती लवकरच कोसळून पडणार आहे असे भविष्य मार्क्सने १८४७ सालीं वर्तविले. भाडवलशाहीचा हा अत कामकरी-शेतकरी वर्ग करणार असून तिच्या ठिकाणीं लवकरच सर्व जगांत समाजसत्ताक कामगार-संस्कृति स्थापन होईल, कारण आता जो कामगारवर्ग सत्ताधारी बनेल तो सर्वांत खालचाच असल्याने त्रिवर्ग सस्कृति कायमची नष्ट होईल व मानव-संस्कृतीच्या भावी इतिहासात वर्गयुद्धाला स्थान उरणार नाहीं.

युरोपीय इतिहासात गेल्या तीन शतकात भांडवलदार वर्गाने सरजामशाहीविरुद्ध जे युद्ध केलें व ज्यातून भांडवलशाही संस्कृति निर्माण झाली, तसे युद्ध आशियातील समाजात जो व्यापारी सावकारवर्ग होता, त्यानें केले नाहीं. याचा परिणाम असा झाला कीं, व्यापारी सस्कृतीचा उदय व भरभराट ज्या

ब्रिटिश, फ्रेंच व डच राष्ट्रात झाली त्या राष्ट्रांनी आशियातील सर्व राष्ट्राना आपल्या गुलामगिरीत लोटले. आशियातील राज्याना जिंकताना या खडातील सरंजामशाही समाजातील आतरविरोधाचा व वर्गविरोधांचा उपयोग युरोपीय व्यापारीवर्गाने करून घेतला आणि आशियातील मागासलेले व दुर्बल व्यापारी-वर्ग युरोपीय व्यापाऱ्याच्या साम्राज्यशाही आक्रमणास साहाय्यक बनले. सरजामी युगातील सामाजिक, धार्मिक, आर्थिक व राजकीय संस्था युरोपाप्रमाणे आशियातील समाजाच्या विकासासहि मारक व विरोधक बनल्याच होत्या. पण आशियातील व्यापारी सावकारवर्ग आपल्या व समाजाच्या विकासास विरोध करणारी सामाजिक बधनें तोडून नवी संस्कृति निर्माण करण्यास दुर्बल व असमर्थ ठरला. तेव्हाच या खडातील दलितानी व मागासलेल्या वर्गांनी परकी-याच्या आक्रमणास साहाय्य करून आपल्या समाजातील वरिष्ठ व सत्ताधारी वर्गावर सूड घेतला. वर्गयुद्धाच्या भावनेची ही एक विकृति आहे व जेथे दलित-वर्ग वरिष्ठ वर्गाचे प्रभुत्व झुगारून देण्यास असमर्थ ठरतो, तेथे तो परकीयाना साहाय्य करून वरिष्ठ वर्गावर सूड घेतो व त्या समाजातील वरिष्ठ व कनिष्ठ हे दोनहि वर्ग परकीय समाजाचे अकित बनतात. समाजातील वर्गयुद्धाचेच हे एक विकृत स्वरूप असून राष्ट्रीय पारतन्त्र्य आणि साम्राज्यशाही याचा उदय या विकृतीतून होत असतो. या मुद्याचा विशेष तपशीलवार विचार मार्क्सच्या लिखाणात व ग्रथात झालेला नाही. साम्राज्यशाही व राष्ट्रीय पारतन्त्र्य यांच्यातून राष्ट्राराष्ट्रातील युद्धे व आतर राजकीय व्यवहार याचा उगम होत असतो. अशा युद्धात व व्यवहारात वर्गयुद्धाचे तत्त्व मागे पडून वर्गसमन्वयाने व वर्गसहकार्याने वागण्याची वृत्ति समाजात वाढत असते, हे लक्षात घेतल्यास अनेक राजकीय व सामाजिक व्यवहाराची मीमासा करताना वर्गयुद्धाचे तत्त्व अपुरे पडते व वर्गसहकार्याचे तत्त्व स्वीकारून त्या व्यवहाराचा उलगडा करावा लागतो.

## वर्गसहकार्य व राष्ट्रवाद

राष्ट्रवादी दृष्टीने विचार करणारे लोक वर्गयुद्धाची दृष्टि सोडून अथवा ती गौण लेखून वर्गसहकार्याच्या व वर्गसमन्वयाच्या दृष्टीनेच सर्व राजकीय व सामाजिक घडामोडींचा उलगडा करू पाहतात. पण सर्वच राजकीय व सामाजिक घडामोडींचा उलगडा वर्गविरोध अथवा वर्गसमन्वय यापैकीं कोणत्या तरी एकाच तत्त्वाचा अवलब करून करू पाहणे, हे शास्त्रीय नाहीं व मार्क्सवादाशीं तें सुसगत नाहीं. सामाजिक व्यवहारात वर्गविरोध केव्हा प्रभावी बनतो, केव्हा तो विकृत बनतो, कोणत्या परिस्थितीत वर्गविरोधाचे धोरण इष्ट फलदायी होतें व कोणत्या परिस्थितीत ते अनिष्ट फलदायी बनते, याचा विवेक केला

पाहिजे असे मार्क्सवाद मानतो. तसेच सर्वच समाजात वर्गविरोध आजपर्यंत सदैव चालूच आहे हे खरे असले तरी कनिष्ठ व श्रमजीवी वर्गाने केव्हाहि वर्ग-युद्धाचे धोरण स्वीकारावे असे मार्क्सवाद मानीत नाहीं, अथवा वर्गसमन्वयाचें वा वर्गसहकार्याचे धोरण सर्वच परिस्थितींत चकीचे अथवा त्याज्य आहे असेंहि त्याचें म्हणणे नाहीं. वर्गविरोध व वर्गसहकार्य हीं दोनहि परस्परविरोधी तत्त्वें प्रत्येक समाजात थोड्याफार प्रमाणात चालू असतात. विशिष्ट परिस्थितींत पहिले अधिक प्रभावी होते, तर विशिष्ट भिन्न परिस्थितींत दुसरें प्रभावी ठरतें. हें सर्व परिस्थितिसापेक्ष आहे व कोणते धोरण केव्हा इष्ट वा अनिष्ट समजावें याचा निर्णयहि परिस्थितिसापेक्ष दृष्टीनेच केला पाहिजे असा मार्क्सवादाचा खरा शास्त्रीय निष्कर्ष आहे.

साम्राज्यशाहीमुळे अंकित राष्ट्रें व प्रभुराष्ट्रें असा भेद पडून साम्राज्यवादी प्रभुराष्ट्रें अंकित राष्ट्राचे रक्तशोषण करतात, तेव्हा त्या राष्ट्रातील भांडवलदार व कामगार हे दोनहि वर्ग अंकित राष्ट्रापासून मिळणाऱ्या आर्थिक लुटीचा कमी अधिक प्रमाणात भोग घेत असतात. अशा परिस्थितींत प्रभु राष्ट्रातील दोन वर्गांचे वर्तन वर्गसहकार्याने होत असते व त्याच्यातील वर्गविरोधी भावना तीव्र अथवा क्रांतिकारक बनत नाहीं. तसेच अंकित राष्ट्रांतीलहि भांडवलदार व कामगार या दोघाना आपल्या आर्थिक उन्नतीस प्रभुराष्ट्र आड येत आहे असा अनुभव येत असल्याने ते दोघे आपला वर्गविरोध विसरून सहकार्यानें साम्राज्य सरकारचे प्रभुत्व झुगारून देण्यास झटू शकतात. अशा प्रकारे साम्राज्य-शाही प्रभुराष्ट्र व त्याचीं अंकित राष्ट्रें याच्यामधील लढ्यात दोनहि प्रकारच्या राष्ट्राचे राजकीय व्यवहार केवळ वर्गविरोधाच्या धोरणाने चालू नसतात व नसावेत हेच योग्य आहे. या वेळीं साम्राज्याचे प्रभुत्व झुगारून देऊं पाहणाऱ्या अंकित राष्ट्रात जो राष्ट्रवाद निर्माण होतो तो पुरोगामी समजला पाहिजे व त्याच्याशीं समाजवादी पक्षानींहि सहकार्य केले पाहिजे. याच्या उलट दुसऱ्या राष्ट्रातील सर्वच वर्गांचे शोषण करू पाहणारी प्रभुराष्ट्रातील राष्ट्रभावना किंवा साम्राज्यभावना ही प्रतिगामी वृत्ति असून तिला आधारभूत असणारी वर्गसहकार्याची वृत्ति ही प्रतिगामी व मानवहितविरोधी समजली पाहिजे. तात्पर्य, राष्ट्रभावना व वर्गसहकारी वृत्ति या नेहेमींच प्रतिगामी असतात असें मानणे अथवा त्यानीं प्रेरित होऊन घडणाऱ्या सर्व वर्तनाचा उलगडा केवळ वर्गविरोधाच्या तत्त्वाने करू पाहणें हे चुकीचे व अशास्त्रीय आहे. ही अशास्त्रीय चूक मार्क्सवाद्याकडून होण्याचा फार संभव असतो. मार्क्सवादाचे यथार्थ आकलन न झाल्यामुळेंच ही चूक होत असते.

## धर्म आणि मोक्ष

राष्ट्रभावनेप्रमाणेच धर्म व मोक्ष या भावनाकडे पाहण्याचा समाजवाद्याचा दृष्टिकोनहि सदोष होण्याचा संभव आहे. राष्ट्रभावनेला सर्वच परिस्थितींत प्रतिगामी समजणे अथवा तिच्या प्रेरणेने होणाऱ्या सर्वच ऐतिहासिक घडामोडींची मीमांसा केवळ वर्गविरोधाच्या तत्त्वानेच करू पाहणे हे जसे सदोष आहे तसेच धर्मप्रेरणा व मोक्षप्रेरणा यानाहि नेहमींच प्रतिगामी व प्रतिक्रांतिकारी मानणे शास्त्रीय दृष्ट्या युक्त नाहीं. धर्मप्रेरणा ही सामाजिक कर्तव्यनिष्ठेला जागृत व प्रबल करीत असते आणि मोक्षप्रेरणा कर्तव्यनिष्ठेसाठीं भोगाव्या लागणाऱ्या क्लेशाना न जुमानता आत्माहुति देण्यास मानवाला प्रवृत्त करीत असते. धर्मनिष्ठेचा उगम भूतदया किंवा निःपक्षपाती प्रेम अथवा अहिंसा हा असून मोक्षनिष्ठेचे खरे स्वरूप सत्यनिष्ठा, अथवा ज्ञाननिष्ठा हे आहे. सत्यासाठीं आणि भूतदयेसाठीं, न्यायासाठीं व निरपेक्ष कर्तव्यनिष्ठ प्रेमासाठीं आपल्या सर्व इंद्रियशक्ति समर्पण करण्यातील आनंद उपभोगणे हेच आपल्या आत्म्याचे सर्वश्रेष्ठ आदर्श स्वरूप आहे हे ओळखून त्याच्या प्राप्तीसाठीं सतत यत्न करीत राहावे हे मोक्षनिष्ठेचे स्वरूप मार्क्सवाद्यांनीं ओळखिलेले नाहीं. यामुळे धर्मप्रेरणा व मोक्षप्रेरणा या जीवनातील प्रेरणाना ते नेहमींच प्रतिगामी व प्रतिक्रांतिकारक समजतात. धर्म ही अफूची गोळी आहे आणि आत्मप्राप्तीचा आनंद किंवा आत्मसाक्षात्कार हा एक केवळ भ्रम आहे हे त्याचे मत खरे शास्त्रीय आहे असे वाटत नाहीं. म. गांधी हे सत्याग्रहाच्या रूपाने सत्य, प्रेम आणि तप हीं जीवनाचीं सनातन मूल्ये जगापुढे पुन्हा उपदेशाने व आचरणाने मांडीत आहेत आणि त्यामुळे धर्मनिष्ठा व मोक्षनिष्ठा याचे आधुनिक बुद्धीला पटणारे, पुरोगामी व क्रांतिकारक स्वरूप जगापुढे येत आहे. सामाजिक रूढि, धार्मिक बंधने आणि राजकीय कायदे याचे एकनिष्ठेने पालन करणे एवढाच आपला धर्म आहे असा उपदेश करणाऱ्या धर्मसंस्था क्रांतिकालात प्रतिगामी व प्रतिक्रांतिकारक ठरत असतात हे खरे आहे, तथापि सामाजिक समतेसाठीं सामाजिक रूढींचे उल्लंघन करावे, सत्यनिष्ठेसाठीं धार्मिक बंधनाचे उल्लंघन करावे, आणि न्यायनिष्ठेसाठीं राजकीय कायद्याचे उल्लंघन करून अनत्याचारी वृत्तीने राज्यसंस्थेशीं सार्वत्रिक असहकार करून अन्यायी राज्यसंस्थेत क्रांति घडवून आणावी असा उपदेश करणारे सत्याग्रही तत्त्वज्ञान मानवी इतिहासात अनेक महत्त्वाच्या घडामोडी करणाऱ्या धर्मप्रेरणेचे व मोक्षप्रेरणेचे बुद्धिगम्य व क्रांतिकारक स्वरूप जगापुढे मांडीत आहे. अनेक ऐतिहासिक घटनाचा उलगडा करण्यास या क्रांतिकारक धर्मप्रेरणेचा व मोक्षप्रेरणेचा उपयोग करावा लागणार आहे. मार्क्सच्या विरोधविकासी भौतिक मीमांसेत या प्रेरणाचा व त्याच्या क्रांतिकारी

स्वरूपांचा यथायोग्य अभ्यास न झाल्याने त्या मीमांसेत दोष राहिलेला आहे. हा दोष काढून टाकल्याशिवाय ही विरोधविकासी भौतिक इतिहासमीमांसा शास्त्रीय बनणार नाहीं असें माझें स्वतःचे मत आहे. ह्या मताचा अधिक विस्तार करावयाचा झाल्यास तो एक स्वतंत्रच प्रबंध होईल म्हणून तसा विस्तार करणें ह्या ठिकाणीं अप्रस्तुत आहे.

## मानसप्रेरणा आणि भौतिक वस्तुस्थिति

विरोधीविकासी भौतिकवाद हा यांत्रिक भौतिकवादाहून भिन्न आहे व त्यात मानवबुद्धीचे स्वातंत्र्य आणि ध्येयनिष्ठ जीवनाचे महत्त्व यांना मान्यता दिलेली आहे. पण या अंतःप्रेरणांचे पृथक्करण करून त्यांचें स्वरूप विशद करणाऱ्या सामाजिक मानसशास्त्राचा अभ्यास अद्यापि त्या संप्रदायाने केलेला नाहीं. फ्राइडच्या मानसशास्त्रात मानवाच्या सुप्त अंतःप्रेरणांचा विचार झालेला आहे. पण त्यात कामप्रेरणेला वाजवीपेक्षा अधिक महत्त्व देण्यात आलें असून ध्येय-निर्मितीची व ध्येयनिष्ठेची प्रेरणा उपेक्षिली गेली आहे. ही ध्येयनिर्मितीची व ध्येय-निष्ठेची प्रेरणाच आत्मप्रेरणा होय व तिच्या साक्षात्काराची तळमळ हीच मनु-ष्याची मुमुक्षा किंवा आत्मप्राप्तीची अंतःप्रेरणा होय. शास्त्रसंशोधन,सौंदर्यनिर्मिति, सामाजिक कर्तव्यनिष्ठा, आत्मशुद्धि इत्यादि अनेक रूपांनीं ही आत्मप्रेरणा प्रकट होत असते. जुनी समाजघटना मोडकळीस आली असता नव्या सामाजिक घटनांचीं कल्पनाचित्रे या प्रेरणेमुळे मानवी बुद्धींत स्फुरू लागतात. साधुसंत व ध्येयदर्शी क्रांतिकारक कवि या प्रेरणेच्या शक्तीने नवी विचारसृष्टि निर्माण करतात व तिला शब्दरूप देऊ शकतात. पण त्यांच्या बुद्धींत वास्तव परिस्थि-तीचे आकलन करण्याचे सामर्थ्य कमी असेल तर ते नवी विचार-सृष्टि रूढ करणारी क्रांति प्रत्यक्ष घडवू शकत नाहींत. क्रांतिकारक राज-कीय पुढाऱ्यांना आपलीं ध्येये कोणत्या परिस्थितींत कोणत्या साधनाने किती प्रमाणात यशस्वी होऊ शकतील याचें ज्ञान अधिक लागते. मार्क्सवादाने सामा-जिक घडामोडींची मीमांसा करताना समाजाच्या भौतिक अंगावर जो भर दिला तो या दृष्टीने योग्य व समर्थनीयच होता. पण त्यांच्या भौतिक मीमांसेत मानवी मनांतील ध्येयनिष्ठेची व ध्येयनिर्मितीची अंतःप्रेरणा गृहीत धरलेली आहे, तिचेच एक स्वरूप धर्मप्रेरणा व मोक्षप्रेरणा हे आहे हें लक्षात घेतल्यास या प्रेरणांचे शुद्ध स्वरूप लक्षात येईल व त्यामुळे अनेक ऐतिहासिक घडामोडींची अधिक शास्त्रीय मीमांसा करणे शक्य होईल असे माझें मत आहे. धर्मप्रेरणा ही एक अफूची गोळी आहे किंवा आत्मसाक्षात्कार हा एक भ्रम आहे एवढे म्हट-ल्यानें सामाजिक व्यवहारांतील त्या अंगाची शास्त्रीय मीमांसा होऊ शकत नाहीं.

मार्क्सची भौतिक इतिहासमीमांसा या दृष्टीने वाढविली पाहिजे व तसे करणे त्याच्या मूळ सिद्धान्ताशीं मुळींच विसंगत नाहीं असे मला वाटते.

सामाजिक क्रांतीच्या कार्यांत या धर्मप्रेरणेचा व मोक्षप्रेरणेचा उपयोग कसा होऊं शकतो हे म. गांधींच्या राजकीय नेतृत्वामुळे आज जगाच्या दृष्टी-समोर आलेलें आहे. यानंतर या सत्याग्रही वृत्तीचा उपयोग वास्तववादी दृष्टीनें किती प्रमाणांत व कोणत्या प्रकारे क्रांतिकार्यास होईल याचा अभ्यास करणे हे समाजवादी तत्त्वज्ञानाचे अवश्य कर्तव्य आहे. विरोधविकासी भौतिक इतिहासमीमांसेचा भावी विकास या दृष्टीने होणे इष्ट व अवश्य दिसते एवढे सुचवून हा निबंध संपवितो.



# इतिहास आणि मानवाचें स्वातंत्र्य.

लेखकः—प्रा. चं. रा. पोतनीस एम्. ए. मुळजीजेठा कॉलेज, जळगांव.

इतिहास म्हणजे मानवाच्या स्वातंत्र्याची कथा आहे, हे हेगेलचे वचन प्रसिद्ध आहे. भाववादाचा ( idealism ) आधार घेऊन हेगेलने अंतरात्मा विश्वातील सत्याशीं एकरूप करणें म्हणजे स्वातंत्र्य होय असे सांगितले. हेगेलच्या दृष्टीला राष्ट्रीयातील शासनसंस्थेला वश मानणारा नागरिक हा स्वतंत्र मानव वाटला. प्रस्तुत लेखामध्यें हेगेलच्या विरोधविकासात्मक ( dialectical ) भाव-वादाची कास न धरता इतिहासातील मानवस्वातंत्र्यासंबंधीं विचार मांडावयाचे आहेत.

तत्पूर्वी स्वातंत्र्याचा कोणता अर्थ येथे गृहीत धरला आहे हे सांगणे आवश्यक आहे. कारण स्वातंत्र्य या शब्दाचें अनेक अर्थ अनेकांनीं केले आहेत. उदाहरणार्थ, शासनसंस्थेसाठीं आत्मनाशसुद्धां करणे हे नाझीवादाला अत्युच्च स्वातंत्र्य वाटेल, तर शासनसंस्थेचा कोणत्याहि तऱ्हेचा मागमूस न ठेवणे हे अराजकवाद्यांना ( anarchists ) स्वातंत्र्याचा मूलभूत पाया वाटेल. किंवा मिलप्रमाणे दुसऱ्याच्या आड येत नाहीं ते स्वातंत्र्य अशी अनिर्णयात्मक व्याख्या कोणी करील. येथे धरलेला स्वातंत्र्याचा अर्थ असा करता येईलः परिस्थितींत आत्मानुकूल बदल करून घेण्याची शक्ति म्हणजे स्वातंत्र्य. असा आत्मानुकूल बदल करण्याची इच्छा मनुष्यजातीच्या सुरुवातीपासून मनुष्यात वास करीत

असते, मनुष्याच्या जन्मापासून ती वाढीला लागलेली दिसते, म्हणून ही स्वातंत्र्याची इच्छा मूलभूत प्रेरणापैकीं एक आहे. इतर प्राणी अंतःप्रवृत्ति-प्रमाणेंच ( instincts ) केवळ वागत असतात. मनुष्य मात्र इच्छाशक्तीच्या जोरावर ( Conscious will) वागत असतो. म्हणून इतर प्राणिमात्राना स्वातंत्र्याची प्रेरणा नसते, परंतु मनुष्यात ती आहे. मनुष्याच्या सुरुवातीच्या इतिहासकालात ह्या स्वातंत्र्यप्रेरणेचे प्रतिबिंब त्याच्या जीवनकलहात आपणास पाहावयास सापडते. आश्रयाला डोंगरातील कोणती गुहा सर्वांत जास्त उपयोगी पडेल हे शोधणे, भोवतालच्या ओबडधोबड दगडाना एकमेकावर आपटून अणकुचीदार टोके काढणे, लांब अंतरावरील पशू मारण्यासाठीं धनुष्यबाणाची योजना करणे— ह्या सर्व जीवनकलहातील गोष्टी आहेत. ह्या सर्व गोष्टींच्या मुळाशीं रानटी माणसाची स्वतःस उपयोगी असा बदल आपल्या भोवतालच्या वस्तूत करण्याची प्रेरणा ही दिसून येते. किंबहुना रानटी माणसाचे टोळके हे सुद्धा जीवनकलहातील एक साधनच आहे.

अशा तऱ्हेच्या जीवनकलहात टिकून राहण्यासाठीं, निसर्गाविरुद्ध आणि परक्या टोळ्याविरुद्ध लढून आपल्याला उपयोगी अशी स्थिति निर्माण करण्या-साठीं मनुष्याला निसर्गाचा उपयोग करून घ्यावा लागतो. त्यासाठीं निसर्गाच्या व्यापाराचे नियम माहीत असणे आवश्यक आहे. मनुष्यात विचार करण्याची शक्ति असल्यामुळे आणि निसर्गाचे व्यापार नियमबद्ध असल्यामुळे हे नियम मनुष्यास शोधून काढता येतात. निसर्गात पाणी हे उच्च पातळीवरून खालच्या पातळीकडे वाहते, उलटे वाहत नाहीं, किंवा झाडावरचे फळ खालीं जमिनीवर पडते, आकाशात उडून जात नाहीं. जरी मनुष्यास हे नियम कोणत्या मूलभूत कारणावर आधारले आहेत हे सुरुवातीला समजले नाहीं तरी व्यवहारात वापरता येतील इतके त्या नियमबद्ध व्यापाराचे ज्ञान लवकर होतें. एकामागून एक नियम त्यास कळू लागून त्याचे ज्ञान वाढीस लागते. कोणत्याहि क्षणीं जेवढें ज्ञान आहे, तेवढेंच त्या क्षणापुरतें सत्य असते. म्हणून सत्यान्वेषण आणि स्वातंत्र्य ह्याची मूलप्रेरणा एकच आहे. कांहीं वेळा या जीवनकलहांत, त्याला एकादा नियम विश्वात चालू आहे असे वाटते व त्याचा तो उपयोगहि करूं लागतो, परंतु तो नुसता सत्याचा आभास असतो. नंतर इतर नियम कळल्या-नंतर पहिल्याचे मिथ्यात्व पटतें. उदाहरणार्थ, पाषाण युगातील ( upper palaeolithic ) माणसे आपल्या गुहांत भिंतींवर जनावराची मोठीं चित्रे काढून, त्याच्या मर्मस्थळीं बाण लागला आहे असे दाखवीत, किंवा पुष्कळशीं जनावराचीं चित्रे काढीत. पहिल्याचा हेतू हा कीं, चित्रातल्याप्रमाणे प्रत्यक्षातहि श्वापदाच्या मर्मी घाव लागावा, दुसऱ्याचा हेतू हा कीं, प्रत्यक्षातहि त्या प्राण्याची

विपुलता असावी म्हणजे खूप शिकार मिळेल. आता हा यातुधर्म (sympathetic magic) खोटा आहे असे विचारवंत मानतात. मनुष्याचे निसर्गाविषयींचें ज्ञान जसें वाढू लागते तसेंच त्याला स्वत्वाचीहि जाणीव होऊं लागते. सापेक्षतः स्वत्वाची जाणीव अगदीं अलीकडची आहे असे म्हटले पाहिजे. रानटी मनुष्य निसर्गाशीं एका दृष्टीने तादात्म्य पावलेला असतो, कारण त्यास निसर्ग हा आपलाच एक भाग असे वाटते. परतु पुढे भावनांची वृद्धि झाली, विचाराचा विकास झाला म्हणजे आपण निसर्गाहून निराळे, आपण इतर मनुष्याहून निराळे अशी जाणीव येऊ लागते. आणि आत्मानुकूल जो बदल करायचा तो स्वतःच्या व्यक्तित्वाला पोषक असा बदल पाहिजे असे वाटू लागते. जी स्वातत्र्याची प्रेरणा पूर्वी साध्या जीवनकलहात प्रतिबिंबित झाली होती ती प्रेरणा आता व्यक्तिविकासाच्या सूक्ष्म भावनेच्या, वरच्या पातळीवर गेलेली आपणास दिसून येते. स्वातत्र्य म्हणजे व्यक्तिस्वातत्र्य अशी स्पष्ट कल्पना ह्या कालखडात दिसून येते. हिंदुस्थानात हा कालखड आता कोठे सुरू होत आहे असे वाटते. युरोपमध्ये सरजामशाहीच्या नाशानतर व भाडवलशाहीच्या सुरुवातीला ही व्यक्तिस्वातत्र्याची कल्पना रुजली.

ह्या काळातील व्यक्तिस्वातत्र्याचे स्वरूप हे तत्पूर्वीच्या शासनपद्धतीच्या व अर्थव्यवस्थेच्या विरोधातून निर्माण झाले होते. पूर्वी अनियंत्रित राज्यसत्ता असे, तिच्यामुळे व्यक्तित्वाच्या विकासाला बधन पडत होते, म्हणून तिच्यात बदल घडवून आणून लोकशाही निर्माण केली. पूर्वी अर्थोत्पादन हे संघामार्फत (guilds) होत होते, आता अर्थोत्पादनाचे स्वातत्र्य व्यक्तींना मिळविले. वाटेल त्याने आपल्या मगदुराप्रमाणे वाटेल तेथे अर्थोत्पादन करावे, आपल्याला वाटेल तेथे विकावे. खुल्या व्यापाराचे तत्त्व आचरणात आले. परतु काही कालानतर असे आढळून आले की हे व्यक्तिस्वातत्र्य नुसते नावाचे आहे. लोकशाही असूनही शासनसस्थेवर लोकांचे नियत्रण नसून मूठभर धनिकांचे आहे, आर्थिक बाबतीतहि जे स्वातत्र्य होते त्याचा दुरुपयोग काही थोडे लोक करीत आणि व्यक्ति ही त्या व्यवस्थेत निराधार, उघडी पडली आहे. पूर्वी सघाचे तरी आश्रयस्थान होते. आता तेहि उरले नाही. व्यक्तिविकासाला आवश्यक म्हणून केलेले व्यक्तीला आत्मानुकूल असे बदल आता बधनभूत झाले.

त्यानतर व्यक्तिविकासाच्या उद्देशाने काही समाजात जे बदल करण्यात आले ते पूर्वीच्या परिस्थितीच्या विरोधातून झाले. पूर्वीच्या अर्थव्यवस्थेतून हा सर्व गोंधळ निर्माण झाला आहे असे एका राष्ट्राने ठरवून एक समाजसत्ताकित अर्थव्यवस्था तेथे निर्माण करण्यात आली. तेथे खुला व्यापार आणि अर्थोत्पादनाचे स्वातत्र्य मर्यादित करून आर्थिक नियोजन करण्यात आले आहे.

पूर्वीच्या पार्लमेंटरी लोकशाहीच्या ऐवजीं निराळी राज्यघटना तेथे अस्तित्वात आहे. परंतु तेथेहि व्यक्तीला स्वमत प्रदर्शित करण्यात अडचणी आहेत. एका पक्षाला उपयुक्त असेल तेवढेंच तेथे चालूं शकतें. विरोधी भूमिका अशक्य करून टाकली गेली आहे. म्हणून उद्देश्य जरी व्यक्तिविकास असला तरी साधनें व्यक्तिविकासाला मारक असल्यामुळे साध्य हस्तगत होणें शक्य नाहीं.

व्यक्तिस्वातंत्र्याची प्रेरणा ही मूलभूत प्रेरणा असल्यामुळे ती कायमची मारली जाणें शक्य नाहीं. पण पुष्कळ काळ मनुष्याची स्वातंत्र्याच्या बाबतींत वंचना होणें मात्र शक्य आहे. मनुष्यांत जशी ही आत्मानुकूल बदल करण्याची दुर्दम्य इच्छा आहे, आत्मविकासात आड येणाऱ्या बंधनास दूर सारण्याची तीव्र मनीषा आहे, तशीच त्याला एकलकोंडेपणाची आत्यंतिक भीतीमुद्धा वाटत असते. इतिहासात आत्म्याचा विकास होऊन त्या विकासाचाच भाग म्हणजे स्वत्वाची जाणीवहि होते, त्याच वेळीं आपल्या वेगळेपणाची जाणीव, आपल्या एकटेपणाची जाणीव, समष्टीपुढे आपल्या असमर्थतेचीहि जाणीव होते. म्हणून आत्मानुकूल बदल करून घेता घेता तो स्वत्वाच्या जाणीवेप्रत पोहोचतो, त्याचवेळीं त्याला ही जाणीव डोईजड वाटूं लागते. आपण इतक्या बंधनातून मुक्त झालो, आता आपण कशातच बद्ध नाहीं, आपला तोल जाऊन पडूं अशा भीतीनें तो गांगरून जाऊन कशात तरी बद्ध, कशात तरी विलीन होऊं पाहातो. मनुष्याचा इतिहास हा बंधमुक्तीचा इतिहास आहे. प्रथम निसर्गाच्या निर्दय बंधनातून तो मुक्त झाला, नंतर समाजाचीं अनेक बंधनें त्यानें झुगारलीं, पण नंतर आपण मुक्त आहोत ही जाणीव, आपण एकटे आहोत ही भावनाच त्याला जाचक होते. नव्या बंधनात तो पडतो. एकलकोंडेपणाची जाणीव हे एक विचित्र मानसिक बंधन त्याला दुसऱ्या बंधनात ढकलते. आपण स्वतंत्र आहोत ह्या भावनेच्या भयानें तो राष्ट्रवादाच्या आहारीं जाईल किंवा दुसऱ्या कोणत्या-तरी समष्टींत विसर्जन पावण्याचा प्रयत्न करील. भांडवलशाही लोकशाहींतील व्यक्ति अशा तऱ्हेच्या भयानें अतिशय घाबरून गेलेली आहे. या विस्कळित समाजातील व्यक्ति आपल्या डोक्यावरचें स्वातंत्र्याचें ओझें टाकून पळूं पाहत आहे. ज्या प्रेरणेमुळे आजपर्यंत व्यक्तींनीं बंधनामागून बंधनें नष्ट केलीं ती प्रेरणा जर सतत जागृत ठेवावयाची असेल तर हे स्वातंत्र्याचें वाटणारें भय नष्ट केलें पाहिजे. ज्याप्रमाणे पाषाणयुगातील रानटी माणसानीं निसर्गाच्या नियमाचा फायदा घेऊन आपला जीवनकलह यशस्वी रीतीनें लढविला, किंवा सुसंस्कृत समाजानीं समाजव्यवस्थेचे नियम लक्षात घेऊन इष्ट तो बदल परिस्थितींत करून घेतला त्याचप्रमाणे आज मनोव्यापाराचे व समाजव्यवहाराचे नियम लक्षात घेऊन आपणासहि व्यक्तिविकासाच्या आड येणारीं बंधनें नष्ट केलीं पाहिजेत. नाहीतर

काहीं काळ तरी, आणि दीर्घकाळपर्यंतसुद्धा, समाजातील व्यक्ति स्वयविकासाची इच्छा दाबून टाकून राष्ट्रपुरुषावर किंवा/वर्गसमष्टीवर आपली सर्व भिस्त टाकतील.

मनुष्यजातीच्या जन्मापासून तेवणारा हा नदादीप अखंड तेवत राहायचा असेल तर आधुनिक शास्त्राच्या ज्ञानाचा फायदा घेऊन समाजव्यवस्थेत व्यक्तिविकासास अनुकूल असा बदल करणे अत्यावश्यक आहे. ह्या समाजक्रांतीचे अगदीं थोडक्यात दिग्दर्शन करणे अप्रस्तुत होणार नाहीं. प्रथमतः सध्याची भांडवलशाही अर्थव्यवस्था बदलून त्याऐवजीं आर्थिक नियोजन करणे आवश्यक आहे. उत्पादन करायचे ते समाजाच्या उपयोगासाठीं, काहीं व्यक्तींच्या नफ्यासाठीं नव्हे. नियोजनविरोधी अर्थशास्त्रज्ञ नियोजनामुळें स्वातंत्र्याची गळचेपी होईल अशी भीति दर्शवितात ती वरील स्वातंत्र्याच्या व्याख्येबाबत खरी नव्हे. स्वातंत्र्य म्हणजे स्वैराचार नव्हे. आत्मानुकूल अशी परिस्थिति बनवायची ती विवेकाच्या अधिष्ठानावरच. विवेक सोडून केलेली गोष्ट इष्ट अशी वाटली तरी अंतीं ती इष्ट होणार नाहीं. व्यक्तित्वाचा सतत विकास होण्यासाठीं समाजशास्त्राच्या ज्ञानानें पटलेलीं बंधने व्यक्तीला पाळलींच पाहिजेत. रस्त्याने डाव्या बाजूने जाणे हें बंधन विकासाला पोषक आहे, घातक नव्हे, कारण शास्त्राने त्या बंधनाची जरुरी पटवून दिली आहे. किंबहुना तें बंधनच नव्हे, तर विकासासाठीं घातलेला तो एक नियम आहे. सध्या अस्तित्वात असलेल्या साधनाच्या जोरावर जास्तींत जास्त विकास होण्यासाठीं आर्थिक नियंत्रणाची आवश्यकता आहे. तसेच राज्यघटनेच्या बाबतींत कोणत्याहि व्यक्तीचे किंवा वर्गाचे अधिपत्य समाजातील व्यक्तींवर राहता उपयोगी नाहीं. यासाठीं शासनशक्तीचें विभजन झाले पाहिजे आणि व्यक्तीला एकटेपणाची भीतिदायक जाणीव होऊं नये म्हणून लोकशाहीचीं केंद्रे हीं संघटित व जागृत राहिलीं पाहिजेत. याचाच अर्थ खेडोपाडीं व शहराच्या विभागांत जनतासमिति नियुक्त झाल्या पाहिजेत व शासनाचीं सूत्रे त्या जनतासमित्यांकडे गेलीं पाहिजेत. हा बदल सध्याच्या परिस्थितींत केला पाहिजे, म्हणजे स्वातंत्र्याच्या प्रेरणेस चालना मिळून मनुष्यसमाज प्रगतीच्या मार्गावर झपाट्यानें चालूं लागेल.



*

# इतिहास शास्त्र आहे काय ?*

लेखक:—प्रा. ना. अ. मावळंकर.
एम्. ए., एल्एल्. बी.
विलिग्डन कॉलेज, सांगली.

—१—

**प्रास्ताविक**

इतिहासाला शास्त्र म्हणावे की नाही हा वाद फार पुरातन काळापासून आजतागायत चालत आलेला आहे. कारण नव्या नव्या युगात, अगर दरएक कालखंडात ज्या काही विशेष महत्त्वपूर्ण अशा घडामोडी होतात, त्याच्या अनुरोधाने या सनातन प्रश्नाचा पुन्हा विचार करावा व काही प्रमेय निश्चित करता आल्यास पाहावे अशी अभ्यासकास इच्छा असणे अगदी स्वाभाविक आहे. आपल्याच कालखडाविषयी बोलायचे झाले, तर कितीतरी रोमाचकारी घटना एकामागून एक घडत आहेत. या साऱ्या घटनाचा काही सयुक्तिक उलगडा आपल्याला करता येईल का ? का, या साऱ्या निसर्गाच्या लहरीप्रमाणे हव्या तशा घडत आहेत ! हा प्रश्न मनात येतोच येतो. आणि अशा वेळी इतिहास हे शास्त्र आहे की नाही व त्यातील प्रमेयानी हा प्रश्न सुटेल की नाही याचे उत्तर देणे निकडीचे होऊन बसते.

इतिहासाचे असे विशिष्ट ज्ञानक्षेत्र कोणते याविषयी आपला जो दृष्टिकोन असेल त्यावरच ह्या आपल्या निकडीच्या प्रश्नाचे उत्तर अवलबून आहे, हे अगदी स्पष्ट होय. इतिहासाच्या ज्ञानक्षेत्रासबधी वाद करणाऱ्या लोकाची इतिहासाच्या कार्यासबधीची कल्पनाच पुष्कळदा भिन्न असते असे आढळून येते. परंतु इतिहासाचा अर्थ व त्याचे स्वरूप याबद्दल अगदी एकमत असलेल्या लोकातही इतिहास हे शास्त्र आहे की नाही ह्या प्रश्नासंबधी एकवाक्यता होईलच अशी काही खात्री देता येत नाही. कारण शास्त्राचे ध्येय आणि शास्त्राच्या विशिष्ट पद्धति याबाबत त्याच्यात दुमत असण्याचा संभव आहे. शेवटी वेगवेगळ्या कारणास्तव दोघेही एकाच निर्णयाप्रत येण्याची शक्यता आहे. उदाहरणार्थ, इतिहास आणि शास्त्र याच्या अर्थाबद्दल मतभेद असूनहि 'इतिहास हे शास्त्र आहे' असे मानणारे काही लोक आढळतीलच, कारण वेगवेगळ्याच नव्हे, तर आजिबात विरोधी कारणासाठी एकाच मार्गाने जाणारे लोक प्रत्यक्ष आयुष्यात जसे आपणाला पाहायला मिळतात, तसेच विचाराच्या प्रातातहि दृष्टीला पडणारच.

प्रस्तुत लेखात ह्या प्रश्नासंबंधी ज्या मुद्द्याचा आपण ऊहापोह करणार आहोत, त्यासंबंधी अगोदरच काही निर्णय कुठल्याहि प्रकाराने जीमधून ध्वनित

*मूळ इंग्रजी निबंधाचे भाषांतर.

झालेला नाहीं, अशी इतिहासाची सर्वसामान्य व्याख्या घेऊन आपण पुढे जाऊ या. ' गतकालांतील मानवी घडामोडींचा अभ्यास म्हणजे इतिहास ' असे म्हटले कीं मग इतिहासलेखनाची एक सोपी रीत सूत्ररूपाने सांगता येते. ती ही कीं— ' प्रथम घटना निश्चित करा, आणि मग शक्य तितकी बिनचूक अशी त्या घटनांची फोड करा. ' मात्र वरवर पाहतां सोपें दिसणारे हे सूत्र, प्रत्यक्ष इतिहासलेखनाच्या कामाला लागल्यावर वाटते तितके सोपे नाहीं असे दिसून येईल.

### ऐतिहासिक घटनाः बाह्य व अंतःस्वरूप

इतिहासातल्या घटना घटना म्हणजे तरी काय ? याचा आपणाला प्रथम विचार करावयाला पाहिजे. भौतिक शास्त्रातील घटना आणि सामाजिक शास्त्रातील घटना यांत एक महत्त्वाचा फरक आहे. एकाद्या जड वस्तूच्या गुणविशेषावरून निःसंदिग्धपणे त्या वस्तूची व्याख्या करणे किंवा ' हीच ती वस्तू होय ' असा निश्चय करणे हे शक्य आहे. परंतु मानवी कृतीच्या बाह्य गुणविशेषाचा तिच्या अंतःस्वरूपाशीं तसा कांहीं निश्चित संबंध असतोच असें नाहीं. अगदीं कट्टर वर्तनवादी आणि शरीरविज्ञानवादी यांनीं देखील आपल्या तत्त्वाच्या आग्रहाला बरीच मुरड घालून असे मान्य केले आहे कीं, मानवांना जड वस्तू समजून त्यांच्या कृतींचा बरोबर उमज पडूं शकत नाहीं. या कारणासाठींच घटनांच्या बाह्य स्वरूपाकडे आणि केवळ शारीरिक हालचालींकडेच विशेष लक्ष पुरविणाऱ्या भौतिक शास्त्राची पद्धति सामाजिक क्षेत्रात लागूं पडत नाहीं.

कारनॅप लिहितो—

'रागावलेला मनुष्य विशिष्ट परिस्थितींत शरिराच्या ज्या हालचाली करितो, त्या प्रतिक्रियारूप हालचाली म्हणजे कांहीं राग नव्हे. कारण कित्येकदा बाह्यतः दृश्यमान् होणाऱ्या ह्या हालचाली नसताहि मनुष्याच्या ठिकाणीं राग संभवतो. रागावल्यानंतर एकाद्या माणसाच्या चेहऱ्यावरील स्नायूंत जे दृश्य फेरबदल घडतील किंवा त्याच्या मज्जाततूंवरील ताण निरनिराळ्या अवयवांच्या द्वारा जसा प्रकट केला जाईल, तशा तऱ्हेचा आविष्कार दुसऱ्या एकाद्या माणसाच्या ठिकाणीं तो रागावलेला असूनहि दिसून येईलच असे नाहीं, परंतु तो रागावला आहे हे मात्र त्याचा तोच समजू शकेल. ( कारनॅप—लॉजिकल फौंडेशन्स ऑफ दी युनिटी ऑफ सायन्स,—उतारा, कॉफमनच्या मेथडॉलॉजी ऑफ दी सोशल सायन्सेस, यावरून. पाने १५४–५५ ).

तेव्हां आपण एकाद्याच्या वर्तनाचा विचार केवळ बाह्यांगावरूनच करूं लागलो तर त्या वर्तनाचे मर्म आपल्या हातून निसटून जाण्याचा संभव आहे.

एकादी म्हातारी परक्या माणसाशींहि मातेच्या मायाळूपणाने वागते याचा अर्थ ध्यानात यायला त्या परक्या इसमाकडे पाहून पुष्कळ दिवसापूर्वी हरपलेल्या—दिवंगत झालेल्या आपल्या प्रिय पुत्राची त्या वृद्धेला आठवण झाली असावी हें आपणाला जाणून घ्यावे लागतें. मानववंशशास्त्रज्ञ रानटी लोकांच्या वागणुकींचा जेव्हा अभ्यास करितात तेव्हा त्याचे खरे मर्म समजण्यासाठीं त्याना तो अभ्यास त्या रानटी जमातीच्या एकंदर जीवनपद्धतीच्या अनुषंगाने करावा लागतो. हाइकनें देखील म्हटले आहे की आपण माणसाच्या भिन्न कृतींचे जे वर्णन करतो ते केवळ त्याच्या बाह्यांगाकडे दृष्टि ठेवून करीत नाहीं; तर त्याच्या प्रेरणा नि संकल्प याच्या अनुरोधाने आपण त्याचे वर्णन करीत असतो.

हेंच दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास असे म्हणता येईल कीं, नैसर्गिक घटनांचा उलगडा त्यातील कार्यकारणभाव समजून घेतल्याने जसा होतो, त्याप्रमाणेच मानवी कृतींचा बोध किंवा उलगडा त्यामागील प्रेरणा व तिची प्रतिक्रिया याचा परस्पर संबंध लक्षात घेतला तरच होऊं शकतो. म्हणून जसे प्राण्याच्या बाबतींत, तसेच मानवी कृतींचेहि पद्धतशीर निरीक्षण, व पृथक्करण केले तर त्यावरून मानवी वर्तणुकीसंबंधीं कांही सामान्य सिद्धान्त बांधता येतील अशा प्रकारचे मत अनेकदा पुष्कळाकडून सूचित झाले आहे.

## वर्तनवादी विश्लेषणांतील दोष

पण या तऱ्हेच्या वर्तनवादी विश्लेषणात पुष्कळच अडचणी उद्‌भवतात. व्ही १ आणि व्ही २ ह्याच्यामुळे ब्रिटिशाचे मनोधैर्य खची होईल अशी हिटलरची कल्पना होती; परंतु हिटलरसारख्या रानटी शत्रूशीं शेवटपर्यंत निकराने लढण्याच्या जॉनबुलच्या कठोर निश्चयाला त्या अस्त्राच्या आपत्तीमुळे उलट विशेषच बळकटी आली. ' प्रेरणा ' ही कांहीं ठराविक गुणांनीं युक्त अशी जड वस्तु आहे असे मानण्यात भौतिकवाद्यांची मोठी चूक होत आहे. वास्तविक प्रेरणा ही प्रेरणाच होय. टॉल्स्टॉयच्या लेखनामुळे तरुण गांधींना सत्य-अहिंसेचा मार्ग चोखाळण्याची स्फूर्ति झाली असे मानले जाते, परंतु महात्माजींच्या पूर्वी लक्षावधि लोकांनीं टॉल्स्टॉय वाचला होता. पण फक्त गांधींनाच एकट्याला सत्य-अहिंसेच्या मार्गाने आत्मोद्धार करून घेण्याची शक्ति टॉल्स्टॉयच्या लेखनातून मिळविता आली. आधुनिक मनुष्यावर भांडवलशाही समाजपद्धतीने मोठा घातक परिणाम झाला आहे अशी सार्वत्रिक समजूत आहे, पण ही समजूत म्हणजे एक सामुदायिक पूर्वग्रह आहे. मनुष्य कल्पितो तशी त्याच्या भोवतालची परिस्थिति असते. वास्तविक, वैद्यकाच्या क्षेत्रात औषधाच्या दृश्य परिणामाला विशेष महत्त्व आहे. पण त्या क्षेत्रात देखील औषधाच्या रामबाणपणाविषयीं

असलेल्या दृढ विश्वासाच्या बळावर नुसत्या पाण्याच्या सेवनानें रोगी खडखडीत बरा झाल्याचे चमत्कार आढळून येतात.

यावरून हे स्पष्ट होईल की, कृति करणाऱ्या व्यक्तींच्या मनीषा आणि हेतू याच्या रूपाने मानवी कृतींच्या जड शरीरामध्ये एकप्रकारचें चैतन्य जेव्हा ओतले जाते, तेव्हाच त्या कृतींना खराखुरा जिवतपणा प्राप्त होतो.

कृति करणाराच्या हेतूमुळेंच वर्तनाला अर्थ प्राप्त होतो हे जरी एका बाजूला खरे असले तरी प्रत्यक्ष घडलेली कृति आणि सकल्पित कृति याच्या स्वरूपात पुष्कळ वेळा फारच मोठी तफावत पडलेली दिसून येते. अमुक एका कृतीचा अमुकच परिणाम होईल ही अपेक्षा आणि प्रत्यक्ष झालेला परिणाम यात पुष्कळच अतर दृष्टोत्पत्तीस येते. आपल्या इच्छेप्रमाणे किंवा हेतूप्रमाणे आपण वागू शकत नाहीं ही तर अगदीं नेहमींच्या अनुभवातली गोष्ट आहे. ' माणसे ही वस्तुत. बीजत्वानें देवच आहेत ' ही मानवी स्वभावासवधींची जास्तींतजास्त चागली नि उदार अशी कल्पना आहे. परतु दुर्दैव इतकेंच की सुप्त असलेले हे आपले देवपण माणसे कधींच प्रकट करू शकत नाहींत.

आपला उत्कट प्रेमभाव आपल्या प्रेयसीजवळ व्यक्त करण्यासाठीं स्वतःचा जीव ओवाळून टाकणारा प्रियकर त्या प्रेमपिशाचानेंच पछाडला गेल्या-मुळें एकदम मूक बनतो हे कोणाला ठाऊक नाहीं ? याच्या उलट अशीहि उदाहरणे पुष्कळ सापडतात कीं, खऱ्या प्रेमभावनेचा यत्किंचितही ठावठिकाणा नसताना नाटकी अभिनय आणि अमाप शब्द याची खैरात मात्र पुष्कळच केली जाते. या उदाहरणावरून लक्षात इतकेंच ठेवावयाचे कीं वाञ्छित कृति आणि प्रत्यक्ष कृति याच्यात अनेक वेळा लावच लाव अतराची दरी पसरलेली असते.

## प्रतिक्रियेची मर्यादा

तसेच या मानवी व्यवहारामध्ये आपल्या कृतींची दुसऱ्या व्यक्तीवर जी प्रतिक्रिया होते तिच्यावर पुष्कळदा मानवी प्रेरणा अवलबून असते, ही आणखी एक गोष्ट लक्षात घेतली की मानवी स्वभावाचा नि वर्तनाचा अभ्यास करणा-रापुढील गुतागुत अधिकच बिकट होते. कोणी कितीहि प्रतिभावान् असला तरी त्याच्या दृष्टीला भोवतालीं असेल ते सर्व दिसू शकत नाहीं व दिसेल त्या सर्वांचे यथातथ्य चित्रहि रेखाटता येत नाहीं. मघाचेच उदाहण घेऊ या. टॉल्स्टॉयने त्याच्या काळचे जीवन त्याला जसे दिसले तसेच रेखाटले. त्याच्या काळची सामाजिक परिस्थिति व जीवनाचे स्वरूप कसेहि असले तरी टॉल्स्टॉयने त्याकडे या दृष्टीने पाहिले एवढेच आपणाला त्याचे लेखन सागत. परतु तरी देखील त्याच्या विविध अनुभवाचा आशय पूर्णाशाने त्यामध्ये उतरला आहे

असे म्हणणे हें धाडसाचें होईल. कारण कला ही कलावताच्या प्रतिभेच्या पराभवाची एक निशाणी आहे. अनताचा शोध घेणाऱ्या साताची ती दुबळी धडपड आहे. टॉल्स्टॉयच्या लेखनाने तरुण गांधींच्या अतःकरणातील कोणत्या तरल तारा छेडल्या गेल्या याची कोण कल्पना करू शकेल ? आणि किती प्रमाणात महात्माजींना ते आत्मसंगीत शब्दात नि कृतीत उतरविता आले, हे तरी कोण सागेल ?

म्हणूनच शास्त्रीय दृष्टीने इतिहास लिहू पाहणाराच्या मार्गातील ही खरी-खुरी अडचण आहे असे **नाईट** म्हणतो. हेतु व कृति याच्यात जर पूर्ण मेळ असेल तर हेतूचा शोध घेणे अनावश्यक ठरेल आणि जर तसा काहीं दोहोंमध्यें सबंध नसेल तर मग मानवी हेतु मानवी कृतींचा—वर्तनाचा उलगडा करू शकणार नाहींत.

—२—

## ऐतिहासिक घटनांची साधनें

इतिहासातील घटना कशा रीतीने प्रस्थापित करावयाच्या हा यापुढला दुसरा प्रश्न आहे.

या दृष्टीने ऐतिहासिक साधनाचे स्थूलपणें दोन वर्ग पडतात. भावी इति-हासकाराला उपयोगी पडावी म्हणून बुद्धया तयार केलेलीं साधने हीं पहिल्या वर्गांत पडतात. आणि यापेक्षा निराळी म्हणजे यदृच्छया तयार झालेलीं परतु गतकालाच्या उभारणीला अत्यत उपयुक्त अशी ऐतिहासिक साधनें हीं दुसऱ्या वर्गांत पडतात. पण प्रत्येक नवी पिढी आपल्या मागील पिढीच्या कर्तृत्वावर मात करून पुढे जाण्याला अधीर झालेली आहे, हें लक्षात घेतले की आपल्या कर्तृत्वाची आणि कीर्तीची गीते भावी पिढ्यांनीं गावीं ही मानवी इच्छा किती फोल आहे हे पटू लागते. म्हणूनच कदाचित् आज ज्याच्या हातात अधिकार आहे, सत्ता आहे, ते लोक पुढील पिढीच्या उपयोगासाठीं म्हणा, किंवा कल्या-णासाठीं म्हणून म्हणा, आपल्या कर्तृत्वाच्या पुराव्याची आपल्याच हाताने तर-तूद करून ठेवतात. ( मुद्दाम लिहिल्या गेलेल्या बखरी, तवारिखा, हीं याचींच उदाहरणे होत. )

ऐतिहासिक कागदपत्रातून इतिहास तयार होतो अशी फार जुनी समजूत आहे. जशा घटना घडल्या तशा त्या सागण्याचा प्रयत्न करणारीं तत्कालीन लिखितें हीं इतिहासाचीं महत्त्वाचीं साधने म्हणून मानलीं जातात. कारण समकालीन लेखकाला त्याच्या काळात घडणाऱ्या घटनाची प्रत्यक्ष माहिती असण्याचा विशेष सभव. मात्र माणसाच्या वागणुकीचा उलगडा करण्याच्या दृष्टीने प्रस्तुत निबंधाच्या पहिल्या भागात जे मूलग्राही आक्षेपस्वरूपाचे विचार

प्रदर्शित केले आहेत, ते जरी यावेळीं बाजूला ठेवले तरी या ठिकाणींहि अशी एक शंका उत्पन्न होते कीं, आत्मचरित्रे, दरबारी बखरनविसांनीं लिहिलेल्या हकीकती, शत्रूंनीं लिहून ठेवलेली माहिती, किंवा त्रयस्थांनीं सहानुभूतिपूर्वक वर्णिलेल्या गोष्टी याच्यामध्ये जसे कांहीं पूर्वग्रह आढळतात तसे कांहीं पूर्वग्रह या ऐतिहासिक साधनामध्ये नसतीलच याला पुरावा काय ? मग ती पूर्वग्रह-दूषित दृष्टि त्या लेखनात जाणतेपणाने येवो किंवा नेणतेपणानें येवो, तिची छाननी ही जरूर व्हावयाला पाहिजे. कारण एखाद्या घटनेची कार्यकारण-मीमांसा करताना अगर तिचे बुद्धिवादी समर्थन करतानाहि लेखकाच्या ठिका-णचा एकादा पूर्वग्रह नकळत त्यामध्ये दडलेला हा असावयाचाच.

## अतिपरिचयानें घडणारा अनुल्लेख

यापुढे आणखी एका प्रकारची अडचण उद्भवते, ती ही कीं, अति-परिचयामुळे कांहीं घटनांचा स्पष्ट उल्लेखहि करण्याचे समकालीन लेखकाच्या-कडून राहून जाते. अशा घटना भोवतालच्या हवामानाप्रमाणे इतक्या नित्याच्या झालेल्या असतात कीं उद्दिष्ट विषयाचा अभ्यास चालू असता त्या विचारात घेण्याचें अवधान राहात नाहीं, किंवा महत्व वाटत नाहीं. उदाहरणार्थ १९ व्या शतकाच्या प्रारंभकालीं अर्थशास्त्रज्ञ जेव्हा सामाजिक व आर्थिक प्रगतीसंबंधीं विचार करू लागले तेव्हा पूर्वापार चालत आलेल्या खासगी मालकीच्या कल्पनेचें अस्तित्व अगदीं अभावितपणे गृहीतच धरलेले असे. शिवाय त्या कालातील प्रत्येकाच्या विचारसरणीमध्येहि ती कल्पना पार रुजून गेली असल्यामुळे तिचा विशेष कटाक्षाने उल्लेख केला नाहीं म्हणून तत्कालीन लोकांची विचारपरंपरा कोठेच अडखळत नसे, किंवा त्या अनुल्लेखाचा विपर्यास होण्याचाहि धोका बिलकुल नसे. परंतु पुढील कालात जेव्हा परिस्थिति बदलली व खाजगी माल-मत्तेचे दुष्परिणाम जाणवू लागले तेव्हा गतकालीन इतिहासाची संगति लावूं पाहणाऱ्या इतिहासकारास हा अनुल्लेख तर्कदुष्ट व गैरसमज निर्माण करणारा वाटला यांत शंका नाहीं.

अशा अनुल्लेखाच्या अडचणीबरोबरच नेमकी त्याच्या विरुद्ध अशी दुसरी एक अडचण उद्भवते, ती म्हणजे केवळ तत्कालीन महत्त्वाच्या अशा एकाद्या गोष्टीवरच विशेष भर दिला जाणे ही होय. तत्कालीन परिस्थितीच्या दृष्टीनेंच विशेष महत्त्वास पावलेल्या घटनाबद्दल पुढील काळातील लोकांना योग्य तो उलगडा न झाल्यामुळे मोठा चमत्कार वाटू लागतो. ह्या दोन गोष्टी-प्रमाणेच ऐतिहासिक साधनाच्या वापरात आणखी एक प्रकार घडतो तो हा कीं, चालू कालातील महत्त्वाच्या प्रश्नाच्या अनुषंगानें आपणाकडून गतकालातील साध्यासुध्या व क्षुल्लक गोष्टींना उगाच अवास्तव महत्त्व दिले जाते.

## साधनांच्या निवडींतील आकस्मिकपणा

शिवाय ऐतिहासिक कागदपत्रांच्या ढिगाऱ्यातून प्रथम कोणते कागद निवडावयाचे किंवा त्यांतील कोणत्या ऐतिहासिक नोंदींना प्रथमतः प्राधान्य द्यावयाचें या बाबतींतहि कांहीं उणीवा राहणारच. कारण त्यासंबंधीं तसे कांहीं ठराविक नियम असणे शक्य नाहीं व तसे ते नाहींतहि. म्हणून अनेक घटनांची नोंद न झाल्याने इतिहासलेखनांत कांहीं उणीवा राहणें हे अगदीं अपरिहार्य आहे. ज्यांच्या अस्तित्वाविषयीं अगोदर कोणालाहि अंधुक कल्पना नव्हती अशा विस्मृतीच्या बळदांत गाडल्या गेलेल्यांपैकीं कांहीं घटना आकस्मिक रीत्या जेव्हां उजेडांत येतात तेव्हांच त्यांचे प्रभावी महत्त्व लक्षांत येते. मागाहून उजेडांत आलेल्या ह्या घटना कित्येकदां ज्ञानाच्या क्षेत्रांत नवीं क्षितिजे उघडतात, तर कित्येक वेळां पूर्वी सुसंगत वाटणाऱ्या इतिहासांत मोठालीं खिंडारे निर्माण करून ठेवतात. याचा परिणाम एवढाच होतो कीं माणसाच्या अज्ञानाचा परीघ संकोच पावण्याऐवजीं अधिकच विस्तार पावतो. जितकें आपण जास्त ज्ञान संपादूं तितकी आपल्या अज्ञानाची जाणीव वाढतच जाते.

अर्थात् ह्या सर्व गोष्टी बाद करून ऐतिहासिक घटनांच्या विशदीकरणाचे कांहीं सामान्य नियम आपणाला बांधतां येतील. तरी देखील वर उल्लेखिलेल्या अडचणींमुळे वस्तुनिष्ठ ज्ञान हे जवळ जवळ अशक्यच होय हे स्पष्ट होईल.

ऐतिहासिक घटनांचीं समकालीन लिखितें हीं वर दर्शविल्याप्रमाणे अनेक अंगानीं अपूर्ण असतात, हे लक्षांत घेऊन इतिहासाच्या खऱ्याखुऱ्या साधनांविषयीं कांहीं लेखकांनीं अगदीं वेगळ्याच कल्पना पुढे मांडल्या आहेत. ज्याला आपण आज अधिकृत असे मानतो, तीं समकालीन लिखितें हीं कांहीं इतिहासाचीं पायाभूत साधनें नव्हेत. अशीं लिखितें एकापुढे एक ठेवून तयार केलेल्या हकीकतीला ' कात्रणें चिकटवून तयार केलेला इतिहास ' असें कॉलिंग-वुड म्हणतो.

## वर्तमानकालांतून इतिहासाकडे

अशा तऱ्हेच्या नकली इतिहासांत गतकालाला मृतवत् समजण्यांत येतें. आणि गतकालीन वडामोडींचीं कलेवरें, कागदपत्रें व स्मारकें यांच्या रूपांत इजिप्शियन ममींप्रमाणे जतन करून लोकांच्यापुढे ठेवलीं जातात. पण गतकाल गेला तो गेलाच. ज्ञानाच्या कक्षेपलीकडे अगदीं कायमचा गेला. फक्त चालू काळांत अवशेषांच्या रूपानें जो गतकाल जिवंत आहे तेवढाच ऐतिहासिक ज्ञानाचा व इतिहासकाराच्या अभ्यासाचा विषय होऊं शकतो. म्हणून सारें दृश्य जग, त्याची आताची व इथली वर्तमानकालीन वस्तुस्थिति हींच इतिहासाचीं खरीखुरीं

साधने होत. कॉलिंगवुडच्या शब्दातच सांगावयाचे झाले तर वर्तमानकालाच्या या आवरणाखाली गतकाल एकाद्या गुटिकेप्रमाणे सामावलेला असतो. ह्या वर्तमानकालातून गतेतिहासाचे चित्र रेखाटणे हे इतिहासकाराचे खरे काम आहे. भोवतालच्या समकालीन जगातील प्रत्येक गोष्ट ही या दृष्टीने अप्रकट असा पुरावाच होय. फक्त प्रतिभावंत इतिहासकारालाच हा पुरावा प्रकट करता येईल. या दृष्टीने पाहता इतिहासकार म्हणजे रंगाचे चार-दोन फटकारे मारून अधिकृत साधनाची केवळ नक्कल चितारणारा रंगारी नव्हे, तर आपल्या स्वयंभू कल्पकतेच्या साहाय्याने स्वतःच्या दृष्टिकोनाप्रमाणे गतकालाचे चित्र रेखाटणारा तो एक प्रतिभावान् चित्रकार आहे. अधिकृत म्हटल्या जाणाऱ्या साधनाची तावेदारी न पत्करता त्याची निवड करणे, त्याची नवी मांडणी करणे, व प्रसंगी त्यावर टीका करणे या सर्व बाबतींत तो स्वतःच मुखत्यार आहे. स्वतःच्या कामी उपयोगी पडतील अशाच घटनांची अधिकृत साधनातून तो निवड करतो, व त्याच्या दृष्टीने ज्याच्यावर अनाठायी भर दिला गेला आहे अशा इतर घटना तो बाजूला सारतो. अधिकृत साधनांनी ज्या बाबतींत मौन स्वीकारले आहे अशा अनुल्लेखित घटनांचाहि आपल्या लेखनात तो समावेश करतो व समकालिनांनी लिहिलेल्या हकीकतींतील त्रुटकपणा अशा तऱ्हेने तो भरून काढतो. इतकेच नव्हे तर हा कलावंत इतिहासकार आपल्या अधिकृत साधनांची चिकित्सा करून त्या साधनांवर चुकीची किंवा खोटी माहिती दिल्याचा आरोपहि करू शकतो. कधी कधी निरनिराळ्या अधिकृत साधनामध्ये ज्या बाबतींत स्पष्ट विरोध आहे अशा गोष्टींचाहि तो आदर करतो आणि गतकालासंबंधींच्या त्याच्या कल्पनाचित्राशी न जुळणारे व विसंगत असे जे जे काही असेल त्या साऱ्यांच्या सत्यतेबद्दल शंका व्यक्त करून ते ते तो नाकारतो. 'या या अधिकृत साधनामध्ये या प्रकाराची अशी नोंद आहे खरी परंतु हा प्रकार अशा रीतीने घडला नसावा, तो असा असा घडला असला पाहिजे' असे तो म्हणू शकतो. ( हिस्टॉरिकल इमॅजिनेशन—कॉलिंगवुड पान ११. ) अशा रीतीने अधिकृत म्हटल्या जाणाऱ्या साधनांचा अधिकृतपणा नाहीसा होतो आणि गतकालाविषयींच्या त्याच्या कल्पनेवरून त्याची सत्यासत्यता मापली जाते. तो स्वतःच आपला अधिकृत पुरावा बनतो. आणि ऐतिहासिक सत्याचा कस ठरविण्याची शक्ति स्वतःच्या कल्पकतेत आहे असे धरून चालतो. अशा रीतीने कल्पनाशक्ति चालवून लिहिलेल्या इतिहासाच्या उभारणींत काय काय येते याचा सविस्तर विचार पुढे केला आहे.

### साधनांचा दुसरा प्रकार

इतिहासाच्या दुसऱ्या प्रकारच्या साधनात सर्वसाधारणपणे यदृच्छया

तयार झालेल्या स्मृतिसाधनांचा अंतर्भाव होतो. यामध्ये शिलालेख, ताम्रपट, पोथ्या, मुद्रा, नाणीं व पदकें, चित्रें, जुन्या इमारतींचे अवशेष, अस्थि व मृतशरीराची राख जतन करून ठेवणारी पात्रे, इत्यादि साधनांचा समावेश तर होतोच, पण मानवजातींचीं अतिपुरातन स्मारकें म्हणून ओळखल्या जाणाऱ्या भाषा, आणि दंतकथा, लोककथा यांचाहि ऐतिहासिक साधनें म्हणून उपयोग केला जातो. ( एनसायक्लोपीडिया ऑफ सोशल सायन्सेस्–भाग ८ वा, पान ३६३.) इतिहासाला साहाय्यकारी होणाऱ्या शास्त्रांची परंपरागत यादी लाग्लवनिझ देतो ती अशी– शकावली, कोरीव लेख ( इमारतींवरील ), पुरातन लीपिपद्धति, मुत्सद्यांचे पत्रव्यवहार, मुद्राशास्त्र, नाणकशास्त्र, मध्ययुगीन ललकाऱ्या, घोषवाक्यें इत्यादि.

या जुन्या यादीमध्ये आणखी कांहीं नवीन शास्त्रांचाहि समावेश करता येईल. उदाहरणार्थ, भाषाशास्त्र, ऐतिहासिक सूचि, पुराणवस्तुशास्त्र, भूगोलशास्त्र आणि हल्लींच्या लोकशाहीच्या काळात महत्त्व पावलेलें लोकस्थितिशास्त्र* (कित्ता पान ३६४). यावरून इतिहासलेखनाला केवढा प्रचंड उद्योग करावा लागतो व तो उद्योग यशस्वी होण्याला इतिहासकाराच्या ठिकाणीं किती विविध प्रकारची तयारी असावी लागते याची कल्पना येईल. हीं विविध तंत्रे सभाळून लेखन केल्यानें इतिहासाला 'शास्त्रा'चा भारदस्तपणा आला आहे.

तथापि, पहिल्या भागात मानवी वर्तणुकीबद्दल जे कांहीं म्हटलें तेंच मानवी संस्थांना व कृतींनाहि लागू आहे हें लक्षात घेतलें पाहिजे. कॉफमन् म्हणतो त्याप्रमाणें ताम्रपट किंवा शिलास्तंभ यावरील कित्येक ओरखडे हवामानाच्या परिणामामुळेहि निर्माण होतील, परंतु आपण मात्र त्यांना ऐतिहासिक लेख समजून त्यांचा अर्थ लावू पाहतो. तो म्हणतो, 'प्रत्येक सामाजिक घटनेचे स्पष्टीकरण करतांना तिच्या बुडाशीं असलेल्या जड घटनेचा सामाजिक अर्थ समजून घेणें अवश्य आहे, ( कॉफमन्–मेथॉडॉलजी ऑफ दि सोशल सायन्सेस पृ. १६६ ). अर्थात् जड घटनेचे सामाजिक महत्त्व समजावून घेतांना देखील वर निर्दिष्ट केलेल्या मर्यादा विसरून चालणार नाहीं.

–३–

## सिद्ध इतिहासाचा विचार

इतिहासाच्या कच्च्या साधनसामुग्रीचा आपण आतापर्यंत विचार केला. आतां प्रत्यक्ष सिद्ध वस्तूचा म्हणजे रचलेल्या इतिहासाचा विचार करण्याची वेळ आली आहे.

---

*Demography: समाजातील जन्ममृत्युविषयक आकडे व तपशील यांचें शास्त्र

उपलब्ध घटनांची केवळ योग्य कालानुक्रमाने जुळणी केल्याने कांहीं इतिहास सिद्ध होत नाहीं. ती घटनांची मामुली जंत्री होईल. घटनांचे कथन करणें किंवा त्याचा कालानुक्रम लावणे म्हणजे इतिहास नव्हे. अर्थपूर्ण किंवा साभिप्राय निवेदन म्हणजे इतिहास होय. आणि जमा केलेल्या घटनांना एकाद्या मानवी हेतूशी सलग्न केल्याखेरीज त्या घटनांना साभिप्रायता किंवा अर्थपूर्णता येत नाहीं. त्या हेतूमुळेच मानवी कृतीला निसर्गातील घडामोडींपेक्षा वेगळेपणा प्राप्त होत असतो. असा एक काळ होता की त्यावेळीं नैसर्गिक घडामोडींचें स्पष्टीकरण देखील मानवी पद्धतीनें करण्यात येई. प्रत्येक नदी किंवा वहाता झरा याच्या ठिकाणीं जलदेवताचे आस्तित्व मानण्यात येई. अरण्यातील झाडावरहि वनदेवताची वस्ती आहे असे कल्पिण्यात येई, किंबहुना सर्व निसर्गसृष्टि म्हणजे सर्वश्रेष्ठ परमात्म्याच्या कल्पनाशक्तीचा–इच्छाशक्तीचा विलास समजला जाई.

निसर्गाकडे अशा एकात्मतेने पहाण्याची श्रद्धा आज आपल्यामध्ये राहिलेली नाहीं. कार्यकारणभावाने सर्व नैसर्गिक घटना बाह्यत परस्परांशीं संबद्ध असतात, त्यात आंतरिक हेतु पाहण्याचे कारण नाहीं असे आपण आज म्हणतो.

### एकात्मतेची जाणीव

तथापि मानवी कृतींच्या बाबतींत मात्र त्यातील परस्पर घटनामध्ये स्वाभाविक अंत:संबंध असतो म्हणून तर त्या सर्वांची मिळून एकप्रकारची स्वयंपूर्ण एकात्मता मानवी कृतीला प्राप्त होते. आणि त्या संबद्ध घटनांतूनच एकच एक प्रभावी कल्पना किंवा संयुक्तिक हेतु स्पष्ट होतो. ' **एका विवक्षित कालखडांतील घटनांमध्यें आवश्यक असा परस्परसंबंध असून सर्व मिळून जेव्हा एकात्मतेची जाणीव निर्माण करूं शकतात तेव्हांच आपणाला त्या ऐतिहासिक कालखंडाचा बोध झाला असे म्हटलें जातें.** ' ( डब्यू. एच्. वॉल्श, दी इंटेलिजिबिलिटी ऑफ हिस्ट्री. फिलॉसफी, एप्रिल १९४२, पान १३२ ). यशस्वी इतिहासकार एका कालखडातील भिन्न भिन्न घटनांना समुचित अशा कल्पनासूत्रात गोवून टाकतो. त्यामुळेच इतरांच्या दृष्टीला जेथे अस्ताव्यस्त घटनांचे जंगल माजलेले दिसून येते तेथेच हा इतिहासकार कांहीं व्यवस्था आणि मांडणी निर्माण करतो. लोकोपकारी राजशाहीचे युग, औद्योगिक क्रांतीचे युग, राष्ट्रवादाचे युग इत्यादि वाक्प्रयोग हे, विविध घटनांना एका सूत्रात गोवून त्या त्या विवक्षित कालखंडांना अर्थपूर्णता आणून देणाऱ्या प्रभावी कल्पनांचेच वाचक होत. तसेच सरंजामशाही, भांडवलशाही, हुकुमशाही इत्यादि शब्दांतील मुख्य कल्पनाहि त्या त्या कालातील सामाजिक,

आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक इत्यादि सर्व प्रकारच्या मानवी हितसंबंधांना आपल्यामध्ये सामावून टाकणाऱ्या आहेत. ह्या मानवी संबंधावर प्रकाश टाकणाऱ्या ह्या सूत्ररूप मुख्य कल्पना जर नाहींशा झाल्या तर मानवी संबंधाचें स्वरूप विस्कळित, स्वैर नि गोंधळाचें होऊन जाईल. 'चालू वर्तमानावरून भूत-काळाची उभारणी करणे' याविषयीं जेव्हा कॉलिंगवुड बोलू लागतो, तेव्हा तो इतिहासकाराच्या ठिकाणीं असलेल्या याच एकात्मनिर्मितीला उद्देशून बोलत असतो.

आता यावर असा एक प्रश्न उत्पन्न होतो कीं, सुट्या सुट्या घटनांची ही जी एकत्र जुळणी करावयाची ती कालदृष्ट्या करावी कीं, स्थलदृष्ट्या ? विशिष्ट भूप्रदेशावरील घडामोडींची कालदृष्ट्या केलेली मांडणी संबंध भूप्रदेशा-वरील मानवाच्या हालचालींशीं सुसबद्ध असेल का ? कालसंक्रमणाचा अर्थ लावणाराला जगांतील भिन्न मानवजमातींच्या परस्पर संबद्धतेचें कोडें उलगडता येईल का ? तें शक्य झालें तरच इतिहासाला शास्त्र म्हणता येईल. भूतकालाचें विवरण करणे आणि भविष्यकालाचें अनुमान बांधणे याला योग्य असे विकासाचे सर्वसामान्य नियम जर बांधता येतील तरच इतिहासाला शास्त्र ही पदवी देणे योग्य ठरेल. इतिहासाबाबत ही अपेक्षा धरणे कितपत युक्त आहे ते आपण पाहूं.

## इतिहास व शास्त्रसंज्ञा

इतिहासात एकसूत्रता शोधण्याच्या बुद्धीने जे इतिहासाचा अर्थ लावतात त्यांच्या दृष्टीने शास्त्राच्या काटेकोर व्याख्येत इतिहास बसू शकत नाहीं. इतिहासामध्ये विविध घटनांची सुसबद्ध मांडणी करण्याचा प्रयत्न केला जात असला तरी त्यामध्ये शास्त्रातील तंतोतंतपणा व रेखीवपणा यावा तितका येऊ शकत नाही. इतिहासामध्यें सर्वसामान्य विधानें असतात पण नियम किंवा सिद्धान्त नसतात. इतिहासकार हे घटना घडून गेल्यानंतर त्या बाबतचा शहाण-पणा दाखवितात ( तोही क्वचितच ! ), आणि भावी कालासंबंधींची त्यांची अनुमाने तर खोटीं ठरल्यानेच विशेष गाजलीं आहेत ! त्यामुळे 'काय घडलें' एवढेंच त्यांनीं पहावें आणि फार तर 'काय घडत आहे' यासंबंधीं दिग्दर्शन स्वरूपाचीं कांहीं सर्वसामान्य विधानें त्यांनीं करावींत इतकेंच. चर्चामंडळातील एखादा वाचाळ मनुष्य जेव्हा 'इतिहासानें असें सिद्ध केलें आहे' असा ओरडा करून त्याच्या बळावर आपलें म्हणणें जोरानें मांडू लागतो, त्या वेळीं हें नक्की समजावें कीं योग्य पुरावा न देताच आपलें मत प्रतिपादण्याचा तो प्रयत्न करीत आहे. कॅटलिन म्हणतो कीं, शास्त्रीय दृष्ट्या 'इतिहासशास्त्र' असें नांव

देता येईल अशी वस्तूच आस्तित्वात नाहीं, हा एक या विषयावर सप्रमाण सिद्ध मानलेल्या थोड्या सिद्धान्तापैकींच एक सिद्धान्त आहे. ( कॅटलिन, दी प्रिन्सिपल्स ऑफ पॉलिटिक्स, पान १०३ ).

' इतिहासशास्त्र ' या नावाची चीजच जगात नाहीं असे म्हणावयाला अनेक कारणे आहेत. एकाद्या ऐतिहासिक घटनेचा निश्चितार्थ समजणे हे सोपे आहे. परतु या विस्तीर्ण कालोदधीमध्ये इतस्ततः पसरलेल्या, पृथ्वीच्या पाठीवर अनेक ठिकाणीं घडत असलेल्या आणि विविध व्यक्तींच्यावर परिणाम घड-विणाऱ्या असख्य घटनासबधीं काहीं एकच एक सयुक्तिक निर्णय घेता येईल असे सागता येत नाहीं. जेव्हा एकच प्रसग सुटा किंवा वेगळा केला जातो, तेव्हा त्याचा अर्थ कमी-आधिकपणाने का होईना पण निश्चित असतो. कारण भोवतालच्या जगाशीं त्या घटनेचे काय सबध आहेत ते आपणाला माहिती असू शकते. परंतु सबध ऐतिहासिक कालखडच्या कालखड विचाराकरिता घेतला तर त्याचा निश्चितपणा कमी होतो. व्याप्ति वाढू लागताच निश्चितता कमी होत जाते.

एकाद्या व्यक्तीच्या विशिष्ट कृतीचे किंवा विशिष्ट प्रसगांच्या वर्ननाचे सयुक्तिक स्पष्टीकरण आपण देऊं शकू; परतु अंतर्मुख होऊन आपल्या गतायुष्याचे सिंहावलोकन केल्यास त्यामध्ये काहीं सयुक्तता किंवा काहीं मेळ आहे असे कोण म्हणू शकेल ? अगर आपल्या असंख्य नि विविध प्रकारच्या अनुभवाच्या बुडाशीं काहीं ठाम तत्त्वे आहेत, वा त्या सर्वांमध्ये एकच एक निश्चित तत्त्व अनुस्यूत आहे असे आपल्यापैकीं कितीकजण सागू शकतील ? हाताच्या बोटावर मोजण्या-इतके तरी असे लोक निघू शकतील का नाहीं याची शका आहे. मानवी जीवन म्हणजे एक कलाकृति आहे, सुंदर काव्य आहे, स्वर्गीय सगीत आहे असे कवि वर्णन करतात. पण आपल्या जीवनाकडे पाहिले तर आपण बहुतेक सारे भग्न व्यक्तित्वाचे, विस्काळित कल्पनामुळें गोंधळलेले, आणि कसे तरी उदरभरण करीत जीवन कठणारे असेच असतो आणि म्हणूनच आपले व्यावहारिक जीवन हे सुसंबद्ध व स्वयंपूर्ण अशा व्यक्तित्वाच्या बाधणीत सामावता येत नाहीं. या व्यक्तिगत उदाहरणाप्रमाणें समाजाच्याहि आयुष्यात असे काहीं गोंधळाचे काळ असतात कीं त्याचे सयुक्तिक विश्लेषण करणे अगदीं अशक्य व्हावे.

शिवाय ऐतिहासिक प्रगतीचें सातत्य तोडून आपण जे कालखड पाडतों त्यात कृत्रिमपणा असतो. त्या कालखंडाच्या समर्थनार्थ कधीं भौतिक शास्त्रातील देखील, तर कधीं जीवशास्त्रातील परिवर्तन, त्रुटितता वा क्रांति तत्त्व याच्या संबंधींचे सिद्धान्त पुढे केले जातात; पण त्याने कधींच पूर्ण समाधान मिळत

नाहीं. एक युग यथ संपले व येथून दुसऱ्याचा प्रारभ झाला आहे, याचे रहस्य सांगताना इतिहासकार मोठ्या अडचणींत पडतो. शिवाय घटनाच्या मागे असलेल्या अनुस्यूत सूत्रतेबद्दल इतिहासकाराच्या वेगवेगळ्या कल्पना असल्यामुळे ऐतिहासिक कालखडाच्या मर्यादा व त्याची वैशिष्टये याबाबतींतहि त्याचे साहाजिकच एकमत होत नाहीं.

खेरीज आपण मागे पाहिलेच आहे कीं ऐतिहासिक घटना या असदिग्ध स्वरूपात आपल्यापुढे कधींच येत नाहींत. उलट सामाजिक शास्त्रातील घटना या नेहमींच उपपत्तिवजा असतात. कांहीं गृहीत सिद्धान्ताच्या अनुरोधाने ऐतिहासिक घटनाची जमवाजमव करणे हे अपरिहार्य ठरते. कारण एकूण एक सर्व माहिती जमा करण्याचा हव्यास हा व्यर्थ आहे. आपण पाहतो कीं एकाद्या खोलीच्या किंवा चित्राच्या साध्या वर्णनातहि बरीच निवड असते, आणि त्यात स्वतःचा विशिष्ट दृष्टिकोन असतोच असतो.

मग ज्याचा वर्ण्यविषय अमर्याद आहे अशा इतिहासवर्णनात तर ही गोष्ट अधिकच खरी ठरते. याचाच अर्थ हा कीं अशा प्रकारे लिहिल्या जाणाऱ्या इतिहासातून अनेक सिद्धान्त निघू शकतील. कारण इतिहासकार आपल्या चक्राकार युक्तिवादातच भ्रमत असतो, म्हणजे अगोदर जीं गृहीत तत्त्वें तो मानतो तींच तो पुन्हा सिद्ध करू पाहात असतो. म्हणूनच आपण आता असे म्हणू शकतो कीं इतिहासकाराची मुख्य कल्पना बदलली कीं त्याप्रमाणे एकाच कालखडातील ऐतिहासिक घटनाची माडणीहि बदलत जाते, त्यामुळे त्यापासून अनेक सुसबद्ध, साभिप्राय व स्वयपूर्ण निर्णय निघू शकतात. शब्द जुळविण्याची कोडीं असतात ना? त्यामध्ये एकाच सूचक अक्षराच्या साहाय्याने उत्तराचे अनेक पर्याय मिळण्याची शक्यता असते. तसेच इतिहासातहि असते. मात्र फरक इतकाच कीं कोड्याच्या बाबतींत सीलबद पाकिटाच्या आत असलेले उत्तरच तेवढे बरोबर मानण्यात येते. तसे बधन इतिहासलेखनात कोण कसे मानणार? बुसेच्या दृष्टीने इतिहासाचा क्रम रोमन कॅथॉलिक चर्चच्या तत्त्वाचे समर्थन करणारा आहे, तर कार्ल मार्क्सच्या दृष्टीने तो समाजवादी क्रांतीचा डागोरा पिटीत आहे. आणि स्पेंग्लरला त्यामध्ये जन्म नि विकास,अधःपतन नि नाश याच्या विषयींच्या नैसर्गिक सिद्धान्ताचे प्रात्याक्षिक पाहायला मिळते. कांहीं कांहीं वेळा तर एकाच घटनासघातावर आधारलेली पण परस्पर विसगत अशी अर्थनिष्पत्ति झाल्याचे दिसून येते. मार्क्सप्रणीत तत्त्वानींच इतिहासाचा अर्थ लावून पाहणाऱ्या रोस्टोव्हेट्झ्रॉफने आपल्या अभ्यासावरून मानवजातीच्या भवितव्याविषयीं मार्क्सने काढलेल्या अनुमानापेक्षा अजिबात निराळीं अशीं अनुमाने काढलीं आहेत. कम्युनिस्टाप्रमाणे वर्गरहित समाजरचनेचे उज्ज्वल चित्र मानव-

जातीच्या भवितव्यात त्याला दिसत नाहीं. उलट मानवी संस्कृति ही सामान्य जनतेच्या पातळीशीं येत येत अखेरीला नष्ट पावणार आहे असें त्याला वाटतें. ( सायन्स ॲन्ड सोसायटी विंटर नवर १९४६ पृ. ५.) अशा तऱ्हेच्या परस्पर विरोधी सिद्धान्ताबाबत खऱ्या-खोट्याचा निर्णय करण्याच्या दृष्टीनें बिनतोड प्रमाणें सापडणें हे खुद्द भौतिक शास्त्रातहि कठीण होत चालले आहे. उदा० प्रकाश किंवा शक्ति लहरीमय आहे कीं अणुमय, हा पदार्थविज्ञानशास्त्रातील वादाचा प्रश्न घेऊ. येथे लहरी किंवा अणु दोन्हीहि वस्तुस्थितीचे समाधानकारक स्पष्टीकरण करूं शकतात असे दिसून येते. इतिहासाच्या बाबत तर निर्णायक प्रमाणे शोधून काढणे अक्षरशः अशक्यच आहे.

तेव्हा प्रत्यक्ष घटना व त्याचे ऐतिहासिक स्पष्टीकरण यामध्ये असलेला हा संबध ध्यानात घेतला म्हणजे असे म्हणावे लागते कीं, ' ऐतिहासिक घटना या इतिहासकाराच्या कल्पनेचींच अपत्ये होत. ' ( कॉफमन, मेथडॉलॉजी ऑफ दी सोशल सायन्सेस, पान १९४ ). इतिहासाची अर्थसंगति ही तो इतिहासकार कोणत्या सामाजिक थरातील आहे व त्याचे व्यक्तित्व कशा प्रकारचे आहे यावर अवलबून असते. इतिहासकाराच्या अशा विशिष्ट दृष्टिकोनाची निश्चिति करणाऱ्या घटकाचा शोध लावणे हे व्यापक समाजशास्त्रविषयक ज्ञानाचे काम आहे. ' विविध कोनाच्या अभ्यासाने प्राप्त झालेले सिद्धान्त शेजारी शेजारीं ठेवून पाहिले असता प्रत्येकातील तरतमभाव लक्षात येऊन व्यक्तिगत दृष्टिकोन मागें पडतो व अभ्यासकास एका नव्याच वस्तुगत दृष्टिकोनाचा लाभ होतो. ' ( मॅनहाइम—आयडियॉलॉजी ॲन्ड युटोपिया, पान २७० ) याची अधिक स्पष्टता येण्यास आपण पदार्थविज्ञानशास्त्रातील सापेक्षतावादाचे ( Relativity Theory) चे उदाहरण घेऊ. आम्ही या प्रातात शिरणे जरा धाष्टर्याचेंच आहे ! असे म्हणतात कीं निरीक्षकाच्या वेगवेगळ्या गतींमुळे विश्वाच्या बाह्य देखाव्यामध्यें जो वेगळेपणा दिसतो त्या भिन्नतेच्या पलीकडे कल्पनेने जाता येऊन विश्वाचें एक नवें सामान्य दर्शन होते. हे नवे विश्वदर्शन निरीक्षकाच्या वेगवेगळ्या गतीवर अवलबून नसते— तर ते सर्वांना सारखेच होते. इतिहासाबाबत अशा तऱ्हेचा सापेक्षता सिद्धान्त मांडता येईलसे वाटत नाहीं. कारण मागे सांगितल्याप्रमाणे इतिहासातील घटना अपरिमेय असतात. त्याची संकलित परिमिति करणे शक्य नाहीं. उदाहरणार्थ, निरनिराळ्या चित्रकारानीं एकाद्या ऐतिहासिक व्यक्तीचीं काढलेलीं चित्रे पाहिल्यावर त्यावरून भिन्न भिन्न स्वरूपाच्या यथार्थचित्रदर्शनाचा साधारण विभाजक काढून आपल्याला त्या व्यक्तीच्या खऱ्या चित्राची कल्पना येईल काय ! हे शक्य दिसत नाहीं. फार तर यामुळें आणखी एका यथार्थदर्शनदृष्टीची त्यात भर पडेल इतकेंच. सरासरीच्या पद्धतीशीं देखील

या पद्धतींचे काहीं सादृश्य नाहीं. कारण केन्स म्हणतो त्याप्रमाणे सरासरीची सामान्य कल्पना ही सामान्य माणसाला आकलन होईल अशी असली पाहिजे. त्याच्यासारख्या बुद्धिमान किंवा प्रस्तुत लेखकासारख्या बुद्धिमद लेखकाला एकट्यालाच आकलन झालेली अशी उपयोगी नाहीं. तेव्हा आता आपणाला असा समारोप करावयाला हरकत नाहीं कीं, ' प्रत्यक्ष काय घडले ते मला सांगावयाचे आहे' ही रांकेची आकांक्षा इतिहासाकडून केव्हांहि पुरी केली जाणे शक्य नाहीं.

भविष्याच्या अनुमानाची शक्यता

आतापर्यंत आपण इतिहास गतकालाचं स्पष्टीकरण कितपत करूं शकेल या दृष्टीनें विचार केला. या स्पष्टीकरणातच भावी कालाच्या अनुमानाचीं बीजे असतात असे म्हणता येईल. कारण ज्या सिद्धान्ताने गतगोष्टींचें स्पष्टीकरण करता येते त्या सिद्धान्ताने—जर तो सिद्धान्त सर्वव्यापी असेल तर—वास्तविक अनुमान बांधता आले पाहिजे, परंतु भावी कालासंबंधीं अंदाज करण्यामध्यें किती तरी अडचणी आहेत. भूतकालाची एक निश्चित अर्थसंगति लावणे हें एक वेळ शक्य असेल; पण भविष्यकालालाहि त्याच चौकटींत बसवू पाहणे ही त्यापेक्षां अगदीं निराळी गोष्ट आहे. प्रथमारंभींच निसर्गाइतक्याच पुरातन अशा मानवी इच्छास्वातंत्र्याच्या (Free will) युक्तिवादाशीं आपली गाठ पडते. ह्या इच्छास्वातंत्र्यानेच मनुष्य हा इतर प्राण्यापेक्षा वेगळा ठरतो. वाटेल तेथें जाऊं शकणाऱ्या आकाशींच्या स्वैरसंचारी वाऱ्याप्रमाणे माणसाची आत्म ( इच्छा ) शक्ति ही अगदीं अनिर्बंध आहे, मुक्त आहे. लहानशा ठराविक साच्यात तिला कोंडता, कोंबता किंवा गोंवता येणार नाहीं. ही इच्छाशक्ति विभूतीच्या द्वारे व्यक्त झाल्यावर तिला इतिहासाचा प्रवाहच्या प्रवाह पार बदलून टाकणें शक्य असते. एकाद्या कुशल कुलालाप्रमाणे नेता आपल्या इच्छेप्रमाणे हवा तसा लोकांना आकार देऊं शकतो. लोकाचीं मने आणि शरीरें दोहोंना तो गुलाम करूं शकतो. लोकांना क्रांतीमध्ये किंवा युद्धामध्यें तो ओढतो. प्रतिक्रांतीला तो पूर्ण वाव देऊं शकतो. किंवा आणीबाणीच्या आणि तातडीच्या संकटाची वा आर्थिक अरिष्टाची संधी साधून शेंकडों वर्षांची प्रगति एका पिढीपुरती तरी तो दडपून ठेवूं शकतो. प्राचीन राजाच्या वेळेपेक्षा अगर कार्लाईलच्या वीर पुरुषांच्या काळापेक्षा आजच्या महापुरुषाची ताकद कल्पनातीत वाढली आहे. स्थलकालाच्या दृष्टीनें जगाला लहान करणाऱ्या शास्त्रीय शोधानीं त्यातील घटकांना परस्परावलंबी बनविलें आहे. अशा या जगात आधुनिक विभूतींच्या सामर्थ्याची प्रतीति दिगंत पसरलेल्या यच्चयावत् भूतलावर सर्वांना होत असते. मनें वळविण्याचीं व जुलूम करण्याचीं जीं साधनें त्याच्या पूर्वसूरींना माहीतहि नव्हतीं तीं सारीं

आजच्या महापुरुषाला उपलब्ध झालीं असून त्याच्या जोरावर आपल्या प्रजेंतील एकाद्या क्षुद्र जंतूकडूनहि आपल्या आज्ञेबरहुकूम वाटेल तीं कामें तो करून घेऊं शकतो. हें विधान कुणास अतिशयोक्त वाटेल तर त्यांनीं हिटलर, मुसोलिनी अगर लोकशाही अमेरिकेंतील रूझवेल्ट याच्या तत्कालीन सत्तासामर्थ्याचें मोजमाप घ्यावें ! किंवा विद्यमान स्टॅलिनच्या आजच्या प्रभावी हुकमतीकडे त्रयस्थपणें लक्ष द्यावें. गांधीजींच्या शब्दाचे अदम्य पडसाद लक्षावधि लोकांच्या अंतःकरणांत आज उमटतात हा महापुरुषाच्या वाढत्या प्रभावाचाच परिणाम नव्हे काय ! आणि जिनांच्या अभावीं पाकिस्तानची कल्पना केव्हांच मृत होऊन गाडली गेली असती हें राजकारणाच्या मार्मिक अभ्यासकाचें म्हणणें असेंच सुचवीत नाहीं का कीं, आपल्या डोळ्यादेखतच पुन्हा एकदा हुकूमशाहीचा काळ आला आहे !

परंतु आपल्या मोहिनीनें क्षणभर चकित करून टाकणारी अशीं हीं मर्दुमकीचीं वा विध्वंसाचीं उदाहरणें बाजूला सारून सामान्य, गरीब माणसाच्या समाजाकडे लक्ष दिलें आणि हळू हळू होत गेलेलीं मानवेतिहासातलीं शांततामय स्थित्यंतरें एकाद्या समाजशास्त्रज्ञाप्रमाणें अभ्यासलीं तरी देखील 'इच्छास्वातंत्र्याचा युक्तिवाद' खराच ठरतो. व म्हणूनच या पृथ्वीवरील बदलत्या मानवी जीवनासंबंधीं कांहीं नियम वा सिद्धान्त शोधून काढणें हें अशक्य होऊन बसतें.

स्थित्यंतर हा सामाजिक जीवनाचा प्राण आहे. कोणतीहि घटना किंवा प्रसंग जसेच्या तसे कधींच पुनरावृत्त होत नाहींत. भूतकाल होऊन गेला तो गेला. इतिहासाची अपरिवर्तनीयता हें एक भयानक सत्य आहे. गतकाल कधींच माघारा येत नाहीं कीं, पुन्हा अवतीर्ण होत नाहीं. सामाजिक जीवनाबद्दल कांहीं नियम बांधण्याच्या मार्गांत ही एक मूलभूत अडचण आहे. कारण जेथें पुनरावृत्ति असेल तेथेंच कांहीं नियम बांधणें संभवतें. किंबहुना पुनरावृत्ति म्हणजे ठराविक पद्धतीनें होणारा बदल. कित्येकदां त्याला बदल म्हणावें कीं नाहीं याबद्दलहि शंका येते. पण भौतिक व मानसिक विश्वांत सतत नवीनव बदल होत असतो. इतिहासाच्या अभ्यासकांना हें चांगलें ठाऊक आहे कीं, तंत्रविषयक व इतर शोधामुळे इतिहासपूर्वकालापासून मनुष्याच्या भौतिक परिस्थितींत अफाट बदल झाला आहे, आणि या स्थित्यंतरांमध्यें कांहीं सुसूत्रता सांपडणें मुष्किल आहे. त्याचमुळे ह्या स्थित्यंतरांना ठराविक तत्त्वाच्या साच्यांत बसविणें अशक्यप्राय आहे. फक्त बाह्य परिस्थितीच सारखी बदलती आहे असें नव्हे, तर माणसाचें आंतरिक जीवन, त्याचें आत्मतत्त्व हेंहि सारखें विकास पावत आहे. विविध मानवसमाजांच्या चालीरीति, नीतिकल्पना, रूढी, परंपरा नि संस्था

याच्यांतील अपार वैचित्र्य मानवशास्त्रज्ञानीं दाखवून दिले आहे. म्हणून भौतिक परिस्थिति जरी कदाचित् तंतोतंत पुनरावृत्त झाली तरी नव्या सजीव सृष्टीकडून तिला होणारें आवाहन वेगळेच असणार, कारण पुनरावृत्तीचा अनुभव हा त्या नवीन सृष्टीला वेगळाच नव्हे काय ?

मनुष्याच्या मानसिक विश्वातील विविधता आणि वैचित्र्य याना एका पद्धतींत बसवितां येणार नाहीं या आक्षेपाला उत्तर देताना कॅटलिनने ' मनुष्य हा संवय लावून घेणारा प्राणी आहे ' ( तो संवयींचा गुलाम असतो ) या वस्तुस्थितीवर जास्त भर दिला आहे. पुष्कळशा चुका करून बऱ्याचशा अनुभवानतर परिस्थितीशीं जुळवून घेण्याचा उत्तम मार्ग त्याला सापडतो तेव्हा त्या मार्गाची तो सवय लावून घेतो. काहीं काळानंतर परिस्थितीला साद देण्याची त्याची ती विशिष्ट पद्धतीची कृति आपोआप, जाणिवनिरपेक्ष होऊं लागते आणि सवयीनुरूप होणाऱ्या त्या कृतीला पुनरावृत्त कृतीचेंच स्वरूप प्राप्त होतें. यावरून हे सिद्ध होत नाहीं का, कीं, जेव्हा आपण मनुष्य बदलला अर्से म्हणतो तेव्हाहि तो खरोखर (संवयींच्या रूपात) पहिल्यासारखाच असतो ? निसर्गांत एकरूपता आहे हा जर सिद्धान्त मानला तर मानवी स्वभाव हा येथूनतेथून सारखाच हा त्या सिद्धान्ताचा क्रमप्राप्त उपसिद्धान्त ( करॉलरी ) मानावा लागेल.

कॅटलिनच्या आक्षेपास उत्तरादाखल असे म्हणता येईल कीं, व्यक्तीला स्मरणशक्ति असते, व्यक्ति शिकत असते आणि पुनरावृत्त घटनेचा अनुभव हाहि प्रामुख्याने एक नवाच अनुभव असतो. ह्या गोष्टी कॅटलिनने लक्षात घेतलेल्या दिसत नाहींत. निरुपद्रवी दिसणाऱ्या संवयी कालांतराने परंपरेचें स्वरूप धारण करतात. या परंपरेच्या पोटीं प्रखर निष्ठा व अभिमान, या अभिमानास डिवचल्यास उफाळून येणारा क्रोधाग्नि, आणीबाणीच्या प्रसंगीं अजगरवृत्तीचा त्याग करून, चकित करून टाकणाऱ्या पराक्रमाने प्रतिपक्षावर मिळविलेला विजय व केलेली क्रांति हीं सर्व त्या संवयींतून निर्माण होणारी क्रमप्राप्त परंपरा आहे. याच्या उलट दीर्घकालीन अराजक किंवा बऱ्याच काळापर्यंतचें राजकीय पारतंत्र्य यामुळें लढाऊ लोकहि जेव्हा निरुपद्रवी मुक्या जनावराप्रमाणें शेळपट बनून एखाद्या पाताळयंत्री नि प्रतिगामी हुकूमशहाच्या आज्ञेस मान तुकवतात त्या वेळींहि या संवयींच अभिमानी माणसांचें कंबरडें मोडतात. — हें विषयांतर सोडून आपल्या मुख्य मुद्द्याकडे वळायचें झाल्यास असें म्हणावे लागेल कीं अशा हजारों इच्छाशक्ति आणि नानाविध प्रकारचे साद यांच्यामुळे परिणामाबद्दल अनिश्चितता निर्माण होते आणि अनुमान अशक्य ठरतें. शिवाय निसर्गांतील एकस्वरूपतेचें तत्त्व निगमन पद्धतीचा पाया म्हणून आधुनिक तर्कशास्त्र मान्य करीत नाहींत.

' एकदा जे घडले ते बऱ्याच अंशीं समान परिस्थितींत पुन्हा घडतें ' अशा संदिग्ध भाषेंत तें एकरूपतेचे तत्त्व सांगितलें जातें. परंतु समान परिस्थितीचा ' बराच अंश ' म्हणजे काय ?– हें कांहीं या तत्त्वानें सांगितलेलें नाहीं. म्हणून भौतिक व मानसिक परिस्थिति ही जरी कमी अधिक प्रमाणाने सारखीच असली तरी भावी कालाविषयीचे अनुमान हे अशक्यच म्हणावें लागतें. नाईटच्या शब्दात आता आपणाला ह्या मुद्द्याचा समारोप करता येईल. तो लिहितो– ' इतिहासाची पुनरावृत्ति होते ' हे विधान किंवा याचसारखें ' मानवी स्वभाव सदा सारखा असतो ' हे विधान कांहीं विशिष्ट अर्थानें खरें असले, तरी तें कोणत्या अर्थानें खरें आहे याची स्पष्ट व्याख्या करितां येत नाहीं. आणि या तत्त्वापासून काढण्यात येणारीं निश्चित अनुमाने हीं खऱ्यापेक्षा खोटींच ठरण्याचा संभव अधिक ! (नाइट.–'लिमिटेशन्स ऑफ सायंटिफिक मेथड इन इकॉनॉमिक्स,' इन 'दि एथिक्स ऑफ कॉंपिटिशन,' पान १४६. )

ऐतिहासिक घटना ही अत्यंत गुंतागुंतीची आहे. या घटनेंत जितक्या व्यक्ति तितक्या प्रकृति. दर एक आपापल्यापरी निराळी व सहज समजण्यास कठीण अशी; व प्रत्येकजण भोवतालच्या परिस्थितींतील राजकीय, सामाजिक, आर्थिक व इतर प्रवाह इत्यादि अंगोपांगाना साद देत देत व त्यांचे आघात-प्रत्याघात सोशीत घटनेशीं सबद्ध असणार आणि घटनेशीं संबंधित असलेले सारे घटक परस्परावर क्रिया-प्रतिक्रिया करीत राहणार आणि त्यातूनच दुसरी ऐतिहासिक घटना बाहेर पडणार–असा हा सारा क्रम आहे. तेव्हा ज्या ठिकाणीं परस्परावर क्रिया-प्रतिक्रिया घडविणारे विविध घटक एकादी परिस्थिति निश्चित करतात, त्या ठिकाणीं प्रत्येक घटकाचें सापेक्ष महत्त्व आणि एकूण परिणाम निश्चित करणाऱ्या त्यांच्या क्रिया-प्रतिक्रियांचे परिणाम यांचे निश्चित मापन करणारें एकच तत्त्व आपल्याला सापडल्याखेरीज भावी कालासंबंधीं निश्चित अनुमान करणें सर्वथैव अशक्य आहे.

यापेक्षाहि अधिक मूलभूत स्वरूपाची दुसरी एक अडचण लक्षात घेणे जरूर आहे. आपण पूर्वीच बघितल्याप्रमाणे गतकालीन घडामोडींचा घडत असलेल्या इतिहासावर परिणाम होतो. त्याचप्रमाणें होणाऱ्या घडामोडींबद्दल भविष्य वर्तवून होष्यमाणावर इष्ट तो परिणाम करता येतो, म्हणजे ती हवी तशी घडवून आणता येते किंवा ती प्रत्यक्षात येणें अशक्य करता येते. किंवा या दोन टोकांच्या मधलाच एकादा बनाव घडतो. असें एकाद्या घटनेचे भविष्य वर्तविल्यावर त्यापासून अनेक प्रकारचे परिणाम घडण्याचा संभव असतो. भौतिक शास्त्रासंबंधीं हायसेनबर्गनें कल्पिलेल्या अनियतीच्या तत्त्वाशीं (indeterminacy) सदृश अशा ' अनियति–तत्त्वा'मुळेंच ही अनिश्चितता प्राप्त होते.

इतिहासकार निःपक्षपातीपणाने सत्याचा शोध करून भावी काला-विषयींचे अनुमान वर्तवीत असेल कदाचित्. पण तो व त्याचा अभ्यासविषय हीं दोन्ही एकाच समाजरचनेचे घटक असल्यामुळे अनुमानविषयावर त्याच्या मताचे व विचाराचें दडपण पडून त्याच्या अनुमानाची वस्तुनिष्ठता ही अशक्यप्राय होऊन बसते. अर्थात् हे शास्त्रीय विधान आहे. सत्याचा शास्त्रीय शोध घेण्याचा इतिहासकाराला छंद असतो या समजुतीवरच तें केले आहे. परतु केवळ सत्ता मिळविण्यासाठींच राजकारणाचे डाव खेळल्या जाणाऱ्याकडून ह्या आजच्या जगात अज्ञानी समाजाला वाटेल ती गोष्ट शास्त्रीय आहे असे भासविता येणे अशक्य नाहीं हे आम्हास माहीत आहे.

वर सांगितल्याप्रमाणे अनियतितत्त्वाप्रमाणे निश्चित नियम सांगता येत नाहींत हे लक्षात घेऊन कॅटलिनसारखे लोक गणिती सरासरीने काही नियम निश्चित करता येतात कीं काय हे पाहतात (पहा—कॅटलिन कित्ता पान २६). पण हे गणिती सरासरीचे तत्त्व सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्याने ढोबळ केलेल्या दृश्यमान घटनानाच लागू पडते. समाजाच्या दृष्टीने अणुप्राय असणाऱ्या व्यक्तींचें वर्तन हें गणिती सरासरीच्या साहाय्याने काढलेल्या अनुमानाच्या कक्षेत बसत नाहीं. अनेक व्यक्ति मिळून होणाऱ्या समूहाच्या वर्तनाबद्दल मात्र आकडे-शास्त्राच्या साहाय्याने कांहीं अनुमान करणे हे शक्य आहे. मार्शल लिहितो—'अर्थशास्त्रामध्ये व्यक्तिसमूहाच्या वर्तनाचा आपण अभ्यास करतो. त्या ठिकाणीं वैयक्तिक भेद एकमेकाला छेद देऊन नाहींसे होतात.' आकडेवारीच्या साहाय्यानें बांधलेले नियम जन्ममृत्यूसारख्या काहीं सामाजिक घटनाना लागू करता येतील ही गोष्ट कांहीं नाकारता येत नाही. पण येथेहि आकडेवारीच्या सरासरीचें क्षेत्र मर्यादित आहे.

परतु प्रत्येक घटक निश्चित करणे आणि त्याबद्दल खरीखुरी माहिती मिळणे याबाबतींतल्या व्यावहारिक अडचणी जरी एक वेळ बाजूला सारल्या तरी नाईटने त्याखेरीज दोन सर्वसाधारण मर्यादा नमूद करून ठेवल्या आहेत. पहिली मर्यादा तो अशी सांगतो कीं, द्रव्यार्जन आणि प्रजोत्पादन अशासारख्या सर्वांना समान असणाऱ्या जीवनातील अगदीं प्राथमिक गरजानाच तेवढी ही आंकडेशास्त्राची पद्धति लागूं करता येणें शक्य आहे. परंतु सर्व प्रकारची प्रगति ही या नैसर्गिक पाशवी वासनांहून भिन्न स्वरूपाची असते आणि ज्या ठिकाणीं वैचित्र्य व व्यक्तिवैशिष्ट्य यांना महत्व असते, अशा जीवनविषयक उच्च मूल्यांचा शोध घेणाऱ्या प्रवृत्तींशींच ती निगडित असते. अशा बाबतींत सरा-सरीचा नियम कसा उपयोगी पडणार ! याखेरीज त्याने सांगितलेली दुसरी मर्यादा अधिक महत्त्वाची आहे. समाजांतील वैयक्तिक परस्पर संबंधात सरा-

सरी एक वेळ शक्य आहे, कारण तेथे व्यक्तिव्यक्तींतील फरक सरासरीमुळे संक्षेप पावतात किंवा प्रसंगी नाहींसेहि होतात. पण जेव्हा या व्यक्तिव्यक्तींचा एकजीवसमाज निर्माण होतो, त्याला एक सामुदायिक मन असते, त्याचे वर्तनोद्देश असतात व इतिहासकारास अशा समाजपुरुषाचा विचार करावयाचा असतो, तेव्हा व्यक्तीच्या वर्तनाबाबत मागे व्यक्त केलेली अज्ञेयता याहि बाबतींत त्याच्या प्रत्ययास आल्याखेरीज राहात नाहीं.

इतिहास हे शास्त्र नाहीं असे प्रतिपादणाराच्या भात्यात आणखी एक अखेरचा आक्षेपरूप बाण आहे, तोहि वरील आक्षेपांना धरूनच आहे. ते सांगतात कीं, समाज म्हणजे कांहीं केवळ सुट्या सुट्या व्यक्तींचा समुदाय नव्हे. व्यक्ति-घटकाच्या बेरजेपेक्षा कांहींतरी अधिक त्यामध्ये असते. तसेच दोन घटकामध्ये जे संबंध असतात त्या सर्वांच्या बेरजेपेक्षाहि कांहीं तरी अधिक त्यात असते. याचाच अर्थ हा कीं समाजातील व्यक्ति-घटकाच्यापेक्षा वेगळे असे व्यक्तित्व समाजाच्या ठिकाणीं दृग्गोचर होत असते. यालाच समाजपुरुषाचा 'आधिक्य-विशेष' असे म्हटले जाते. या दृष्टीने पाहता समाजरचना ही भौतिक घडणीपेक्षा वेगळी असते. भौतिक घडण ही केवळ पुजकेवजा. एक विशिष्ट रचना असलेली गोळाबेरीज होय. नवी भौतिक घडण व जुनी भौतिक घडण यात फरक फक्त रचनेचा. घटकावयव तेच. (नाइट पृ. १११ पहा.) सारांश, रचनेच्या फरकाने घटक अवयवाच्या मूळ स्वरूपातच फरक पडावा असे निर्जीव सृष्टीत होत असल्याचे शास्त्र सांगत नाहीं. समाजरचनेचे तसे नाहीं. त्यात होणाऱ्या फरकाची घटकव्यक्तींवरहि प्रक्रिया होते व त्याचे स्वरूप पालटते. म्हणून सामाजिक हालचालींबद्दल म्हणजे सामाजिक गटाच्या राजकीय, आर्थिक, व इतर बाबतींतील स्थित्यंतराबद्दल जेव्हा आपण बोलतो त्या वेळीं त्या त्या समाजगटाच्या अंतर्गत व बाधणीविषयक अशा दोन्ही बदलाबद्दल बोलत असतो.

इतिहासाला शास्त्र म्हणता येईल कीं नाहीं या प्रश्नाच्या दृष्टीने आतापर्यंत केलेले हे सर्व विवेचन महत्त्वाचे आहे. पदार्थ-विज्ञानशास्त्रात घटक वस्तूचे प्रथम पृथःक्करण करून नंतर ती माहिती एकत्रित करून एकाद्या वस्तूचे स्वरूप समजुन घेता येणे शक्य आहे. याच पद्धतीने त्या शास्त्रामध्ये विशिष्ट उदा-हरणावरून सामान्य सिद्धान्त बांधता येतात. पण समाजगटाचे स्वरूप समजून घेण्याला ही फुटकळपणाची अणु-पद्धति अपुरी आहे. कुठलाहि लोकसमाज किंवा देश हा त्याचे तत्त्वज्ञान आणि त्याची स्वतंत्र जीवन-पद्धति याच्यासकट एकच एक 'समाजपुरुष' म्हणून आपल्यापुढे उभा असतो. त्याच्या घटकाची विभागणी नि पृथःक्करण करून त्या वस्तूचे स्वरूप आपणाला उमजणार नाहीं.

सहानुभूतिपूर्ण कल्पनेनेच ते जाणलें पाहिजे. पृथःक्करण म्हणजे विच्छेदन किंवा नाश ठरणार आहे. जॉन्सनच्या 'लिली' या प्रकाशपुष्पाचे व त्याच्या सौंदर्याचे कोणी पृथःक्करण करू शकेल काय ? ते सामग्र्याने कल्पनेनेच जाणले पाहिजे. लोकसमाजाच्या आत्म्याची ओळख शास्त्रीय पद्धतीपेक्षा तिला विरोधी असणाऱ्या अशा स्फूर्तिनिष्ठ पद्धतीनेंच होत असते. या ठिकाणीं इतिहासाचा अभ्यास कलासमीक्षेच्या जवळ येतो. इतिहासाच्या अभ्यासापासून जीवनाविषयीं सम्यक् दृष्टि लाभली तरी शास्त्रीय नियम उभारता येत नाहींत.*

— ४ —

### इतिहासांतील वस्तुनिष्ठ गतितत्त्व

इतक्यावरहि ज्याना इतिहास हे शास्त्र आहे असं वाटत असेल त्यानीं मानवी इच्छेचा स्वैरपणा लक्षात घ्यावा. स्वैरपणा व नियमबद्धता हीं परस्परविरुद्ध आहेत. वैयक्तिक इच्छा, कल्पना, लहरी आणि तत्सम सर्व प्रकारच्या स्वैरप्रवृत्ति याचे शास्त्र होऊ शकत नाहीं. तसेच परस्परविरुद्ध अशा उद्दिष्टाची विविधताहि शास्त्रात सामावू शकत नाहीं. या आपत्तींतून मार्ग काढण्यास देववादाचीच कास धरणें हा सर्वांत सोपा मार्ग होय. पण ह्या विश्वाच्या घडणींत अनादि कालापासून संवादित्व आहेच असे मानण्यात बुद्धिवाद्यांनींहि देववाद्याना साथ केलेली आहे. मानवी व्यवहारात जी काहीं व्यवस्था, नियमबद्धता, समतोलपणा, नि प्रमाणबद्धता दिसून येते, ते सारे ईश्वराने करून ठेवलें आहे. नाहींतर मनुष्य कधींच इतका स्वतत्र होता ना ! ईश्वरानेंच ह्या जगात येणाऱ्या प्रत्येक मनुष्याला बुद्धीचे देणे दिले आहे, ज्ञानाचा प्रकाश दिला आहे. तेव्हा त्या माणसाने अंतर्मुख होण्याचाच काय तो अवकाश कीं लागलीच त्या दैवी सुसवादित्वावर लख्ख प्रकाश पडेल, असे देववाद्याचे म्हणणे असते. परतु असल्या रूढवादी मार्गांचा साफ इन्कार करणाऱ्या शास्त्रीय मनोवृत्तीच्या आधुनिक माणसाला या युक्तिवादाचा काहींहि उपयोग नाहीं. कारण हे सुसवादित्व साक्षात्कारानें, आत्मस्फूर्तीने जाणता आले तरी त्याचे अस्तित्व प्रत्यक्ष जीवनात बुद्धीला पटेल अशा रीतीने दाखविता येणें, हे अशक्य होय.

१७ व्या शतकापासून भौतिक शास्त्रामध्ये जी विलक्षण प्रगति होत गेली तिच्यामुळें इतिहासाकडे पाहण्याचा एक नवीन दृष्टिकोन तयार झाला. कारण निसर्गावर मानवी हेतु लादून त्या पद्धतीने निसर्गाकडे पाहण्याची संवय जेव्हा सुटली तेव्हाच शास्त्रीय विचाराचा मार्ग खुला झाला. निसर्गाच्या पाठीशीं कोणीतरी सूत्रधार आहे ही कल्पना बाजूला सारल्यानतर सृष्टिचमत्कारांचे संशो-

* या भागातील सर्व विवेचनासाठीं पॉपरचें 'पॉव्हर्टी ऑफ हिस्टॉरिसिझम' इकॉनॉमिका मे व ऑगस्ट १९४४ व मे १९४५ पहा.

घन झपाट्याने होऊ लागले. निसर्गापेक्षा मानवी हालचालीत काहींतरी महत्त्वाचा फरक आहे ही गोष्ट प्राचीन कालापासून मानण्यात येत आहे. आणि सहेतुकतेचा फार मोठा भाग मानवी घडामोडींमध्यें असतो हे खरे आहे. असें असून निसर्गशास्त्राच्या पद्धति लवकरच सामाजिक शास्त्राना लागू करण्यात आल्या, व त्यावरून इतिहासाचे स्वरूप व त्याचे वैशिष्ट्य याबद्दलची नवीन कल्पना त्याच्या पाठोपाठ पुढे आली. एन्जल्स लिहितो—

" सामाजिक प्रगतीचा इतिहास व सृष्टीचा इतिहास यामध्ये एक महत्त्वाचा फरक आहे. माणसाच्या कृतींमुळें सृष्टीवर झालेले परिणाम लक्षात न घेतले तर असें दिसतें कीं, निसर्गातील घटक आंधळेपणाने, अजाणता एकमेकावर काहीं परिणाम घडवितात. त्यामागे काहीं विशिष्ट तऱ्हेचा असा ठरीव आराखडा असतो असें नाहीं. फक्त त्याच्या आपापसातील घडामोडींमुळें काहीं सर्वसाधारण नियम आपोआपच ठरतात इतकेच. निसर्गसृष्टीमध्ये जे काहीं घडतें ते अगदीं बुद्धिपुरस्सर ठरविल्याप्रमाणे काहीं घडत नाहीं " ( एंजल्स—फरबॅकमधील उतारा, मुकर्जींच्या 'ऑन इंडियन हिस्ट्री'मधून, पान २३). याच्या उलट माणसाच्या घडामोडींचा इतिहास काय सांगतो ते पाहू या. " माणसे आपणच आपला इतिहास घडवितात. त्यातून काहींहि निष्पन्न होवो, परंतु प्रत्येक मनुष्य आपण निश्चित केलेल्या उद्देशानुसार बुद्धिपुरस्सर वागत असतो. आणि मग साहाजिकच अनेक दिशेने कार्य करणाऱ्या या इच्छाशक्ति आणि बाह्य जगतावर होणारे त्याचे विविध परिणाम यातून मानवी इतिहास बनत जातो. " याचा अर्थ कोणतीहि एकादी घटना ही जरी वैयक्तिक जाणीव आणि हेतु याच्याखेरीज घडत नसली तरी देखील एकदर इतिहास हा सामान्य नियमानुसारच घडतो, असें म्हटले जाते. कारण फारच क्वचित् प्रसगीं व्यक्तीच्या इच्छेप्रमाणे साऱ्या गोष्टी घडून येतात. इतिहासात वावरत असणाऱ्या अनेकाच्या इच्छा कल्पनेपेक्षा काहीं निराळेच घडवून आणतात. फार काय, पण कित्येक वेळा इच्छेच्या किंवा कल्पनेच्या अगदीं विरुद्ध घडून येते. म्हणून एकदर परिणाम लक्षात घेता स्वैर अशा मानवी इच्छेला ह्या साऱ्या घडामोडींमध्ये दुय्यम स्थान प्राप्त होते. या बाबतींत सामाजिक क्षेत्रात निर्माण होणारी परिस्थिति व मनुष्यबाह्यसृष्टींत अहेतुकपणे घडून येणारा बनाव याचे एकमेकाशीं चागलेंच साम्य दिसून येते. ( जॅक्सन, डायलेक्टिक्स, पान १२७ )

समाजातील घडामोडी या अशा व्यक्तिनिरपेक्षपणे अकल्पित घडून येतात, ही कल्पना केवळ मार्क्सवाद्याचीच नाहीं. स्वतःच्या इच्छेचा ज्यांत यत्किंचितहि सबंध नाहीं अशा साध्याकडे चाललेल्या सामाजिक प्रगतीला समाजाचा एक घटक या नात्यानें प्रत्येक मनुष्य एकसारखा हातभार लावीत असतो, असें

डम स्मिथहि म्हणतो. कल्पनावादाकडे झुकणाऱ्या तत्त्वज्ञानाचा पुरस्कार कर-
ारा हाइक सुद्धा हेच सांगतो की, वैयक्तिक कृतीपेक्षा वेगळी असणारी म्हणूनच
सामाजिक ' या नावाला पात्र ठरलेली कोणतीहि सामाजिक प्रक्रिया ही
हेतुकच असते. आणि जाणीवपूर्वक घडत नसते. ( 'सोशॅलिझम ॲन्ड दि
डि ऑफ सोसायटी ' इकॉनॉमिका फेब्रुवारी १९४४, पान ३१ ).
नवी जीवनातील भाषा किंवा बाजार, तसेच पैशाचे किंवा नीतीचे
वहार या गोष्टी बुद्ध्या घडविलेल्या नाहीत, असे हाइकने दाखवून दिले आहे
ान २९). याच ठिकाणीं मॅनहाइमचे युद्धासंबंधीचे सर्वमान्य उदाहरण आप-
ला घेता येईल. तो लिहितो की, " बहुतेक कोणालाहि युद्ध नको असते.
र्थिक, सामाजिक, मानसिक घडामोडींचे परिणाम साचत जाऊन अखेरीला
ाचा स्फोट होतो. परंतु ह्या दैनंदिन घडामोडी ज्याच्या हातून घडतात
ांना युद्धासारख्या परिणामाची बिलकुल अपेक्षा नसते. तरी देखील त्या कृती
णाराना तिटकारा वाटेल अशा प्रकारचे परिणाम घडून येतातच. " यालाच
तिहासातील वस्तुनिष्ठ गतितत्त्व असे मॅनहाइम नाव देतो.

हा निष्कर्ष अत्यंत महत्त्वाचा आहे. भौतिकशास्त्रज्ञ ' जड वस्तू ' चा
ा तऱ्हेने अभ्यास करतात, त्या तऱ्हेने अभ्यास करण्याला योग्य असा प्रत्यक्ष
तुनिष्ठ विषय शास्त्रीय इतिहासाच्या अभ्यासकाला यामुळेच हातीं लागत
हे. यावरून आपणाला असे म्हणता येईल की, शास्त्रीय दृष्टीने इतिहासाचा
भ्यास करणारा वस्तुनिष्ठ गतितत्त्वाचे म्हणजेच सामाजिक प्रगतीचे नियम
धून काढतो. अशा रीतीने प्रस्तुत निबंधाच्या उपोद्घातात प्रत्येक गोष्टीकडे
ाण्याचा आत्मवाद्याचा जो याबाबतचा दृष्टिकोन सांगितला त्याला असे
परिणामकारक उत्तर दिले जाते. कारण इतिहासविषय हा वस्तुनिष्ठ आहे हे
ाता आपण दाखवून दिले आहे.

तथापि वस्तुनिष्ठ इतिहास ज्याची शास्त्रीय मीमांसा करू पहातो ती
तु कोणती ? हा प्रश्न शिल्लक राहिलाच. उदाहरणादाखल आपण असे सम-
ा चालू या की, विद्यमान इतिहासकार जागतिक युद्ध ( १९३९–४५ ),
ांडवलशाही समाज व समाजसत्तावाद याचा अभ्यास करतो. पण भांडवल-
ाही म्हणजे तरी काय ? भांडवलशाही म्हणजे प्रत्येकाला हातात घेऊन पाहता
ारी एकादी जडवस्तु नव्हे. बरे जी माझ्यावर परिणाम घडवून आणते असे
ापण मानतो ती परिस्थिति परिस्थिति म्हणजे तरी काय ? तिच्यासंबंधीं मी
तःच्या अशा ज्या कल्पना बनविल्या असतील त्या कल्पना म्हणजेच परि-
थति. निरनिराळ्या लोकांवर गांधीजी निरनिराळा परिणाम घडवून आणतात,
कसे ? आपल्या मनांवर परिणाम करणारे गांधीजी हे काहीं जड-

स्वरूपी—देहधारी गांधीजी खात्रीने नव्हेत, तर आपणापैकीं प्रत्येकाने त्याच्याविषयीं करून घेतलेल्या कल्पना म्हणजेच गांधी होत. आणि म्हणूनच प्रत्यक्ष दिसणारी वस्तु ही जरी एकच असली, तरी निरनिराळे लोक निरनिराळ्या प्रकारें त्या वस्तूचें पृथक्करण करतात. त्या वस्तूचा अर्थ वेगवेगळ्या तऱ्हेनें लावूं शकतात, आणि ते भिन्न भिन्न अर्थ सुद्धा सारे खरे असतात. भांडवलशाही व समाजवाद या वस्तूंबद्दलच्या आज प्रचलित असणाऱ्या भिन्न कल्पनांचे जंजाळ आपण पाहातच आहोत कीं !

इतिहासाच्या वस्तुनिष्ठ स्वरूपावर घाव घालू पाहणारी ही विचारसरणी आपणाला अगदीं सुपरिचित आहे. आणि हिचे खंडनहि फारसें कठीण नाहीं. वर सांगितलेल्या अनियोजित निष्कर्षासंबधींच्या युक्तिवादावरून निघणारा हा एक उपसिद्धान्त आहे. हाइक हा स्वतःच्या आत्मवादी दृष्टिकोनाप्रमाणे घटक-कल्पना व या कल्पनाविषयींच्या कल्पना यामध्यें फरक करतो. आणि सामाजिक शास्त्राचें मुख्य काम संबंध वस्तूचा विचार करणें हे नसून वस्तुघटकाची जुळवाजुळव करणे हे आहे असें म्हणतो. याचा अर्थ असा कीं, एक संबंध वस्तु ज्या मूलभूत कल्पनांची बनलेली असते, त्या मूलभूत कल्पनांबद्दलच्या कल्पना निरनिराळ्या लोकांच्या निरनिराळ्या असू शकतील. क्रांतीच्या कालखंडाबद्दल बोलत असताना मार्क्स हेच सांगतो. तो लिहितो, कालाच्या ओघात मानवी जीवनामध्ये होणाऱ्या अवस्थांतराबद्दल विचार करीत असताना दोन गोष्टी अगदीं अलग केल्या पाहिजेत. एक उत्पादनाच्या आर्थिक स्थितींत होणारे भौतिक बदल आणि दुसरे त्याच्या अनुषंगानें नैतिक, राजकीय, धार्मिक, सौंदर्यविषयक, नि तात्त्विक घडणींत होणारे बदल. ह्या दुसऱ्या प्रकारच्या बदलाच्या बाबतींत उत्पन्न झालेल्या विरोधाची जाणीव माणसाला होते, अन् त्या विरोधाचा शेवट लावण्यासाठीं तो झगडण्याला उद्युक्त होतो. (मार्क्स—क्रिटिक जॅक्सनमधला उतारा पान १९१ ).

यासंबंधींचे स्पष्टीकरण देताना जॅक्सन लिहितो कीं,—' सामाजिक जीवनातील घटनावरून असे एक मूलभूत अनुमान निघते कीं, कोणत्याहि काळीं समाजातील प्रत्येक व्यक्तीची भोवतालची परिस्थिति सापेक्षत्वानें इतराहून भिन्न असल्यामुळे तिला साकल्याने होणारे समाजदर्शन इतराच्याहून भिन्न असणार. याच मुद्द्यावर जुने आत्मवादी व नवे अनुभवनिष्ठ एकात्मवादी हे दोघेही जणू काय, आपण अगदीं बरोबर आहोंत या भावनेने बोलत असतात. पण त्यांच्या दृष्टींतून पूर्णपणे निसटलेली वस्तुस्थिति अशी आहे कीं, जीवनाला आवश्यक असणाऱ्या साधनांचे उत्पादन सहेतुकपणें करीत असताना माणसांना जे विशिष्ट अनुभव येतात त्यांतूनच वस्तुनिष्ठ असे सामान्य सिद्धान्त बांधण्या-

जोगी भूमिका मनुष्य अजाणता निर्माण करीत असतो. आणि अशा तात्त्विक सिद्धान्ताचा व्याप ( आवाका ) व त्यांची वास्तवता हीं एका व्यक्तीच्या प्रत्यक्षानुभवापलीकडच्या असतात ( जॅक्सन पान २१९ ). जॅक्सननें दाखविलेला हा सूक्ष्म फरक नेहमींच्या अनुभवातील गोष्टींवरून खरा ठरतो. उदाहरणार्थ, लोकमतात किती जरी बदल झाले तरी समाजघटनेचा सबधपणा हा अविच्छिन्न व अबाधितच राहतो.

## प्रगतीच्या नियमाचा शोध

या ठिकाणीं मुख्य मुद्दयाचा प्रश्न हा आहे कीं, हीं सामाजिक माकल्ये ( सामाजिक घटना ) आपली एकात्मता कायम राखून एकत्र राहतात याचें कारण काय ? आणि त्यात जेव्हा बदल घडून येतो तेव्हा तो कोणत्या कारणावरून घडतो ? मानवी जगतातील ह्या सार्‍या स्थित्यंतराचा सबध असंदिग्धपणे व ठामपणानें जर परिवर्तनशील अशा स्वतत्र मूलभूत तत्त्वाशीं आपण लावून दाखवूं शकलो तर ऐतिहासिक प्रगतीच्या नियमचा शोध लागला असें होईल. आणि मग त्याच्या साहाय्यानें इतिहासाचे शास्त्र तयार करिता येईल.

उत्पादनसंबंधाच्या एकात्रित बेरजेतून तयार होणारी समाजाची आर्थिक घडण ही समाजातील सर्व स्थित्यतराचे मूळ कारण होय असे मार्क्सिस्टांचें म्हणणें दिसतें. समाजाची आर्थिक घडण ही स्वतत्र असून परिवर्तनाच्या बाबतींत स्वयशासित आहे. एवढेच नव्हे तर समाजातील कल्पना व विचारप्रवाह आणि धार्मिक राजकीय संस्था याच्यातील स्थित्यतरे आणि आर्थिक घडण याचा एकमेकाशीं कार्यकारण सबध आहे असे ते म्हणतात.

या तर्‍हेचा एकतत्त्वप्रतिपादक दृष्टिकोन केवळ मार्क्सवाद्याचाच आहे असे नाहीं. स्पेन्सर, कोम्त व मिल यानीं वरील दृष्टिकोनाला सदृश अशा तर्‍हेच्याच कल्पना माडल्या आहेत. अर्थात् मूळ कारणासंबंधींचा प्रत्येकाचा दृष्टिकोन अगदीं भिन्न आहे.

प्रगल्भावस्थेस पोहोचलेल्या मानसशास्त्राच्या पायावर समाजरचनेचे शास्त्र उभारण्याची शक्यता मिलच्या दृष्टीला दिसून येते. त्याला असें वाटते कीं, इतिहासाच्या अभ्यासाने व ऐतिहासिक घटनाचें योग्य पृथःकरण करून एकदा समाजाच्या प्रगतीचे नियम निश्चित करता आले कीं, भाविष्य वर्तविण्यास त्यांचा अबाधित उपयोग व्हावा. बीजगणितात अनंत श्रेणींपैकीं पहिले कांहीं घटक हस्तगत होऊन त्याच्या घडणींतील नियमितपणाचें तत्त्व ध्यानात आल्यावर ज्याप्रमाणें कितीहि घटकापर्यंतच्या उर्वरित श्रेणींचें अनुमान आपल्याला करता येतें, त्याप्रमाणें हातीं आलेल्या समाजप्रगतीच्या नियमावरून भावी कालाविष-

यांची अनुमाने करिता येऊं लागतात. ( उतारा—पॉपर, इकॉनामिका, मे १९४३ पान ७३ ).

या बाबतींत अधिक पल्लेदार असा प्रयत्न नुकताच कार्ल मॅनहाइमनें केला असल्याचे दिसून येते. त्यावरून त्याची आश्चर्यकारक विद्वत्ता व जर्मन विद्वानात प्रायः आढळून येणारी निःशेष ज्ञानसंपादनाची ओढ याची पुरेपूर ओळख पटते. मॅनहाइमच्या मताने माणसाच्या बौद्धिक विकासाचीं तीन स्तबके आहेत. अकल्पित शोध, संशोधन आणि संयोजन अशीं नावें तो त्या तीन स्तबकाना देतो.

निसर्गाशीं झगडा करीत असताना माणसाला जे प्रश्न पडले, जीं कोडीं निर्माण झालीं त्याचीं उत्तरे शोधण्यासाठीं तो धडपडूं लागला, चाचपडूं लागला. त्या वेळीं चुका आणि प्रयोग याच्या प्रक्रियेतून जात असता आकस्मिकपणे त्या कोड्याचीं उत्तरे उलगडणे—त्याचे स्मरण होणे ( स्फुरण होणे ! ) ही बुद्धीच्या विकासाची पहिली अवस्था होय. या अवस्थेत माणसाने जीं काहीं निर्णायक विधाने केलीं तीं त्यानें विधिनिषेधाच्या रूपाने पुढील पिढ्यासाठीं ठाशीवपणानें सांगून ठेवलीं आहेत. संशोधनाच्या दुसऱ्या स्तबकात माणसाने कल्पनेनेच काहीं एक ध्येय निश्चित केले, व त्याच्या सिद्धीसाठीं एका विशिष्ट कालात, विशिष्ट तऱ्हेने, अमुक इतकी श्रमशक्ति, कोणत्या प्रकारे खर्ची घालावी यासंबधीं अगोदरच काहीं अदाज बांधून ठेवले. आणि या पद्धतीनेंच त्यानें समाजामध्ये निरनिराळीं हत्यारे ( उत्पादनसाधने ), अनेक संस्था नि विविध संघटना निर्माण केल्या आहेत. आज आपण विचाराच्या नि आचाराच्या दृष्टीने या दुसऱ्या स्तबकामध्यें आहोत. आपण परिच्छिन्न अशा एक एका साध्याची कल्पना करूं शकतो. पण कँटने सुचविलेल्या साध्याच्या सलग साम्राज्याचा साक्षात्कार मात्र आपणाला घडत नाहीं. आपली विचारसरणी एका सरळ रेषेत व एकाच दिशेनें चाललेली असते. त्यामुळे अनेक बाजू असलेल्या समाजघडणीचे सर्वांगीण ज्ञान आत्मसात् करणें आपल्याला अशक्य होतें. जोपर्यंत आपण याच स्तबकात राहू तोपर्यंत अर्थशास्त्रात ज्याला ‘ सर्धी—मूल्य ’ ( वेळेला वस्तु हस्तगत करण्यासाठीं द्यावी लागणारी किंमत ) असे म्हणतात किंवा इमर्सन ज्याला ‘ भरपाईचा सिद्धान्त ’ म्हणतो त्या तत्त्वाला शरण जाणें आपणास भाग पडणार आहे. स्वातंत्र्य किंवा सुरक्षितता, स्थैर्य किंवा प्रगति यांपैकीं एक कांहींतरी आपण मिळवूं शकूं. एक ध्येयप्रणाली आपण पतकरूं शकूं. तदितर उद्दिष्टे आपल्या कक्षेबाहेरचीं आहेत असें मानावे लागेल, तिसऱ्या स्तबकातली संयोजनात्मक अशी जी बुद्धि आहे ती मात्र संपूर्ण परिस्थिति आवाक्यात घेऊं शकेल. या संयोजनाच्या स्तबकांत मनुष्य संकल्पित दिशेनें प्रगतीच्या तारूचें सुकाणूं हलवूं शकेल.

हा उद्देश डोळ्यापुढे ठेवून मॅनहाइमने सयोजनाच्या स्तबकापर्यंत मनुष्याचे परिवर्तन करण्याच्या प्रश्नावरच आपले लक्ष केंद्रीभूत केलें. सयोजनाच्या स्तबकापर्यंत जेव्हा माणसाच्या बुद्धीची प्रगति होईल, त्याच वेळीं वास्तव पार्श्वभूमि लक्षात घेऊन एकाद्या प्रत्यक्ष वस्तूचे शास्त्रशुद्ध दृष्टीने आपण आकलन करूं शकूं असें मॅनहाइमला वाटते. अशा रीतीने योजनाबद्ध व स्फूर्तिनिष्ठ दोन्ही विचाराचें—संकल्प व स्फूर्ति याचे—ध्येय एकच आहे, असे दिसून येईल. " परंतु स्फूर्ति ही बौद्धिक विश्लेषण टाळते तर योजनाबद्ध विचारसरणी ही चिकित्सेची सर्व आधुनिक साधनें उपयोगात आणते. "

ज्याला आपण अकल्पित घटना असें म्हणतों त्या वास्तविक तशा नसतात. त्या फक्त विशिष्ट शास्त्राच्या सिद्धान्तीकरणाच्या चौकटींत किंवा विशिष्ट बुद्धिवादाच्या कक्षेंत बसत नाहींत इतकेंच. त्या शास्त्रांच्या पद्धतीने शोध घेणारास त्या अकल्पित वाटतात. पण विचाराच्या विविध अगाचा आटोप सामावूं शकणाऱ्या बुद्धीला त्या घटनाची संपूर्ण संगति लागूं शकेल, असे मॅनहाइमचें म्हणणें आहे.

### स्वतंत्र व खुल्या समाजाचे पुरस्कर्ते

स्वतंत्र व खुल्या समाजाच्या पुरस्कर्त्यांनीं मार्क्सच्या स्वयगतिनिष्ठ भौतिकवादावर हल्ला चढविण्यापेक्षा वर निर्दिष्ट केलेल्या मॅनहाइमच्या ध्येयवादी विचाराचा हल्ला परतविणें अधिक आवश्यक आहे. हाइकनें या दिशेने प्रयत्न केला आहे. त्याने आपल्या ' सायंटिसिझम् अँड स्टडी ऑफ दि सोसायटी ' या ग्रंथात याला ' मानसिक विकासाचा बूटथापटा सिद्धान्त ' असें म्हटलें आहे, व त्याविरुद्ध त्यानें चागलाच सोटा उचलला आहे. (इकॉनॉमिका १९४२–४४) तसेंच अलीकडे कार्ल पॉपरनेंहि बंदिस्त समाजपद्धतीवर अत्यंत परिश्रमपूर्वक व विद्वत्तापूर्ण असा हल्ला चढविलेला आहे.

सर्व प्रकारच्या नियतिवादा (determinism) विरुद्ध जो युक्तिवाद केला जातो तो मूलतः निकोप अशा संशयवादावर आधारलेला असतो. या युक्तिवादाच्या बुडाशीं एक अबाधित तत्त्व आहे, तें असें कीं, प्रत्येक विधान निदान तात्त्विक दृष्ट्या का होईना, पण खोटें होऊं शकेल असें शास्त्र मानतें. कोणत्याहि क्षणाला संपूर्ण ज्ञान प्राप्त होईल हें अशक्य आहे. अशा तऱ्हेच्या सर्वज्ञतेवर हक्क सांगणें म्हणजे हाइक म्हणतो त्याप्रमाणे अव्याहत परागतिच पत्करणें होय. स्वतःच्या ज्ञानाची स्वतःलाच मीमांसा करतां येईल असें प्रतिपादणें म्हणजे आपल्याला माहीत आहे त्यापेक्षा अधिक ज्ञान स्वतःजवळ आहे,असें भासविणेंच होय.आणि हें अक्षरशः मूर्खपणाचें आहे.'इतिहास संपूर्णतया विशद करतो'

म्हणणाराला आपल्या इतिहासलेखनाच्या वेळेला इतिहास ही एक पूर्ण झालेली प्रक्रिया आहे, या दृष्टीने पाहाता आलें पाहिजे. पण इतिहास ही एक आपल्या काळात पूर्ण झालेली प्रक्रिया आहे, ह्या दृष्टीने हेगेलनें इतिहासाचा विचार केला असा एक नेहमींचा आक्षेप त्याच्या इतिहासविषयक तत्त्वज्ञानावर घेण्यात येतो. इतिहासाच्या विकासाला कांहीं नियम नाहीं, ही गोष्ट अत्यंत सरळ शब्दात स्पष्टपणे फिशरनें सागून टाकली आहे. तो लिहितो—' इतिहासामध्ये कित्येक-जण काहीं संविधानक, काहीं लयबद्ध पुनरावृत्ति किंवा काहीं पूर्वयोजना आहे, असे दाखवून देतात. पण मला इतिहासात फक्त आकस्मिक घटनाच्या परपरे-पलीकडे दुसरें काहीं दिसत नाहीं. **आकस्मिक घटनापरपरा ही एकच एक अतुलनीय अशी गोष्ट इतिहासात प्रत्ययास येत असल्यानें तेथें सामान्य सिद्धान्त बांधण्याला कांहीं जागाच नाहीं.** ' ह्या विधानातील ठळक अक्ष-रातील महत्त्वाचा अर्थपूर्ण भाग हा अजून तितकासा लोकाना विशेष परिचित नाहीं. वस्तुतः शास्त्राचा नेहमींचा सिद्धान्तच या विधानाने निराळ्या शब्दात पुढे माडला आहे. तो हा कीं, निरपवाद सिद्धान्त हे विशिष्ट प्रक्रियाच्या अचल व्यवस्थेसंबंधींच अबाधित विधानें करू शकतात.'मानवी समाजाचा विकास'ही ऐति-हासिक प्रक्रियेंतील अद्वितीय अशी महान् घटना असल्यामुळे सर्वसाधारण निय-माच्या भाषेत तिचे वर्णनच होऊ शकणार नाहीं. कारण तिला नियमच नाहींत.

उत्क्रांतितत्त्व किंवा समाजप्रगतीचा नियम एकदा माहीत झाला असे वाटले कीं त्याला चिकटून राहणें हा या नियमातील गर्भित भाग मोठा धोक्याचा आहे. पदार्थविज्ञानशास्त्राच्या नियमाचें उल्लंघन करणें म्हणजे स्वतःला निष्कारण ताप करून घेणें होय. तसेच प्रगतीच्या नियमाचें उल्लघन कर-ण्याचा प्रयत्न करणें म्हणजे मानवजातीला नाशाच्या नि आत्यंतिक दुःखाच्या खाईत लोटण्यासारखे आहे. कारण अशा वागण्याने प्रगति खुटेल आणि प्रतिगामित्व व त्याबरोबरच ओढवणाऱ्या महान् आपत्ति याना थैमान घालण्यास पूर्ण मुभा मिळेल. जगाकडे सनातनी दृष्टीनें पाहणाऱ्या पुराण-मतवादी व भेकड मनाच्या माणसाला मार्क्स निक्षून बजावतो कीं, ' तत्त्वज्ञानीं आजपर्यंत ह्या जगाच्या स्वरूपाचे फक्त विवरण केलें, तथापि मुख्य मुद्दा आहे तो हे जग बदलण्याचा आहे. ' आधुनिक काळातील कट्टर नियतीवादी विचार-सरणींमध्यें देखील हा कार्यप्रवणतेचा विशेष स्पष्ट दिसतो. पालट खरा पण तो प्रगतीच्या नियमाला धरूनच झाला पाहिजे, तो प्रतिगामी स्वरूपाचा असता कामा नये, तो पुरोगामी हवा. हे दोन शब्द मार्क्सवादी गोटात वाद-विवाद होत असतां सारखे इकडून तिकडे फेकले जात असतात. बदल योग्य मार्गाने व्हावा म्हणून त्यावर नियंत्रण जरूर आहे. ह्या मुद्यावर ध्येयवाद्यांचें

भौतिकवाद्यांशीं सहमत आहे. मॅनहाइम हा बुद्धीच्या विकासालाच वळण लावून नव्या समाजाला अनुरूप असा नवा मनुष्य निर्माण करूं पहातो. तो म्हणतो, 'मानवी प्रवृत्तींना अशा रीतीने संघटित करावयाचे व त्याना असे वळण लावावयाचे कीं, त्यांनीं आपली सारी शक्ति आणीबाणीच्या योग्य प्रसंगीं उपयोगाला आणून एकदर प्रगतीच्या प्रवाहाला इष्ट दिशेने वळण लावावे, हे उद्दिष्ट साध्य करणे ही राजकारणातील मुख्य गोष्ट आहे.' (मनहाइम)

## शास्त्रवाद्यांचा निर्बुद्ध निर्णय

मानवेतिहासाच्या प्रवाहाला नियंत्रित करता येईल, दिशा दाखविता येईल या कल्पनेनेच स्वतंत्र समाजाच्या पुरस्कर्त्यांना कित्येकदा सात्त्विक संताप उत्पन्न होतो. या कल्पनेला हाइक 'शास्त्रवाद' असें नाव देतो. शास्त्रवाद म्हणजे भौतिक शास्त्रातील कल्पना निर्बुद्धपणाने सामाजिक शास्त्रानाहि लागू करण्याचे खूळ होय. भौतिक शास्त्रामध्ये आपल्याहून अलिप्त असणाऱ्या बाह्य सृष्टींतील वस्तुजाताची पाहणी करून तिचे स्वरूप आपण समजून घेतो, त्यामुळे त्या वस्तूवर नियंत्रण ठेवणे शक्य होते. पण मानवजातीच्या इतिहासाला नियंत्रित करण्याची मनीषा बाळगणारे शास्त्रज्ञ हे स्वतः समाजाबाहेर, त्या इतिहास-प्रवाहाला सोडून दुसरीकडे कुठे राहतात काय ? हाइकने वर्णिलेल्या अपार्थिव बौद्धिक वातावरणात अनिर्बंधपणे वावरणाऱ्या मुक्तात्म्यांच्या जातींतले ते असतात काय ? मानवी घडामोडींमध्यें प्रथम बुद्धीला सर्वश्रेष्ठ स्थान देऊन सुरुवात करणाऱ्या अन् शेवटीं बुद्धीच्या नाशाने अखेरी करणाऱ्या अशा शास्त्रवाद्यांच्या विचारसरणीची शोककथा हाइकने मोठ्या भडक शब्दात वर्णिली आहे. निरनिराळे दृष्टिकोन व भिन्न प्रकारचीं ज्ञानें यानीं संपन्न असणाऱ्या व्यक्ति-व्यक्तींमधील क्रिया-प्रतिक्रिया याच्यातूनच वैचारिक जीवन तयार होते. मत-भेदाच्या पायावरच बुद्धीच्या विकासाची सामाजिक प्रक्रिया चालू असते. पण ह्या प्रक्रियेच्या परिणामाचे अनुमान करता येत नाहीं हे त्या प्रक्रियेचे एक मूलभूत लक्षणच होय. कोणते दृष्टिकोन समाजविकासाला साहाय्यक होतील अन् कोणते न होतील हे आपणाला समजणें अशक्य असते. सारांश, आज जे दृष्टि-कोन आणि जीं मते आग्रहाने आपण मांडतों त्याच्यामुळे समाजविकासावर कसलेंहि बंधन न पडतां त्या विकासाला वळण लावणे शक्य नाहीं. मानवी मन हें समाजरचनेचाच एक भाग असल्यानें कुणाहि योजकाच्या मनोव्यापारा-पासून समाजरचना अलिप्त राहूं शकत नाहीं. म्हणून मनाच्या विकासाची योजना आंखणें, त्याची जुळणी करणें किंवा सर्वसामान्यपणें समाजाची प्रगति आंखणें हे वाक्प्रयोग म्हणजे 'वदतोव्याघाता'चीं सुंदर उदाहरणेंच होत. (हाइक—पान १२३ 'दि रोड टु सर्फडम.')

दुसऱ्या शब्दांत असे म्हणता येईल कीं, इतिहासाचें वस्तुनिष्ठ गतितत्त्व हे चिरकाल वस्तुनिष्ठच रहाणार. वस्तु व तिचे घटक यांच्या संबंधाचें शास्त्र अजून लिहिलें गेलेलें नाहीं. कदाचित् तें कधींच लिहिलें जाणार नाहीं.

मानवी प्रगति नियमबद्ध आहे या सिद्धान्ताविरुद्ध दुसरा एक निर्णायक युक्तिवाद आहे. या नियमाचे अस्तित्व कबूल केलें तर वास्तवतेंतील अपूर्व गतिमानपणावर कसा विश्वास ठेवावा ? बदल हा अपरिवर्तनीय मार्गानेच होतो असे हा सिद्धान्त सांगतो. त्यामुळेच त्या बदलाची प्रक्रिया आपण नियमाच्या भाषेत सांगू शकतो. मार्क्स म्हणतो—'जेव्हां स्वतःची गति निश्चित करणारा नैसर्गिक नियम समाजाला सापडतो, तेव्हा देखील त्याच्या उत्क्रांतींतील नैसर्गिक क्रम सोडून समाज एकदम उडी घेऊं शकत नाहीं; अगर नैसर्गिक क्रमाप्रमाणे असणारे समाजाच्या प्रगतींतील टप्पे नुसत्या लेखणीच्या फटकाऱ्याने नाहींसे करता येत नाहींत. परंतु एवढेच मात्र करिता येईल कीं, ह्या ज्ञानामुळे नवनिर्मितीच्या जन्मकाळच्या वेदना कमी करता येतील, त्याची तीव्रता कमी करता येईल.' पॉपरनें दाखवून दिल्याप्रमाणें मार्क्सच्या या विधानाचा खरा अर्थ हा कीं, सामाजिक प्रगतीचें आपण फक्त स्पष्टीकरण करूं शकतो, विविध मार्गांनें आपण तिला मदत करूं शकतों. तथापि महत्त्वाचा मुद्दा हा कीं कोणीहि ती बदलूं शकत नाहीं. ( पॉपर, इकॉनॉमिका मे १९४४, पान १०२. )

भौतिक शास्त्राच्या नियमाना देखील जें साध्य करणे अशक्य ते करून दाखविण्याचा खटाटोप नियतिवादाच्या धर्तीचे समाजप्रगतीचे नियम साध्य करू पाहतात असें आपणाला दिसून येईल. 'इतर गोष्टी सदृश असतील तर' अशा शर्तीवर शास्त्रीय सिद्धान्ताच्या द्वारें भावी कालाविषयींचीं अनुमाने सांगितलीं जातात. परंतु शास्त्रीय नियमाचें हें सशर्त संभाव्यतेचें स्वरूप धुडकावून लावण्याचाच प्रयत्न समाजप्रगतीचा नियम करतो असें दिसतें. सध्या आपल्यापाशीं पदार्थविज्ञान, रसायन, यंत्रविद्या, मानवशास्त्र, शासनशास्त्र, अर्थशास्त्र, मानसशास्त्र इत्यादि शास्त्राचे नियम आहेत. त्यांचा आंवाका ' जर—तर' नीं मर्यादित असतो. कारण परस्परावलंबी अशा बहुविध क्षेत्रांनीं आपले एकदर जीवन बहरलेलें असले तरी प्रत्येक शास्त्राचा सबंध विशिष्ट क्षेत्रापुरताच येत असल्यानें तेवढ्या मर्यादेपुरतेच आपले सिद्धान्त खरे आहेत असे ते ते शास्त्र म्हणतें. ज्या ठिकाणीं इतर परिस्थितींत झपाट्याने बदल होत नाहींत किंवा आपल्याला ठाऊक असलेल्या नियमांप्रमाणेंच बदल होतात, अशा पदार्थविज्ञान किंवा रसायनशास्त्रांतील अनुमानें बिनचूक आणि अधिक

निश्चित असतात. परंतु जेथें एका शास्त्राच्या क्षेत्रावर तदितर शास्त्राचे घटक वारंवार परिणाम घडवितात अशा सामाजिक शास्त्राच्या बाबतींत इतर गोष्टी सदृश राहतील तर अशीं जर–तरची अट घातल्यावाचून कोणतेहि शास्त्रीय नियम बांधले जात नाहींत. असे असूनहि समाजाच्या विकासाचा सिद्धान्त बांधूं पाहणारे शास्त्रवादी भिन्न भिन्न सामाजिक शक्तींच्या परिणामाना आपल्या चौकटींत बसविण्याचा प्रयत्न करून पाहतात ! अशा रीतीने अद्यापि कुठेहि बांधण्यात न आलेला सामाजिक शक्तींच्या मोजमापाचा सिद्धान्त हे विकासवादी पुढे मांडीत आहेत. पण एकापुढे एक घडत गेलेल्या घटनाच्या मालिकेचें स्पष्टीकरण एकाद्या नियमान्वयें किंवा नियमाच्या गटान्वये करता येणे शक्य आहे असे मानणे हे भौतिक शास्त्रात देखील चूक ठरविण्यात आले आहे. महत्त्वाची गोष्ट अशी आहे कीं जरी एकाद्या नियमाने निसर्गातील घडामोडींचें क्रमवार स्पष्टीकरण केले, त्याची संगति लावली तरी कार्यकारणभावाने तीन-चार घटना विशिष्ट नियमान्वये एकापुढे एक घडून येण्यापलीकडे जास्त क्रमपद्धति प्रत्यक्षातहि दिसून येत नाहीं. वाऱ्यानें झाड हालले आणि फळ खालीं पडले, तर ह्या घटनेचे स्पष्टीकरण करण्याला, त्यातील कार्यकारणभाव सांगण्याला, न्यूटनप्रणीत ' गुरुत्वाकर्षणाचा सिद्धान्त, साह्यकारी आहे हे कोणी नाकारणार नाहीं. परंतु तेवढा एकच नियम ती घटना घडविण्यास कारणीभूत नाहीं. गुरुत्वाकर्षणाखेरीज वाऱ्याच्या दाबाचे स्पष्टीकरण करणाऱ्या नियमाचा आपणाला विचार करावा लागेल. इतकेंच नव्हे तर हेलकाव्यामुळे शाखेला बसणारे धक्के, त्या फळाच्या देठाला बसणारा ताण, फळाला बसलेला मार, त्यानतरचे रासायनिक फेरफार इत्यादिसंबधींच्या नियमांचाहि विचार करावा लागेल. ......आणि हें सर्व कदाचित् कोणी करू शकले तरी उत्क्रांतीचे किंवा परपरेसंबधींचे नियम कोण सांगू शकणार ! ' ( पॉपर, इकॉनॉमिका मे १९४५ पान ७३ ).

पॉपरने दाखवून दिल्याप्रमाणे प्रगतीचे किंवा विकासाचे नियम हे केवळ दिग्दर्शन स्वरूपाचे होत. त्याचा विचार निरपेक्ष दृष्टीने करण्यात येतो हे चूक आहे. उदाहरणादाखल आपण मार्क्सचेंच एक वचन घेऊं या. तो लिहितो, ' उत्पादनसाधनांची साचत जाण्याकडेच प्रवृत्ति असते.' पण ही काहीं निरपेक्ष अशी वृत्ति नाहीं, तर ती एका विशिष्ट परिस्थितीवर अवलबून असते. तेव्हां सर्व शास्त्रीय नियमाप्रमाणे हे वचन म्हणजे सशर्त अनुमानच होय. जर लोकसख्या कमी झाली ( ती अनेक कारणानीं कमी होऊं शकेल ) तर हें अनुमान टिकणार नाही.

मार्क्सचेच आणखी एक वचन घेऊं. तो लिहितो कीं, ' फायद्याचे प्रमाण कमी होत जाणें ह्या प्रवृत्तीला राजाज्ञेने पायबंद घालणे हे भांडवलशाहीच्या अस्तित्वाला अगदीं आवश्यक आहे. ' ......परंतु भांडवल शिल्लक कसे पाडावे याबाबतच्या शोधानींहि नफ्याचे प्रमाण कमी होत जाण्याच्या प्रवृत्तीला आळा घालतां येईल, त्याला राजाज्ञेचीच नेहमीं गरज लागेलच असे नाहीं. तेव्हा मार्क्सचें वरील वचनहि मर्यादित अर्थानेच नियम ठरतें. याचप्रमाणे प्रगतीच्या प्रवृत्तींसबंधीं निरपेक्षपणे बोलता येणे अशक्य आहे. तेथे फक्त बदल असतो असे नाहीं, तर स्वभावतः परिवर्तनशील परिस्थितींत बदल होत असतो ही महत्त्वाची गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे.

## विवेचनाचा निष्कर्ष

या सर्व विवेचनाचा निष्कर्ष असा कीं, स्वयपूर्ण अशी नियतिवादाची निर्दोष पद्धति असणे संभवतच नाहीं. काहीं संवादी स्वरूपाचे सिद्धान्त ( काहीं गोष्टी गृहीत धरून त्यावरून काढलेले ) किंवा संभाव्य अनुमाने दर्शविणारे नियम आपण सागूं शकू, अगर कल्पनासृष्टींतील कामचलाव् अशा प्रवृत्तींचे दिग्दर्शन आपण करू शकूं, परंतु ठराविक परिस्थितींत अशा अशा तऱ्हेनेच बदल होत जातील असे सागणारा निश्चित सिद्धान्त आपण बांधू शकत नाहीं. त्यामुळे निश्चित अनुमान करणे हे अशक्य होऊन बसते.

## अनेकवस्तुवाद् (Pluralism)

वरील विवेचन लक्षात घेता आधुनिक विचारात अनेकवस्तुवाद हा जो एक विशेष आहे त्यामध्ये बरेच तथ्य आहे असे वाटू लागते. आधुनिक मार्क्सवाद ( मार्क्सवाद ही काहीं ठराविक, बंदिस्त अशी संहिता नाहीं )–प्रस्तुत लेखकाला तो समजतो त्याप्रमाणे–हे काहीं एकवस्तुवादी तत्त्वज्ञान नव्हे. प्रो. डी. पी. मुखर्जींच्या दृष्टिकोनाशीं सहमत होऊन असे म्हणता येईल कीं, 'मार्क्स काय अगर एंजल्स काय, दोघाच्याहि दृष्टीने प्राचीन किंवा भावी कम्युनिझम ही काहीं विशिष्ट अशी परिणत अवस्था नव्हे, ऐतिहासिक बदलाचे किंवा शोधाचें ते एक साधन आहे. (कमजास्तपणे भासमान होणारा कल्लोळ, इतर परिस्थिति व गरागति याबा योग्य तो वाव देऊन समाजप्रगतीचे स्वयगति पद्धतीने संशोधन करण्यासाठीं वापरता येणारे असे ते साधन आहे. ) ह्या विषयावरील सर्व वाङ्मयाचा विस्तृत आढावा घेऊन आपल्या ' हीरो इन् हिस्ट्री ' या पुस्तकामध्ये सिडने हुकनेहि असाच निष्कर्ष काढला आहे. केवळ आकस्मिकपणे किंवा यदृच्छेने सर्व मानवी घडामोडी घडून येतात हे म्हणणे बरोबर नाही. तसेच संपूर्णतः नियतिवादहि मानणे योग्य नाही. खरे पाहता ॲरिस्टॉटलच्या या

(कार्यकारणभावी) पद्धतीच्या विचाराबद्दल आधुनिक काळांत सर्वत्र संशयच उत्पन्न झाला आहे. तार्किक द्वैते किंवा कल्पनासृष्टींतील विरोध याचे महत्त्व कमी होत असून दिवसेंदिवस त्याची जागा, क्रमाक्रमाने होत जाणारा प्रवाही बदल व स्थित्यंतरे याचेकडून अधिकाधिक आक्रमिली जात आहे. त्यामुळे द्वैतातील पूर्वीचें विरोधीपण हिरावून घेतले जात असून त्याच्या जागीं वर्गकल्पना व क्रमकल्पना या दोहोंच्यामध्ये स्थित्यंतर हा एक नवा दुवा तर्कशुद्ध पद्धतीनें पुढे मांडला जात आहे. (लेविनकृत ' ए डायनॅमिक थिअरी ऑफ पर्सनॅलिटी '—उतारा लिंड याचे ' नॉलेज फॉर व्हॉट, पान २८ वर). कडेकोट व्यवस्था आणि अगदीं गोंधळ, किंवा संपूर्ण स्वातंत्र्य आणि केवळ नियतिवाद ह्या कल्पना मर्यादित अर्थानेच खऱ्या आहेत. प्रत्यक्षांत तर कायदा आणि स्वतंत्रता यांतील कल्पनीय अशा सर्व प्रमाणाचे मिश्रणच दिसून येते. विश्वाबद्दलची नवीन तात्त्विक कल्पना ही अशा प्रकारे वर्णिली जाते. (चार्लस् हार्टशॉर्न, हिबर्ट जर्नल, आक्टो. १९४५.)

पदार्थविज्ञानशास्त्राच्या अभ्यासात लहरीसिद्धान्त व अणुसिद्धान्त यांबाबत घडले त्याप्रमाणें येथेहि विरोधी घटकाच्या समीलनाने विरोध परिहार करण्याचा हा प्रयत्न आहे. स्थूलसामान्य सिद्धान्तांत ग्रथित केलेली अशी ही ' सामाजिक ' कल्पना आहे. स्वतः ईश्वर हे देखील एक प्रभावी ' सामाजिक ' अस्तित्व आहे ! स्वातंत्र्याला योग्य व स्वाभाविक मर्यादा घालून परमेश्वरानें आपले सर्व समर्थपण प्रगट केले आहे. उदा०—अशा तऱ्हेच्या मर्यादा कीं,— जादा स्वातंत्र्य घेतले तर अधिक संधी प्राप्त होण्यापेक्षा जादा धोकेच वाढतील. कमी स्वातंत्र्य दिले तर धोके कमी होण्यापेक्षा संधीच कमी होत जातील. परंतु सामाजिक दृष्ट्या काहीं अस्तित्व हवे असेल, संधि हवी असेल तर थोडाफार धोका पत्करलाच पाहिजे. अशा रीतीनें परमेश्वरी समर्थपणाच्या चुकीच्या नि असामाजिक कल्पनेमुळे निर्माण झालेल्या बऱ्यावाईटासंबंधींच्या (पापपुण्यासंबंधींच्या) पुरातन नि भ्रामक प्रश्नांतून (समजुतींतून) आपली सुटका होते. (शुद्ध स्वातंत्र्य किंवा संपूर्ण सुरक्षितपणा सर्वशक्तिमान् परमेश्वरहि सिद्ध करूं शकत नाहीं).

अनेकवस्तुवादाच्या सर्व प्रकारच्या सिद्धान्ताचें मूळ संशयवादाच्या पोटात असते. माणसाला केव्हाही केवल ज्ञान प्राप्त होणें शक्य नाहीं, हा याचा मूलभूत सिद्धान्त. जो मार्ग मर्यादित शक्तीच्या मनुष्यप्राण्याकडून क्रमून जाणें अशक्यच आहे, अशा न संपणाऱ्या मार्गानेंच अंतिम सत्य दर्शविता येतें. म्हणून सत्य हें केवळ जिज्ञासेचे ध्येय ठरतें. हें भौतिक व सामाजिक दोन्ही शास्त्राबद्दल खरें आहे. इतिहास हें शास्त्र आहे कीं नाहीं, या प्रश्नाला पूर्णपणे उत्तर द्याव-

याचें असेल तर शास्त्रासंबंधींच्या आपल्या नेहमींच्या कल्पना आपण थोड्याशा फिरून तपासून पाहिल्या पाहिजेत.

आतापर्यंत चर्चिलेल्या इतिहासविषयक दोन्ही दृष्टिकोनावरून स्पष्ट होते कीं, त्यांच्यात एका मुद्यावर एकवाक्यता आहे–आणि सर्व भेदाना जर काहीं अर्थ असेल तर सुरुवातीला कुठे तरी एकता असायलाच पाहिजे. मूर्त घटना नि प्रसंग याचा इतिहास बनतो असे दोघेहि मानतात. स्वतंत्र शोधाचा आव आणून कॉलिंगवुडने आपला दृष्टिकोन माडला आहे. तो म्हणतो, 'ज्ञानविषयक सारे प्रचलित सिद्धान्त इतिहास समजण्याला निरुपयोगी आहेत. इतिहासज्ञान म्हणजे काहीं अंशीं बदलत्या परिस्थितीची ओळख आणि काहीं अशीं अमूर्त अशा घटनाप्रवाहाचें तार्किक ज्ञान नव्हे, तर जे काहीं प्रत्यक्ष नि बदलते आहे, त्याच्या सबधींचे तार्किक ( कार्यकारण ) ज्ञान होय. कॉलिंगवुडच्या या दृष्टिकोनातून पाहावयाचे झाले तर इतिहासाच्या अभ्यासातून काहीं विशेष निष्पन्न होईलसं वाटत नाहीं. इतिहासाच्या वाचनानतर घटना नि प्रसग याच्या असबद्ध माहितीनें डोक्यात गोंधळ निर्माण झाला आहे, अशा अवस्थेत आपण बाहेर पडण्यात अर्थ नाहीं. शास्त्र म्हणून त्याकडे पाहावयाचे असेल तर काहीं निराळ्या रीतीने आपणाला इतिहासाची व्याख्या केली पाहिजे. शास्त्र आणि इतिहास यासबधींच्या आपल्या कल्पनाची फेरतपासणी पुढील भागात केली आहे.

—५—

## इतिहासः घडामोडीचें शास्त्र

प्रत्यक्ष घटनाच्या बदलत्या देखाव्याचा विचार शास्त्र करू शकत नाहीं, ही गोष्ट आज सर्वमान्य झाली आहे. * जर एकाद्या वस्तूच्या अगभूतच वाढण्याचा नि बदलण्याचा धर्म असला तर ती वस्तु शास्त्रदृष्ट्या अभ्यासनीय ठरू शकणार नाहीं. शास्त्राला स्थिर असा विषय पाहिजे. ज्या बाबतींत काहीं मूलभूत स्थिरता असेल त्या बाबतींत शास्त्राला बोलता येईल. ( नाईट–एथिक्स ॲन्ड दी इकॉनॉमिक इंटरप्रिटेशन : एथिक्स ऑफ कॉम्पिटिशन. पान २१ ). तुलना करता येईल अशा रीतीने पुनरावृत्त होणाऱ्या प्रक्रिया व बाह्यागे आणि चिरकालीन वस्तु याचाच शास्त्र विचार करतें असे कॅटलिन देखील म्हणतो.

---

* स्टोइक तत्त्वज्ञाप्रमाणे चक्रनेमिक्रमाच्या तत्त्वावर आधारून किंवा स्पेंगलरप्रमाणे काहीं युगमान् ठरवून कोणी जर भावी कालातील घडामोडींबद्दल निरपेक्षपणे अनुमाने करू लागला तर सिमेलप्रमाणे त्याला एवढेच म्हणावे लागेल कीं, ' बाबा, सामाजिक विकासाचे काहीं नियम आहेत असे कोणीहि बोलूं शकत नाहीं. '

(कॅटालिन, पान ३५). याचसाठीं कॅटलीन चार्लस् बर्नार्डचें अशा अर्थाचें अवतरण देतो कीं, ' वस्तूचे शुद्ध स्वरूप व घटनेचे मूल हेतु हे नेहमींच अज्ञात रहातात. वस्तुवस्तूंतील संबंध तेवढे आपणाला माहीत होतात, असे शास्त्र सांगते. ' म्हणून कॅटालिनच्या मतें—' मनुष्यातील परस्परसंबंधाचे शास्त्र म्हणजे राज्यव्यवहारशास्त्र होय. '

त्याचप्रमाणे अर्थशास्त्रासंबंधींचीहि जुनी कल्पना बदलावी लागत आहे. मानवी व्यवहारातील एक विशिष्ट क्षेत्र अभ्यासासाठीं मर्यादित करणारी अशी अर्थशास्त्राची जुनी कल्पना होती. परंतु त्या तऱ्हेची वर्गीकरणाची व्यवच्छेदक पद्धति सोडून रॉबिन्सच्या नव्या व्याख्येप्रमाणे या जगात विशिष्ट साध्ये व मर्यादित साधने यांच्यातील सार्वत्रिक संबंधाचा अर्थशास्त्र विचार करतें असे म्हणावे लागेल. कालाप्रमाणें साध्ये व साधने दोन्ही बदलतील, पण त्या दोहोंतील संबंध चालूच राहाणार.* याप्रमाणेच नाईटहि लिहितो कीं, अर्थशास्त्रातील तत्त्वमीमांसा ही इतर कोणत्याहि क्षेत्रातील तत्त्वविचाराप्रमाणें अमूर्तच आहे. तपशीलाच्या उपाधींतून अलग काढलेल्या अशा केवल अमूर्त तत्त्वाचाच तें विचार करते. (नाईट पान २८१).

अर्थशास्त्राला जसे ' निवडीचे शास्त्र ' असें म्हणता येईल, त्या धर्तीवर इतिहासाबाबत आपणाला ते एक 'घडामोडींचे शास्त्र' आहे असे म्हणता येणार नाहीं काय ?

घटकाभर हा विचार मान्य केला तर इतिहास हे कोणत्या तऱ्हेचे शास्त्र होईल ? अर्थशास्त्र हे कोणत्या प्रकारचें शास्त्र आहे, याबद्दल तज्ज्ञांमध्ये पुष्कळच मतभिन्नता नि अनिश्चितता आहे. अर्थशास्त्रीय नियमाचा दर्जा काय ? अर्थशास्त्रीय नियम व वस्तुस्थिति यांचा परस्पर संबंध काय ? याबाबतहि पुष्कळच मतभेद आहेत.

### शास्त्रकल्पनेची फेरतपासणी

शास्त्राविषयींची रूढ कल्पना अशी आहे कीं, शास्त्र हे वस्तुस्थितिबद्दलचे वादातीत आणि त्रिकालाबाधित नियम सांगून टाकते. व्यापक नि सना-

---

* एका बाजूला सामाजिक नि तंत्रविषयक परिस्थिति व दुसऱ्या बाजूला वर्तणुकीसंबधींचीं संभाव्य ध्येये म्हणून कल्पलेलीं साध्ये यांच्यातील परस्पर संबंधाच्या मालिका हा अर्थशास्त्राचा अभ्यासविषय होय. केवळ साध्यें किंवा नुसती परिस्थिति ही दोन्हींही स्वतंत्रपणे अर्थशास्त्राचा अभ्यासविषय होत नाहींत. या दोहोंतील संबंध हेच अर्थशास्त्रीयदृष्ट्या महत्त्वाचे होत. (रॉबिन्स्. नेचर ॲन्ड सिग्निफिकन्स पान ३८.)

तन तत्त्वाचा शोध आणि सह-परिवर्तनाची तत्त्वे ठरविणे हे शास्त्रीय चिकित्सेचे ध्येय आहे, असें अगदीं प्रारंभापासून ठरविण्यात आले आहे. बुद्धिवादी तत्त्वज्ञांचें हें म्हणणे झालें. आधुनिक शास्त्रातील नियमाचा पूर्ण अर्थ समजण्याच्या दृष्टीने याची काहींशी विस्ताराने चर्चा करणे जरूर आहे.

बुद्धिवादी तत्त्वज्ञाचा मूलभूत सिद्धान्त असा आहे कीं सत्तत्त्व हे इंद्रियगोचर नसून बुद्धिगम्य आहे. तर्कशास्त्र नि गणित हीं शुद्ध ज्ञानाचीं प्रातिनिधिक स्वरूपे होत. ( कॉफमन—पान १० ). सपूर्ण बुद्धिवादाच्या कक्षेत अंगभूत असलेले सुसवादित्व, निश्चितता यासारखे घटक शुद्ध बुद्धीने स्पष्ट करून तिच्या साहाय्याने विश्वाची प्रक्रिया समजून घेता येते. उदाहरणार्थ, आकाशस्थ गोलक हे भूमितिदृष्ट्या पूर्ण गोलाकार आहेत आणि त्याच्या कक्षा ह्या पूर्ण वर्तुळे आहेत. पृथ्वीपासूनचे त्याचे अतर गणिती पद्धतीने निश्चित असले पाहिजे. जे प्रत्यक्षात घडत जातें त्याचा नियम शोधून काढल्यावर तशीच प्रत्येक गोष्ट घडत राहिली पाहिजे. कारण अशा योजनेतून एका उत्कृष्ट व सुसंवादी जगव्यवस्थेची कल्पना येऊ शकेल व विश्वयोजनेचा या पद्धतीनें अर्थ लावीत असताना जागतिक मूल्याचीहि प्रतीति होईल. बुद्धीच्या अतर्दृष्टीला प्रत्यक्ष इंद्रियानुभवाची पुष्टी हवीतर मिळू शकेल, परतु अशा पाठपुराव्याची बुद्धिगम्य सूक्ष्मज्ञानाला बिलकुल जरुरी नाहीं. इंद्रियानुभवाच्या योगाने बुद्धिगम्य अनुभवाचें खंडनहि होऊ शकणार नाहीं. कारण बुद्धि ही उच्चतर शक्ति आहे.(कॉफमन पान १०). ठराविक बौद्धिक कल्पनानीं बसविलेले सामुदायिक सिद्धान्त हे इंद्रियगोचर घटनाचे गूढ उकलूं शकतात असे आधुनिक शास्त्र मानीत नाहीं; या अर्थाने आधुनिक शास्त्र बुद्धिवादाला विरोधी आहे. उलट बुद्धिगम्य गृहीत सिद्धान्तावर प्रत्यक्षानुभवाचें नियंत्रण पाहिजे असे शास्त्र म्हणते. तथापि भावी कालाविषयींचीं अनुमाने करण्याबाबत बुद्धिगम्य कल्पना शास्त्राला मार्गदर्शन करितात. म्हणून कॉफमन शास्त्राला ‘ चिकित्सक बुद्धिवाद ’ असें म्हणतो आणि पहिल्यो प्रकाराला ‘केवल बुद्धिवाद’ किंवा ‘मूलगामी बुद्धिवाद’ असे नाव देतो.

आधुनिक कालात केलेले शास्त्राचे दोन प्रकार सर्वांच्या परिचयाचे आहेत. एका बाजूला बुद्धिगामी, सिद्धान्तानुसारी नि स्वतःसिद्ध अशीं निगमन पद्धतीचीं शास्त्रे, तर दुसऱ्या बाजूला इंद्रियानुभवगामी, सिद्धान्तकारी, अनुभवसिद्ध अशीं अनुगमन पद्धतीची शास्त्रे. हा भेद अनुभववादी विचारज्ञानीं पुढे दिल्याप्रमाणे चागल्या प्रकारे मांडून दाखविलेला आहे. ते म्हणतात, ‘ एकदर अर्थपूर्ण विधानाचे दोन वर्ग करिता येतील. एक घटनाविषयीं केलीं गेलेलीं व म्हणून जीं इंद्रियगम्य आहेत अशीं वस्तु-विधाने. दुसरीं संकेतासबंधीं केलीं गेलेलीं संकेत-

विधानें. आणि संकेत हे सुद्धा एक प्रकारच्या घटनाच होत, एवढ्याच अर्थानें त्यांची संगति मनाला पटू शकते. ' ( बेन्जामिन, इंट्रोडक्शन टु फिलॉसफी ऑफ सायन्स पान १२ ).

**सामाजिक शास्त्रांतील शृंगापत्ति.**

शास्त्राच्या ह्या वर्गीकरणाबाबत आपल्या दृष्टीने महत्त्वाचा असा एकच प्रश्न आहे तो हा कीं, स्वतःसिद्ध अशा तत्त्वावरून निरपेक्षपणे निश्चित किंवा निरपवादपणें खरीं अशीं वस्तुस्थिति संबंधींचीं विधाने करता येतात काय ? स्वतःसिद्ध सिद्धान्तानीं बनलेलीं शास्त्रें हीं निरपेक्षतः निश्चित असे ज्ञान देतात, पण त्याचे सिद्धान्त वस्तुस्थितीचा निर्देश करीत नाहीत. याच्या उलट अनुभवसिद्ध शास्त्रे हीं वस्तुस्थितीचा निर्देश करितात, पण निरपवाद निरपेक्ष असे निश्चित ज्ञान देऊं शकत नाहींत. याबद्दलचे आइन्स्टाईनचे वचन प्रसिद्ध आहे. तो म्हणतो ' गणितातले सिद्धान्त वास्तवाला जेथे स्पर्श करितात तेथे ते निश्चित नसतात. आणि जेथें ते निश्चित असतात तेथे ते वास्तवाला स्पर्श करीत नाहींत.' दुसऱ्या शब्दात असें म्हणता येईल कीं, स्वतःसिद्ध सिद्धान्तानुसारी शास्त्रे हीं विश्लेषणात्मक असतात. विधानातील तार्किक संगति, त्यातील परस्पर संबंध याच्याकडेच तीं शास्त्रे लक्ष देतात. तीं विधाने वास्तवाच्या निश्चितीनें किंवा शक्यतेच्या चौकटीने स्वतःला बाधून घेत नाहींत. त्याचीं विधानें जोंपर्यंत तार्किक दृष्ट्या सुसंगत असतात, तोंपर्यंत तीं निरपेक्षपणें खरीं असतात. अनुभवसिद्ध शास्त्रातील विधाने हीं संश्लेषणात्मक असतात. तीं शक्यतेच्या चौकटींत वावरत असतात. प्रत्यक्षात जरी तीं विधानें खोटीं नसलीं तरी तीं तर्कदृष्ट्या खोटीं ठरू शकतात. नवीन अदाजपत्रकांतील कलमामुळे टाटा स्टील शेअर्सचे भाव वाढतील असे म्हटले तर अनेक शक्यतापैकीं ही एक प्रत्यक्षात घडून येईल असे आपण म्हणतो. शक्यताना घातलेली ही मर्यादा वास्तवासंबंधींच्या कोणत्याहि विधानाबाबत फार महत्त्वाची आहे. परंतु लक्षात ठेवलें पाहिजे कीं हे तत्त्व कायम नियंत्रणाच्या तत्त्वाने बाधले गेलें आहे. हे कायम नियंत्रण म्हणजे अनुभव-प्रक्रियेच्या तर्कशास्त्राचा मूल सिद्धान्तच होय. एक विरुद्ध उदाहरण देखील अनुभवसिद्ध नियम खोटा ठरवूं शकते. कारण परस्परविसंगत अशीं विधाने शास्त्राच्या बाधणींत एकत्र नादू शकत नाहींत. हा दृष्टिकोन स्वतःसिद्धपणें काटच्या संश्लेषणात्मक विधानाना खोडून काढतो. कारण कीं तीं विधाने पृथःकरण करूं गेलें असता विश्लेषणात्मकच ठरतात. या ठिकाणीं या वादविवादात अधिक शिरण्याचे कारण नाहीं. इतिहास हें कोणत्या प्रकारचे शास्त्र ठरविता येईल एवढ्यापुरतेच प्रामुख्याने या विवेचनाचें आपणाला महत्त्व आहे. इतिहासातील विधाने हीं वरील अर्थानें

विश्लेषणात्मक होऊं शकतील काय ? अगर संश्लेषणात्मक व्यापक विधानें म्हणजेच अनुभवसिद्ध नियम इतिहास सांगू शकेल काय ? कीं हे दोन्ही मार्ग टाळून मधलाच एकादा मार्ग इतिहासाला चोखाळता येईल ?

शास्त्रीय नियमाच्या स्वरूपाविषयींच्या ज्या सिद्धान्ताचा आतापर्यंत आपण विचार केला ते सिद्धान्त एका गृहीत तत्त्वावर आधारलेले होते कीं ज्ञान हे एक इंद्रियगम्य तरी असते किंवा तार्किक पद्धतीने तरी निष्पन्न झालेले असतें. बुद्धिवाद्याच्या म्हणण्याप्रमाणे स्वतःसिद्ध अशीं कांहीं विधानें हेच तर्काचें अंतिम अधिष्ठान होय. त्याच्यापासून सर्व ज्ञान निष्पन्न होते. कांहीं अनुभववादी असे म्हणतात कीं, इंद्रियद्वारा प्राप्त होणारे ज्ञान हेच सत्य ज्ञान होय. बाकीचे ज्ञान त्यापासून फलित होते. ड्युईच्या मताप्रमाणे बुद्धिवादी व अनुभवादी हे दोघेहि या बाबतींत सारखीच चूक करीत आहेत. ते दोघेहि निरपेक्ष व शाश्वत अशा सत्याचा शोध घेत आहेत.'तथापि शास्त्रीय प्रक्रियेच्या दृष्टीने असें सत्य हे केवळ ध्येयभूत होय. शक्य त्या सर्व नियंत्रणातूनहि अबाधित राहणारे असे सामान्य सिद्धान्त शास्त्रामध्ये समाविष्ट करण्याची शास्त्रज्ञाची आकांक्षा असते. अशा तऱ्हेचे सिद्धान्त बांधतां येतील अशी श्रद्धा म्हणजेच ' सत्यावरील त्याची निष्ठा ' होय. सत्य साध्य होणे नव्हे.

वरील विचाराप्रमाणे सामाजिक शास्त्रे हीं एका विशिष्ट प्रकारच्या शृंगापत्तींत सापडतात. एका दृष्टीनें त्यांचे नियम म्हणजे आशयशून्य अशीं विश्लेषणात्मक विधानें असतात. त्यामुळे तीं वास्तवाशीं निगडीत नसतात. दुसऱ्या दृष्टीने तीं अनुभवसिद्धहि असतात; पण आपण मागे पाहिल्याप्रमाणें सामाजिक शास्त्रामध्ये अनुभवसिद्ध नियम बांधणे हे जवळजवळ अशक्यच आहे. उदाहरणार्थ, अर्थशास्त्रामध्ये अर्थशास्त्रीय नियमाची स्वतःसिद्धता मायसेसने कटाक्षानें सांगितली आहे.

तो म्हणतो ' आपण स्वभावतःच विचारप्रवण व क्रियाशील असल्यामुळें कृतिसंबंधींची कांहीं निश्चित कल्पना बांधतो. ती कल्पना ग्राह्य मानली कीं त्याबरोबरच मग ध्येय आणि मार्ग, साध्य आणि साधने, कार्य आणि कारणे, आदि आणि अंत ह्या परस्परसंबद्ध कल्पनाहि आपण लक्षात घेतो. तसेंच मूल्यें, क्रयवस्तू, देवघेव, किंमत, उत्पादनखर्च इत्यादि ( अर्थशास्त्रीय ) कल्पनांचे आहे. ह्या सर्व कल्पनांचे तार्किक विवरण, कृतीच्या मूळ कल्पनेपासून ह्या कल्पना कशा निघाल्या याचे पद्धतशीर वर्गीकरण, आणि त्यांच्या परस्पर संबंधाचे स्पष्टीकरण इत्यादि गोष्टी करणे हे आपल्या शास्त्राचें ( अर्थशास्त्राचे ) पहिले काम आहे. या गोष्टींचा विचार करणाऱ्या उपपत्तीच्या भागाला ' प्राथमिक मूल्यें नि

किंमत ' यांचा विचार असे म्हणतात. हीं तत्त्वे स्वतःसिद्ध आहेत याबाबत कांहीं शका नाहीं. ( कॉफमनमधील उतारा पृ. २२५–२६ ).

**अर्थशास्त्राचा दृष्टान्त**

रॉबिन्सची भूमिका तितकीशी स्पष्ट नाहीं. तो म्हणतो—अर्थशास्त्रीय नियम हे त्या त्या प्रश्नात अपरिहार्यतेने अतर्भूत होणाऱ्या गोष्टींचे वर्णन करितात. त्या ( अर्थशास्त्रीय ) नियमानीं गृहीत धरलेल्या सर्व गोष्टी उपस्थित असतील तर त्यानीं अनुमानलेले सभाव्य परिणाम जरूर घडलेच पाहिजेत. या अर्थाने इतर शास्त्रीय नियमाशीं त्याचे साम्य आहे, याबाबत शंका राहातच नाहीं. विशिष्ट परिस्थितींत ठराविक क्रमाने जर कांहीं घटना घडल्या असल्या तर त्यावरून अनुमानता येणाऱ्या दुसऱ्या घटनाची उपस्थिति ही अगदीं निश्चयाने सागता येते. ( राबिन्स पान १२१ ). गृहीत धरलेल्या गोष्टींमध्ये गर्भित असलेला सर्व भाग घुसळून काढून बाहेर काढण्याला विश्लेषणात्मक पद्धति हे एक चागले साधन आहे. (हे अर्थात् ' इतर परिस्थिति समान असेल तर ' या अटीवर अवलंबून आहे. हिचा पुढे विचार करावयाचा आहे. )

सर्व शास्त्रीय सिद्धान्ताप्रमाणे अर्थशास्त्रीय सिद्धान्त हे देखील गृहीत तत्त्वाच्या मालिकेपासूनच निष्कर्षरूपाने निघालेले असतात. आणि यातील प्रमुख गृहीत तत्त्वामध्ये साधे नि अविवाद्य स्वरूपाचे प्रत्यक्ष अनुभवच ग्रथित असतात. तथापि अर्थशास्त्राचे सिद्धान्त हे विश्लेषणात्मक होत असा मात्र अर्थ नव्हे. ते प्रत्यक्षाशीं निगडित आहेत, याबद्दल रॉबिन्स निश्चित आहे. जर गृहीत तत्त्वे वास्तवाशीं संबद्ध असतील तर त्यावरून निघणाऱ्या निष्कर्षांचाहि वास्तवाशीं संबध असला पाहिजे. विद्युत्कणाच्या अस्तित्वाबद्दल शका घेण्याचें जसें आता फारसें कारण उरले नाहीं, तसेच वस्तुस्थितीचा प्रतियोगी भाग म्हणून असलेल्या वैयक्तिक आवडीनिवडी, ग्रह याच्या सत्यत्वाविषयीं शंका घेण्याला फारसे कारण उरलेले नाहीं. आपण तयार व्याख्यावरून बरेच निष्कर्ष काढतो, हे खरे, पण त्या व्याख्या यदृच्छेने तयार झालेल्या असतात हे मात्र खरे नाहीं. ( रॉबिन्स पान १०५ ).

तेव्हा अर्थशास्त्रीय नियम हे संश्लेषणात्मक व्यापक सिद्धान्तावरून तयार झालेले असतात असे दिसते. त्यामुळे ते खोटे ठरणे शक्य आहे. परंतु ते खोटे ठरू शकत नाहींत, असेहि रॉबिन्स सुचवितो. त्याच्या मते कोठल्याहि शास्त्रीय अनुमानामध्ये ' इतर परिस्थिति समान असेल तर ' अशी एक अट अंतर्भूत असतेच. यंत्रशास्त्रातील एकाद्या सिद्धान्ताप्रमाणे चालू असलेल्या प्रयोगात धरणीकंपाच्या धक्क्याने व्यत्यय आला तर लगेच यंत्रशास्त्रांतील नियम असत्य ठरले

असें कोणीहि सुजाण मनुष्य म्हणणार नाहीं. प्रस्थापित अशा सिद्धान्तावर थोड-क्याशा आधाराने टीका करून ' मागणी—पुरवठा हे तत्त्व आता बाद झाले आहे, उघड दिसणाऱ्या गोष्टींना मान्यता न देणारे अर्थशास्त्र हे पोकळ आहे, टाकाऊ आहे ' अशा तऱ्हेचे शेरे मारणाऱ्या दांभिक (soi-disant) अर्थ-शास्त्रज्ञांना व तदनुयायी सर्वसामान्य लोकांना रॉबिन्सने आपल्या नेहमीच्या उत्साहाने उपहासास्पद ठरविले आहे. ( रॉबिन्स पान १२४ ).

रॉबिन्सच्या या विवेचनाला काहीं आक्षेप घेता येईलसें दिसत नाहीं. शास्त्रीय सिद्धान्त हे गृहीत तत्त्वावर आधारलेले असतात हे सर्वपरिचित आहे. शास्त्रे वस्तुस्थितिपासून वेगळे असे एक स्वकल्पित विश्व तयार करतात, आणि काहीं मध्यस्थ तत्त्वाच्या किंवा रॉबिन्स म्हणतो, त्या दुय्यम गृहीत तत्त्वाच्या आधारे त्या कल्पित विश्वाचा वास्तव-जगाशीं संबंध जोडतात यात शंका नाहीं.

खालीं पडणाऱ्या आकाशस्थ गोलासंबंधींची गॅलिलिओचीं समीकरणे हीं प्रत्यक्षात ते गोल कसे खालीं पडतात, यासंबधींचीं विधाने होऊ शकत नाहींत. कारण ' हवामानाचा विरोध नसणे ' ह्या काल्पनिक परिस्थितींतच हीं समी-करणें खरीं ठरतात. परंतु यामुळे स्वतःच्या योजनेत काहीं दोष आहे असे गॅलि-लिओ मानीत नाहीं, तर स्वतःच्या योजनेला निश्चिति आणण्यासाठीं, हवामा-नाच्या विरोधासंबंधीं नव्या निश्चित नियमाची बांधणी करण्याच्या दृष्टीने एक पाऊल पुढे टाकण्याची आज आवश्यकता आहे, एवढेच तो सुचवितो ( कॉफमन, पान ८६ ).

व्यापक सिद्धान्ताला मर्यादित करणाऱ्या सर्व घटकांचीं संपूर्णतः यादी देणे हे भौतिक शास्त्राबाबतच शक्य आहे. आणि ते सर्व घटक परिचित अशा नियमान्वयेच वागत असल्यामुळे त्यांनीं मर्यादित केलेला विशिष्ट सिद्धान्त एका ठराविक क्षेत्रात पूर्णपणे सत्य आहे असें सांगता येते. अर्थात ते देखील एखाद्या विरोधी उदाहरणाने तो खोटा ठरेपर्यंतच. पण सामाजिक शास्त्रात मात्र हे शक्य नाहीं. याला दोन कारणे आहेत. एक असे कीं, मर्यादित क्षेत्रात का होईना पण एखाद्या सिद्धान्ताला व्यत्यय आणणाऱ्या सर्व परिस्थिती घटकांची नोंद करा-यचा प्रयत्न केला तर तो अयशस्वी ठरणार हे निश्चित. कारण त्यापासून काढ-लेला निष्कर्ष हा इतका काहीं गुतागुंतीचा होतो कीं त्यातून मार्ग काढणेच मुष्कील असते. उदाहरणार्थ, अर्थशास्त्राच्या अभ्यासात निर्दोष चढाओढीच्या वातावरणातून सदोष ( अपूर्ण ) चढाओढीच्या वातावरणात आपण आलो असता, ज्याचा काहीं सयुक्तिक उलगडा होत नाहीं अशा काहीं गोष्टी गृहीत धराव्या लागतात. उलटपक्षीं, व्यत्यय आणणाऱ्या घटकांची सपूर्णतः नोंद केली

नाहीं अशा स्थितींत एकादा सिद्धान्त खोटा ठरला तर न नोंदलेल्या अशा इतर काहीं घटकामुळेंच असें घडले, असे म्हणण्याची नेहमींच पाळी येईल. उदाहरणार्थ, वस्तूंची किंमत वाढूनहि मागणींत कपात झाली नाहीं तर इतर परिस्थितीच्या बदलामुळे हें घडून आले असे म्हणावे लागेल. अशा रीतीने आपला मागणी–पुरवठ्याचा सिद्धान्त हा केव्हाही खोटा ठरत नाहीं असे अर्थशास्त्रज्ञ मानतात. कारण सश्लेषणात्मक व्यापक सिद्धान्ताप्रमाणें अर्थशास्त्रीय नियम देखील कोणतीहि शक्यता निश्चिनपणाने बाजूला सारीत नाहींत. वस्तुतः पाहता अर्थशास्त्रज्ञाला इतर परिस्थितीमधील बदलाचा विचार करणे हे शक्य नाहीं. अर्थशास्त्रज्ञ फक्त त्याच्या क्षेत्रामधील बदल लक्षात घेऊ शकतो. त्या बाहेरील बदल हे त्याच्या कक्षेबाहेरचे होत असे रॉबिन्स जोराने सांगतो. जेव्हा वैयक्तिक मूल्यमापनामध्ये बदल घडवून आणण्याच्या रूपाने मानवी इच्छा ही कार्यकारणभावात अडथळा उत्पन्न करते, ढवळाढवळ करू पाहते त्या वेळीं कोणतेंहि अनुमान करणे हे अशक्य ठरते. परंतु ही अडचण फार महत्त्वाची आहे असे रॉबिन्स मानीत नाहीं. तो विचारतो कीं, अशा वेळीं अर्थशास्त्राच्या अभ्यासकावर तेवढी बिनचुक अनुमान काढण्याची जबाबदारी काय म्हणून ? दुसऱ्या कोणत्या शास्त्राच्या अभ्यासकाला त्याच्या क्षेत्रापुरते तरी इतिहासप्रवाहांत अचूक मार्ग काढण्याचे होकायंत्र सापडले आहे ते दाखवून द्यावे !

आता हे खरे आहे कीं भौतिक शास्त्रात सुद्धा काहीं वेळा अनुमाने खोटीं ठरतात. कायम नियंत्रणाच्या तत्त्वामध्ये ही गोष्ट गर्भितच आहे. विरोधी उदाहरणाने जेव्हा नियम खोटा ठरतो तेव्हा शास्त्राच्या बांधणींतील एक भाग म्हणून तो राहूं शकत नाहीं. व शक्य असेल तर त्या जागीं दुसरा नियम येतो. परंतु सामान्यतः शास्त्रीय नियम हे कल्पनेमध्ये खोटे ठरू शकणारे असले, तरी प्रत्यक्षात तसे ठरविले जात नाहींत. कायम नियंत्रणाच्या तत्त्वाचा हाच अर्थ लावला जातो. प्रत्यक्षात खोटे न ठरणारे म्हणून उल्लेखनीय असे प्रयोगसिद्ध सिद्धान्त अर्थशास्त्रामध्यें नाहींत. अर्थशास्त्रीय पृथक्करणाच्या अपरिहार्यतेवरच रॉबिन्स या नियमाचे अनुमानसामर्थ्य आधारतो. अर्थशास्त्रीय नियम हे केवळ विश्लेषणात्मक आहेत असे तो मानतो. अर्थशास्त्राचें अनुमानसामर्थ्य दाखविण्यासाठीं तो जे उदाहरण घेतो, त्या उदाहरणानेच हें विधान सिद्ध करता येईल. ‘ चलनाच्या गरजेसंबंधीं काहीं गृहीत तत्त्वे मानल्यावर, चलनवाढीबरोबर त्याची व्यवहारातील किंमत कमी होते असें ’ विधान समर्थनीय ठरतें, असें तो म्हणतो. पण या विधानाला काहीं अनुमानयोग्यता आहे कीं नाहीं याबद्दल शंका वाटते. आपल्याला वाटेल तीं गृहीत तत्त्वें आपण मान्य करूं शकतों. परतु प्रत्यक्ष व्यवहारांत जेव्हां चलनवाढ होत असते,

त्या वेळीं चलनाच्या गरजेसंबधींचीं आपलींच गृहीत–तत्त्वे काय म्हणून कायम राहावीत, याला कांहीं कारण दाखविता येत नाहीं.

अनुभवसिद्ध व स्वतःसिद्ध अशा दोन प्रकारच्या तार्किक सिद्धान्तातील फरक लक्षात न घेतल्यामुळें या तऱ्हेचा युक्तिवाद केला जातो. विश्लेषणात्मक तार्किक सिद्धान्ताचे रॉबिन्सचे उदाहरण वर दिलेच आहे. दुसऱ्या प्रकारच्या सिद्धान्ताकरता पुढील उदाहरण पाहाः जर आपण एकाद्या माणसाला बिनशर्त (इतर परिस्थिति समान असता) एक आणा किंवा रुपया देऊं केला, तर तो रुपयाच घेईल. हे विधान प्रत्यक्षात जरी खोटे ठरले नाहीं तरी कल्पनेमध्यें खोटें ठरू शकेल. प्रत्यक्षात खोटे ठरत नाहींत असे दुसऱ्या प्रकारचे अर्थशास्त्रीय नियम सांपडणे मुष्कीलच होय.

अशा रीतीने आपण उभयविध विचार करू लागलो तर त्यातून असा एक हास्यास्पद निष्कर्ष निघू शकेल कीं, अर्थशास्त्रीय सिद्धान्त हे निरर्थक होत ! पण कॉफमनच्या तात्त्विक सिद्धान्तासंबधींच्या विशिष्ट कल्पनेमुळे आपण या आपत्तींतून बचावतों. कारण अर्थशास्त्रीय नियम हे याच प्रकारचे असतात. विश्लेषणसिद्धान्तासारखेच सारे तात्त्विक सिद्धान्त असतात. म्हणजे त्याच्या-प्रमाणें ते खोटे ठरण्याजोगे नसतात. याचा अर्थ असा कीं, त्याच्यापासून निघालेले निष्कर्ष प्रत्यक्षात दिसले नाहींत तरी ते सिद्धान्त बाद ठरत नाहींत. जर असे दिसले कीं, हे सिद्धान्त प्रत्यक्षात खरे ठरतच नाहींत, तर त्या सिद्धा-न्ताची वेगळ्या भूमिकेवर मांडणी करावी लागेल इतकेच. तथापि त्याच्या-पासूनहि अनुभवावर आधारलेल्या सिद्धान्ताप्रमाणे वस्तुस्थितीला धरून असलेलीं अशीं कांहीं अनुमाने काढता येतील. त्यासाठीं अनुमानाचे ४ वर्ग पाडण्यात येतात. ते असे :—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ प्रत्यक्षात | | फलित झालेले | असे | अपेक्षित | निष्कर्ष |
| २ ,, | न | ,, | ,, | ,, | ,, |
| ३ प्रत्यक्षात | | फलित झालेले | असे | अनपेक्षित | निष्कर्ष |
| ४ ,, | न | ,, | ,, | ,, | ,, |

या वर्गीकरणाचा हेतु एका उदाहरणानें स्पष्ट होईल. एकाद्या माणसाने स्वीकारलेल्या जीवनक्रमात तो यशस्वी होईल कीं नाहीं, याबद्दलचे अनुमान करताना त्याचा स्वभाव, कल, ज्ञान, त्याची तयारी व भोवतालची परिस्थिति यासारख्या कांहीं तात्त्विक गोष्टींचा आपण विचार करतो व या गोष्टींच्या अनुरोधानें आपण विशिष्ट निष्कर्षांची अपेक्षा करतों. पण तो निष्कर्ष फलित न होणें शक्य आहे. तरी सुद्धा त्या तात्त्विक गोष्टींचा विचार आपण सहजा-

सहजीं सोडून देत नाहीं. तर उलट आपले अनुमान का खोटें ठरले याचें स्पष्टीकरण करण्यासाठीं आणखी कांहीं तात्त्विक नियम आपण शोधून काढतों. उलट फलित झालेला परिणाम अपेक्षित असेलच असे नाहीं. पण तो निष्कर्ष किंवा परिणाम ज्या नियमाच्या अनुरोधाने अनुमित केला असेल, ते नियम खरे ठरतील.

कॉफमनने दिलेले उदाहरण येथें घेता येईल. एकाद्या लॉटरीमध्ये कोणत्या नंबराला बक्षीस मिळेल ह्याबद्दल एकाद्यानें केलेले अनुमान खरे ठरले आणि ईजिप्शियन स्वप्नावलीच्या आधारें आपण हे अनुमान केले असे तो सांगूं लागला, तर लगेच आपण आपली गणिती पद्धति सोडून ईजिप्शियन स्वप्नावली (शकुनावली) प्रमाण मानीत नाहीं. प्रत्यक्षात सत्याचा पडताळा पाहण्यावर वाजवीपेक्षा जास्त जोर देणाराची चूक यावरून स्पष्ट होईल. विशिष्ट वेळेच्या परिस्थितीवरून शास्त्रीय दृष्ट्या अनपेक्षित असे अनुमान केले, आणि ते प्रत्यक्षात बरोबर उतरले, म्हणून लगेच ज्याच्या अनुरोधानें ते अनुमान केले गेले 'ते नियम सत्य आहेत' अशी ग्वाही (प्रत्यक्षात आलेले पण शास्त्रीय दृष्ट्या अनपेक्षित असे) ते अनुमान देऊ शकत नाहीं. स्वयगति शास्त्राच्या नियमाच्या खरेपणाची कसोटी म्हणून 'एकाद्या खाद्यपदार्थाचे अस्तित्व खाण्यावरून ठरते' ही (इंग्रजी भाषेतील) म्हण एंजल्स पुढे करतो, तेव्हा त्याची चूक होत आहे. कारण जरी सोशॅलिस्ट क्रांति यशस्वी झाली तरी तेवढ्यामुळे मार्क्सवादाची विचारपद्धति बरोबर आहे असे सिद्ध होत नाहीं.

## निष्कर्ष

इतिहासांत देखील तात्त्विक सिद्धान्त मांडण्याचा प्रयत्न करणे एवढेच शक्य आहे. अर्थशास्त्रातील सीमान्त उपयुक्ततावाद्यांना (Marginalist school) निवडीचे पद्धतशीर शास्त्र उभारता आलें याचे कारण (उपयुक्ततेच्या सीमेवरून वस्तूंचें मोल ठरविण्याची) ती कल्पना सूचक, व्यापक व फलदायी अशी आहे. तथापि इतिहासातील घडामोडींचे शास्त्र तयार करण्याच्या अवस्थेपासून अद्यापि आपण दूर आहोंत. पॉपरने इतिहासातील अनेक तात्त्विक सिद्धान्त सांगून टाकले आहेत. उदाहरणार्थ, प्लेटोचा क्रांतिविषयक सिद्धान्त, सत्ताधारी वर्ग अंतर्गत यादवीमुळे किंवा युद्धातील पराजयामुळे क्षीणबल झालेला नसेल तर क्रांति यशस्वी होत नाहीं, लॉर्ड ॲक्टनचा (अत्युच्चीं पदिं थोरही बिघडतो) विकृतीचा सिद्धान्त : सत्तेचा दुरुपयोग करण्याचा मोह होणार नाहीं अशा प्रकारची दुसऱ्यावर हुकमत गाजविण्याची सत्ता एकाद्याला देता येणें शक्य नाहीं, कारण जसजशी जास्त सत्ता द्यावी, तसतसा तो मोह वाढत जातो

आणि फारच थोड्याना तो टाळता येतो. ( इतर उदाहरणे पॉपरच्या इकॉनॉमिका, ऑगस्ट १९४४ पान १२१ वरील 'पॉव्हर्टी ऑफ हिस्टॉरिसिझम्' या लेखात पहा. ) पण या सिद्धान्ताचें शास्त्र कसें बनवायचें ! एका मध्यवर्ती आधारभूत अशा कल्पनेच्या अभावीं घडामोडींचे शास्त्र निर्माण करणें जास्तच अवघड आहे. राष्ट्र, सरकार, व्यापार यासंबंधींच्या सध्याच्या तात्त्विक आदर्शांना सामाजिक चळवळी, परंपरा व संस्था याच्या नव्या रूपाची जोड दिली पाहिजे, हे खरें आहे आणि ते एक वेळ करताहि येईल. पण ज्या प्रकारचे इतिहासशास्त्र आपण तयार करू पाहत आहोत त्याबाबत अत्यंत महत्त्वाची अडचण ही आहे कीं, इतिहासप्रवाहाच्या मध्यवर्ती नियमासंबंधीं आपले एकमत नाहीं. अर्थशास्त्रज्ञातील वेगवेगळाले पंथ बाजूला सारल्यास असे दिसते कीं, आर्थिक घडामोडी समजण्याच्या दृष्टीने सीमान्त उपयुक्ततावाद्याचा ' पद्धतिशास्त्रनिष्ठ व्यक्तिवाद ' हा उपयुक्त ठरतो, याबाबत सर्वसाधारण एकमत आहे. त्यामुळें अर्थशास्त्राच्या क्षेत्रात पुढील प्रगतीला साहाय्यक ठरतील असे तात्त्विक सिद्धान्त—सर्वसंमत असे मार्गदर्शक नियम उपलब्ध आहेत. या बाबतींत भौतिक शास्त्रात तर जवळ जवळ एकमतच आहे. यावरच पॉपरने भौतिकशास्त्राची वस्तुनिष्ठता आधारलेली आहे. तो म्हणतो, 'ज्ञानाचे समाजशास्त्र कशाकडे दुर्लक्ष करीत असेल तर तें स्वतःकडेच, म्हणजे शास्त्राच्या सामाजिक किंवा लौकिक स्वरूपाकडेच होय. अर्थशास्त्रातील दुर्मिळतेसंबंधींचा सिद्धान्त किंवा मूल्यमालिकेचा क्रमसिद्धान्त यासारख्या अंतिम सिद्धान्ताच्या संकलनाची इतिहासाला फार जरूरी आहे. तरच वेगवेगळे नि विस्कळित असे अनेक नियम व सिद्धान्त याना सुसंगत विचारप्रणालीमध्ये गोवणे शक्य होईल; आणि त्यावर राजकीय, नैतिक व शासनविषयक अशासारख्या सिद्धान्ताना सामावून घेणाऱ्या स्थायी संबंधाची उभारणी करणे आपणाला शक्य होईल.

या उभारणीच्या जोरावर व सद्यःकालीन वस्तुस्थितीमध्ये रुजलेल्या दुय्यम सिद्धान्ताच्या आधाराने आपणाला भविष्यकालातील इतिहासप्रवाहासंबंधीं अपेक्षित अनुमाने करता येतील.

ह्या साऱ्या विवेचनाचा साराश सागू शकेल असा एक शेवटला प्रश्न विचारता येईल कीं, ' इतिहास हा कृतीला मार्गदर्शक होईल काय ! नैतिक किंवा राजकीय धडे त्यापासून मिळतील काय ! या प्रश्नाना कॉलिंगवुडने दिलेलें उत्तर वक्तृत्वपूर्ण असून खात्री पटविणारे आहे. त्याच्या मते—

' सामर्थ्याची कसोटी पाहणाऱ्या महत्त्वाच्या क्षणीं अनुभवी आणि जाणतीं माणसे हीं स्वतःची इच्छा, स्वार्थ इतकेच नव्हे तर स्वतःला रास्त

वाटणारी वागणूक यांच्या मोहाला बळी पडण्याचे नाकारतात. वागण्याच्या नियमानीं कृतीचें सामर्थ्य कमी होतें. कसें वागावें याबाबत मार्गदर्शन व्हावें म्हणून जो वर्तणुकीसंबंधींच्या नियमांची मागणी करतो, तो रूढी व विधिनिषेध यांच्या टाकाऊ नीतीला चिकटून बसतो व परिस्थितीच्या आवश्यकतेकडे त्याची डोळेझाक होते. शास्त्र पुष्कळच शिकवूं शकेल, परंतु तें काय शिकवूं शकतें यालाहि मर्यादा आहेत.'



# धर्माचें मानवी इतिहासांतील स्थान

लेखकः—तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, वाई.

## धर्माचे प्राचीन व्यापक अधिष्ठान

इतिहासात ज्ञात असलेल्या मानवाच्या सर्व संस्कृतींत धर्माने महान् प्रभाव दाखविला आहे, याबद्दल ऐतिहासिक तत्त्ववेत्यात मतभेद नाहीं. आज मानवजातिविद्या कांहीं प्राथमिक मानवगट धर्महीनच आहेत असें अपवादादाखल दाखवीत असली तरी प्रगल्भ स्थितीला पोहोंचलेल्या भूतकाळातील आणि वर्तमानकाळातील समाजात व राष्ट्रांत धर्महीन राष्ट्र किंवा समाज आढळत नाहीं. ईजिप्त, असीरिया इत्यादि भूमध्यसमुद्रासंनिध नांदलेल्या लुप्त संस्कृतींचे अवशेषसुद्धा त्या संस्कृतींची धार्मिकता सूचित केल्याशिवाय राहत नाहींत. ग्रीक लोकांची अमर मूर्तिकला, महाकाव्ये आणि दर्शनें धार्मिक भावाने भरलेलीं दिसतात. रोमन लोकांची धर्मसंस्था त्यांच्या साम्राज्याइतकी जरी भव्य नव्हती तरी त्यांच्या कौटुंबिक जीवनात ती केंद्रस्थानीं होती; पृथ्वीच्या पश्चिम गोलार्धाच्या इतिहासांत परिणामकारक शक्ति भरणारे तीन असहिष्णु धर्म ज्यू व अरब लोकांच्या संस्कृतींनीं निर्माण केले; ते म्हणजे यहुदी धर्म, ख्रिश्चन धर्म आणि इस्लाम होत. या तीन धर्मांच्या इतिहासावांचून पाश्चात्य मानवांचा इतिहास सुसंगतपणे लिहितांच येणार नाहीं. इराण, हिंदुस्थान व चीन यांतील प्रगतीचा, पराक्रमाचा आणि सर्व सांस्कृतिक घडामोडींचा अर्थ धर्मसंस्थेच्या अभ्यासाशिवाय कळणार नाहीं. म्हणून आजपर्यंतच्या मानवी इतिहासाचा, धर्म हा एक मूलभूत घटक आहे.

धर्माच्या ऐतिहासिक कार्याचे समालोचन करतांना तीन मुद्दे चिंतनात घेतले पाहिजेत; ( १ ) धर्माच्या अंगांत जी एवढी प्रभावी शक्ति दिसते, तिचा उगम कोठें आहे व त्या उगमाचे स्वरूप काय आहे ? (२) धर्मानें जगांतील भिन्न भिन्न समाजांत व राष्ट्रांत जो प्रभाव दाखविला व जें कार्य केलें त्याचें स्वरूप काय आहे आणि धर्माचा त्या त्या समाजाच्या व राष्ट्राच्या सामाजिक आणि सांस्कृतिक उन्नति-अवनतींशीं कार्यकारणसंबंध कशा प्रकारचा आहे ? ( ३ ) विद्यमान वैज्ञानिक बुद्धिवादी विश्व-संस्कृतींत धर्माचे तात्त्विक अधिष्ठान डळमळीत झाले आहे काय ? या तीन प्रश्नाचा क्रमाने येथे विचार करावयाचा आहे.

## धर्माचा उगम मनुष्यच

धर्माची बुद्धिवादाच्या दृष्टीने समीक्षा करताना हे सिद्ध होते कीं, धर्माचा उगम मनुष्यच आहे. धर्माचे उगमस्थान मनुष्याचा आत्मा होय. बाहेर कोठेही धर्माचा उदय झाला नाहीं, देवता, ईश्वर, अतिमानव आणि अतींद्रिय शक्ति अथवा पारलौकिक तत्त्व याच्यामध्ये धर्माचा उद्भव झाला नाहीं. धर्मस्थापना करणारे ऋषि, अवतार वा प्रेषित मानवच होते. मानवजातिविद्येप्रमाणे धर्माची प्राथमिक अवस्था ज्या हीन अवस्थेतील मानवसंघात सापडते, तेथेही धर्माचे मूळ मानवी हृदयातच दडलेले दिसतें. धर्म हा मनुष्यानें व्यक्तिशः आणि समुदायशः घडविला आहे; धर्म हा मनुष्यानेंच निर्माण केला आहे. कोणत्याही प्रकारच्या अलौकिक किंवा पारलौकिक शक्तीचा हात त्याच्या निर्मितींत नाहीं, असे मानणारे शास्त्रज्ञ मनुष्याच्या ठिकाणीं वसत असलेल्या व अनेक रूपाने प्रकट होणाऱ्या शक्तींतील, प्रवृत्तींतील, वा मनोवृत्तींतील एका किंवा अनेक अथवा सर्व शक्तींशीं अथवा मनोवृत्तींशीं धर्माचा संबध कार्यकारणभावदृष्टीने जोडतात. धर्माची बौद्धिक उपपत्ति लावावयाची असल्यास त्याचा उगम व विकास मनुष्याच्या आंतरबाह्य प्रवृत्तींतच सापडला पाहिजे हे मात्र निश्चित होय.

अलौकिक किंवा पारलौकिक शक्ति किंवा तत्त्वे बुद्धिवादाच्याहि कक्षेत येत नाहींत, त्यामुळें तशा शक्तींच्या किंवा तत्त्वाच्या गृहीत कृत्यावर आधारलेली धार्मिक उपपत्ति शास्त्रीय चर्चेचा विषय संपूर्णपणें होऊ शकत नाही, मनुष्य समाजाच्या ऐतिहासिक अभ्यासास अशी उपपत्ति विशेष साहाय्य करूं शकत नाहीं. याचा अर्थ असा नव्हे, कीं मानवी इतिहासाचे रहस्य मनुष्यास बुद्धिद्वारा पूर्णपणें ज्ञात झाले आहे; परंतु मनुष्यज्ञानाची प्रगती व्हावयास गूढवाद मदत करीत नाहीं; गूढ असलेले सत्य केव्हांतरी बुद्धीस गोचर होईल, अशा आशेनेच मनुष्य रहस्याचा शोध करण्याचा प्रयत्न करतो. अलौकिक, अतींद्रिय, दिव्य आणि गूढ अधिष्ठानावर धर्माची उभारणी झाली आहे, असे मानणारा श्रद्धावाद बौद्धिक प्रयत्नांना कायमच्या मर्यादा घालण्याचा प्रयत्न करतो; त्यामुळे तद्विषयक

शास्त्रवाढीस अडथळाच उत्पन्न करतो; आधुनिक विज्ञानाने आणि बुद्धिवादानें धर्मविषयक क्षेत्रात पूर्वी गूढ मानलेल्या अनेक प्रश्नाचा उलगडा केलेला आहे. विद्यमान सगळ्या मानवसमाजांच्या धर्मसंस्थांचा वैशिष्ट्यपूर्ण इतिहास आज सापडला आहे; धार्मिक कल्पनाचा आणि आचारांचा अभ्यास देशोदेशींच्या विद्वानांनी चालविला आहे; धार्मिक मनाची आणि धार्मिक अनुभवांची मानसशास्त्रीय तपासणी संशोधक करीत आहेत! त्याचे मथन करून जो निष्कर्ष निघतो, तो हाच की, धर्मांचे उगमस्थान मानवी आत्मा अथवा अंतःकरण आहे. अलौकिक, पारलौकिक, दिव्य आणि अतींद्रिय शक्ति अंतःकरणानेंच निर्माण केल्या आहेत, ईश्वर, स्वर्ग, नरक व मोक्ष हे मनानेंच भाविले आहेत.

पूर्वकालीन मनुष्यजातीच्या प्रवृत्तींचे सारसर्वस्व धर्मांत भरून राहिलेले दिसतें. म्हणून मनुष्याच्या प्राथमिक गरजा भागविणाऱ्या सहजप्रवृत्तींत ( instincts ) कोणी धर्माचें मूळ शोधतात; कोणी तार्किक बुद्धांत (reason) धर्मबीजाचा तपास करतात; कोणी विश्वविषयक सौंदर्यानुभूतींत त्याचे उगमस्थान शोधतात; कोणी मनुष्याच्या उच्च नैतिक मूल्याचे तळाशीं धर्माचे अधिष्ठान पाहतात, आधुनिक प्रयोगात्मक मानसशास्त्राच्या आणि मनोविश्लेषणशास्त्राच्या आश्रयाने कोणी ईषत्-संज्ञायुक्त ( subconscious ) मनाच्या गाभ्यात किंवा असज्ञायुक्त ( unconscious ) मनाच्या खोल तळात धर्माच्या मूळाचा शोध घेण्याचा प्रयत्न करतात. हे करीत असता बालमने, आजारी माणसे, वेडे वा अर्धवेडे लोक आणि वन्यजन याच्याहि प्रवृत्तींच्या अभ्यासाचा तुलनेकरिता उपयोग करतात. तात्पर्य, सीतेचा शोध करण्याकरिता रामचंद्राचे चतुर, चपल व धाडसी दूत सर्व दिशांना धावत होते, त्याप्रमाणे आजचे धर्मशोधक धर्माच्या मूलभूत प्रेरणेचा आपापल्यापरी सर्व बाजूंनी शोध करीत आहेत. मनुष्याच्या कोणत्याहि एका विशिष्ट प्रवृत्तींत धर्म जन्मला नाहीं. त्याच्या सर्व प्रवृत्तींत धर्माचे धागे आडवे उभे विणलेले सापडत असल्यामुळे त्याच्या सर्व प्रवृत्ती धर्मास कारक आहेत. मनुष्याच्या सर्व तऱ्हेच्या अपूर्णतेच्या दोषाचा व प्रमादाचा निरास करून त्याचें पूर्णत्व, निर्दोषत्व आणि शुद्धत्व धर्मानेच आपल्या दिव्य विश्वांत दाखविलें आहे. अपूर्णता, दोष वा प्रमाद याचा संबंध मनुष्याच्या कोणत्याहि एका अंगाशीं पोहोंचत नाहीं; तर सर्वांगाशीं पोहोचतो म्हणून सहजप्रवृत्ति, बुद्धि,सौंदर्यानुभूति, नैतिक जाणीव, कल्पनाशक्ति, दिवा-स्वप्नशीलता, मनोगंड, ईषत्-संज्ञायुक्त मन अथवा गूढ मन यापैकीं कोणत्याहि एकाच गोष्टीचा प्रभाव पडून धर्म निर्माण झाला नाही असेंच म्हटले पाहिजे; या सर्व गोष्टींचा धर्माच्या जन्माशीं आणि विकासाशीं संबंध आहे.

## मानवी मनाचे तीन थर

आधुनिक मानसशास्त्राचा मानवी मनाच्या रचनेसंबंधीं असा एक निष्कर्ष आहे कीं मानवी मनाचे तीन थर आहेत; ( १ ) संज्ञानयुक्त मन ( conscious mind ) ( २ ) ईषत्-संज्ञानयुक्त मन ( subconscious mind ) ( ३ ) संज्ञानरहित मन ( unconscious mind ) हे ते थर होत. अनुभव, भावना, विकार, विचार, तर्क, सुख-दुःखे, स्मृति इत्यादि मनःस्थिति जेव्हा जाणिवेनें भरलेली असते, या अवस्था जेव्हा बोधमय व स्पष्ट असतात, तेव्हा त्यास संज्ञानयुक्त मन म्हणतात. अनुभव, भावना, इच्छा व विचार जेव्हा नकळत चालू असतात, तेव्हा त्या मनाच्या अवस्थेस, ईषत्-संज्ञानयुक्त म्हणतात. उदाहरणार्थ, आपण पुणे शहरातून, बुधवार पेठेतून पर्वतीकडे जाण्यास निघतो, तेव्हा रस्ता जर सरावाचा असेल तर पर्वतीचा विचार विसरल्यासारखा होतो, परंतु अनेक आडवे रस्ते ओलांडून आपण मित्राशीं चर्चा करीत नेमके पर्वतीस जाऊन पोहोचतो. या उदाहरणात आपल्या मनातून पर्वतीचा विचार निघून गेलेला नसतो; उलट तोच आपणास नकळत इष्ट स्थळाकडे नेऊन पोहोंचवितो. न्यायदान करीत असता न्यायालयात बसलेला न्यायमूर्ती, वादी वा प्रतिवादी यापैकीं कोणाची तरी बाजू घेऊन बोलणारा वकील, प्रवासास निघालेला व्यापारी, जहाज हाकणारा दर्यासारंग, हे आपले काम करीत असता मुख्य उद्देश बाह्यतः विसरूनहि वस्तुतः विसरलेले नसतात. ही मनःस्थिति ईषत् म्हणजे अल्प, अर्धजागृत संज्ञानाची म्हणजे जाणिवेची होय; संज्ञान म्हणजे मनोवृत्तींची लखलख जागृत स्थिति होय. सज्ञानरहित मनाच्या व्यापाराचे उदाहरण असें आहे : रात्रीं झोपताना पाच वाजून दहा मिनिटांनीं सकाळीं उठण्याचा संकल्प करून झोपणारी माणसे सवय नसतानाहि नेमकीं संकल्पित वेळेवर उठतात, असा पुष्कळांचा अनुभव आहे. या निद्रामय स्थितींत कालाचें अवधान ठेवणारें मन संज्ञानरहित असूनहि आपले कार्य बजावीत असतें.

धर्माची घडण करणाऱ्या मनोवृत्ति या तिन्ही अवस्थेंतील मनाच्या आहेत. कारण धार्मिकता ही मनुष्यजातीची अत्यंत खोल रुजलेली, दृढमूल झालेली व फार परिणामकारक अशा प्रकारची भावना आहे. हे तिचे वैशिष्ट्य तिने मनाचा सर्वांगीण ठाव घेतला असल्यामुळेंच तिला प्राप्त झाले आहे. समर्पक, तर्कशुद्ध व बिनतोड युक्तिवाद मानसिक धर्ममूलावर आघात यशस्वी रीतीनें करूं शकत नाहीं, याचें हें एक महत्त्वाचे कारण आहे. मनाची सर्वांगीण अशी पकड धर्म कसा घेऊं शकला याची कारणमीमांसा थोडक्यात पुढीलप्रमाणे आहे.

## धर्मांची उत्पत्तिः डुरखाइमचे विचार

फ्रेंच समाजशास्त्रज्ञ डुरखाइम आणि त्याचे विद्वान् सहकारी यानीं धर्म-संस्थेच्या प्राथमिक उत्पत्तीची उपपत्ति लावण्याचा जो प्रयत्न केला आहे त्यास संपूर्ण मान्यता जरी देता येत नाहीं, तरी त्यांतील एक महत्त्वाचें सामाजिक मानसशास्त्राचें तत्त्व धर्मसंस्थेची मीमांसा करताना निष्पन्न झाले आहे, ते या प्रसंगीं ध्यानात घेण्यासारखे आहे. त्याचे म्हणणे असे कीं, तर्काच्या व्यवस्थित व शुद्ध नियमाची ज्या अवस्थेत मनुष्याना जाणीव नसते अशा अप्रगल्भ स्थितींत धर्मासारखी गंभीर सस्था निर्माण झाली आहे. मनुष्यांनीं त्या अवस्थेतच हजारों वर्षे धर्म अंगीं बाणविला आहे. आज सुद्धा सुसंस्कृत तर्कबुद्धि नसलेल्या बालांमध्ये आणि इतरेजनामध्ये धर्म हा वाढत असतो म्हणून मनामध्ये धर्म रुजण्याची पद्धति ही बुद्धिवादाच्या अनुरोधाने चालत नाहीं असेच म्हटले पाहिजे. मनुष्य हा समुदायप्रिय असल्यामुळे, समुदायाच्या संगतींत मनुष्याला समुदायाच्या छंदाने वर्तन करण्याची स्वाभाविक उत्सुकता असते. ही उत्सुकता समुदायामध्ये उत्तेजित होते; एकमेकाच्या वर्तनाचा परिणाम एकमेकावर समुदायात फार जलद होतो; एकमेकांच्या सानिध्यात अनुकरणप्रवृत्तीला भर येत असतो; त्या स्थितींत सत्यासत्याची बुद्धिवादास अनुसरून तपासणी करणारी तार्किक बुद्धि मंदावते आणि न तपासलेल्या कल्पना सहज स्वीकारल्या जातात. यास संघमनाचा सामुदायिक विचार (Collective thinking of group mind) अशी सज्ञा दिली आहे. या सामुदायिक विचाराचा प्रभाव व्यक्तीवर फार पडतो. त्याखालीं ती दबली जाते. संघप्रियता ही एक सहजप्रवृत्ति (instinct) आहे. कारण मानवजातीचा योगक्षेम त्यामुळे चालतो. मनुष्यजात जीवनसंग्रामात त्यामुळे यशस्वी होत आली आहे. त्यामुळे संघाचा प्रभाव व्यक्तीवर जबरदस्त असतो. जेव्हा तार्किक बुद्धि ही बाल व मूक अवस्थेत असते अशा सामाजिक स्थितींत धर्म जन्मला असल्यामुळे आणि अत्यंत उन्नत अशा धर्मसंस्थांच्या वेद, अवेस्ता, बायबल, कुराण, गीता इत्यादि धर्मग्रंथांतील माडणीसुद्धां अतार्किक बुद्धिकालास अनुरूप अशीच असल्यामुळे धर्म हा सामुदायिक विचारतत्त्वावर मुख्यतः अधिष्ठित आहे, असेच निश्चितपणें म्हणतां येतें. सामुदायिक विचार हा संघप्रियता या सहजप्रवृत्तींतून जन्मतो म्हणून त्याचे मूळ मनाच्या स्वभावातच रुजलेलें आहे. लहानपणापासून अनुकरणशील मनाला धर्माचें वळण मिळालेले असते. सामाजिक परंपरा ही सामुदायिक विचारावर आधारलेली असते त्यामुळें तिचा स्वीकार मन सहज करते आणि शेवटीं परंपरेची पकड सुटणे कठिण असतें. जन्मापासून मृत्यूपर्यंत संघाच्या पोटांतच मानव वावरत असल्यामुळें संघाची सामर्थ्यमयता व संघाधीनता यांची छाप मनाच्या

कणाकणामध्ये पडलेली असते. शेतीच्या हंगामाच्या वेळचे अन्नोत्सव, कुटुंबांतील बालकांच्या जन्माचे उत्सव, विवाह, अंत्यकर्म, न्यायसभा, युद्धाची तयारी इत्यादि सामुदायिक प्रसंगानीं या सामुदायिक विचाराला भर येत असतो. कौटुंबिक व सामाजिक स्वास्थ्यास आवश्यक दिसणारे आचार, विधि-निषेध आणि नियम याची महती सामुदायिक विचाराने मनास पटते. त्याबद्दल आदर आणि त्याच्या भंगाची भीति या गोष्टी सामुदायिक विचारांचाच परिपाक होय.

### सिद्धपुरुषाचा साक्षात्कार

येथें हे मात्र लक्षात ठेवले पाहिजे कीं, डुरखाईमच्या या विचारामधली अपूर्णता म्हणजे त्यात वैयक्तिक अनुभवाला गौण स्थान आहे, ही होय. कला आणि विज्ञान याच्या इतिहासात वैयक्तिक कर्तृत्वास जसे महत्त्व आहे, तसेंच धर्मोद्भव, धर्मविकास आणि नवधर्मस्थापना यात आहे. गुणवान्, प्रतिभाशाली, स्फूर्तिसंपन्न आणि मनीषी व्यक्तींनीं धर्माच्या इतिहासातहि मोठी कामगिरी केली आहे; समुद्राप्रमाणे तलावांत, नद्यात व ओहळातहि पाणी असते, परंतु भरती समुद्रालाच येते; त्याप्रमाणे थोड्याच व्यक्तींच्या मनाला धर्मभावनानीं व दिव्यानुभूतींनीं उसळणाऱ्या अमर्याद चैतन्यसागराचे स्वरूप प्राप्त होतें. साक्षात्कार, समाधि, दिव्यदर्शन इत्यादि शब्दानीं वर्णिलेली चित्तावस्था सर्वसाधारण लोकाना अनुभवावयास मिळत नसते. वादळाचा, प्रकाशाचा व वृष्टीचा पराक्रमी देव इंद्र आणि सगळ्या आकाशाला मुठींत ठेवणारा सम्राट् वरुण हे आपल्या यज्ञात हजर राहून आपल्या हातातील सोमपात्राचा स्वीकार करून त्यातील सोमाचे सेवन करीत आहेत, असें दर्शन ऋग्वेदातील ऋषीला होत होते. वसिष्ठ ऋषीबरोबर नौकेत बसून वरुण समुद्रात पर्यटन करीत असे. विश्वाएवढा वैश्वानर गौतमाला दिसत होता. विश्वाच्या जनकाने स्वतः संदेश देऊन पतिताचा उद्धार करण्याकरतां मला पाठविलें, ही गोष्ट ख्रिस्तानें स्वतः सांगितली. घागरींतील पाणी ओतावयास जेवढा वेळ लागतो, तेवढ्या वेळात महंमद अल्लाच्या सर्व महालातून फिरून येत असे. बुद्धाला अनेक जन्म ज्ञानाची साधना करावी लागली; ते सर्व जन्म त्याला स्मरत होते. अशी विशाल प्रत्ययशील मनोवस्था (Exalted state of mind) थोड्याच सिद्ध पुरुषाना लाभते. हे एक प्रकारचे दिवास्वप्न असते. साक्षात् अनुभव इंद्रियानीं घ्यावा, त्याप्रमाणें हा अनुभव ऋषींना, प्रेषिताना, अवताराना, साधूंना आणि महात्म्याना येत असतो. तरल अनिर्बंध शक्तींनीं तरारलेली त्यांची चित्तवृत्ति अशा दिव्य साक्षात्कारास प्रसवते; त्या वेळीं कोणती तरी एक भावनारूप मनोवृत्ति शुद्ध स्वरूपात वा संकीर्ण स्वरूपांत उन्नततेस पोचते. शांति, प्रीति, भीति, आनंद, उत्साह इत्यादि भावनांपैकीं कोणती तरी एक परिपोष पावून अगाध आणि अमर्याद अनुभवास

गोचर होते; या जगातली अपूर्णता त्यात भरून निघते; या जीवनातील दोष, दैन्य, पाप, दौर्जन्य इत्यादि विलय पावतात. अनेक जाचक प्रश्न सुटतात; सर्व कामना तृप्त होतात; मृत्यूचे भय निरास पावते; विश्वास, धैर्य आणि निर्भयता यांची मिरास लाभते; सत् आणि असत् याचा निर्णय करण्याचे विवेकसामर्थ्य प्राप्त होते; निग्रह आणि अनुग्रह याचा अधिकार प्राप्त होतो. हा अधिकार आणि हे सामर्थ्य अशा उन्नत अवस्थेत लाभलेल्या धर्मकल्पनेलाहि प्राप्त होते, म्हणून अशा साक्षात्कारी पुरुषांचे ग्रंथ परमप्रमाण पदवीस प्राप्त होतात.

**एका महत्त्वाच्या प्रश्नाचा उलगडा**

अशा तऱ्हेचा धार्मिक अनुभव का येतो; आणि इतरेजन, सुसंस्कृत व असंस्कृत जनता, पंडित, राजे, कलावान्, कवी, इत्यादि लोक त्यास का मान्यता देतात, असा महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न होतो. कारण हा अनुभव फारच थोड्याच्या वांट्यास येतो; परंतु त्याचे प्रामाण्य युगानुयुगें अनंत माणसांनी मानले आहे; म्हणून याचे उत्तर देता आले पाहिजे. धर्माची मानवी इतिहासात जी प्रतिष्ठा आहे, तिचा अर्थ त्याशिवाय कळणार नाही. या प्रश्नाचा उलगडा असा आहे :—

निसर्गाचा व जीवनाचा विविध आणि चमत्कृतिपूर्ण अनुभव मनुष्यास येत असतो; त्यात एक प्रकारची संगति असावी, अशी अपेक्षा असते. ज्या प्राचीन संस्कृति प्रथमच प्रगल्भावस्थेस पोचल्या, त्यांना नैसर्गिक परिस्थितीचे आनुकूल्य लाभले होते. तशा संस्कृति पूर्वी चीन, हिंदुस्थान व इराण या देशांत आणि पश्चिम आशियातील आणि भूमध्य समुद्रासंनिध असलेल्या असीरिया, इजिप्त, ग्रीस, इत्यादि देशात वाढल्या. त्या संस्कृतींच्या उदयकाली निसर्गानुभवास आणि निसर्गचिंतनास प्राधान्य आले होते. त्या अनुभवाला व चिंतनाला अर्थपूर्णता आणि संवादित्व चेतनाशक्तीच्या आरोपानेच प्राथमिक स्थितींत येऊं शकले. सुपीक जमीन, जलपूर्ण नद्या, पशूंची समृद्धि, ऋतुचक्राची व्यवस्थित गति इत्यादि नैसर्गिक शक्तींची उदारता, कुटुंबांत अनुभवास येणाऱ्या मातापितराच्या वात्सल्याची व अनुग्रहाची बरोबरी करने, असे त्यास दिसे. गुलाबी कांतीच्या उषेचे आगमन झाले असता वाटे की, सुंदर व तरुण माता किंवा बहीण गाणें गुणगुणत गोड झोपेतून जागृत करीत आहे. ईश्वराने किंवा देवांनी कृपा करावी आणि इष्ट कामना पूर्ण कराव्या, अशी ते लोक प्रार्थना करीत असत; परंतु सूर्योदय आणि सूर्यास्त, वर्षा आणि वसंत, प्रकाश आणि झुळझुळ वाहणारा वारा, हीच त्याची किंवा त्यांची कृपा आहे, असे ते पाहात असत. त्यानें दर्शन देऊन पावन करावे, अशी उत्कंठा त्यांच्या हृदयात राही; परंतु सूर्यदर्शन व वायुस्पर्श हेच त्याचे दर्शन आणि त्याचा स्पर्श असें त्यांस वाटे. यजुर्वेदांत ऋषि म्हणतो, ' याला गायी चारणारे गोप पाहतात; नदीवरून घडे भरून

आणणाऱ्या क्रिया बघतात; प्राणिमात्र याचे दर्शन घेतात; तो सगळ्याना कृपेने व ममतेने संभाळतो. ' निसर्गच जीवनाची आकाक्षा पूर्ण करतो; त्याच्या योगानें श्रेय:साधन करता येते, असा त्यास अनुभव येत असल्यामुळे त्याच्या ठायीं चेतनत्वाचा आरोप करून त्याच्या प्रार्थनेंत मन गुंगून जात असे. त्याच्या आराधनेने पवित्र झालों, असे वाटे. या पावित्र्याच्या भावनेने भारलेली युयुत्सु वृत्ति अग्निदेवाप्रमाणे जागृत होऊन पेटण्यास उशीर लागत नसे. निसर्गाच्या अनुग्रहात अपवादहि घडत. प्रखर उष्णता, तीव्र थडी, वादळ, हिंस्र पशूंचा हल्ला, साथींच्या रोगाचा प्रादुर्भाव व अशा प्रकारच्या इतर आपत्ति आल्या, तरी प्रगल्भ दशेस पोहोचूं पाहणाऱ्या सस्कृतीच्या त्या नैसर्गिक परिसरात या गोष्टींना सातत्य लाभत नसे, मातापितराच्या क्षणिक क्षोभाप्रमाणे त्याचा प्रादुर्भाव सहज विस्मरणीय वाटे. म्हणून निसर्गाचे सौंदर्य व समृद्धि याच्याबद्दल उदात्त भाव आणि पूज्यबुद्धि उत्पन्न होऊन त्या निसर्गावर केलेल्या देवत्वारोपाने त्याच्या अनुभवाला फारच खुलावट येत असे. विवशपणे आलेल्या तशा अनुभवात ऋषींना किंवा थोर पुरुषाना धन्यता वाटे.

तात्पर्य, सृष्टि व जीवनातील घडामोडी याचा अर्थ समजून घेण्याची स्वाभाविक आतुरता माणसात आहे. सृष्टि आणि जीवनातील घडामोडी याचा उत्कट अनुभव अहर्निश मनुष्यास येत असतो, परंतु त्याची सगति सामान्य मनुष्यास कळत नाहीं; ती संगति प्रतिभाशाली, तीव्र सवेदनक्षम धार्मिक पुरुषाच्या अनुभवाच्या द्वारा ध्यानात येते. धार्मिक पुरुषाच्या अनुभवाशीं जुळणारे मनस्तरंग इतराच्या अनुभवास येत असतात, परतु त्यात स्पष्टता, उत्कटता, आवेश आणि गंभीरता नसते. हे गुण धार्मिक महापुरुषाच्या अनुभवात असतात. त्यामुळे विश्वास उत्पन्न होऊन मनाचे समाधान होते. म्हणून लोक महापुरुषास शरण जातात.

### अतृप्त कामनांची तृप्ति

दुसरे असे कीं, मनुष्याच्या सर्व सहजप्रवृत्तींना ससारात अपरिमित बंधने प्राप्त होऊन सर्व मनुष्यास त्याचे नियमन संतत करावे लागते, त्यामुळे त्यांतील बराच मोठा भाग सज्ञानरहित मनाच्या गाभाऱ्यात गुडुप झालेला असतो. समूळ नष्ट मात्र होत नसतो. आत्मसंरक्षण, लैंगिक प्रीति, स्वजातिरक्षण आणि संघप्रीति, अशा प्रकारच्या सहजप्रवृत्ति सामान्य रूपाने मानसशास्त्रज्ञांनीं परिगणित केल्या आहेत. आत्मरक्षणाच्या सहजप्रवृत्तींतून अमरत्वाची वासना वाढीस लागते. लैंगिक प्रीतीच्या पोटीं शाश्वत प्रेम आणि अनंत वात्सल्य यांची वासना निर्माण होते. स्वजाति रक्षणाच्या प्रवृत्तींतून सहकार्य, परोपकार, दया इत्यादि न्यायबुद्धीचा उदय होऊन शाश्वत न्यायरक्षकाची भावना जन्मते.

आत्मरक्षणपर आणि जातिरक्षणपर प्रवृत्तींतून तिच्या साफल्याकरितां त्रिकाल-ज्ञान आणि पराभूत न होणारे अनंत सामर्थ्य कल्पनाचक्षूपुढे येते. प्रथम या सहजप्रवृत्तींच्या साफल्याच्या वाटेत अनुल्लंघनीय अडचणी वारंवार येत असतात, आत्मदौर्बल्याचा प्रत्यय क्षणोक्षणीं येतो आणि पराभूत मनःस्थितींत सहजप्रवृत्तींच्या व्यथा असह्य होतात, म्हणून त्या व्यथाजनक प्रवृत्तींना मनाच्या खोल गुहेत कायमचे दडून पडून राहावें लागते. त्यांनीं संज्ञानरहित मन भारावून जाते. रात्रीच्या वेळीं पावसाळ्यात जत्रेचे यात्रेकरू ज्याप्रमाणें शहराच्या कोपऱ्यातील धर्मशाळेत अस्ताव्यस्त गाढ झोपीं जातात, त्याप्रमाणें सहजप्रवृत्तिजन्य वासना संज्ञानरहित मनात गर्दी करून झोंपलेल्या असतात; ती त्यांची झोप व ती रात्र धर्मानुभूतीच्या प्रकाशानें संपतें. मनुष्य हा काममय वा कामात्मा आहे असें शास्त्र सांगते. सगळ्या मानवी प्रवृत्तींचा साधारण मूलभूत आधार किंवा प्रेरणाशक्ति काम किंवा एषणा ( libido ) ही होय. ती कायमची अतृप्त राहते. वास्तविक-जगात त्याला पदोपदीं अगणित अडथळे अडवीत असतात. ती कृतार्थ व तृप्त धर्मानुभवात होते. कारण स्वर्गांत ईश्वरापाशीं सर्व कांहीं इच्छामात्रेकरून सिद्ध होते. या जगातलीं वैगुण्ये आणि बंधनें तेथें नसतात. म्हणून पाप आणि अपवित्रता नसते. ज्याला संसारात मधुरनिश्वासपूर्ण प्रीतिचें आलिंगन लाभत नाहीं अथवा लाभले तरी ते कालानें मर्यादित असतें, त्या[redacted] अनुभवात भरपाई होते, असें वाटते. ज्याला या जगात एकलकोंडेपणा आणि उदास वाटते, त्यास विश्वप्रभूच्या मैत्रीची प्राप्ति होऊन त्याच्या आनंदमय आणि चिन्मय चिर सान्निध्यात धन्यतेचा दिवस उगवतो. संज्ञानरहित मनातील सगळे भाव तृप्त होऊन जातात. सर्व ज्ञात व अज्ञात उद्दिष्टें ज्यात सामावतात, सर्व कामनांची परमावधीची तृप्ति ज्यात होते, असा ज्योतिर्मय, पापरहित, सत्यमय, मृत्युरहित, निर्भय, आनंदनिधान व सर्वसमर्थ ईश्वर वा स्वर्ग वा मोक्ष प्रत्यक्ष पाहणारे मात्र थोडे असतात. त्यांनीं स्वतः पाहून आश्वासन देण्याचा अवकाश कीं, सगळे बाकीचे लोक त्यांच्या भोंवतालीं जमा होतात; प्रार्थना करू लागतात; भजनमंडळ्या स्थापतात; यात्रा भरवितात; तीर्थस्थानें निर्माण करतात; तसें अभयाचें आश्वासन मात्र मिळालें पाहिजे. कल्पनेच्या क्षेत्रात ते दिव्य विश्व आले म्हणजे झाले, म्हणजे आश्वासन खरोखरच मिळाले, अशी खात्री होते. कारण संज्ञानरहित मनातील गूढ वासना किंवा भावना यांची त्यामुळे तृप्ति होते. अन्यथा त्यांचा निकाल लावणेंच सामान्य मनुष्यास दुर्घट असतें. त्या आशांकरिता जणूं काय टपलेल्याच असतात.

प्रमाणाच्या आधारें संशोधन करून ठरवलेले बौद्धिक निर्णय संज्ञानयुक्त तार्किक मनाचें समाधान करतात. परंतु संज्ञानरहित गूढ मन हें फार विशाल

आणि सामर्थ्यशाली आहे. तार्किक बुद्धिवादी निश्चयाची त्याला फारशी कदर नसते. म्हणूनच जागृतींतील अवधानाचा पहारा उठल्यावर निद्रेच्या आणि तंद्रेच्या झापडींत संज्ञानरहित मन उठाव करून स्वप्नात आपणास इष्ट अशी सृष्टि निर्माण करते. धर्मसंस्था तर्काच्या बाल्यावस्थेपासून म्हणजे रानटी स्थितीपासून अस्तित्वात आली आहे. ती संज्ञानरहित मनाच्या आकांक्षाना जागृतींतील अवधानाचा पहारा असतानासुद्धा आपले कार्य करण्यास मुकरता उत्पन्न करते. स्वप्नवत् असलेले आभासमय काल्पनिक विश्व धर्मसंस्था निर्माण करते. तरी जागृतींतील प्रमाणशुद्ध, तर्कबद्ध व व्यवस्थित निर्णयाच्यापेक्षा अधिक तथ्ययुक्त ते काल्पनिक आभासमय विश्व ठरते. कारण धर्माचा बाणा परमसत्याचा संदेश देणे हा असतो. त्या त्या विशिष्ट सामाजिक परिस्थितीच्या वातावरणात एका तऱ्हेची संज्ञानरहित मनाची घडण झालेली असते. त्या सर्व मनावर ( काहीं थोडे पाखंडी अपवाद म्हणून सोडल्यास ) धार्मिक कल्पनाचा परिणाम होत असतो. कारण धर्मसंस्था अशा प्रकारचे विश्व निर्माण करते की, त्याचे सत्यवादित्व त्या सामाजिक परिस्थितींतील सर्व मनाशीं निर्माण होतें. उदाहरणार्थ, गायनकला घ्या. गायनकलेची छाप एकदम सर्व प्रेक्षकावर पडते; परंतु ते प्रेक्षक एका विशिष्ट सामाजिक सस्काराच्या परपरेत वाढलेले पाहिजेत. पाश्चात्य सगीताची छाप हिंदी मनावर एकदम पडत नाहीं किंवा हिंदी संगीताची पाश्चात्य मनावर पडत नाही. तसेच धर्माचे आहे.

## अनुभूति व बुद्धिप्रामाण्य

तर्कशुद्ध व प्रमाणसिद्ध निर्णयावर धार्मिक विचार मुख्यतः आधारलेले नसतात, म्हणून त्याची मातब्बरी कमी होत नाहीं असे जरी मानसशास्त्रदृष्ट्या मान्य केले, तरी त्याचे बौद्धिक प्रामाण्य अथवा सत्यत्व का स्वीकारावें, असा प्रश्न उपस्थित होतो. त्याचे उत्तर, सत, महात्मे, सिद्धपुरुष आणि त्याची तरफदारी करणारे पडित असे देतात की, अनुभव हा ज्ञानाचा पाया आहे, प्रत्यक्ष अनुभव हा स्वतःच प्रमाण आहे. परगावीं भेटलेल्या मित्राची सत्यता जरी सिद्ध करता आली नाहीं, तरी प्रत्यक्ष झालेल्या भेटीचे प्रामाण्य किंवा सत्यत्व कसे कमी होणार ? परतु हें उत्तर लंगडे आहे; ही गोष्ट आधुनिक मानसशास्त्रानुसारे सिद्ध होते. कारण वस्तु समोर नसताना सुद्धा वस्तूंचे दर्शन किंवा वस्तूंची साक्षात् अनुभूति येत असते, असे अनेक मानसिक विकृतींनीं पछाडलेल्या माणसांच्या विविध अनुभवाच्या नोंदीवरून सिद्ध झालें आहे. जेम्स, प्रोफेसर ल्युबा, स्ट्रीटर, सेट टेरेसा इत्यादिकानीं जे पारमार्थिक अनुभवाचे शेकडो प्रकार सांगितले व नोंदले आहेत, त्यातील काहीं इंद्रियजन्य भ्राति, या सदरात सहज मोडतात. " खिस्ताचा हस्तस्पर्श अनुभवास येतो; त्याचे मेघगंभीर भाषण ऐकूं

येतें; त्याचे तेजःपुज मुख आणि प्रशान्त मुद्रा दिसते; तो दार ठोठावतो, हाक मारतो, असे दिसते. " अशा प्रकारचे बाह्य इंद्रियांनी होणाऱ्या साक्षात्कारांचे दाखले सर्व धर्मांत आहेत. परंतु ते सत्य आहेत, असे सिद्ध करण्यास एकहि प्रमाण नाहीं. प्रत्यक्ष अनुभवाचा दुसरा प्रकार म्हणजे जागृतींतच मनासमोर देवता, सद्गुरु इत्यादिकाचे देखावे येतात; आपली खात्री असते कीं, चक्षु, स्पर्श, श्रोत्र इत्यादि इंद्रियाचा यांत भाग नाहीं, अशा तऱ्हेचे अनुभव हिस्टि-रिया किंवा उन्माद या मनोरोगात हमेशा येत असतात. योगसाधनेने अशा तऱ्हेच्या अतींद्रिय साक्षात्काराची प्राप्ति होते. परतु योगसाधनेने तसे दिसते म्हणून ते सत्य आहे, असे सिद्ध होत नाहीं. तिसरा प्रत्यक्ष अनुभवाचा प्रकार म्हणजे अनुभवात येणारी वस्तु बाह्य आहे कीं, मानसिक आहे, याचा कांहींच निर्णय होत नाहीं; परतु भासमान वस्तूच्या अस्तित्वाची आणि सान्निध्याची भावना फार स्पष्ट व संशयातीत असते. सेंट टेरेसा या बाईने आपला अशा तऱ्हेचा धार्मिक किंवा आध्यात्मिक अनुभव नोंदून ठेविला आहे. तुकारामासहि असा अनुभव येत होता. ' जेथे जातो तेथें तू माझा सागाती ' असे तुकाराम देवास सागतो. अनेक सतांनीं असे अनुभव वर्णिले आहेत. ब्राह्मोसमाजी गुरु केशवचंद्रसेन, विवेकानंद, रामतीर्थ, रामकृष्ण परमहंस यांनीं असे अनुभव घेतले आहेत. हे अनुभव केवळ तशा तऱ्हेच्या आध्यात्मिक परंपरेच्या सस्कारामुळे झालेली मानसिक परिणति होय, असेच का म्हणूं नये ? विकृत मनोवस्थेत अथवा तशा तऱ्हेच्या भावना पुनः पुनः आत्मसात् करण्याच्या प्रवृत्तीने खोल संस्कार झालेल्या मनात तसे अनुभव उत्पन्न होतात. त्याचे प्रामाण्य किंवा अप्रामाण्य मात्र तेवढ्यानें सिद्ध होत नाहीं. त्या त्या साधूच्या धार्मिक परपरेचे वैशिष्ट्य त्या त्या अनुभवात असतेच. मनीं वसे ते स्वप्नीं दिसे, असे म्हणतात, परंतु यापेक्षाहि पुढे जाऊन असे म्हटले पाहिजे कीं, ते जागृतींत, स्वप्नात आणि समाधींतहि दिसते.

धर्माचा अनुभवात्मक आधार वर सागितला, त्याला बौद्धिक आधारही आहे. श्रेय (Good) आणि सत्य (Truth) असे त्या बौद्धिक निर्णयाचे दोन भाग आहेत. श्रेय म्हणजे मनुष्याच्या जीवनाच्या दृष्टीने कल्याणरूप, हितकारक, मंगल अथवा इष्ट असें जे उद्दिष्ट ते होय; आणि त्या उद्दिष्टाला नेणारा मार्ग अथवा ते उद्दिष्ट सिद्ध करणारीं साधने हीं श्रेय या सदरांत येतात. कारण तीं श्रेयस्कर असतात. साध्य आणि साधन यांची एकरूपता अथवा अनुरूपता धर्म मानतो, म्हणून साध्याइतकेच साधनांचें मूल्य धर्म समजतो. या श्रेयासच परमार्थ म्हणतात. मनुष्याच्या जीवनातलीं सगळीं ध्येयें आणि ध्येयसाधने परमार्थाशीं जुळवून घेणे हें धर्माचे महत्त्वाचें कार्य असते. परमार्थाशीं अनुरूप जीं साधने

आणि साध्ये असतात, तींच धर्म्य होत, तींच नैतिक होत. आधुनिक परिभाषेत श्रेयाचा प्रश्न म्हणजे नीतीचा होय.

काटने कर्मबुद्धीच्या मीमांसेत म्हटले आहे कीं, "या दोन गोष्टींचे वारवार आणि निर्धारपूर्वक जो जो मनन करावे तो तो अंतःकरण आश्चर्य आणि गंभीरता यानीं अधिक अधिक भरून जाते. त्या दोन गोष्टी म्हणजे मस्तकावरील तारागणान्वित नभ आणि माझ्या अन्तःकरणातील नैतिक विवेक." आत्मरक्षणाकरिता, जनहिताकरिता जशाम तसे म्हणून किंवा आपत्काल म्हणून जरी आपण नीतीचे शुद्ध नियम मोडण्याचे समर्थन करू शकलो तरी विवेकाचा प्रकाश ज्याचा मंद नाहीं अशा साधूस त्याची रुखरुख राहूनच जाते, शुद्ध नीतिनियमाचे निरपवाद पालन करता आले तर किती बरे चागले होईल, असेच महान् विवेकशाली सज्जनाना वाटत असते. जे भोळे नाहींत, पराक्रमी आहेत, शास्त्र व कला यांत प्रवीण आहेत, लहान-मोठ्या व्यवहारात चातुर्याने ज्यानीं यश मिळविले आहे, असे अनेक कर्ते पुरुष नीतिनियम निरपवादपणे पाळता आले तर फार उत्तम असेच समजतात. ही शुद्ध विवेकबुद्धि मनुष्याच्या हृदयात खोल रुजलेली आहे. तिच्या संपूर्ण समर्थनाचे आश्वासन धर्मच देतो. तो म्हणतो, नीतिनियम समाजहितार्थच जर निर्माण झाले आहेत असे मानले तर ते त्या त्या सामाजिक परिस्थितीप्रमाणें बदलले पाहिजेत. मग ते सापेक्षच ठरतात. तसेच ज्या व्यक्तीला समाजाचे महत्त्व स्वतःपेक्षा अधिक वाटत नाहीं ती व्यक्ति नीतिनियमास कायद्याइतकेच तात्पुरते आणि वरपांगी मूल्य देणार. अंतरात्म्याच्या साक्षीने ती व्यक्ति नीतिनियम पाळण्यास तयार होणार नाहीं. म्हणून नीतिनियमास सापेक्ष, देशकालमर्यादित मूल्य नसेल, व व्यक्तीच्या स्वतःच्या समाजनिरपेक्ष पूर्णतेचे ते भाग असतील तर त्याचे समर्थन सामाजिक किंवा वैयक्तिक स्वार्थावर आणि उपयुक्ततावादावर आधारता येणार नाहीं. नीतिनियमाची मंगलता वा कल्याणरूपता जेथून निष्पन्न होते, त्याचे पावित्र्य जेथून प्रसवते असे स्थान ईश्वरच होय. जीवित क्षणभंगुर आहे, सामाजिक व्यवहार चंचल आहेत तर नीतीचे शाश्वत मूल्य कोठून निर्माण होते? नैतिक संकल्पाची आज्ञा कोठून येते? नीतीचा भंग केला असता जे भय वाटते ते कोणाचे वाटते? जीविताचे काहींही होवो, भार्या-पुत्र, ज्ञाति वा लोक काहींही म्हणोत, पाप मात्र करणार नाहीं; अनिष्टाची वासना शिवूं देणार नाहीं; असे धैर्य कोणाच्या आधारे येते? या प्रश्नाचे उत्तर ईश्वराच्या आस्तिक्याने मिळते. हा नीतितत्त्वाचे समर्थन करणारा युक्तिवाद बिनतोड आहे, असे जरी म्हणता आलें नाहीं तरी मागे वर्णिलेल्या धार्मिक अनुभवाच्या आणि संस्काराच्या वातावरणांत हा युक्तिवाद अधिक भर घालतो असे म्हणता येईल.

श्रेयाबरोबर एक बौद्धिक सत्य धर्म सागत असतो. तें म्हणजे विश्वाची उपपत्ति होय. आस्तिकदर्शने अथवा तत्त्वज्ञाने या उपपत्तीची माडणी कुशलतेनें करीत असतात. विश्वाचे आदिकारण म्हणून ईश्वराची कल्पना धार्मिक तत्त्वज्ञान सागते. विश्वातील व्यवस्था, सौंदर्य, नियमबद्धता पाहून त्याच्या पाठीमागे कोणी तरी सर्वज्ञ, संकल्पयुक्त द्रष्टा आणि सर्वशक्तिमान् असा ईश्वर मानला पाहिजे असे अनुमान निघतें असे अध्यात्मवादी तत्त्वज्ञान सागते. विश्वरचनेसंबंधीं, विश्वाच्या उभारणी-संहारणीसबधीं भिन्न भिन्न धर्मात भिन्न भिन्न उपपत्ति सागितल्या आहेत. त्याचप्रमाणे तत्सबधीं स्वर्ग, नरक, ईश्वर, आत्मा, जीवगति यांच्या कल्पनाही त्या त्या धर्मांच्या भिन्न भिन्न आहेत. त्यात एक तऱ्हेचा युक्तिवाद असतो तो निर्विवादपणे सिद्ध होण्यासारखा हेत्वाभासरहित असतो असे नव्हे; परंतु त्या त्या समाजाच्या धार्मिक परंपरेला सावरून धरण्याचे काम करण्याची ताकद मात्र त्यात असते.

—२—

धर्मसस्थेचा मानसिक पाया म्हणजे मूळ कसे आहे हे वर थोडक्यात सांगितले. सर्व धर्मसस्थाना वरील मानसिक प्रक्रिया लागू आहे. मानवजातिशास्त्रज्ञानीं मनुष्यसमाजाच्या अगदीं वन्य अवस्थेतील धर्मसंस्थापासून तों अद्ययावत् सुधारलेल्या धर्मसंस्थाचा संपूर्ण आढावा सागितला आहे. त्यानीं सागितलेल्या धर्मसस्थाच्या सर्व अवस्थाना व प्रकाराना सामान्यपणें लागू पडेल अशी ही मानसिक प्रक्रिया आहे. शातिपर्वात महाभारतात भीष्मानीं धर्म हा मानस आहे, म्हणजे मनोनिर्मित आणि मनातच वास करणारा आहे, असे म्हटले आहे; त्याचें हेच रहस्य आहे. धर्माने जगातील भिन्न भिन्न समाजात व राष्ट्रात जो प्रभाव दाखविला आहे, जगाच्या सास्कृतिक आणि सामाजिक उन्नति-अवनतींत जें कार्य केलें आहे, त्याचा अर्थ त्याच्या मानसिक उगमाचे स्वरूप समजल्यामुळेच नीट ध्यानात येऊ शकतो.

कामना आणि श्रद्धा याच्यावर धर्म उभारला जातो. बुद्धिवाद हा धार्मिक विचारसरणीच्या पोटात बीजरूपाने असतो. बुद्धिवादाची बौद्धिक सामुग्री मनुष्याच्या संस्कृतींत फार उशीरा निर्माण झाली आहे. बुद्धिवाद प्रगल्भ दशेस प्राप्त होण्यापूर्वीच धर्म हा विशाल रूपास प्राप्त झाला; त्यात प्रगल्भ दशेस प्राप्त झालेला बुद्धिवाद नतर प्रविष्ट झाला आहे. ज्यावेळीं मनुष्य सर्व दृष्टीने दरिद्री होता; जीवन-सामुग्री मोठया कष्टानें लाभत होती; अत्यंत कष्टानें मिळविलेलीं साधनें लवकर संपत, अशा वेळीं जे जें जीवनास पोषक व साहाय्य करणारें दिसेल व सांपडेल त्यावर झडप घालून त्याच्यावर आपली पकड खेंचून अढळ बसविणें या प्रवृत्तीला जीवन–सग्रामांत महत्त्व प्राप्त झाले होते. या प्रवृत्तीचा त्याच्या

विचारसरणीवर फार खोल परिणाम होणें स्वाभाविक आहे. जेथे निवडीला सवड कमी, तेथें जे बरेसें दिसेल तेच पूर्णपणे हस्तगत करणे, हेंच शहाणपणाचे ठरणें स्वाभाविक आहे. त्याचा परिणाम विचारसरणीवर सहजगत्या झाल्याशिवाय राहिला नाहीं. तारतम्य-विवेक, चिकित्सा, निर्णय बराच काळपर्यंत तहकूब करणें, पुन्हा: समालोचन इत्यादि बुद्धिवादाचीं अगे त्या वेळीं महत्त्वास पोंचूं शकत नव्हतीं. जे इष्ट, रम्य, भोग्य आणि सत्य वाटेल, ते त्वरित विलंब न लावता मान्य करून त्याच्याबद्दल ममत्व वाटणे, हेंच त्या मनःस्थितींत अधिक संभवत होते; श्रद्धा ही वृत्ति त्या स्थितींत पोषण पावते. जे मनास पटले तें दुसऱ्यास पटवून देण्याला लागणारी अव्यक्त व सकेतनिष्ठ (Abstract and symbolical) विचारपद्धति आणि वाग्विस्तार त्याच्यापाशीं नव्हता. दुसऱ्यास पटविण्याची युक्ति नसली तरी संवगड्याना पटावे, अशी त्याला काळजी असते. कारण जे खरे आहे असे वाटतें, त्यावरच जीवनसग्रामात टिकाव धरता येतो. म्हणून स्वतः कळकळीने विश्वासाची आणि शपथेची भाषाच तो वापरतो. हीच श्रद्धेची मूळ उपपत्ति होय. जे जे मूल्यवान् इद्रियांनीं आणि कल्पनेने मनाला सापडेल ते ते नीट रीतीने हृदयात जतन करून बदोबस्तात ठेवणारी मनोवृत्ति म्हणजे श्रद्धा होय. सामाजिक सस्कृतीच्या ज्ञानरूपी वैभवाच्या काळात ही कृपणपणे जतन करणारी श्रद्धारूपवृत्तीच ज्ञानाच्या विकासाचे बधन ठरते. कारण त्यावेळीं अनंत तारतम्ये आणि बहुत प्रकार असलेले अगणित विचार तपासून त्यांतून शाश्वत मूल्याच्या विचाराची निवड करावयाची असते. अशावेळीं, समृद्धीच्या काळीं, वाटेल ती अडगळ साठवून ठेवली, तर भार होतो आणि गोंधळ माजतो; अशावेळीं बुद्धिवाद हा श्रद्धेला मर्यादा घालून तिच्यातील गोधळ, अव्यवस्था, ओबडधोबड कल्पना व भाबडे विचार नष्ट करून टाकतो आणि धर्मविकासास व परिवर्तनास मदत करतो. परंतु श्रद्धा हे धर्माचे मूळ होय. ते नष्ट झाले म्हणजे धर्म नष्टच होतो. धर्म हा धारक आहे, असे म्हणतात. त्याची धारक शक्ति श्रद्धेत आहे. त्यामुळेच धर्म हा मानवी सस्कृतीचा पायाभूत जो द्विविध संबध त्यास निर्माण करू शकला.

### धर्माची प्रतिज्ञा

धर्माने माणसाचे दोन प्रकारचे सबंध निर्मिले, राखले व दृढ केले. ते दोन सबंध म्हणजे माणसाचा सृष्टीशीं संबंध आणि माणसाचा माणसाशीं सबध. या दोन संबंधांवरच मनुष्याचे जीवन—सर्वस्व आधारलेले आहे. मनुष्याची सस्कृति या दोन संबंधांवर आधारलेली आहे. हे संबंध जितके चागले होत जातात किंवा बिघडत जातात त्यामानाने माणसाची सस्कृति उन्नत होते किंवा अवनत होते. धर्मानें

गेली दहा हजार वर्षे मनुष्याच्या मनावर जे असीम स्वामित्व गाजविले आहे, त्याचे कारण धर्माने मनुष्यास असे आश्वासन दिलें कीं सगळ्या जीवनाचा आणि विश्वाचा अर्थ तुला सागतों आणि तुझ्या सर्व कामनाची आणि महत्वकांक्षेची परमसीमा ज्यात होते असें परमकल्याण तुला प्राप्त करून देतो. या तऱ्हेचे आश्वासन मनुष्यास पाहिजे आहे आणि म्हणूनच धर्मावर मनुष्यानें एवढी भिस्त ठेविली आहे. काहीं दोन तीन शतकाचा आधुनिक युरोपचा इतिहास अपवादादाखल वगळल्यास धर्मानें हजारो वर्षे मनुष्याच्या इतिहासावर प्रत्यक्षपणें किंवा अप्रत्यक्षपणे वर्चस्व गाजविले आहे. अर्थव्यवस्था, राज्य, कायदा, कुटुंबसस्था, वाङ्मय, काव्य, कला, शास्त्रे इत्यादि सर्व व्यवहारावर आपली मुद्रा धर्माने उमटविली आहे.

मानवी सुधारणा आणि ऐतिहासिक परिवर्तन या दृष्टीने ज्या समाजाच्या आणि राष्ट्राच्या संस्कृतींचा मानवेतिहासावर महान् परिणाम झाला आहे, आणि आजची मानव सस्कृति ज्या संस्कृतींची कमीजास्त ऋणी आहे त्याच संस्कृतींच्या धार्मिक कार्यांचा आढावा थोडक्यात घेऊं, म्हणजे धर्माचे मानवी इतिहासातील स्थान लक्षात येईल.

भूमध्य समुद्रातील क्रीट बेट, नाईल नदीचा परिसर, युफ्राटिस आणि तैग्रिस नदीचा सामत प्रदेश, उत्तर हिंदुस्थानातील सप्तसिंधु आणि चीनमधील पीत नदी या ठिकाणीं जगातील प्राचीनतम संस्कृति जन्मल्या. यापैकीं नाईल नदीच्या परिसरातील आणि युफ्राटिस–तैग्रिस प्रदेशातील सस्कृतींचे प्राचीनतम अवशेष अधिक प्रमाणात उपलब्ध झाले आहेत. हिंदुस्थानातील प्राचीनतम भौतिक अवशेष अ ता कोठे सापडूं लागले आहेत आणि त्याचा अभ्यास व्हावयाचा आहे. मोहाजोदारो आणि हाराप्पा येथील इष्टका लेख अजून उकललेले नाहींत, तसे ईजिप्त आणि मेसापोटेमिया किंवा आशिया मायनर येथील लेखांचे नाहीं. त्याचा अर्थ कळला आहे. त्या ठिकाणीं सस्कृतींची भौतिक आणि आध्यात्मिक सामग्री सापडली आहे, त्यावरून धर्मसंस्थेविषयीं जो निष्कर्ष निघतो तो असा आहे.

## प्राक् ऐतिहासिक धर्मकल्पना

प्रजोत्पादन, पशुसमृद्धि आणि कृषि यांच्या म्हणजे जीवनतत्त्वाच्या अधिष्ठात्री देवतेचे देऊळ हे पुरातन मानवाच्या जीवनाचे अथवा अस्तित्वाचे केंद्र होय. त्याच्या भोवतीं शहराची किंवा गांवाची वस्ती होत असे. ईजिप्त, सुमेर, बाबिलोन, ग्रीस, रोम आणि क्रीट येथील शहरांचे देवमंदिरमध्यवर्तित्व हें मुख्य लक्षण होय. देवमंदिराशेजारीं राजमंदिर असावयाचें. मानवी सुधारणाच्या उदयाची

ध्वजा प्रथम देवमंदिरावर फडकली. कृषिकर्मातील मुख्य कर्म बीजावाप होय. बीजावापकालीन पशुयज्ञ ज्या ठिकाणीं व्हावयाचा तेथेच देवमंदिराची उभारणी झाली आणि तेथेच त्या तीर्थस्थानींच, प्रजा वसूं लागल्या आणि नगरें निर्माण झालीं. मंदिरात विविध प्राणि व पशु यांच्या आकाराची किंवा अर्धपशू आणि अर्धमानवी अशा आकाराची मूर्ति विराजमान झालेली असावयाची; कांहीं ठिकाणीं अधिक सुसंस्कृत प्रजेत संपूर्ण मानवाकार देवमूर्ति असावयाची. ती मूर्ति प्रत्यक्ष देवच मानिलेला असावयाचा अथवा देवाचे प्रतीक मानिलेलें असावयाचें. त्या मंदिराचे पूजक स्त्री किंवा पुरुष पुरोहित असावयाचे. त्याचे पोशाक आणि राहणी इतरेजनापेक्षा निराळी असे. समाजात त्याचे स्थान श्रेष्ठ मानिले जाई. त्यांच्यात समाजातील हुशार लोकाचा भरणा अधिक होत असे.

देवपूजा आणि यज्ञ हीं त्या पुरोहिताची मुख्य कर्तव्ये होत. महत्वाच्या अर्चा आणि यज्ञ हे विशिष्ट कालीं आणि विशिष्ट ऋतूच्या प्रारंभीं व्हावयाचे असल्यामुळे कालातिपात न होता विहितकालीं तीं कर्मे बिनचुक करण्याची जबाबदारी पुरोहिताचीच असे. पेरणीचे आणि कापणीचे हंगाम हे यज्ञकर्मास मुख्य होत. इतरही अनेक प्रसंग अर्चा आणि यज्ञ यास महत्त्वाचे मानले जात; त्यामुळे महिन्यांचे आणि ऋतूंचे फरक चटकन प्रजेच्या लक्षात भरत. मंदिरसंस्था हें लोकांचें पंचांग अथवा टेबलावरील कॅलेंडरच बनले होते, कारण केव्हा कोणत्या काळीं काय करावयाचे, याची बिनचुक नोंद पुरोहित मंदिरात ठेवीत. योग्य कालीं आणि योग्य प्रसंगीं यथासांग कर्म घडलें नाही आणि प्रजेवर संकट आले तर त्या संकटाचे कारण देवतेचा प्रकोप होय असे मानत असत; म्हणून कालमापनाला यथासांग यथाकाल कर्माकरिता महत्त्व प्राप्त झालें.

सणाकरिता आणि उत्सवार्थ जसे लोक समुदायाने मंदिरात जमत, त्याप्रमाणे वैयक्तिक कारणास्तवहि ते मंदिरात जात असत व व्यक्तिशः पूजा प्रार्थना करून देवतेची कृपा संपादन करीत असत. मंदिरातील पुरोहित केवळ धार्मिक आराधनेतच तज्ज्ञ नसे, तर त्याला जादू, वैद्यक आणि फलज्योतिषहि येत असे. शरीराचे व्याधी आणि मनाची दुखणी बरे करण्याचे सामर्थ्य पुरोहितात असे.

ईजिप्त आणि बाबिलोनिया येथील मुख्य देवमंदिराची मांडणी एका ठराविक दिशेकडे तोंड करून असावयाची. बाबिलोनियामधील देवळे प्रामुख्यानें अगदीं पूर्वाभिमुख असत. सूर्य ज्या दिवशीं बरोबर पूर्वेस अगदीं मध्यभागी उदयास येतो, त्या मध्यभागास अभिमुख अशीं तीं देवळे असत. शुद्ध पूर्वेस सूर्योदयाच दिवस म्हणजे एकवीस मार्च आणि एकवीस सप्टेंबर होत. मार्चे महिन्यांतच युफ्राटिस आणि तैग्रिस नद्याना पूर येत असत. गिझे येथील पिर-

मिड हे सुद्धा पूर्व पश्चिम बांधले आहेत. इजिप्तमधील नाईल नदीच्या खोऱ्यांतील मुख्य मंदिरें पूर्वाभिमुखच सापडतात. परंतु त्यात विशेष असा कीं, वर्षांत सगळ्यांत मोठा दिवस जो असतो त्या दिवशीं सूर्य क्षितिजावर ज्या पूर्वबिंदूवर उदय पावतो त्या बिंदूस अभिमुख तीं मंदिरें बांधलेलीं आहेत. याचें कारण असें कीं, नाईल नदीला प्रथम पूर त्याच सुमारास येतो. कांहीं मंदिरें विशिष्ट तारकांच्या उदय-दिशेस अनुलक्षून बांधलेलीं दिसतात. तात्पर्य, सूर्य आणि आकाशस्थ इतर ज्योति यांच्याशीं मंदिरस्थ देवतांचा संबंध गृहीत धरलेला होता. पेकिंग शहरांतील एक स्वर्गदेवतेचे मुख्य मंदिर हिवाळ्याच्या मध्यभागातील सूर्योदयाची दिशा ध्यानात धरून तदभिमुख बांधले आहे. चिनी सम्राट वर्षारंभाच्या दिवशीं प्रतिवर्षी स्वर्गदेवतेची पूजा व यज्ञ करीत असे.

### जगांतील पहिला राजा

देवमंदिर संस्थेतच कालगणनेस खरा प्रारंभ होऊन ज्योतिष आणि गणितविद्या निर्माण झाल्या. ईलियट् स्मिथ् हा संस्कृति-शास्त्र पंडित म्हणतो कीं, ज्या ईजिप्तमधील पुरोहिताने नाईल नदीच्या पुराचे वार्षिक गणित ठरवून पेरणीचा काल सांगितला आणि पाटबंधाऱ्याची पद्धत शोधून काढली तोच जगांतला पहिला राजा झाला; आणि तोच देवाचा पहिला अवतार ठरला. ज्योतिष, गणित आणि लेखन या विद्यांची वाढ प्रथम पुरोहितांनीं देवळात आणि यज्ञशालेत बसून केली, याचीं प्रमाणे प्राचीन इतिहासात फार मिळतात. लोकांना अदृश्य शक्तींची भीति दाखवून, जादूटोणा करून, भाकड पुराणकथा सांगून, जप, मंत्र, तंत्र इत्यादिकांच्या नादीं लावून नागविणारा सामाजिक वर्ग अशी पुरोहितवर्गाची हेटाळणी अनेक आधुनिक विद्वान् करीत असतात. त्यात जरी कांहीं तथ्यांश असला, तरी पूर्वग्रहदूषित नसलेल्या इतिहास-तत्त्ववेत्त्यास हे माहीत आहे कीं, मनुष्यजातीच्या बौद्धिक आणि आध्यात्मिक संस्कृतीचे खोल व अढळ अधिष्ठान पुरोहितांनीं हजारो वर्षे तपश्चर्या करून रचले आहे. पुरोहितवर्ग हा प्राचीनतम संस्कृतीची मशाल पेटविणारा पहिला मनुष्यवर्ग होय. तो पहिल्यादा उदयाला आला म्हणून माणसाला बौद्धिक जीवन आणि वाङ्मय लाभले, सरस्वतीनें प्रथम पदार्पण पुरोहिताच्या बुद्धींत केले. त्याच्याच हृदयमंदिरात तिचा नृत्योत्सव प्रथम युगानुयुगे झाला आणि आतां प्रौढपणीं तिच्या महिम्यास पुरोहिताचे मनोमंदिर संकुचित वाटून ती सकल मानवजातीच्या विशाल अंतःकरणाच्या आकाशापेक्षा उंच असलेल्या महालात नृत्यार्थ उतरत आहे.

पुरातन मंदिरें म्हणजे खगोल निरीक्षणाच्या शाळा, ग्रंथालये, विद्यापीठें आणि रुग्णालये बनलीं होतीं. बाबिलोनियातील बेल्मरडूक देवाच्या मंदिरातील पुरोहितांनीं चंद्राच्या सूक्ष्म गति मोजल्या, सात ग्रहांचे फेरे तपासले. सत्तावीस नक्षत्रें आणि बारा राशी असे आकाशमंडलाचे भाग पाडले. होमरच्या महा-

काव्याच्या पूर्वी हजारो वर्षे छंदोबद्ध काव्याची रचना इजिप्त आणि बाबिलोनमधील पुरोहित करीत असत.

### विविधशास्त्रांचा उदय

पदार्थसंग्रहालये आणि खजिने पहिल्यादा देवमंदिरातच निर्माण झाले. कारण पुष्कळ काळपर्यंत पुरोहितच राजा व देवावतार मानला जात होता. त्यामुळे अमोल सुंदर वस्तू आणि संपत्ति त्याला लोक अर्पण करीत. प्रजाना जे जे कांहीं अमोल,मनोज्ञ, चमत्कृतिजनक, चिरकालिक संग्राह्य, चिररक्षणीय आणि गोप्य वाटे ते सगळे रक्षण करण्याचे स्थान मंदिरच दिसे. हिरोडोटस ( इ. स. पू. ४८५–४२५ ) या जगातल्या पहिल्या ज्ञात ग्रीक इतिहासज्ञाने असे म्हटले आहे कीं, प्रवासार्थ ज्या ज्या देशात तो गेला तेथे तेथे उत्साहपूर्ण माहिती पुरोहितवर्गाने प्रामुख्याने दिली; त्याचप्रमाणे महत्त्वाचीं इतिहाससाधने पुरोहिताकडूनच त्यास मिळालीं. मंदिरात संपत्ति प्रथम मोठया प्रमाणात साठली, आणि मोठे खजिने निर्माण झाले. संपत्तीचा संचय हा मनुष्याच्या संस्कृतीचा भौतिक पाया होय. संचय हा आपद्‌काली, दुष्काळात, युद्धात आणि महत्त्वाच्या गरजा उत्पन्न झाल्या असता उपयोगी पडतो. जीवनाच्या प्रथम व तातडीच्या गरजा भागवून जे लोक संचय करण्यास समर्थ होतात, तेच सुधारणा आणि संस्कृति निर्माण करून सुसंस्कृत बनू शकतात. देवळात प्रथम लक्ष्मी वास करू लागली. महत्त्वाचीं सामुदायिक हिताचीं कार्ये, हीं लक्ष्मी करू लागली. तिचा व्यवहार इतका वाढू लागला आणि इतका देवघेवीचा विविध व्याप तिने निर्माण केला कीं, माणसाची स्मरणशक्ति तिची नोंद करण्यास असमर्थ ठरली. म्हणून त्या व्यापातून लेखन आणि गणन निर्माण झाले. मनाने किती ध्यानात ठेवावे आणि बोटानीं किती मोजावे, मन आणि वाणी थकली आणि बोटे अपुरीं पडलीं म्हणून लेखन आणि गणन उत्पन्न झाले. अक्षरे आणि अंक याचे अद्‌भुत सामर्थ्य सूर्य, चंद्र, भूमी, वायू आणि नद्या याच्या इतकेच वाटू लागले, म्हणून त्याचे देवत्व तितकेच प्रभावी वाटू लागले. कोणत्याही वस्तूच्या सामर्थ्याचा प्रत्यय भक्ति आणि विस्मय यानीं भरून जाई. म्हणून नैसर्गिक वस्तूंच्या पूजेबरोबर मानवनिर्मित वस्तूचीही पूजा त्या वेळचे मन करू लागे. आपणच निर्माण केलेल्या वास्तूची आणि आपणच शोधलेल्या अक्षरात्मक, वर्णात्मक आणि अंकात्मक संकेताची मातृवत् पूजा मातृका म्हणून मनुष्य करू लागला. शुद्ध, शांत, स्वच्छ, भावनारहित व रुक्ष बौद्धिक व्यापार त्या वेळच्या माणसाच्या मनाला क्वचित् माहीत होता. भावनाचे रंग त्यात मिसळलेले असत. अव्यक्त, अमूर्त कल्पनाचीं साधने उपलब्ध झालीं नव्हतीं, अशा वेळीं लेखन आणि गणन सुरू झाले. देवळातल्या पेढ्यामधून व्यापारी देवघेव आणि

सावकारी प्रथम सुरू झाली. इजिप्तमधील या सावकारी पेढ्यांतील कारकून, कुळें आणि सावकाराचें कर्ज आणि सरकारी करवसूल करणारे शिपाई यांची पांच हजार वर्षांपूर्वीचीं चित्रें ब्रिटिश म्यूझियममध्ये पाहावयास मिळतात.

लेखन, गणन, ज्योतिष इत्यादि विद्यांच्या बरोबर महान् स्थापत्य, मंदिरांबरोबरच अस्तित्वात आले. मंदिरें, मनोरे, कबरस्थाने इत्यादि पाषाणांच्या किंवा पक्क्या विटांच्या वास्तू हजारों वर्षे टिकाव्या अशा रीतीने इजिप्तमधील लोकांनीं बांधल्या. अशा तऱ्हेचे स्थापत्य मोठमोठ्या सांघिक प्रयत्नाशिवाय निर्माण होणे शक्य नसते. त्या पांच हजार वर्षांपूर्वीच्या काळांत मनुष्याची साधनसामुग्री इतकी चांगली नव्हती. लोखंडासारख्या कणखर धातूंचा शोध झाला नव्हता, अशा वेळीं संघाच्या हिंमतीवरच अशीं चिरस्थायी कार्ये घडतात. इजिप्तमधील पहिले राजे फरोह पुरोहित होते. इजिप्तमधील लोक राजास सूर्यदेवच समजत. सूर्यदेवास ओसिरिस म्हणत. जमिनींतील सुपीकपणा, स्त्रींतील जननशक्ति व गायींतील दुधाळपणा सूर्याकडून मिळतो. तोच सूर्य राजा आणि पुरोहित बनून मनुष्यांच्या उपकाराकरतां पृथ्वीवर येतो असे ते समजत. इसिस् नांवाची पृथ्वीरूप व आकाशरूप गो देवता आणि थोथ लुनुस् नांवाची विद्यादेवता सुद्धां त्या पुरोहित राजांत वास करते, असे ते मानीत. तो राजा सर्व रोग, पिशाच, राक्षस इत्यादिकांचे निवारण करून ऋतूंचे चक्र फिरवितो आणि शेती पिकवितो असे त्यांस वाटे. म्हणून राजाच्या हातून शेत पेरणीचा समारंभ ते करीत. राजाचें जीवनतत्त्व कायम राहावे म्हणून ते लोक राजा प्रत्यक्ष मेला तरी त्याचे शरीर कुजून नष्ट होऊं नये म्हणून प्रयत्न करीत. त्याकरतां अनेक जीवनद्रव्यांचा शोध त्यांनीं केला. ते शरीर अबाधितपणे सुरक्षित राहावे म्हणून त्यांनीं अत्यंत मजबूत बांधकाम शोधून काढले. राजवंशाची अखंड परंपरा टिकविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. सूर्य जसा जीवमात्राचा प्राण आहे, त्याप्रमाणे राजा हा समाजाचा प्राण होय, असे इजिप्तची प्रजा मानीत असे, म्हणून त्यांनीं राजपरंपरेला चिरंतन ठेवण्याकरतां राजांचीं जीं मंदिरें आणि कबरस्थाने बांधलीं तीं चिरंतन राहावीं अशा हेतूने बांधलीं. त्यांची धर्मनिष्ठा हीच राजनिष्ठा होती. ती किती दृढ होती, याची साक्ष इजिप्तचे पिरॅमिड हजारो वर्षें देत आहेत.

### विविधसंस्था व संस्कार यांचें प्राचीन स्वरूप

राजवंशाच्या दैवी महत्त्वामुळें राजाचा वंशविस्तार ज्यावर अवलंबून ती लग्नसंस्था अत्यंत महत्त्वास पोंचली. जगांत सगळीकडे परंपरागत रूढ लग्नसंस्थेंत वधूवराच्या मस्तकावर बाशिंग बांधतात, त्याची सजावट करतात, आणि

वाजंत्री वाजवून मिरवणूक काढतात. हे बाशिंग, ही सजावट आणि ही मिरवणूक राजा-राणीसारखी असते. बाशिंग हे राजा-राणीच्या मुकुटाचीच हुबेहुब नक्कल असते. ' यथा राजा तथा प्रजा.' राजवंशाची प्रतिष्ठा ही समाजाच्या जीवनाची प्रतिष्ठा. प्रत्येक कुटुंबसंस्थेस लग्नाचें महत्त्व राजाच्या लग्नाइतकेंच आहे. त्यामुळे लग्नसंस्था महतीस पोचली. जगातील लग्नसस्था ही इजिप्तच्या लग्नसंस्थेचें अनुकरण आहे, असे जरी ईलियट स्मिथप्रमाणे मान्य केले नाहीं तरी एवढें खरें कीं, राजसंस्थेच्या स्थैर्यास लग्नबंधन हे कारण आहे; ही गोष्ट समाजाला अत्यंत उत्कट रीतीने पटते. सत्ताधीशाच्या लग्नसंस्थेचे अनुकरण प्रजाजन त्वरित करतात. जन्म, मृत्यु, पौगंड, प्रौढावस्था हीं व अशीं जीवनातील स्थित्यंतरे मनुष्याच्या आयुष्यात अत्यंत महत्त्वाचीं असतात. त्यामुळे नवे मानवी संबध उत्पन्न होतात किंवा त्या संबंधात बदल होत असतात. संस्कृतीच्या प्रारभावस्थेत हे संबध अत्यंत गूढ शक्तींच्या नियत्रणाखालीं असतात असे वाटत असल्यामुळे त्यासंबंधाची पवित्रता आणि महती अलौकिक वाटते. म्हणून धर्मविधीच्या रूपाने हे पावित्र्य गूढत्व, आणि महत्त्व प्रकट होतें. कुटुंबसंस्थेतील धार्मिक संस्कार यासंबंधाचे गांभीर्य व्यक्त करतात. कौटुंबिक संबध धर्मानें प्रथम दृढ केले.

जगातील महानद्याच्या काठीं कृषिकर्म उच्चतर अवस्थेस पोचून स्थिर राष्ट्रे निर्माण झालीं आणि त्याबरोबरच कुटुंबसंस्था आणि राज्यसंस्था विकसित झाल्या. राज्यसंस्था ही मानवी इतिहासाच्या खऱ्या युगास प्रारंभ करते. सुधारणेचे आणि सुसंस्कृतपणाचें ते प्रथम लक्षण होय. त्याच्या पूर्वीच्या मानवी स्थितीला रानटी म्हटले तर जास्त समर्पक ठरेल. प्रथमतः राज्यसंस्था हेच धर्मपीठ होते. राजाच भूदेव होता. त्यानेच कृषिकर्माला महत्त्व आणून लोकाना स्थिर जीवन प्राप्त करून दिले. इजिप्तचे आणि सुमेरचे पहिले राजे पुरोहितच होते. त्यानीं लोकावर जे राज्य केले त्यास तलवारीपेक्षा दैवी शक्तीचा पाठिंबा अधिक होता. तलवारीचा वार दिसू शकतो, परंतु दैवी प्रकोप अदृष्टपणे प्रहार करून जातो, आणि रडावयास लावतो, म्हणून धार्मिक अधिष्ठानावरून राज्य करणे अधिक सुकर जाते. धार्मिक अवतार असलेला राजा प्रजेच्या मानेवर न बसता, मनावर ताबा चालवून, राज्यव्यवहार आणि कायदा अमलात आणतो. पुरातन सुमेरमधील आणि एकदरीत असुर राष्ट्रांमधील राजसंस्था इजिप्तप्रमाणें धार्मिकच होती. परंतु इजिप्तप्रमाणे सगळ्या अथवा अर्ध्या असुर राष्ट्रावर एकछत्री राज्य प्रथम नव्हतें. तेथे भिन्न भिन्न गांवांवर व प्रदेशावर भिन्न भिन्न पुरोहितांचें वर्चस्व होतें; आणि त्याच्यांत कायमची तेढ व चढाओढ असे.

त्यांचे देव आणि कर्मकांड प्रत्येकीं थोडे थोडे भिन्न असे. त्यामुळें सेमेटिक लोक जिंकीपर्यंत त्यांच्यांत एकी कधींच झाली नाहीं. त्याचा परिणाम असा झाला कीं, पुरोहित-राज्यें डबघाईस आलीं. शांततेच्या काळात पुरोहित राज्यांतील दोष इतके उघडकीस येत नाहींत, ते युद्धकालांत येतात. पुरोहित राज्याच्या शांततामय संस्कृतींतील मंदिरांत आणि नागरिकांच्या घरांत साठलेल्या लक्ष्मीच्या लोभाने वखवखलेल्या सेमेटिक लोकांनीं स्वाऱ्या करून तीं राज्यें धुळींत मिळ-विलीं. परंतु प्रजेच्या मनावरील देवळातील देवाचे आणि पुरोहिताचें वर्चस्व कायमच राहिले. बाबिलोनियामध्ये देऊळ आणि राजमहाल अशा दोन प्रति-स्पर्धी शक्ति निर्माण झाल्या.

### ब्रह्मक्षत्रांचा लढा

प्राचीन संस्कृतींच्या इतिहासातील ब्रह्मक्षत्राचा प्रसिद्ध लढा हा अशा रीतीने सुरू झाला. जेव्हा राजा पुरोहिताशीं संगनमत करून आणि तद्देशीय देवाधर्माशीं जुळते घेऊन राज्य करी, तेव्हा व्यवस्था आणि शांतता चिरकाल टिके. मागासलेल्या हीन संस्कृतींतील राजानीं लष्करी सामर्थ्यावर राज्य मिळ-विले तरी तेथील पुरोहितवर्ग विद्याविभूषित असल्यास ते टिकणे दुरापास्त होई. युगानुयुगे ब्रह्मक्षत्रामध्ये झगडा आणि पुनर्मीलन याचा इतिहास चक्रने-मिक्रमाने घडत होता. पुरोहित आणि राजा, विद्वत्ता आणि नैसर्गिक बुद्धि-चापल्य, पुराणविद्येची परंपरा आणि प्रतिभाशाली इच्छाशक्ति याच्यामध्ये हा झगडा होई, आणि त्याचे समीलनहि होई. कित्येक वेळा पुरोहित हा परंपरेचा अभिमानी, रूढिनिष्ठ आणि कल्पनाशक्तिशून्य असावयाचा तर विजयी राजा सुधारणाप्रिय, कल्पनाकुशल आणि नवजीवन भरणारा असावयाचा; उलट कित्येक वेळा पुरोहित हा ज्ञानाचा दीप घेऊन प्रगतीचा वाटाड्या बनावयाचा आणि राजा मात्र सामर्थ्याने धुंद व प्रतिगामी असावयाचा. आर्य लोकांच्या इतिहासात राजा हाच पुरोहित, ही अवस्था कोठेही दिसत नाहीं. ब्राह्मण आणि क्षत्रिय यांचे द्वंद्व त्यांच्या संस्कृतीच्या प्रारंभापासून दिसते. केवळ राजहीन समाज-संस्था कधींकाळी होती, असें हिंदुस्थानातील आर्यांच्या ग्रंथात म्हटले आहे. परंतु पुरोहितच राजा, अशी संस्था स्पष्टपणे मान्य नव्हती असे दिसतें. मनुस्मृ-तींत मात्र एके ठिकाणीं म्हटले आहे कीं, सेनापतित्व, राजपद आणि दंड कर-ण्याचा अधिकार हे सर्व वेदवेत्ता धारण करू शकतो.

पुरोहितावर मात करून वर आलेला पहिला बाबिलोनियातील सम्राट् खमूरब्बी किंवा हंम्मूरब्बी हा होय. परंतु याला सुद्धां तेथील पुरोहिताचा आशीर्वाद मात्र घ्यावा लागला. आणि तेथील देवतांना शरण जावें लागलें. सुमेरिया आणि अक्काडिया येथे पाटबंधाऱ्याच्या कामाचा समारंभ करताना त्याने जो

लेख लिहून ठेविला आहे, त्यात तो म्हणतो की, अनु आणि बेल या देवाच्या आज्ञेवरूनच मी सुमेर आणि अक्कड यावर राज्य चालवितो. जगातील सगळ्यात पुरातन म्हणून सापडलेला लिखित कायदा हंमुरब्बीचा होय. त्या कायदेग्रंथाच्या प्रारंभीं असें चित्र आहे कीं, त्यात हंमुरब्बी शमश नामक देवाकडून कायद्याचा ग्रंथ प्रसाद म्हणून स्वीकारीत आहे. सगळ्या असुर राष्ट्राला लागू पडणारा व्यापक कायदा देवाच्या कृपेने या अतिपुरातन सम्राटाला मिळाला, असेच त्या वेळच्या राज्यसंस्थेला म्हणावे लागले. एवच, कायदाही धर्मानें जन्माला पहिल्यादा घातला असेच इतिहासाच्या तत्त्वज्ञास म्हटले पाहिजे. मानवजातिशास्त्रज्ञानी कायद्याला मूळभूत असलेल्या धार्मिक कल्पनाचा आणि भावनाचा शोध प्राथमिक स्थितींतील मानवी समाजात केला आहे. उच्च धर्मांतील विधिनिषेध, पापपुण्ये आणि पावित्र्यापावित्र्य, याचेहि त्याच प्राथमिक धर्मकल्पनात आणि धर्मभावनात मूळ आहे. माना (Mana) आणि ताबू (Taboo) या संज्ञानीं त्या भावना आणि कल्पना सागितल्या आहेत. सृष्टीच्या आणि जीवनाच्या अनुभवाच्या आधारावर प्रत्यक्ष मानसिक आणि बाह्य व्यवहार प्राथमिक मानव जेव्हा करीत होता, तेव्हा त्याच्या अनुभवाने जे वस्तूंचें आणि आचरणाचे वर्गीकरण केले त्यात तर्कबुद्धि बीजरूपानेच काम करते. विचाराचे संवेदनात्मक आणि भावनानिष्ठ स्वरूप असतें. माना या संज्ञेने पवित्र, सामर्थ्ययुक्त, मगल, हृद्य असे जे पदार्थ त्याच्यातील शक्ति व्यक्त केली जाते. वीरपुरुष, सुदर स्त्री, उमदा घोडा, चपळ जनावर, भरारी मारणारा शोभिवत पक्षी, औषधि गुणयुक्त वनस्पति, तरतरी आणि जोम उत्पन्न करणारे अन्न, अथवा रसशुद्ध जलाचा प्रवाह, सूर्यचद्राचे किरण, प्रार्थनामत्र इत्यादि पदार्थांचे ठायीं आणि जीवनोपकारक वर्तनक्रमात माना ही शक्ति राहते. उलट कर्कश स्त्री, आळशी पुरुष, मठ्ठ जनावर, रोगकारक अन्न, अहितकारक वर्तन, वाईट हवापाणी, आणि दूषित जमीन इत्यादींबद्दलची निषिद्धता ताबु या संज्ञेने व्यक्त होते. वरील योग्य आणि अयोग्य पदार्थांसंबंधी वर्तनाचे नियम प्राथमिक मानवात तयार झाले आणि पुढे संस्कृतीचा व्याप वाढल्यावर त्यातून नीति, कायदा आणि धर्मतत्त्वे निष्पन्न झालीं.

इजिप्त आणि बाबिलोन ( अथवा असुर राष्ट्रे ) यामध्ये धर्मसंस्थेंने मानवी संस्कृतींत जी चिरस्थायी भर घातली त्याचा संक्षिप्त आढावा वर सागितला. मूर्तिकला, स्थापत्य, उन्नत कृषि-कर्म, वैद्यक, लेखनकला, ज्योतिष, गणित, राज्यसंस्था आणि कायदा, अशा प्रकारच्या मानवी संस्कृतीच्या व्यापक आधारांची स्थापना इजिप्त आणि असुर राष्ट्र यानीं केली. या व्यापक सास्कृतिक आधारांची रचना सामर्थ्यसंपन्न धर्मप्रेरणेनेच केली. त्या धर्मप्रेरणेंत मनुष्याची आकांक्षा मृत्यूवर विजय मिळवून स्वर्गाला पोचणारा मार्ग निर्माण करण्यापर्यंत

आणि स्वर्गाचें साम्राज्य हस्तगत करण्यापर्यंत पोचली; म्हणूनच ती या वास्तविक सृष्टींतील अनंत अडचणींना उल्लंघून वर निर्दिष्ट केलेले सांस्कृतिक कार्य करूं शकली. ' मी अमर कसा होईन ' हाच प्रश्न भौतिक साधनांच्या द्वारें सोडविण्यास घेतला, म्हणून इजिप्तमधील मानवजातीला या मृत्युलोकांतील जीवनयात्रा स्थिरपणे करता येईल असा सामाजिक संस्कृतीचा पाया रचता आला. प्रतिक्षणीं ग्रासू पाहणाऱ्या काळाला दोन हात दूर ठेवून काहीं काळ जगता येईल, असे आश्वासन मनुष्याने त्या संस्कृतीकडून मिळविले. इजिप्तनंतर व असुर राष्ट्रानंतर इतिहासात इराण व हिंदुस्थानमधील आर्यसंस्कृतीचा क्रमांक येतो. त्याच संस्कृतीच्या समकालात किंवा किंचित् नंतर युरोपांतील आर्यसंस्कृतीच्या वसाहतींचा इतिहास घडत होता. परंतु ऋग्वेदाइतके प्राचीन उत्तम अवशेष त्याच्यांत उपलब्ध नाहींत. कदाचित् असें संभवते कीं, त्या समयीं चिरस्थायी मूल्यांची सांस्कृतिक प्रेरणा तेथें मंदावलीहि असेल. म्हणून इजिप्त आणि असुर राष्ट्रें यांच्यानंतर भारतीय आर्य आणि इराणी आर्य यांचा क्रमांक येतो. याच समयास अतिपूर्वेस चीन देशातहि संस्कृतीची भव्य उभारणी सुरू होती. परंतु त्यात केवळ धर्मसंस्थेचा प्रभाव किती होता, याचे मापन करणे कठीण आहे. एवढेच सामान्य विधान करता येतें कीं, सूर्यरूपी, स्वर्गरूपी किंवा आकाशरूपी परमात्म्याचा प्रतिनिधि किंवा पुत्र, सम्राट् या रूपाने मानवदेह धारण करून जगावर राज्य करतो; तोच सगळ्यांचा पिता आणि कल्याणकर्ता होय अशी धर्मकल्पना अतिपूर्वेकडील मानवी जगावर आपले प्रभुत्व गाजवीत होती. म्हणून हजारो वर्षें एकाच राजसिंहासनाखालीं ते मानवी जग नांदले. तेथे कुटुंबसंस्था चिरंजीव झाली, कृषि, हस्तव्यवसाय, नौकानयन, लेखन-मुद्रण इत्यादि व्यवसाय फार प्रगल्भ झाले. परंतु तेथील मनुष्याने सम्राटाचें दास्य आणि पितृनिष्ठा हा श्रेष्ठ धर्म मानला. त्यामुळे त्याच्या व्यक्तित्वाची वाढ झाली नाहीं, कारण स्वतंत्र अशा सदसद् विवेकाची अंतःकरणात वाढ होऊं शकली नाहीं.

### वेदकालीन धर्मकल्पना

हिंदुस्थानात अति पुरातन काळीं असुर राष्ट्राप्रमाणें एक संस्कृतियुक्त राष्ट्र सिंधुतीरावर वसले होते असे अलीकडच्या उत्खननावरून दिसते. परंतु त्यांतील इष्टका लेखांचा अर्थ अजून लागला नाहीं; म्हणून ऋग्वेदरूपी वाङ्मय हेच प्राचीनतम साधन अजून तरी मानले पाहिजे. ऋग्वेदापासून उपनिषदापर्यंतच्या काळात जी आर्यसंस्कृति नांदली तिने शाश्वत मूल्यांचे तत्त्वज्ञान निर्माण केलें. इजिप्त व असुर राष्ट्रें यांच्यापेक्षा भिन्न असे हें नितान्त महत्त्वाचे वैशिष्ट्य आर्य संस्कृतीचें आहे. तत्त्वज्ञान हें सर्व विद्यांचें सार होय आणि ते मार्गदर्शक म्हणून ज्ञानसाधनेत राहते. अत्यंत मूलभूत आणि वरिष्ठ अशा विचारांचा

आणि प्रश्नाचा परामर्ष घेणे हे तत्त्वज्ञानाचे एक मुख्य कार्य असते. वैदिक तत्त्वज्ञानाने असे कार्य निश्चितपणे केलें आहे. आजच्या पाश्चात्य विद्येच्या परिसीमेला पोचलेल्या शिक्षितासही जे विचार आणि प्रश्न गूढ वाटतात आणि ते सोडविण्यात व त्याचे मनन करण्यात परमार्थसाधनेचा आनद होतो असे विचार आणि प्रश्न वैदिक तत्त्वज्ञानाने उपास्थित केले आहेत. त्यानीं विश्वाचा आणि जीवनाचा तळापासून ठाव घेऊन त्यात जो अर्थ निश्चितपणे पाहिला तो आज जरी त्यावर अधिक वैचारिक सस्कार केल्याशिवाय ग्राह्य वाटला नाहीं तरी त्याची उची आणि खोली, मानसिक गाभीर्य निर्माण केल्याशिवाय राहत नाहीं. ज्ञानाची निष्काम उपासना करण्यात मोक्ष आहे, ज्ञानानद हाच परमार्थ आहे, तत्त्वचिंतन हे एक स्वतःसिद्ध मूल्य आहे, या गोष्टींची शिकवण वैदिक तत्त्वज्ञान देते. हे तत्त्व ज्या सस्कृतीला लाभते ती सस्कृतीच मनुष्याला अमरत्वाचे आश्वासन देऊन ते पूर्ण करू शकते.

वैदिक तत्त्वज्ञानाने त्या काळात युरोपपासून तो चीनपर्यंत आणि पामीरपासून सिलोनपर्यंत पसरलेल्या धर्मसस्थेला नष्ट न करता उदात्त स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. जलचर प्राणी, वृषभ, अश्व, गो, वराह, अर्धपशू, अर्धमनुष्य, आकाशस्थ गोल, भूमी, नदी, पर्वत, वृक्ष, सरोवर इत्यादि मूर्त वस्तूची आणि प्राण्याची पूजा करणारे, त्याचे ठायीं देवत्व स्थापून तदर्थ यज्ञ बलिदान इत्यादि प्रकारची अर्चा करणारे जे संप्रदाय जगात पसरले होते त्याना हीन धर्मकल्पनांच्या बंधनातून मुक्त करणारा विचार वेदानीं प्रथम सागितला. सर्व चराचर विश्व हे एकच ईश्वराचे स्वरूप आहे हा सदेश वेदानीं दिला. वृषभपूजक आर्योना आणि असुराना सागितले कीं, तो वृषभ विश्वरूप विराट स्वरूपाचा आहे. असेच गोपूजक, अश्वपूजक आणि मनुष्यपूजक इजितमधील धर्म-सप्रदायासारख्या सप्रदायाना सागितले. गोपूजकास सागितले की, ती पूजार्ह गो म्हणजे विश्वात्मक अदिति देवता आहे. ती त्रैलोक्यरूप आहे, सूर्य, समुद्र, नक्षत्रें, पृथ्वी इत्यादि तिच्याच विभूति आहेत. जे मानवमूर्तिधारी ईश्वराचे पूजक संप्रदाय होते त्याना सागितले कीं, हा विश्वाचा शास्ता म्हणजे विराट पुरुष होय. अशा रीतीने जगातील ईश्वरी प्रतीकाच्या सर्व उपासकाना 'तीं प्रतीकें एकाच विश्वात्मक परमात्म्याचे आविर्भाव आहेत, असे आश्वासन दिले आणि विश्वधर्म-समन्वयाचा मार्ग सागितला. हे तत्त्व हिंदुस्थानातील अगणित परस्परविरोधी धर्मसंप्रदायाना एकत्र गुंफण्यास समर्थ झाले. या तत्त्वामुळे हीन भोळसट, अक्राळविक्राळ, मौर्ख्यपूर्ण धर्मविचाराना कांहींसा पायबद बसला. मात्र ते मानवी मनाला तज्जन्य अज्ञान, दौर्जन्य आणि हृदयदौर्बल्य यातून मुक्त करूं

शकलें नाहीं व अडाणी कर्मकाड मारू शकले नाहीं. विरोधाचे दुर्धर विष मात्र त्यानें हिंदुस्थानातील धर्म–संप्रदायातून नष्ट केले.

### विश्वरहस्य उकलण्याचा यत्न

वैदिक तत्त्वज्ञानाने, विश्व हीं एक महान् शरीरवत् संघटना(organism) आहे, तिच्यामध्ये एक प्रकारचे इंद्रियसंस्थेप्रमाणे संवादित्व आहे, हे तत्त्व वारंवार सांगितले आहे. आणि त्याची रूपकात्मक तुलना मत्स्य, वृषभ, अश्व, गो, अज, मनुष्य, इत्यादिकांच्या शरीररचनेशीं केलेली आहे. अधिक तात्त्विक भाषेत तर असे म्हटले आहे कीं, विश्वतत्त्व प्राणरूपच आहे. त्याच-प्रमाणे शरीरव्यापाराशीं आणि जीवनतत्त्वाशीं साम्य दाखवून विश्वाचे रहस्य उलगडण्याचा प्रयत्न केला आहे. प्लेटोपासून तो विद्यमान प्रो० व्हाइट हेडपर्यंत झालेल्या अनेक पाश्चात्य तत्त्ववेत्याना या तत्त्वाचे महत्त्व वाटले आहे. अशा स्थितींत यापुढेही विश्वाचा अर्थ समजून घेण्याला या वैदिक तत्त्वाचा उपयोग होणारच नाहीं, असे कसे म्हणता येईल ?

दुसऱ्या एका पद्धतीनें विश्वरहस्य सांगण्याचा प्रयत्न वेदांनीं केला आहे. त्या प्रयत्नाचे भौतिकवादाशीं बरेच साम्य आहे. विश्व हे एकाच तत्त्वाचे बनले आहे, अशी श्रद्धा दृढ धरून त्या तत्त्वाचे अनेक अर्थ विकल्पाने सांगितले आहेत. एक अर्थ असा कीं, विश्व हा वैश्वानर म्हणजे अग्नितत्त्व आहे. आकाशात जे चमकते ते अग्निरूपच असले पाहिजे; सगळे प्राणी जगतात जे जठराग्नीमुळे, म्हणजे जीवनतत्त्वहि अग्निरूपच मानलें पाहिजे. मेघात वीज दिसते, म्हणून जलाचे अंतरंगहि अग्नीच असले पाहिजे, अशा रीतीने सर्वव्यापी अग्नितत्त्व हाच परमेश्वर होय; असा वैदिक अग्निपूजकांनीं निष्कर्ष काढला. काहींनीं दुसऱ्या एका पद्धतीनें, जल हेंच जगाचे मूलतत्त्व ठरविले. काहींनीं वायू हेच मूळस्वरूप ठरविले. काहींनीं त्याहीपुढे जाऊन आकाश हेच आदितत्त्व ठरविले. उपनिष-दात विचाराची मजल यापुढे गेली, विश्वाचा मूळ आधार शुद्ध, सत्, असे तत्त्व आहे; या कल्पनेपर्यंत ते पोचले. या सत तत्त्वाची सर्वांगीण भूमिका छांदोग्य-उपनिषदाच्या सहाव्या अध्यायात मांडली आहे. या उपनिषदाचा काळ भारतीय युद्धाच्या पूर्वी मानतात. गौतमबुद्धापूर्वी पांचशे वर्षे तरी ही प्राचीन उपनिषदे झालीं होतीं; छांदोग्यउपनिषदाचा सहावा अध्याय हा जगाच्या वाङ्मयातील तार्किक विचारांचा प्रथम नमुना होय. इतक्या पुरातन काळातील वाङ्मयांत बुद्धिवादाची पद्धति व्यक्त रीतीने स्वीकारलेला हाच वाङ्मयाचा पहिला अवतार होय. यात विश्वाचे आदिकारण, स्वरूप आणि पर्यवसान शुद्ध सत् हेच होय, असा सिद्धान्त सिद्ध केला आहे. आधुनिक प्रसिद्ध जडवादाची सूचना यात आहे. आणि प्राचीन सांख्यांची जडप्रकृति आणि वैशेषिकांचा परमाणुवाद

यातून जन्मला. कदाचित् आयोनिया आणि अथेन्स्‌मधील ग्रीक तत्त्वज्ञाने तसेच अलेक्झांड्रियांतील दर्शने याना या वैदिक विचाराचा वारा लागला असण्याचा फारच संभव आहे. कारण इजिप्त आणि भूमध्य समुद्राजवळील राष्ट्रे याच्याशी भारतीयाचा संबंध सिकदरापूर्वी कैक शतके आला होता, असे ऐतिहासिक साधने सागतात. उपनिषदात वरील दोन प्रकाराशिवाय सर्वांत मुख्य ब्रह्मवाद होय. ब्रह्मवादी तत्त्वज्ञानाचे सिद्धान्त सागण्याचे हे स्थळ नाही. त्याची व्याप्ति विशाल आहे. त्याची महती सगळे ज्ञानी गातात. ते तत्त्वज्ञान मान्य केले नाही, तरी ज्ञानाच्या मदिरात त्याचे उच्चतम स्थान कोणीही नाकारीत नाही. वैदिक तत्त्वज्ञानानतर अनेक परस्परविरोधी तत्त्वज्ञाने भारतीयांनी निर्माण केली; आणि त्या तत्त्वदर्शनाची अगभूत तर्कशास्त्रे निर्माण केली. या तत्त्वज्ञानाची आणि तर्कशास्त्राची महती केवळ पुरातन ज्ञानेतिहासातील काही पायऱ्या आणि कालखड म्हणून इतिहासशास्त्र मान्य करतेच. परतु त्याची विचारप्रवर्तकतेची शक्ति अजून खुंटली नाही, हेही त्याचे मननान्ती सिद्ध होते. मात्र त्याची पुन्हा तपासणी करून, तथ्यातथ्य विभाग करून, नवी माडणी केली पाहिजे. ही तत्त्वज्ञाने धार्मिक चिंतनातूनच प्रादुर्भूत झाली आहेत.

तत्त्वज्ञान आणि तर्कविद्या याच्या इतकीच महती भारतीयाच्या भाषाज्ञानाला आहे. आधुनिक भाषाविषयक शास्त्रे प्राचीन भारतीयाच्या भाषाभ्यासाचेच फळ आहे. तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्र हे पाणिनीय व्याकरणामुळेच शक्य झाले आहे. युरोपातील भाषाच्या मूळ स्वरूपाची कल्पना प्राचीन भारतीयांनी केलेल्या भाषाविषयक परिश्रमाशिवाय युरोपियनाना आली नसती. भाषेचे चिंतनहि प्राचीन भारतीयांनी ते एक वेदाग आहे अशा धार्मिक भावनेनेच केले.

सर्व भौतिक विज्ञानाचा पाया असलेली गणितविद्या भारतवर्षांत काही बाबतींत सगळ्या जगाच्या पुढे गेली होती. विशेषतः अकगणित आणि बीजगणित या दोन शाखातील मूलभूत तत्त्वे प्राचीन भारतीयांनीच शोधून काढली. दशाकपद्धति आणि शून्य याचा शोध यज्ञविद्येचे परिशीलन करतानाच झाला. शतपथ ब्राह्मणात शून्याची बेरीज व शून्याची वजाबाकी याचे रूपक ब्रह्माच्या सृष्टिव्यापाराला लागू केले आहे. बाराव्या शतकातील भास्कराचार्य अठराव्या शतकातील फ्रेंच गणिती आणि ज्योतिषी लाग्राज याच्याबरोबर होता.

वरील शुद्ध बुद्धीच्या क्षेत्रातील पराक्रमाची स्फूर्ति जशी वैदिकधर्माने दिली त्याचप्रमाणे कलेच्या क्षेत्रातही दिली. रामायण आणि महाभारत ही महाकाव्ये जन्माला येण्याच्या अगोदर राजसूय आणि अश्वमेध या यज्ञामध्ये वीरकथाचे काव्यमय गान होत होते. त्यालाच विस्तार आणि संघटना प्राप्त होऊन वरील महाकाव्ये जन्मली. त्यातूनच भास, कालिदास, बुद्धघोष आणि तदुत्तर

कवींची परंपरा अस्तित्वात आली. नाटक आणि संगीत यांचे प्रयोग यज्ञात होत. आणि त्यांचीच परंपरा उत्कर्षाला पोचली. आणि देवतांच्या यात्रा आणि उत्सव यांत त्या कलांना प्रौढत्व आणि वैविध्यपूर्ण रम्यत्व प्राप्त झाले.

असुर राष्ट्रांत जगातील प्राचीनतम शासनविधान म्हणजे कायदा अथवा राजधर्मशास्त्र हे अस्तित्वात आले असे म्हणतात. परंतु हिंदुस्थानातही तसें राजधर्मशास्त्र अस्तित्वात आले असले पाहिजे. परंतु सध्या उपलब्ध राजधर्मशास्त्र हे असुर राष्ट्रांच्या उत्तरकालातील आहे. धर्मसूत्रे हा प्रामुख्याने राजधर्मच आहे. परंतु धर्मसूत्रानंतर अर्थशास्त्रे इ. सनापूर्वी निर्माण झाली त्यांचा उत्कृष्ट आदर्श म्हणजे कौटिलीय अर्थशास्त्र होय. कौटिलीय अर्थशास्त्र हा ग्रंथ जर खरोखर मौर्य चंद्रगुप्ताच्या अमात्यानेच लिहिला असेल तर त्या वेळच्या राज्यव्यवहाराच्या जागतिक ग्रंथामध्ये त्याचे अद्वितीयत्व मान्यच करावे लागेल. परंतु युरोपियन विद्वान् या ग्रंथास इ. सनाच्या तिसऱ्या चौथ्या शतकात आणून ठेवतात. आणि म्हणतात कीं, चंद्रगुप्ताच्या दरबारात असा विद्यावैभवशाली माणूस असता तर तो ग्रीक प्रवासी मेग्यास्थिनीस यास दिसलाच असता.

हिंदु धर्माने सर्व हीनोच्च धर्मांचा विभूतिवादाच्या तत्त्वाने संग्रह करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे अनायासानेच हीनोच्च गुणांच्या बहुविध तारतम्याच्या संस्कृतींचें रक्षण केले आणि तद्द्वारा संस्कृतींच्या विविध थरांत कायम रहून बसलेल्या मानवगटांची भली मोठी उतरंड निर्माण केली. आणि त्यातून जातिसंस्था जन्मली. हीनधर्मसंप्रदायांचे वैशिष्ट्य आणि हीन संस्कृतींचा वारसा या जातिसंस्थेने कायम ठेवला. व्यवसायभेद हे नैसर्गिक भेद ठरले. वनस्पति आणि प्राणि या सृष्टींतील वैचित्र्याच्या मर्यादा जशा अबाधित आणि अनुल्लंघनीय असतात, त्याप्रमाणे व्यवसायपरंपरा, धार्मिक चालींच्या परंपरा, सामाजिक रीतिभातींच्या परंपरा अबाधित आणि अनुल्लंघनीय ठरविल्या. त्यामुळे मनुष्याचे मन आणि व्यवहार अत्यंत संकुचित, कृत्रिम, पोकळ, व्यर्थ, अडगळीवजा असलेल्या संप्रदायांच्या बंधनात बंदिस्त झाले. मनुष्याच्या विकासप्रवण शक्तींची पूर्ण कुचंबणा झाली. बंधनाच्या उंच, खडबडीत, काळ्या, अगणित भिंतींच्या बनलेल्या हिंदुसमाजसंस्थेच्या जुनाट वाड्यात मोकळा वारा आणि सूर्यप्रकाश यांचा मागमूसहि राहिला नाहीं. कोंदट, अंधाऱ्या हजारो खोल्या बांधलेल्या तिळ्लेवजा असलेल्या भयाण वाड्यासारखे भारतीय हिंदूंचे सामाजिक जीवन झाले. मनुष्याने निर्माण केलेल्या आणि कल्पिलेल्या बंधनांना आणि भेदांना निसर्गांतील नियमांचे आणि भेदांचे स्वरूप देणारा धर्म हा दीर्घकालीन, सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक अवनतीला कारण होणारच. त्यामुळें व्यापक कायदा लागू पडेल असा समाज अस्तित्वांत आला नाहीं; आणि त्याच

